


[ ९ ]

[ राजगुरुबरोबर आलेल्या सैनिकांनीं ब्रह्मदंडी मांत्रिकाच्या शोधार्थ सारी गुहा हुडकून काढली. त्यांना काळभैरवाच्या मूर्तीखालीं एक चोरवाट सांपडली. आंत गुहेंत ब्रह्मदंडी लपून बसला असेल असें समजून त्याला बाहेर काढण्याच्या हेतूनें राजगुरुच्या आज्ञेप्रमाणें सैनिकांनीं गुहेच्या तोंडाशीं लाकडें एकत्र करविलीं व तेल ओतून तीं पेटविलीं. पुढें वाचा... ]

तेल पडलें असल्यानें लाकडें चटकन पेटलीं.

धुरामुळें व विस्तवाचा ताप वाढत गेल्यानें काळभैरवाखालच्या तळघरांत किंवा चोर-वाटेंत ब्रह्मदंडीला गुदमरल्यासारखें झालें. राजगुरु व सैनिक गुहेच्याबाहेर निघून गेले होते. गुहेला जर आणखी कोठें तरी द्वार असेल तर मांत्रिक त्या वाटेनें पळून जाऊं नये म्हणून राजगुरुनें आपले सैनिक जागो-जागीं नेमले.

सेनापति म्हणाला—“ राजगुरु ! या आगींत तो मांत्रिक भस्म होऊन जाणार ! निदान गुदमरून तरी मरणार !”

राजगुरु म्हणाला—“ तो एवढ्यानें मरणारा मनुष्य नाहीं. तो खात्रीनें कोठून तरी निसटून जाण्याच्या प्रयत्नांत असणार. तूं आपल्या सर्व सैनिकांना सावध रहायला सांगून ठेव. गफलत झाली तर चोर हातावर तुरी देऊन पसार होईल. कोठें दिसला तर





त्याला धरून आणून माझ्या समोर हजर करायला सांग!"

राजगुरु ब्रह्मदंडी मांत्रिकाला धरण्यासाठीं सेनापतीला बजावीत असतां तिकडे ब्रह्मदंडी चोर वाटेच्या टोकाशीं जाऊन शिळेवर आपली जादूची कांडी आपटीत होता. तो आपल्या शिष्याला बोलवीत होता. जयमल व लखूची कुजबूज त्याच्या कानावर पडली होती. त्यानें दोघांचा आवाज ओळखला होता. दोघांनीं माझा कोंडमारा करून ठार करावयाचें ठरविलेलें दिसतें आहे. तो जयमल लबाड आहे. भयंकर दरीचें गुपित त्याला कळलें आहे. मी मेलों तर माझा कांटा दूर होईल असा विचार करून त्यानें या संधीचा फायदा घेतलेला दिसतो आहे. शेवटीं तो ओरडून म्हणाला—

"तूं असा घात करशील असें मला स्वप्नांत देखील कधीं वाटलें नाहीं. पण लक्षांत ठेव. तूं अजून मला पुरेपूर ओळखलें नाहींस! माझ्या मंत्रशक्तीची कल्पना तुला आलेली नाहीं." असें म्हणत त्यानें जादूची कांडी दगडावर दोन तीनदां आपटली. पण उत्तर नाहीं. म्हणून पुन्हां ओरडला—

"ए विश्वास घातकी! गुरुद्रोही! लक्षांत ठेव! माझ्या तावडींतून तूं कसा सुटतोस तें पाहातों मी! तूं दगडापलीकडे त्या गुराख्याबरोबर उभा आहेस हें मला कळलें नाहीं असें वाटलें होय तुला! तूं एका मिनटाच्या आंत हा दगड बाजूला सरकवला नाहींस तर तुम्हां दोघांना भस्म करीन!"

त्याची ती धमकी ऐकून लखू घाबरला. जयमलनें त्याला धीर देत म्हटलें—"लखू! अगदीं भिऊं नकोस या पोकळ धमक्या ऐकून आपण दगड सरकवूं असें त्याला वाटत असेल. त्याच्याजवळ होती नव्हती ती सर्व मंत्रशक्ति हरपून गेली आहे. ब्रह्मपूरच्या एका मांत्रिकानें ती हिरावून घेतली आहे. आतां राजाच्या सैनिकांच्या हातून सुटका मिळणें ब्रह्मदंडीला शक्य नाहीं. आपण येथें लपलों आहों हें त्याला कळलें आहे. म्हणून दुष्टपणानें आपल्याला सैनिकांच्या हातीं पकडून देऊन स्वतःची सुटका करून घ्यायला देखील तो मागें पुढें पाहणार नाहीं. म्हणून आपण येथून पाय काढूं या!"

पण लखूच्या मनांत एक शंका होती. सैनिक चारी बाजूला पहारा देत असतां त्यांची नजर चुकवून पळून जाणें अशक्य आहे.

तिकडे धुरानें गुदमरून जाऊन ब्रह्मदंडी खोकत होता आणि ओरडत पण होता— "उग्रभैरवाची मूर्ती देखील ह्यांनीं फोडून टाकली. या धुरांत उभें राहणें अशक्य! मेलों! आतां सुटका नाहीं. सैनिक धरणार मला. यमयातना सहन कराव्या लागणार! वांचव! कालभैरवा!"

त्याचा तो आवाज जयमल व लखू ऐकत उभे होते. जयमल म्हणाला—"धुराचे लोट पलीकडे दिसत आहेत. स्वारी सांपडली आहे त्यांत. बिळांतून बाहेर पळवाट न सांपडलेल्या उंदराची दशा झाली आहे."



"गुरुद्रोह! इतका मोठा विश्वासघात! जयमल! तूं बोलत आहेस तें मला ऐकूं येत नसेल असें वाटलें होय तुला?" ब्रह्मदंडी ओरडला व पुन्हां खोकूं लागला.

"डोंगरावर जायला एक वाट आहे. मला माहीत आहे ती. फार तर सैनिक धरतील. पण येथें गुदमरून मरण्यापेक्षां तेंच बरें! मी सांगतों त्यांना कीं तुम्ही दोघे कोठें लपलां आहां तें." ब्रह्मदंडी म्हणाला.

ब्रह्मदंडी परत जात असल्याचें त्याच्या पावलांच्या आवाजावरून दोघांना कळलें. ब्रह्मदंडी म्हणाल्याप्रमाणें केल्याशिवाय राहणार


चांदोबा

    



नाहीं. याचा विचार करून जयमल थोडा थ्याला.

त्यानें लखूला जेथें उभा होता तेथेंच क्षणभर उभें रहायला सांगून स्वतः गुहेच्या टोकापर्यंत जाऊन गुहेच्या बाहेर डोकावून पाहिलें. त्याला दूर एका खडकावर एक सैनिक उभा असलेला दिसला. पण त्याचें लक्ष गुहेकडे नव्हतें दुसरेंच कोठें तरी होतें.

जयमल लगेच मागें वळला. आंत गुहेत जाऊन लखूला म्हणाला—"लखू! आपल्याला पळावयाचें असेल तर हीच संधी आहे. ब्रह्मदंडी आपण येथें लपलों आहे हें जाऊन सांगेल. सैनिक शोधायला येतील व आपण येथें सांपडलों नाहीं तर तोच तोंडघशी पडेल. चल, ये माझ्या पाठी-मागून!"

लखू व जयमल गुहेच्या तोंडाजवळ आले. त्यांना दूर ओरडा ऐकूं आला. मांत्रिकाला सैनिकांनीं धरलें होतें. त्याचा तो आवाज होता. इतक्यांत ब्रह्मदंडीचा कर्णभेदी आवाज ऐकूं आला. जयमल व लखू जागच्या जागीं क्षणभर उभे राहाले. आतां पुढें काय करावयाचें या विचारांत दोघे उभे असतां त्यांना एक म्हातारा तलवार उपसून एका खडका मागून हळू हळू सरकत येत असलेला दिसला. गुहेसमोर सिंहाला पाहून तो जागच्याजागीं निश्तब्ध उभा राहिला. जयमलनें त्याला ओळखलें. तो लखूला म्हणाला—"तो पहा, तुझा बाप आहे!"

लखूनें तिकडे वळून पाहिलें. खरोखरच त्याचा म्हातारा बाप होता तो.

जयमलनें खुणेनें म्हाताऱ्याला सुचविलें—"तो सिंह कांहीं करणार नाहीं. भिण्याचें कारण नाहीं. पुढें ये!" लखूच्या बापानें मुलाला ओळखलें व जयमल खूण केल्या-प्रमाणें पुढें आला.



त्यांना दुरून ब्रह्मदंडीचा मंत्रघोष ऐकूं येत होता. परंतु त्या मंत्राचा कांहीं उपयोग होणार नाहीं हें जयमल चांगलें ओळखून होता. त्यानें अनुमान केल्याप्रमाणें ब्रह्मदंडीचा मंत्रघोष एकाएकीं थांबला. कारण त्याच्या समोर राजगुरु होता व त्यानें मंत्रलेलें पाणी त्याच्या अंगावर टाकलें होतें. ब्रह्मदंडीची जणूं वाचाच बसली.

"काळभैरव! ठिकऱ्या होऊन पडला आहे पहा पलीकडे! तो तुझें काय रक्षण करणार? स्वतःचेंच करूं शकला नाहीं!" राजगुरु गरजला.

ब्रह्मदंडीचा सर्व दर्प हरपला होता. तो थरथर कांपत होता. त्यानें राजगुरूचे पाय धरले. राजगुरूनें त्याला दरडावून विचारलें—"नांव काय तुझें?" त्याचे केस धरून त्याला उभा केला आणि दरडावून म्हणाला—"राजगुरूला ओळखलें नाहींस वाटतें?"

"आतां राजगुरूनेंच या दासानुदास ब्रह्मदंडीचें रक्षण करावें!" ब्रह्मदंडी हात जोडून नम्रपणें म्हणाला.

"तूं ब्रह्मपूरच्या सेनापतीचा वध कां केलास?" राजगुरूनें ब्रह्मदंडीची शेंडी धरून त्याचें डोकें हलवीत विचारलें.

"राजगुरु तें काम माझ्या शिष्याचें आहे. मी त्याला नको म्हणत असतां त्यानें तें दुष्कृत्य केलें. तो गुरुद्रोही आहे!"

शिष्याचें नांव ऐकतांच राजगुरूनें ब्रह्मदंडीची शेंडी सोडली व विचारूं लागला—"त्यांची गोष्टच मी विसरत होतों. कोठें आहेत ते दोघे?"

"राजगुरु त्यांतला एकच माझा शिष्य आहे. दुसरा गुराख्याचा पोर आहे. दोघांची पापकर्में आतां मी काय सांगूं?" ब्रह्मदंडी स्वतःचा निर्दोषपणा दाखवीत म्हणाला.

"ते कोठें लपले आहेत हें मी विचारलें. त्यांनीं काय काय पापकर्में केलीं हें नाहीं मी विचारलें. या सर्व पापकर्मांना जबाबदार कोण आहे हें मला कळतें. कोठें आहेत दोघे?" राजगुरूनें दरडावून विचारलें.

"राजगुरु, दोघे विश्वासघातकी सिंहाच्या गुहेंत लपून बसले आहेत! त्यांना लवकर जाऊन धरलें नाहीं तर ते निसटून जातील व डोंगर देखील उतरून निघून जातील. माझ्या त्या विश्वासघातकी शिष्याला या डोंगरातल्या सर्व चोरवाटा व गुहा छान माहिती आहेत. लखू गुराख्याच्या तोंडून मी भयंकर दरीच्या संबंधी काळभैरवाची जी वाणी ऐकली ती त्या दुष्ट जयमलनें सर्व ऐकली आहे." ब्रह्मदंडी म्हणाला.

भयंकर दरीचें नांव ऐकून राजगुरूला आश्चर्य वाटलें. त्यानें पूर्वी कधीं तें नांव ऐकलें नव्हतें. तर मग हा ब्रह्मदंडी एवढ्याच-साठीं येथें राहून काळभैरवाची उपासना करीत होता व एवढ्याचसाठीं त्यानें सेनापतीचा वध करविला म्हणावयाचा. या सर्वांच्या मागें ह्या भयंकर दरीचें रहस्य आहे तर!




राजगुरूनें कांहीं सैनिकांना बोलविलें व ब्रह्मदंडीनें सांगितल्याप्रमाणें खाणाखुणा ओळखून घेऊन निवळ्या सिंहाच्या गुहेकडे दोघां शिष्यांना धरून आणण्यासाठीं सैनिकांना पाठविलें.

सैनिक त्या बाजूला धांवले. त्यांना म्हाताऱ्याबरोबर दोघे एका खडका पलीकडे चालत असलेले दिसले. एका सैनिकानें दुरून हाक मारून विचारलें—"ए म्हाताऱ्या! त्या दोघांना घेऊन कोठें निघालास?

"तें ऐकून लखूचा बाप अडखळल्या-शिवाय म्हणाला—"मी त्यांना कोठें घेऊन








जात नाहीं. या वाटेनें त्यांना राजगुरूकडेच घेऊन येतों आहे. माझें इनाम बळकावण्याचा तुझा हेतु दिसतो आहे! तें नाहीं चालावयाचें. सांगून ठेवतों. जा, आपल्या वाटेनें."

"दोन दिवसाचा पाहुणा आहे या जगांतला. पण मोह सुटत नाहीं पहा." तो सैनिक इतर सैनिकांना म्हणाला. सर्व सैनिक राजगुरूला ती बातमी द्यायला धांवले.

राजगुरूला त्या भयंकर दरीची माहिती काढून घ्यायचा मोह झाला. पण ब्रह्मदंडी शिष्यांसमोर लपवा लपवी करूं शकणार नाहीं असा विचार करून त्यानें तो प्रश्न काढला नाहीं व शिष्य येईपर्यंत थांबण्याचें ठरविलें.

राजगुरूनें सर्वांत प्रथम ब्रह्मदंडीची स्वारी घमेंड उतरविण्याचें ठरविलें. तो सेनापतीला म्हणाला—"डुकर बांधून नेतात तसें या मूर्खाला बांधून, घेऊन चला राजधानीकडे. गांवांत प्रथम दवंडी पिटवायला सांगा कीं मांत्रिकाचाचा शोध लागल्याच्या खुशी खातर आजचा दिवस उत्सव दिवस म्हणून साजरा करण्यांत यावा." नंतर त्यानें गुहेच्या तोंडाशीं पहाऱ्यासाठीं कांहीं सैनिकांना नेमलें.

राजगुरूच्या आज्ञेप्रमाणें सैनिकांनीं ब्रह्मदंडीचे हात व पाय बांधून त्याला डुकरासारखें लोंबकळत उचलून घेऊन डोंगर उतरूं लागले. ब्रह्मदंडीचा आक्रोश चालू होता—"मला सोडा! मी तुमच्या पायां पडतों! हे काळभैरवा! हे आपल्या उपासक भक्तांच्या तप्त हृदयाला सांवली देणाऱ्या वट वृक्षा! किती अपमान करवितो आहेस रे?"

राजगुरु हंसत आनंदानें डोंगर उतरूं लागला व डोंगराखालीं जेथें घोडे झाडाला बांधून ठेवले होते तिकडे चालूं लागला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# महावीर

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं ही मेहनत स्वतःच्या सुखासाठीं करीत नसून दुसऱ्या कोणासाठीं तरी करीत असावास असें वाटतें. पण एक गोष्ट लक्षांत ठेव, अपात्र माणसावर उपकार केला तर त्याचा परिणाम उलटाच होतो. त्याचें उदाहरण म्हणून महावीर नांवाच्या एका क्षत्रिय तरुणाची गोष्ट ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

पूर्वी कधीं गौड देशांत महावीर नांवाचा एक शूर तरुण रहात असे. क्षत्रिय कुळांत जन्मल्यामुळें त्याच्या अंगीं क्षत्रिय बाणा बाणलेला होता. त्यानें लहानपणींच कित्येक राक्षसांचा वध केला होता. त्याच्याजवळ













एक स्फटिक मणि होता. तो कपाळावर असेपर्यंत महावीर कोणाला दिसत नसे. तो मणि त्याला एका यक्षाकडून मिळाला होता.

वर्षांत आल्यावर त्याला मुली सांगून येऊं लागल्या. पाटलीपुत्र राजधानीचा राजा चित्रगुप्त याला सुलोचना नांवाची बहीण होती. तिच्या सौंदर्याचें वर्णन ऐकून महावीर पाटलीपुत्र नगराकडे निघाला. चित्रगुप्तानें महावीराच्या शौर्यासंबंधीं ऐकलें होतें. चित्रगुप्तानें राजघराण्याला शोभेल अशा तऱ्हेनें महावीराचा सत्कार करावयाचें ठरविलें. ठरल्यावेळीं महावीर आला. त्याच्या सत्कारास दासदासी हजर होते. त्यानें सुलोचनेला पाहिलें व त्यानें ऐकलें होतें त्याहूनहि अधिक सुंदर ती त्याला वाटली. त्यानें तिच्याशींच लग्न करण्याचा आपल्या मनाशीं निश्चय केला.

महावीर पाटलीपुत्र येथें एक वर्षभर राहिला. चित्रगुप्ताशीं त्याची मैत्री दिवसेंदिवस वाढतच गेली. परंतु महावीरानें स्वतः होऊन सुलोचनेशीं लग्न करण्याची इच्छा व्यक्त केली नाहीं. एकदां चित्रगुप्तानें स्वतःच्या लग्नाची गोष्ट त्याच्यासमोर काढली. म्हणाला—

"ब्रह्मपूरच्या गादीवर यशोवती नांवाची राजकन्या राज्य करीत आहे. तिच्याशीं लग्न करण्याची इच्छा अनेक राजकुमारांना आहे. पण तिनें अट ठेवली आहे. तिच्याहून अधिक बलवान व पराक्रमी पुरुषाशींच लग्न करायला ती तयार आहे. ती अट रास्त नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. परंतु प्रत्येक वीर तिच्याहून कमी पराक्रमी आहे हें दर्शविण्याचा तिचा प्रयत्न दिसतो. अर्थात ही गोष्ट कोणत्या स्वाभिमानी पुरुषाला आवडेल? कोणी तिला मागणी घालायला आला कीं ती प्रथम धनुर्विद्येंत व गदा युद्धांत त्याची परीक्षा घेते. कोणी हारला तर ती त्याचा शिरच्छेद करून टाकते. कित्येक शूरवीर तरुण राजकुमारांचा तिनें अशा तऱ्हेनें अमानुष वध केला आहे. मी देखील तिच्याशींच लग्न करावें असें म्हणत आहें. पण तिनें मला जर गदा युद्धास आव्हान केलें व मी हारलों तर आपला शिरच्छेद होईल या भीतीनें मी धजत नाहीं. याला उपाय काय?"

तें ऐकून महावीर म्हणाला—"मित्रा! यशोवतीचा पराभव करण्याच्या कामीं मी तुला मदत करीन. हें माझ्याकडे लागलें. पण एका अटीवर, तूं आपल्या बहिणीचें लग्न माझ्याशीं करून दिलें पाहिजेस."

चित्रगुप्त त्याला तयारच होता. म्हणाला—"माझ्या बहिणीशीं तूं लग्नास तयार आहेस हें ऐकून मला आनंदच वाटतो. पण यशोवती बरोबर मी द्वंद्व युद्ध करीत असतां तूं मला मदत कशी करणार हें नाहीं मला कळलें."

"माझ्याजवळ एक स्फटिक मणि आहे. तो कपाळावर असेपर्यंत मला कोणाची भीति नाहीं. मी अदृश्य रूपानें तुझ्या शेजारीं उभा राहून मदत करीन" महावीर म्हणाला.



तें ऐकून चित्रगुप्ताला वाटलें कीं आतां यशोवतीशीं आपलें लग्न झालेंच. दोघे आपला बेत कसा पार पाडावयाचा या संबंधीं विचार करूं लागले.

महावीर म्हणाला—"तूं या आपल्या मांडलिक राजांना बरोबर घेऊन ब्रह्मपुराकडे नीघ. मी तुझ्याबरोबर येतों. मी तुझा एक मांडलिक आहें असें सांग, म्हणजे कोणाला माझ्याविषयीं कशाहि प्रकारची शंका वाटण्याचें कारण नाहीं."

चित्रगुप्तानें आपल्या मांडलिक राजांना स्वतःबरोबर येण्यासाठीं निरोप पाठवला.

त्यांना बरोबर घेऊन त्यांच्याबरोबरच महावीरला पण येण्यास सांगितलें. ब्रह्मपुराच्या सरहद्दीवर पोंचतांच त्यानें यशोवतीकडे निरोप पाठविला कीं द्वंद्व युद्धास आव्हान करीत आहें. तिनें चित्रगुप्ताला द्वंद्व युद्धाचे नियम वगैरे कळविले व दुसऱ्या दिवशीं द्वंद्व युद्धाची तयारी ठेवण्यास सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं चित्रगुप्त आपल्या मांडलिक मित्र मंडळींसह द्वंद्व युद्धासाठीं ठरल्या जागीं आला. तेथें राणी यशोवती देखील आपली शस्त्रास्त्रें घेऊन आली होती. द्वंद्व युद्ध सुरु होण्यापूर्वी महावीर कांहींतरी कारण सांगून मांडलिक मित्र मंडळींतून उठून निघून गेला. त्यानें एका निर्जन स्थानीं तो स्फटिक मणि डोक्याला बांधला आणि अदृश्यपणें द्वंद्व युद्धाच्या जागीं आला. चित्रगुप्ताच्या खांद्याला स्पर्श करून 'मी हजर आहें घाबरूं नकोस' असें त्यानें सुचविलें.

यशोवतीच्या हातांत एक धनुष्य होतें. त्यावर बाण चढवून ती सांगेल तसा नेम मारावयाचा होता. तिनें तें धनुष्य व भाता चित्रगुप्ताला दिला व म्हणाली—"ह्या धनुष्यावर बाण ठेवून शक्य होईल तितका दूर तो सोडा."



त्या धनुष्याला दोरी बांधणें देखील चित्रगुप्ताला शक्य नव्हतें. पण शेजारीं महावीर होता. त्यानेंच अदृश्यपणें त्याच्या हाताबरोबर आपला हात नेऊन सर्व काम बेमालूम पार पाडलें. दोघांची शक्ति एकवटल्यामुळें बाण फार दूर जाऊन पडला. यशोवतीचा बाण तितका दूर जाऊं शकला नाहीं. तिला राग आला व थोडें आश्चर्य पण वाटलें.

पण ती तशी माघार घ्यायला तयार नव्हती. गदा युद्धासाठीं तिनें आव्हान केलें. त्या वेळीं देखील चित्रगुप्तानें अदृश्यपणें गदा हातांत धरली. क्षणार्धांत यशोवतीच्या हातांतली गदा दूर जाऊन पडली. यशोवतीचा पूर्ण पराभव झाला. तिची घमेंड उतरली. सर्व राजवाड्यांत गेले. महावीर पुन्हां कांहीं वेळानें परत आला व, जसें कांहीं काय झालें हें त्याला माहीतच नाहीं असें दाखवीत, विचारूं लागला—"काय झालें ? कोण जिंकला कोण हारला ?"

"तुमच्या राजाचा जय झाला. मी वचन दिल्याप्रमाणें त्यांच्याशीं लग्नास तयार आहें." यशोवती जमलेल्या मांडलिकांना म्हणाली.





ब्रह्मपूर येथें यशोवती व चित्रगुप्ताचें लग्न झालें. चित्रगुप्त मगध व ब्रह्मपूरचा राजा झाला. विवाह झाल्यावर तो वाजत गाजत पाटलीपुत्र नगरीं आला त्यानें वचन दिल्याप्रमाणें महावीरशीं आपल्या बहिणीचें लग्न करून दिलें.

लग्न ठरल्याचें ऐकून यशोवतीनें राजाला म्हणजे पतीला विचारलें—"राजाच्या बहिणीचें लग्न एका सामान्य मांडलिकाशीं करून देण्याचा काय अर्थ ?"

चित्रगुप्त स्मित करून म्हणाला—"तो एक मांडलिकच नसून माझा एक विश्वासपात्र मित्र देखील आहे."

सुलोचनेनें महावीरला पाहिलें तेव्हां पासूनच तिचें मन त्यांच्यावर बसलें होतें. तो पराक्रमी होताच प्रेमपात्रपण होता. असा शूर व उदार पुरुष तिचा पति असावा याचा तिला अभिमान वाटे. एकदां सहज त्यानें, ती कोणाशीं बोलणार नाहीं असा विचार करून तिच्या भावाचें लग्न यशोवतीशीं कसें होऊं शकलें हें सांगून टाकलें. तें ऐकून सुलोचनेला पतीच्या शौर्याचा जास्तच अभिमान वाटला.

पण हा अभिमानच महावीराचा वध होण्यास कारण झाला. एकदां नणदा-भावजया आपापल्या नवऱ्याच्या शौर्याची स्तुति करीत बसल्या असतां यशोवती गर्वानें फुलून जाऊन म्हणाली—"माझ्या पतीसारखा शूर या दुनियेंत मिळणें अशक्य."

तें ऐकून सुलोचना हंसूं लागली. म्हणाली—"कळली आमच्या बंधुराजांची बहादुरी, पण तें असूं दे. यांच्यासमोर द्वंद्व युद्धास उभे राहण्याची आहे का त्यांची छाती ? विचारून कां नाहीं पहात ?"

"यःकश्चित् एका मांडलिकानें राजाशीं बरोबरी करण्याचें साहस दाखवूं नये." यशोवती नणदेचा अपमान करण्याच्या हेतूनें म्हणाली.

सुलोचनेला तो अपमान सहन झाला नाहीं. ती म्हणाली—"कोण म्हणतो कीं हे मांडलिक आहेत ? कोणाचे ? माझ्या भावाचे ? खोटें ! माझ्या भावानें स्वतःच्या पराक्रमानें तुला जिकलें, असें तुला वाटलें होय ? अदृश्यपणें हेच बाजूला उभे राहून त्याची मदत करीत होते बाईसाहेब." रागाच्या भरांत ती हें सर्व बोलून गेली व हें देखील तिनें सांगून टाकलें कीं तिचा नवरा अदृश्यपणें बाजूला कसा उभा राहूं शकला.

यशोवतीच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. तिला वाटत होतें कीं शूर पति मिळावा म्हणून तिनें एवढी मोठी प्रतिज्ञा केली आणि हट्ट धरला होता. मगधच्या राजाच्या शौर्यासमोरच ती मान वांकवून लग्नास तयार झाली. पण तीच शेवटी फंसली. या उलट तिच्या नणदेला कांहीं प्रतिज्ञा केल्या शिवाय फुकटा फुकटी एवढा पराक्रमी पति मिळाला. तिला हें कसें सहन होणार ? तिनें महावीराचा शिरच्छेद करविण्याचें ठरविलें.

ती आपल्या पतीला जाऊन म्हणाली—"तुमच्या मेहुण्याचें वागणें दिवसें दिवस फाजीलपणाचें होऊं लागलें आहे. हलक्या



लोकांशीं बोलण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं. एका सामान्य मांडलिकाशीं आपल्या बहिणीचें लग्न करून देऊन आपण त्याला डोक्यावर चढवून ठेवलें आहे म्हणून माझी मान पदोपदीं खालीं होत आहे. ती म्हणते कीं मला आपण नाहीं, त्यानें जिंकलें, म्हणें. त्याच्याशीं माझें लग्न व्हायला पाहिजे होतें."

चित्रगुप्तानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व आपल्या दोघां तिघां मांडलिकांकरवीं गुप्तपणें महावीराचा वध करविला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, महावीरावर जो हा प्रसंग ओढवला त्याला कारण कोण? सुलोचना कीं यशोवती कीं चित्रगुप्त? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

"आपल्या नवऱ्याचा अपमान कोणत्या स्त्रीला आवडेल? त्यांत महावीरासारखा शूर पति असल्यावर सुलोचनेनें गप्प कां बसावें? यशोवतीला तरी दोषी कसें ठरवितां येईल? सुलोचना जें म्हणाली तें सर्व खरें समजून सर्व अपमान सहन करून तिनें स्वस्थ रहावें हें कसें शक्य होईल. तिचा व तिच्या नवऱ्याचा एवढा अपमान? तिला फंसवून तिच्या नवऱ्यानें तिच्याशीं लग्न केलें, हें मानायला ती तयार नव्हती. म्हणून तिनें महावीराच्या विरुद्ध पतीजवळ तक्रार केली. आतां चित्रगुप्तानें खरें सांगून पत्नीचा व स्वतःचा अपमान सहन करून घ्यावा ह्याची अपेक्षा करणें देखील बरोबर होणार नाहीं. तेव्हां पत्नीच्या मनाचें समाधान करून देण्यासाठीं महावीराचा कांटा दूर करण्याव्यतिरिक्त त्याच्याजवळ दुसरा उपाय नव्हता. विश्वासघात करून ज्यानें यशोवतीशीं लग्न केलें त्याच्याकडून विश्वासघाताशिवाय खरेंपणाची अपेक्षा ठेवणेंच चुकीचें ठरेल. माझ्या मतें खरी चूक महावीराचीच. आपलें गुपित त्यानें बायकोला कां सांगावें? त्याला त्या चुकीचें फळ भोगावें लागलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. [ कल्पित ]





# शिकलेली विद्या

त्या दिवशीं संजीवचा वाढदिवस होता. संजीव पहाटे उठून आंघोळ करून नवे कपडे घालून आजोबांची वाट पहात बसला होता. संजीव बरोबर उषा व दोघांच्या पाठोपाठ अशोक हजर झाले. पण सर्वांच्या आधीं "चांदोबा" आला होता. आजोबा आंघोळ करून येतांच चांदोबासाठीं मुलांची ओढाताण सुरू झालेली पाहून आजोबा म्हणाले—"मिळाला ना चांदोबा! आतां माझी काय गरज तुम्हांला? मी बाजारांत जाऊन येतों."

"तें नाहीं चालायचें, गोष्ट सांगून जा," मुलें म्हणालीं. स्वतः होऊन बोलाविलेल्या संकटाला तोंड द्यायला आजोबा तयार झाले.

आजोबा खुर्चीवर बसले व मुलें जमिनीवर घोळका करून बसलीं.

"आजोबा! मला गोष्ट लिहायला शिकवा. मी चांदोबांत छापायला पाठविणार आहें!" संजीव म्हणाला.

आजोबा स्मित करून म्हणाले—"वेड्या, गोष्टी शिकवून का येतात? शिकलेली विद्या, आणि बांधून घेतलेली शिदोरी फार उपयोगी पडत नाहीं." असें म्हणत त्यांनीं तपकीर नाकांत कोंबली.

"अजून याला लिहितां वाचतां येत नाहीं आणि चांदोबाला गोष्टी पाठविणार म्हणतोय? काय पण वेडपट आहे!" अशोक म्हणाला.

"आजोबा, शिदोरी म्हणजे हो काय?" उषानें प्रश्न केला.

"प्रवासाला निघतांना झुणका भाकर वगैरे बांधून घेतात ना? तीच शिदोरी!










पण दूरचा प्रवास करणाऱ्यांना ती किती दिवस पुरणार ?" आजोबा म्हणाले.

"गोष्ट ! गोष्ट ! आजोबा गोष्ट सांगा !" मुलें ओरडली. त्यांना वाटलें कीं आजोबा गप्पांत रंगवून गोष्ट सांगणार नाहींत.

"बरें बाबांनो ! ऐका गोष्ट !" आजोबा गोष्ट सांगूं लागले—

"एका गांवीं एक मुलगा रहात असे. त्याला वाटे, विद्या संपादन करावी, ज्ञान मिळवावें. संजीव कसा गोष्टी लिहायला शिकवा म्हणत होता ना अगदीं तशीच इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली.

सुदैवानें एक साधुबुवा त्या गांवीं आले. मुलगा त्यांना पाहून त्यांच्याजवळ जाऊन हात जोडून म्हणाला —"साधुबुवा ! मला विद्या संपादन करावयाची आहे. मला शिकवा."

तें ऐकून साधुबुवा स्मित करून म्हणाले— "खुळ्या ! शिकवलेली विद्या व बांधून घेतलेली शिदोरी कोठवर पुरणार ?"

मुलगा म्हणाला—"मी लहान आहें तशी माझी बुद्धि पण लहान आहे. आपण जें कांहीं म्हणालांत त्यांतलें मला कांहीं एक समजलें नाहीं."

"मी या पंचक्रोशींत दोन दिवस राहणार आहें. रहा माझ्याबरोबर. कांहीं सांगावयाचें झालें तर सांगेन व तुझ्या पदरीं जितकें पडेल तितकें घे !" साधुबुवा म्हणाले.

तो मुलगा साधुबुवांच्याबरोबर राहण्यास कबूल झाला. दोघे दिवसभर हिंडत. संध्याकाळ झाली कीं कोणाच्या तरी ओसरींत किंवा पडवींत पडून रहात.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं ते ज्या घराच्या पडवींत झोंपले होते तें घर एका चोराचें होतें. रात्रीं चोर चोरी करण्यासाठीं निघाला तेव्हां त्याचा मुलगा त्याला म्हणाला—"बाबा ! मला देखील चौर्यविद्या शिकवतां का ?"

"बाळ शिकलेली विद्या आणि बांधून घेतलेली शिदोरी कोठवर उपयोगी पडणार ? स्वतःच्या बुद्धीचाच भरंवसा करावा लागतो. स्वतःच्या अनुभवानें विद्या येते व ज्ञान वाढतें." बाप म्हणाला.

"बरें तर बाबा ! मी स्वतःच्या अनुभवानें चोर होणार ! फक्त मला बरोबर घेऊन चला." चोराचा मुलगा म्हणाला. बापानें कबूल केलें. दोघे निघाले.

बाहेर पडवींत पडल्या पडल्या साधुबुवांचा तो शिष्य तें सर्व संभाषण ऐकत होता. तो साधूला म्हणाला—"साधुबुवा ! आपण म्हणालांत अगदीं तेंच हा चोर आपल्या मुलाला म्हणाला. पाहतों आतां हे दोघे काय करतात तें." असें सांगून तो त्या पिता-पुत्रांच्या पाठीमागून निघाला.

चोर आपल्या मुलाला बरोबर घेऊन एका श्रीमंत गृहस्थाच्या घरीं गेला. त्यानें भिंतीला भोंक पाडलें व मुलाला म्हणाला—"जा आंत ! मधल्या खोलींत एक पेटी आहे. पेटींत दागिने आहेत. ही किल्ली घेऊन जा व पेटी उघडून तुला जमेल तितकें सोनें उचलून घेऊन ये."

बापानें दिलेली किल्ली घेऊन मुलगा घरांत गेला. एक मोठा पेटारा दिसला. तो



त्यानें उघडला. आंत शिरला आणि पेटारा बंद करून घेतला. पण झांकणाचा आवाज झाला. त्या आवाजानें घरांतल्या दोघां चौघांची झोंप मोडली. एक म्हणाला—"काय आहे बुवा !" तो पेटाऱ्यावर जाऊन झोंपला. म्हणाला—"उद्यां सकाळीं पाहून घेऊं. चोराचा पोर आंत अडकून राहिला. ही गोष्ट चोरानें ओळखली व तेथून पाय काढला. साधूच्या शिष्यानें तें पाहिलें. त्याला आश्चर्य वाटलें कीं स्वतःच्या मुलाला सोडून चोर कसा पळून गेला ! तो त्याच्या पाठोपाठ निघाला. चोर आपल्या घरीं परत आला व दार बंद करून









निश्चितपणें झोंपीं गेला. मुलाची सुटका कशी होणार याची त्याला थोडी देखील काळजी नव्हती.

तिकडे पेटींत अडकलेल्या मुलानें काय केलें माहीत आहे का? त्यानें बेफिकीर होऊन जितकें सोनें त्याला घेतां आलें, घेतलें. उंदीर कुरतडल्याचा आवाज होतो तसा आंतून आवाज केला. कुरतडण्याचा आवाज ऐकून पेटाऱ्यावर झोंपलेला माणूस 'उंदीर उंदीर' म्हणून ओरडत उठला व पेटारा उघडला. लगेच चोराचा मुलगा उडी मारून बाहेर आला. पेटाऱ्यावर झोंपलेल्या माणसाला एक ढुशी मारून बापानें भिंतीला जें भोंक पाडून ठेवलें होतें त्या भोंकांतून बाहेर आला आणि धूम पळाला.

घरांतले लोक व नोकरचाकर जागे झाले व 'चोर चोर' म्हणून ओरडत त्याच्या पाठोपाठ धांवले. पण त्यांना हुलकावणी देण्यासाठीं चोराच्या मुलानें काय केलें कळलें का? वाटेंत एक विहिर होती. त्या विहिरींत त्यानें एक मोठा दगड टाकला आणि झाडावर चढून गंमत पहात बसला.

तो आवाज ऐकून लोक विहिरीकडे धांवले. दिवे लावून त्यांनीं विहिरींत डोकावून पाहिलें. दोघे तिघे विहिरींत उडी मारून पहायला तयार झाले. पण चोर तेथें असेल तर ना त्यांना मिळेल. निराश होऊन सर्व आपापल्या घरीं निघून गेले.

त्यानंतर चोराचा पोर झाडावरून खालीं उतरला व आपल्या घरीं निघून गेला. त्यानें दारावर थाप दिल्यावरोबर त्याच्या बापानें दार उघडलें. त्यानें आपला पराक्रम खूप वर्णन करून बापाला सांगितला.

त्याचें तें वर्णन साधु व त्याचा शिष्य बाहेर पडवींत बसून ऐकत होते. "पाहिलेंस चौर्य विद्या देखील शिकून येत नाहीं, अनुभवानेंच ती संपादन करावी लागते. शिकलेली विद्या कुचकामाची असते."

आजोबांनीं येथवर गोष्ट सांगितली. मध्येंच संजीव म्हणाला—"तर मग मी देखील स्वत:च गोष्टी लिहून पाठवीत जाईन आजोबा! कोणी गोष्ट शिकवायची जरूर नाहीं मला."

तें ऐकून सर्व मुलें हंसली. संजूला राग आला.

आजोबा स्मित करून म्हणाले—"मला जगूची गोष्ट आठवते हें ऐकून!"

"जगू कोण आजोबा? सांगा त्याची गोष्ट!" मुलांनीं ओरडा केला.





"सांगतों, सांगतों ! ओरडूं नका !" आजोबांनीं जगूची गोष्ट सुरू केली.

"जगूचा बाप लखुजी, गांवचा पाटील होता. त्या काळीं गांवांत पाटलाचा फार दरारा असे. तसा आज देखील कमी नाहीं. गांवांत कांहीं भांडणतंटा झाला कीं लोक पाटलांकडे मध्यस्थीसाठीं धांवत. कोणाला मदतीची गरज असली तरी लोक पाटलाकडे येत. पाटील आपल्या समजुतीनें सल्ला देई किंवा त्याला होईल तितकी मदत करून निरोप देई. गांवकऱ्यांचा पाटलांवर फार विश्वास होता."

गांवकरी लोक वडिलांना इतका मान देतात हें पाहून जगूला आश्चर्य वाटे. त्यानें वडिलांची बरोबरी करण्याचें ठरविलें. म्हणून तो जिथें वडील जात तिथें जात असे व वडील जें कांहीं बोलत तें लक्षपूर्वक ऐकत असे. ते जें कांहीं करीत तें तो लक्षपूर्वक पहात पण असे.

एकदां गांवांत एका घरीं जावया-सासऱ्यांचें कांहीतरी कारणावरून भांडण झालें. शिवीगाळीपर्यंत वेळ येऊन ठेपली.

ही गोष्ट पाटलांच्या कानावर येऊन पोंचली. पाटील भांडण मिटविण्यासाठीं निघाले. तेव्हां ते बरोबर आपल्या मुलाला पण घेऊन गेले. त्यांनीं जांवयाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला व म्हणाले—"तुझ्या सासऱ्याला मी गेलीं तीस चाळीस वर्षें चांगला ओळखतों. तो लाखांत एक माणूस आहे. त्याच्याशीं असें भांडण करून तूं आपली व आपल्या सर्व नातेवाईकांची अशी शोभा करून घेत आहेस. ह्यांत शहाणपण नाहीं."

वडीलधाऱ्या पाटलांनीं मध्यस्थी केल्या-मुळें भांडण मिटलें व जांवयानें सासऱ्याची माफी मागितली.

जगू वडिलांची बोलण्याची पद्धत अगदीं लक्षपूर्वक ऐकत बसला होता. तो त्यांची नकल करूं लागला. एकदां तो एका गल्लीं-तून जात असतां एका घरांत भांडणतंटा व मारहाण चालू होती. त्या घरांत चोरी झाली होती. घरच्या नोकरावर सर्वांचा संशय होता. नोकराला खांबाला बांधून घर मालक त्याला काठीनें झोडपीत होता. नोकराची बायको रडत होती व सांगत होती कीं त्यानें चोरी केली नाहीं.

जगू आंत गेला व सर्व ऐकून म्हणाला—"गेलीं तीस चाळीस वर्षें मी ह्याला ओळखतों. हा अट्टल चोर आहे. जवळ-पास त्याच्याबरोबरीचा चोर नाहीं, मला





     



माहीत आहे. मग ही मारहाण कशाला करतां ?"

जगूचें तें बोलणें ऐकून तो मूर्खासारखा बोलतो आहे असें कोणी म्हणाला नाहीं. सर्व हेच म्हणाले कीं पाहिलेंत लखुजी पाटलांचा मुलगाच आहे कीं नाहीं ? अगदीं बापाचे गुण मुलांत उतरले आहेत. नोकर अट्टल चोर आहे हें सांगितलें कीं नाहीं ह्यानें."

दुसऱ्या दिवशीं बाजारांत चौरस्त्यावर कोणीतरी एक पाडा विकत होता. सर्व त्या पाड्याची किंमत काय असूं शकेल या विषयीं बोलत होते. सर्व लोक शिंगा भोंवरी पाहून परीक्षा करीत होते.

जगूनें एकाला विचारलें—" काय भानगड आहे ? सर्व उभे कां ?"

त्याला उत्तर मिळालें—" हा पाडा विकायला उभा केला आहे येथें !"

जगू गर्दीतून पुढें गेला. पाड्याकडे मोठ्या पारखी लोकांसारखें पाहिलें. एक मनुष्य पुढें येऊन म्हणाला—" चौधरी शंभर रुपयाला मागत आहेत. इतकी किंमत देणें बरोबर होईल का तुम्हीच सांगा."

जगूनें पाड्याच्या अंगावर हात फिरवीत म्हटलें—" उत्तम जातीची गाय आहे. जवळ पासचे लोक ह्याच गाईचे दूध पितात. मी पन्नास वर्षें झालीं ही गाय पहात आहें. शंभरच काय दोनशें सुद्धां द्यायला हरकत नाहीं. माझ्या मतें."

तेव्हां सर्वांना कळलें कीं जगू एक मूर्ख शिरोमणि आहे. त्या दिवसापासून जगूला मूर्ख शिरोमणि हें नांव पडलें.

आजोबांची गोष्ट पुरी झाली आणि तिकडून वर्दी आली की पानें मांडली आहेत, चला पानांवर ! मुलें उड्या मारीत पळून गेलीं.














# गलाम हिरकणी

[२]

एकदां अलीशार, बायकोनें विणलेला गालिचा घेऊन बाजारांत विकायला निघाला. वाटेंत त्याला एक दलाल भेटला. दोघे एका दुकानासमोर गालिचाचा मोलभाव करीत उभे होते. तेव्हां तेथें एक ख्रिस्ती मनुष्य आला आणि म्हणाला कीं मी तो गालिचा साठ दीनार देऊन घ्यायला तयार आहें. पण अलीशार कबूल होईना. तेव्हां तो शंभर रुपये द्यायला कबूल झाला. पण अलीशारला ती किंमत पण कमी वाटली. दलाल त्याच्या कानांत हळून म्हणाला—"चांगली किंमत आहे. देऊन टाक." पण खरी गोष्ट अशी होती कीं त्या ख्रिस्ती माणसानें त्या दलालाला दहा दीनार पहिल्यानेंच बक्षिस देऊन गालिचाची किंमत पटवून द्यायला सांगितलें होतें. जमरूदनें अलीशारला बजावून सांगितलें होतें कीं माल ओळखणाऱ्याच्या हातींच विकावा म्हणजे किंमत चांगली मिळते. पण दलालाच्या मिडेस्तव अलीशार शंभर दीनार घेऊन घरीं निघाला. त्यानें मागें वळून पाहिलें तेव्हां त्याला तो ख्रिस्ती माणूस पाठोपाठ येत असलेला दिसला. त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें त्याला विचारलें—"तुम्ही कशाला येत आहां ? काय काम आहे तुमचें ?"

"मला या गल्लीच्या टोकाशीं थोडें काम आहें." तो ख्रिस्ती म्हणाला. पण अलीशार आपल्या घरीं पोंचला तेव्हां तो ख्रिस्ती पुढल्या गल्लीत जाऊन पुन्हां अलीशारच्या घरींच आला आणि म्हणाला—"माझा गळा कोरडा पडला आहे. तहान भागवण्यासाठीं आलों आहें तुझ्याकडे."

तो किती नीच किंवा दुष्ट असला तरी प्यायला पाणी मागतो आहे तर त्याला नाहीं कसें म्हणतां येईल असा विचार करून अलीशार घरांत गेला आणि झारी घेऊन बाहेर आला. दार वाजण्याचा आवाज ऐकून जमरूद पण बाहेर आली. तिनें विचारलें—"आज इतका उशीर कां झाला परत यायला ? गालिचा विकला गेला का ? विकत घेणारा कोणी व्यापारी होता कीं ओळखीचा माणूस ?"

"आज बाजारांत गर्दी होती म्हणून उशीर झाला. गालिचा मी एका अनोळखी माणसालाच विकला." अलीशार म्हणाला.

"हें पाणी कोणासाठीं घेऊन चालला आहेस ?" तिनें विचारलें.

"त्याच माणसासाठीं. तो आला आहे माझ्या बरोबर !" असें सांगून अलीशार झारी घेऊन बाहेर गेला.

पण जमरूदला थोडी शंका आली. आपल्यावर कांहींतरी नवीन संकट येणार आहे.

तो ख्रिस्ती बाहेर गल्लींत उभा राहिला नाहीं. तो घरांत शिरला. "चोर



कुठला. काय रे, कोण तूं माझ्या घरांत शिरायला ? हो बाहेर" अलीशार दरडावून म्हणाला.

"बाहेर उभें राहणें अशक्य झालें म्हणून घरांत आलों. हें कांहीं घर नाहीं ओसरीच तर आहे. क्षण भर आराम करून मी आपल्या वाटेनें निघून जाईन." तो ख्रिस्ती म्हणाला. त्यानें अलीशारच्या हातांतून झारी मागून घेतली व पाणी पिऊन झारी परत दिली. तो ख्रिस्ती निघून जाईल असें अलीशारला वाटलें होतें. पण त्याचा तो अंदाज चुकला.



तो ख्रिस्ती अगदीं विनम्रपणें म्हणाला— "मालक! थोडासा उपकार जरी कोणी कोणावर केला तरी त्याचा परिणाम मनावर कित्येक वर्षें राहातो. परोपकार करण्याची सद्बुद्धि अल्लानें आपल्याला दिली नसेल असें नाहीं वाटत मला. माझी तहान भागली. पण भूक नाहीं भागली. मीठ भाकर देखील पुरेल मला." ख्रिस्ती निस्संकोचपणें म्हणाला.

"आमच्या घरीं इतकें सगळें कोठून येणार? ऊठ; नीघ येथून बाहेर!" अलीशारला जास्त राग आला होता, त्याचा लोचटपणा पाहून.

तरी तो हलवाचें नांव काढीना. "घरांत नसेल तर बाजारांत तर असेल! अल्लाची कसम, मी गालिचासाठीं तुम्हांला शंभर दीनार दिले आहेत ते तुमच्या कडेच आहेत. उपाशी पाहुण्याला परत पाठविण्याचें पाप लागेल." तो धीट ख्रिस्ती म्हणाला.

आतां मात्र अलीशारला फारच राग आला. पण त्याला त्याची इच्छा पुरी करावी लागली. त्यानें त्या ख्रिस्त्याला खोलींत बंद करून बाहेरून कुलूप लावून घेतलें व म्हणाला—"मी तुला जें पाहिजे तें घेऊन येतों. पण येथून हललास तर पहा!" असें बजावून सांगून तो बाजारांत गेला आणि बाजारांतून फळफळावळ व इतर खाण्याचे पदार्थ घेऊन आला.

तें सर्व पाहून तो ख्रिस्ती म्हणाला— "केवढा अतिथि-सत्कार तुमचा! ह्या सर्वांची गरज काय होती. दहा जणांना पुरेल एवढे हे पदार्थ आहेत. तुम्ही देखील माझ्याबरोबर खायला बसा."

दोघे खायला बसले असतां त्या ख्रिस्त्यानें एका केळ्याची साल काढून केळाच्या गराला बेशुद्ध करण्याचें कांहीं तरी औषध लावलें व म्हणाला—"मी सोलून दिलेलें केळें आपण व आपण सोलून दिलेलें मी खावें अशी रीत आहे." अलीशार केळें खाल्ल्याबरोबर बेशुद्ध होऊन पडला.

लगेच तो ख्रिस्ती उठला व बाहेर गल्लींत गेला. तों पर्यंत त्याचे नोकर, एक खेचर बरोबर घेऊन आले होते. त्याच्याबरोबर म्हातारा रशीद अल्दीन देखील होता. त्याच म्हाताऱ्यानें लिलावांत जमरूदला विकत घेण्यासाठीं प्रयत्न केला होता. तो सुद्धां एक ख्रिस्तीच होता. पण तो मुसलमान व्यापाऱ्याचें सोंग करून आला होता. अलीशारचा पाहुणा म्हाताऱ्याचा भाऊ होता. त्याचें नांव बर्सूम असें होतें.



सर्व अलीशारच्या घरांत शिरले. त्यांनीं जमरूदच्या तोंडांत बोळे कोंबले व तिला गाढवावर बसवून रशीदच्या घरीं घेऊन गेले. आपल्या घरांतल्या एका खोलींत तिला नेऊन व तिच्या तोंडांतले बोळे काढून म्हातारा तिला म्हणाला—"जमरूद! आतां येथून तुझी सुटका होणें शक्य नाहीं. तूं आपला धर्म सोड व ख्रिस्ती होऊन माझ्या-बरोबर रहा! तूं हें कबूल केलेंस तर तूं मागशील तें मी देईन. तूं सांगशील तें मी करीन. पण जर का तूं माझें ऐकलें नाहींस तर तुला कुत्र्यासारखें सर्व आयुष्य कंठावें लागेल. लक्षांत ठेव!"

जमरूद रडत व म्हाताऱ्याला शिव्या देत म्हणाली—"एवढा थेरडा झालास आणि तुला हें शोभतें? तूं काय वाटेल तें केलेंस तरी चालेल पण मी आपला धर्म सोडणार नाहीं."

तिचें तें उत्तर ऐकून म्हाताऱ्यानें तिला खूब बडवलें. त्याचा हात दुखूं लागला तेव्हां तो थांबला. "हिला सैंपाकी गुलामांत ठेवून उपाशी ठेवा. खायला प्यायला मिळालें

नाहीं म्हणजे डोकें येईल ताळ्यावर." त्यानें नोकरांना हुकूम केला.

*   *   *

कांहीं वेळानें अलीशार शुद्धीवर आला. त्यानें ओरडून हाक मारली—"जमरूद !" पण उत्तर आलें नाहीं. म्हणून तो जमरूदच्या खोलींत गेला. तेव्हां त्याला तेथें विणकामाचें सामान अस्ताव्यस्त स्थितींत पडलेलें दिसलें. त्याच्या पोटांत धस्स झालें. तो खित्तीच जमरूदला घेऊन गेला असणार. तो वेड्या-सारखा—"जमरूद ! जमरूद !" असा ओरडत धांवूं लागला. रस्त्यावरचीं मुलें 'तो पहा वेडा' म्हणून म्हणत त्याच्या पाठीस लागलीं.

त्याच स्थितींत गल्लोगल्ली फिरत असतां त्याला एक म्हातारी भेटली. तिनें त्याला विचारलें—"बाळ ! कोण रे तूं ? आणि काय तुझी ही दशा ?"

अलीशारनें सर्व वृत्तांत तिला सांगितला. म्हातारी थोडा वेळ विचार करून म्हणाली—"बाजारांत जाऊन बायकांना लागणाऱ्या वस्तु—बांगड्या, पोत, आंकडे, सुया, दोरा वगैरे एका मोठ्या ताटांत भरून घेऊन येतोस का ? मी तें ताट डोक्यावर घेऊन गल्लोगल्ली फिरतें आणि तुझी जमरूद कोठें आहे याचा शोध काढतें."



तें ऐकून अलीशारला धीर आला. त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. सहानुभूति दाखवणारी निदान ही म्हातारी तरी मिळाली. तो बाजारांत गेला व म्हातारीनें सांगितल्या-प्रमाणें सर्व सामान विकत घेऊन एका ताटांत घेऊन आला. म्हातारी घरीं गेली. वेष पालटला आणि ताटावर एक स्वच्छ फडकें टाकून तें डोक्यावर घेऊन निघाली. गांवांतल्या सर्व लहान थोर व्यापाऱ्यांच्या व श्रीमंतांच्या घरीं फिरत ती रशीदच्या घरीं गेली.

व्यापाऱ्यांच्या व श्रीमंतांच्या घरच्या दासींनाच त्या वस्तूंची जास्त गरज असे. म्हणून त्या पुढें येऊन त्या विकत घेऊं लागल्या. तिच्याकडे सर्व वस्तु कमी किमतीला मिळत आहेत हें पाहून सर्व दासी तिचा आवाज ऐकल्याबरोबर तिला बोलावून घेऊन जाऊं लागल्या.

एक दोन दिवसांत म्हातारीची ओळख गांवभरच्या दासींशीं झाली. त्यांच्यापैकीं कांहींच्या तोंडी तिला एका दासीला तिच्या मालकानें कसें वागवलें, कशी मारहाण केली वगैरे गोष्टी कळल्या. तिसऱ्या दिवशीं





म्हातारी निरोपाप्रमाणें निघाली. तिला एका जागीं कोणीतरी कण्हत असल्याचा भास झाला. जवळ जाऊन पाहिलें तर एक दासी. तिनें अलीशारच्या तोंडी तिचें वर्णन ऐकलेंच होतें. कित्येक दासींकडून एका दासीवर झालेली मारहाण तिनें ऐकली होती. त्या बेशुद्ध पडलेल्या दासीला पाहतांच तिला त्या सर्वांची आठवण झाली व ती जमरूदच असणार याची तिला खात्री पटली. तिनें जवळ जाऊन तिच्या तोंडावर पाणी शिंपडलें. त्या दासीनें डोळे उघडून पाहिलें. तेव्हां म्हातारीनें तिला हळूच विचारलें—“तूं अलीशारची दासी ना? त्यानेंच मला तुझ्या-कडे पाठविलें आहे? उद्यां संध्याकाळीं काळोख पडल्यावर सैंपाक घराच्या खिडकी-जवळ येऊन उभी रहा. बाहेर शीळ ऐकूं येतांच तूं बाहेर ये. तो तुझी वाट पहात बाहेर उभा राहील.”

म्हातारीनें घरीं जाऊन अलीशारला दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं त्या जागीं जाऊन शीळ वाजवायला सांगितलें. अलीशारनें तिला इनाम देण्यासाठीं खिशांत हात घातला. पण म्हातारीनें त्याचा हात धरला व म्हणाली—“तुला तुझ्या प्रयत्नांत यश मिळालें तर तेंच माझें इनाम.”

दुसऱ्या दिवशीं काळोख पडल्यावर म्हातारीनें सांगितल्याप्रमाणें अलीशार रशी-दच्या घराच्या सैंपाक घराबाहेर खिडकीखालीं जमरूद कोठें दिसते का पहात बराच वेळ उभा राहाला. तो दमून गेला असल्या-कारणानें वाट पहात बसून राहाला. जरा आडवा झाल्याबरोबर त्याचा डोळा लागला आणि थोड्या वेळानें तो घोरूं लागला.

त्याच वेळीं तेथें रशीदच्या घरीं चोरी करण्याच्या हेतूनें एक चोर आला. तो एका सोनेरी टोळीचा पुढारी होता. तो घरांत कोठून शिरणें सोपें जाईल हळूहळू पहात, जणुं कांहीं सहज आपण त्या बाजूला आलों आहों हें दाखविण्यासाठीं शीळ घालीत सैंपाकघराच्या खालच्या बाजूनें चालूं लागला. तितक्यांत खिडकी उघडली व खिडकींत त्याला एक दासी उभी दिसली. चोर खिडकीच्या खालीं वांकून लपून बसला. पण खिडकींतून एक दोरी खालीं आलेली पाहून व ती धरून कोणी स्त्री उतरत आहे हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

जमरूदला वाटलें कीं अलीशारच वेष पालटून आला असावा. ती हळूच त्याच्या खांद्यावर उतरली. चोर तिला घेऊन जोरानें पळाला. तिला वाटलें कीं अलीशारच तिला घेऊन पळत असावा. हळूच ती म्हणाली—“किती दूर पळशील? तूं दमून गेला आहेस, फार थाळला आहेस असें म्हातारी सांगत होती.”

पण चोर कांहींच बोलला नाहीं. तो जास्तच जोरानें धावूं लागला. जमरूदला तेव्हां थोडा संशय आला. तिनें त्याला हळूच विचारलें—“बोलत कां नाहींस? कोण तूं? तूं मला सोडलें नाहींस तर मी ओरडेन.”



तेव्हां चोरानें तिला खालीं उतरलें. तों-पर्यंत दोघे एका निर्जन दाट झाडींत येऊन पोंचले होते. चोर म्हणाला—“तूं ओरडलीस तर तुझा गळा दाबून जागच्या जागीं ठार करीन. मी एका टोळीचा नायक आहे. आमच्या टोळींत वीस चोर आहेत. पण कोणी स्त्री नाहीं. तुला मी आपली राणी करीन व तूं मागशील तें तुला देईन. माझे वीस अनुयायी तुझ्या हुकमावर आपल्या प्राणाची आहुती द्यायला तयार राहतील. अशी वेड्यासारखी वागूं नकोस. त्या श्रीमं-ताच्या घरची दासी म्हणून जिवंत राहण्यापेक्षां









आम्हां चोरांच्या टोळीची राणी म्हणून कां नाहीं रहात ?"

जमरूदनें प्रसंग ओळखून वागण्याचें ठरविलें. तिनें त्याच्याबरोबर जायला कबुली दिली व त्याच्याबरोबर चालूं लागली. चोर तिला घेऊन चोरांच्या राहण्याची जी गुप्त जागा होती तेथें गेला. तेथें त्यानें आपल्या अनुयायांना सांगितलें कीं ही आपली सर्वांची राणी आहे. सर्वांनीं लवून तिला मुजरा केला. जातांना चोरांचा नायक आपल्या म्हाताऱ्या मोलकरणीला एका बाजूला बोलावून म्हणाला— "हें पहा आजी! आम्ही आतां उद्यां रात्रीं किंवा परवां पहाटे परत येऊं. तुम्ही या राणीवर कडक नजर ठेवा. निसटून जाईल कोठें."

त्या दिवशीं रात्रीं जमरूदला झोंप लागली नाहीं. पण तिनें मनांतल्या मनांत एक बेत योजला आणि सकाळीं उजाडल्या-वर आनंदानें म्हातारीबरोबर गप्पा मारूं लागली. सकाळीं खाऊन पिऊन दोघी उन्हांत बसल्या. तेव्हां जमरूद म्हातारीला म्हणाली— आजी! या मी तुमच्या उवा काढतें." म्हातारीला फार आनंद झाला. जमरूद गाणें म्हणत होती व उवा काढून मारीत जात होती. सुमारें अर्धा तास बसल्यावर म्हातारी म्हणाली—"छान ऊन पडलें आहे. मी जरा आडवी होते. तूं उवा काढीत रहा." पण म्हातारीला एक दोन मिनिटांत झोंप लागली.

जमरूद त्याचीच वाट पहात होती. ती चोरांच्या गुहेंत गेली. एक पुरुषी पोशाख स्वतःच्या बेताचा निवडून घेऊन जमरूदनें तो अंगांत घातला व डोक्याला एक पगडी बांधून घेतली. बाहेर येऊन पाहिलें तर एक खेचर उभें होतें. त्यावर बसून निघून गेली.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# भीमूचें पराक्रम

भीमूचें लग्न जमीनदाराच्या मुलीशीं झालें आणि त्याची गणना मोठ्या लोकांत होऊं लागली. जमीनदारानें विचार केला कीं जांवईबापूंच्या सेवेसाठीं चांगलासा नोकर ठेवून दिला म्हणजे कसली काळजी नाहीं. त्यानें मुनिमाला एक पोऱ्या घेऊन यायला सांगितलें. तो एका मुलाला बोलवून घेऊन आला. एक धोतरजोडी, दोन सदरे व वर्षाच्या अखेरीला थोडा पगार ठरला.

एकदां संध्याकाळीं भीमू बागेंत फिरत असतां त्या मुलाचा बाप नमस्कार करून म्हणाला—"धनी, माझा पोरगाच आपल्या चाकरीला ठेवला आहे. त्याला खायला प्यायला कांहीं कमी पडणार नाहीं मला माहीत आहे. पगार पण मिळेल. पण दोन गोष्टी धन्याजवळ सांगाव्या म्हणतों."

"बोल, खुशाल बोल!" भीमू म्हणाला.

"दर शनिवारीं तैल स्नान करायची संवय आहे त्याला." नोकराचा बाप म्हणाला.

"म्हणजे रे काय? तो तेलानें नाहणार म्हणतोस?" भीमूनें विचारलें.

"बायकांसारखें नाहणें मी नाहीं म्हणत! साधें तैल्स्नान म्हणतों. आठवड्यांतून एक-दांच शनिवारीं! सांगण्याचें कारण असें कीं तैल्स्नानाचें नांव ऐकलें कीं पळून जातो हा. म्हणून मारून मुटकून घालावें लागतें." बाप म्हणाला.

"असें होय! बरें तर! मी त्याची व्यवस्था करतों." भीमू म्हणाला.

"अन् धनी! महिन्यांतून एकदां त्याचे केस कापायला हवेत! नाहीं तर बोकडा-सारखे वाढतात बघा!" बाप म्हणाला.



भीमूनें त्याला अगदीं बेफिकीर रहायला सांगितलें. म्हणाला—"दर शनिवारीं त्याला तेलानें न्हाऊं घालण्याची जबाबदारी मी स्वतः वर घेतों." त्या दिवसापासून भीमू शनिवार केव्हां येतो याची वाट पहात बसला. घेतलेली जबाबदारी पार पाडायची एवढेंच त्याला माहीत होतें.

शनिवार उजाडला. भीमूनें नोकराला बोलावून सांगितलें कीं जा रे तेल्याकडे, आणि घाणीचें डबाभर ताजें तेल घेऊन ये.

"नोकर डबा घेऊन तेल्याकडे गेला व त्याला म्हणाला—"जांवई बापूंनीं एक डबाभर ताजें तेल आणायला धाडलें आहे मला."

भीमूनें आपल्या नोकराला तेलाचा डबा नहाणीघरांत ठेवायला सांगितला आणि स्वतः बरोबर जाऊन नहाणी घराला आंतून कडी लावून घेतली. नोकराला एका टबांत उभें केलें आणि डोक्यावर डब्यांतलें तेल ओतलें. तो मुलगा जोर जोरानें ओरडूं लागला. कारण त्याच्या डोळ्यांत तेल गेलें होतें.

"तोंड बंद कर नाहीं तर गळा दाबून येथें आडवा करीन पहा तुला. तुझ्या खोड्या मला सर्व माहीत आहेत. तुझाच बाप सांगून गेला आहे मला. तूं रडशील ओरडशील हें सर्व त्यानें मला सांगितलें आहे पण या भीमरावांजवळ नाहीं चाला-यच्या तुमच्या गमजा, बच्चमजी!"

नंतर त्या पोराला नहाणीघरांतच कोंडून ठेवून तेलानें नीट चांगली आंघोळ करून घे असें सांगून भीमूनें बाहेरून कडी लावून घेतली. बिचारा नोकर आंत मोठ मोठ्यानें रडूं लागला. भीमू बाहेरून ओरडत होता—"ओरडलास तरी कडी काढणार नाहीं."

ओरडाओरडा ऐकून भीमूची बायको धांवत आली. "तुमचा नोकर कां असा ओरडतो आहे? त्याला नहाणी घरांत बंद कां केलात?" तिनें विचारलें.

"तुला काय करायच्या या भानगडी? तूं आपलें काम पहा जाऊन. त्याचा बाप स्वतः सांगून गेला आहे मला सर्व कांहीं. दर शनिवारीं त्याला तैल स्नान घातलें पाहिजे. तो रडतो ओरडतो म्हणून देखील त्याच्या बापानें सांगितलें आहे मला. मी त्याच्या डोक्यावर तेलाचा डबाच रिकामा केला. आतां किती ओरडत बसला म्हणून हरकत नाहीं!"

"बाइ-बाइ-बाइ-बाई!" कपाळावर हात मारून लक्ष्मी घरांत गेली व आईला जाऊन सर्व सांगितलें. आई हंसली आणि म्हणाली—"काय बाई तरी! डबाभर तेल डोक्यावर ओतलें!"

पण नवऱ्याची लाज राखली पाहिजे म्हणून लक्ष्मी स्वतःला सावरून म्हणाली—"त्यांच्या गांवाला म्हणें दर शनिवारीं तेलाची आंघोळ करण्याची रीत आहे. मी देखील तशी आंघोळ केली नाहीं तर राग येईल त्यांना. भीमूच्या नोकराबरोबर घरच्या इतर नोकरांना पण दर शनिवारीं डबाभर तेल मिळूं लागलें.

आतां दुसरी अट उरली होती. महिना झाला. त्यानें नोकराला बोलावून विचारून



द्यायला सांगितलें, आणखी कोणा कोणाची हजामत करून द्यावयाची आहे ?

नोकर सर्व नोकरांना विचारून आला. प्रत्येक जण म्हणाला कीं प्रत्येकानें केव्हांच न्हाव्याकडून हजामत करून घेतली आहे.

"काय रे! मग तूं कां नाहीं करून घेतलीस ? भीमूनें रागानें विचारलें."

"माझ्याकडे वस्तरा कोठें आहे मालक ?" नोकरानें विचारलें.

"असें होय! माझ्याजवळ तुझ्या गमजा नाहीं चालायच्या, बच्चूजी! समजलास काय! पहा बोकडासारखे केस वाढले आहेत. तुझ्या बापानें महिना अखेर केस कापायला सांगितलें आहे. त्यानें कातरी वस्तरा कांहीं दिलें नाहीं तुला ? जा घरीं आणि बापाकडून कातरी वस्तरा सर्व घेऊन ये! माझे केस काप व नंतर आपले!" भीमू म्हणाला.

"मला हजामत करतां येत नाहीं!" मुलगा म्हणाला.

"येत नाहीं ? तर मग तुला शिकलें पाहिजे! जा, कातरी किंवा वस्तरा घेऊन नाहीं आलास तर माझ्याकडे काम नाहीं. चल नीघ!" भीमू म्हणाला.

तो आरडाओरडा ऐकून लक्ष्मी धांवत आली व भांडणाचें मूळ कारण विचारून घेऊन भीमूला म्हणाली—"दोन आणे द्या त्याला. तो येईल केस कापून कोठून तरी!"

"केस कापायचे म्हणजे दोन आणे देऊन कापून घ्यायचे, हें नव्हतें त्यानें सांगितलें. काय पण डोकीं या लोकांची ? जें हवें तें नीट सांगतां देखील येत नाहीं यांना." भीमू म्हणाला.

[ आणखी एक पराक्रम पुढील अंकीं ]





# लाटांचा हिशेबनीस

तुम्हांला खरें वाटो कीं न वाटो, पण घडलेली गोष्ट आहे. त्या काळीं इंग्रजांचें राज्य हिंदुस्तानच्या पूर्वेकडील समुद्र किनाऱ्यावर नुकतेंच सुरू झालें होतें. केरटा नांवाच्या गांवीं कामाशास्त्री नांवाचा एक कारकून कर वसूलीच्या कामावर नेमला गेला. कामाशास्त्री वस्ताद् लांचखाऊ कारकून होता.

एकदां एका इंग्रज अधिकाऱ्यानें जमिनीचा महसूल जमा करायला नोकराला पाठविलें. कामाशास्त्रीनें शिरस्त्याप्रमाणें त्याला मिळणारी रकमबरोबर पाठविली नाहीं म्हणून महसूलाची रकम परत केली.

अधिकाऱ्यानें वरिष्ठ अधिकाऱ्याकडे फिर्याद केली. गांवकऱ्यांकडून फिर्यादी अर्ज लिहून घेऊन तें पण पाठविले. रेव्हिन्यू बोर्डपर्यंत व शेवटी प्री. व्ही कौंसिलपर्यंत फिर्यादी गेल्या. तेव्हां चवकशीसाठीं एक कमेटी नेमण्यांत आली. कमेटीनें चवकशी करून कामाशास्त्रीला एका बेटावर एक वर्षभर नेऊन सोडण्याची शिक्षा दिली. कपडेलत्ते, खाण्या-पिण्याचे पदार्थ व इतर जरूरी सामान सरकारी खर्चानें देण्यांत यावें असा शेरा पण देण्यांत आला होता.

रिपोर्टाची एक प्रत कामशास्त्रींकडे सूचने-साठीं आली व त्याबरोबर एक पत्र होतें कीं सामानाची यादी पाठवावी. कामाशास्त्रीनें इतर पदार्थांबरोबर दहा रीम कागद, दउती, टांक, वगैरे पण पाठवून देण्यास लिहिलें.

कामाशास्त्री तें सर्व सामान घेऊन बेटावर पोंचला. त्यानें हिशेबाच्या मोठमोठ्या वह्या शिवून घेतल्या एक वही घेऊन तो तीन प्रत्येक पांच मिनिटांत किती लाटा आल्या

      

व किती लाटा गेल्या याचा हिशेब लिहूं लागला. पंधरावीस दिवसांत वही भरून गेली. ती ठेवून देऊन एक कोरी वही घेऊन पुन्हां लिहीत बसला.

दिसाऱ्या दिवशीं ईस्ट इंडिया कंपनीचें एक जहाज त्या बेटाला येऊन लागलें. जहाजाच्या कप्तानाला बोलावून कामाशास्त्रीनें एक पांच रुपयाची पावती त्याच्या हातांत लिहून दिली व म्हणाला—" पांच रुपये या बेटावर कर द्यावा लागतो. तो दिलात तरच नांगर उचलायला परवानगी देईन."

इंग्रज कप्तानाला तें कांहीं कळलें नाहीं. त्यानें पांच रुपये दिले व पावती घेऊन निघून गेला. अशा तऱ्हेनें कित्येक जहाजें आलीं व कामाशास्त्रीनें प्रत्येक कप्तानाकडून पांच पांच रुपये वसूल केले. एका कप्तानानें नकार दिला तेव्हां कामाशास्त्रीनें कपाटांतल्या वह्या दाखवून विचारलें—" तर मग सरकारनें मला फुकट पगार देऊन येथें नेमलें आहे वाटतें?" त्या कप्तानानें रुपये देऊन पावती घेतली व निघून गेला.

त्या कप्तानानें ती पावती वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे पाठविली. चवकशी करतां कळलें कीं अशा पावत्या दीड एकशें तरी कचेरींत जमा झाल्या आहेत. त्या पावत्या विलायतेंत कंपनीच्या मुख्य कचेरींत पाठवण्यांत आल्या. कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं या छापी पावत्या नाहींत तेव्हां यांची रकम त्या कप्तानाकडून वसूल करून घ्यावी असा शेरा दिला. चवकशी चालू होती. शेवटीं कामाशास्त्रीनें हा कर वसूल केला असल्याचें कळलें. त्याची हुशारी पाहून सरकारानें त्याला माफी केली व त्याला पुन्हां त्याच्या कामावर नेमलें.





# अरण्यकांड

पंचवटींत एका पर्णकुटींत राम, लक्ष्मण व सीता सुखपूर्वक राहूं लागलीं. शरद ऋतु जाऊन हेमंत ऋतु आला.

एकदां तिघें स्नानासाठीं गोदावरीवर निघालीं. त्यांना शरयू नदीची आठवण झाली व त्या बरोबर अयोध्येची पण. लक्ष्मणानें भरताच्या उदार स्वभावाची व त्यागाची स्तुति करून त्याच्या आईची निंदा केली.

पण रामानें त्याला अडवून अशी निंदा-करणें तुला शोभत नाहीं, असें सांगितलें. भरताचें प्रेम आठवून रामाच्या डोळ्यांत आंसवें आलीं. भरत शत्रुघ्न व लक्ष्मण तिघे भाऊ किती प्रेमळ आहेत. यांच्या मदतीनें मी कधीं अयोध्येंत राज्य करूं शकलों तर! त्याच्या सहज मनांत आलें.

तिघं स्नान करून आपल्या आश्रमांत परत आलीं. संध्या, पूजा आदि आटोपून तिघं बाहेर पडवींत बोलत बसली असतां तेथें एक राक्षस स्त्री आली. ती रावणाची धाकटी बहीण शूर्पणखा होती. तिचें उग्ररूप पाहून व कर्कश आवाज ऐकून सीतेनें तोंडच फिरविलें.

रामाचें रूप पाहून ती मुग्ध झाली व डोळे वटारून आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागली. लक्ष्मण बाजूला जाऊन उभा राहिला. ती रामाला म्हणाली—" तूं कोणी











तरी मुनि दिसतोस पण तुझ्याजवळ धनुष्य-बाण कशाला आणि ही कोण, तुझी बायको कीं काय? तूं आमच्या राक्षसांच्या देशांत कशाला आलास?"

रामानें थोडक्यांत आपली ओळख सांगून विचारलें—"हे भद्रे! तूं कोण? कोणाची मुलगी?"

"माझें नांव शूर्पणखा आहे. मी एकटी या रानांत फिरतें. तूं रावणाचें नांव ऐकलेंच असशील? त्याचा पराक्रम त्रिलोकांत प्रसिद्ध आहे. देवेंद्रदेखील त्याचें नांव ऐकून थरथर कांपतो. तो विश्रवसूचा मुलगा आणि राक्षसांचा राजा आहे. तो माझा मोठा भाऊ. माझा मधला भाऊ कुंभ-कर्ण. तो नेहमीं झोंपतो. बिभीषण सर्वांत धाकटा भाऊ. पण त्याच्यांत राक्षसोचित एकहि गुण नाहीं. महा पराक्रमी खर व दूषण हे देखील माझे भाऊच. मी तुझें रूप पाहिल्यापासून तुझ्याशीं राक्षसविवाह करण्याचें ठरविलें आहे तूं आपल्या बायकोला टाकून दे. माझ्यासमोर तिची काय बरोबरी?"

राम म्हणाला—"माझें लग्न झालेलें आहे व मी एक पत्नीव्रती आहें. तूं तिची सवत म्हणून राहणें तुला तरी आवडेल का! तो बघ माझा भाऊ आहे. मी काळा आहें, पण तो पहा कसा गोरा आहे. पराक्रमी आहे. त्याची बायको त्याच्या बरोबर आली नाहीं. तूं त्याच्याशीं लग्न केलेंस तर सवतीमत्सर होणार नाहीं विचार कर."

शूर्पणखा लगेच रामाला सोडून धावत लक्ष्मणाकडे गेली व लग्न करून घ्यायला विनंति केली.

लक्ष्मणानें तिची थट्टा करीत म्हटलें—"तुझें हें नाजुक शरीर पाहून मला विचार करावा लागतो आहे. हें पहा, मी आहे आपल्या मोठ्या भावाचा सेवक व दास. तूं माझ्याशीं लग्न केलेंस तर तुला दासी व्हावें लागेल. माझे धनी रामचंद्र आहेत. त्यांची बायको झालीस तर मी तुझी सेवा करीन. तुझ्या सारख्या सुंदरीशीं लग्न केल्यावर आपल्या कुरूप व म्हाताऱ्या पत्नीला राम सोडून देईल."

राम व लक्ष्मण तिची थट्टा करीत आहेत हें शूर्पणखेला कळलें नाहीं. ती पुन्हां रामाकडे येऊन म्हणाली—"तूं या म्हाताऱ्या व कुरूप स्त्रीशीं लग्न झाल्यामुळें माझ्या सौंदर्याचा अपमान करीत आहेस. मी हिला एका क्षणांत गट्ट करून टाकतें बघ! मग सवती मत्सर करण्याचें कारणच उरणार नाहीं. असें सांगून ती सीतेला 'आ' पसरून खायला धांवली. सीता पळूं लागली तेव्हां शूर्पणखा तिला धरायला धांवली.

राम लक्ष्मणाला म्हणाला—"पाहिलेंस, हलक्या व दुष्ट लोकांशीं थट्टा केल्याचा हा परिणाम झाला. आतां थट्टा सोडून हिला विकलांग करून पाठवून दे."

लक्ष्मणानें क्षणार्धांत तलवार उपसून शूर्पणखेचें नाक व कान कापून टाकले. शूर्पणखा आक्रोश करीत रानांत निघून गेली.



जनस्थानांत तिचा भाऊ खर राज्य करीत असे. ती त्याच्या कडे रडत गेली. तिचें रक्तबंबाळ झालेलें नाक व कान पाहून भावानें तिची ती स्थिति कोणी केली म्हणून विचारलें. म्हणाला—"माझें नांव ऐकून त्रिलोक कांपतात आणि माझ्या बहिणीची ही दशा व्हावी? सांग, कोण आहे तो दुष्ट!"

शूर्पणखेनें राम लक्ष्मण व सीता तिघांच्या विषयीं सांगून त्यांनीं तिचा कसा अपमान केला हें तिखटमीठ लावून खूप वर्णन करून सांगितलें. नंतर ती म्हणाली—"तूं त्या तिघांना ठार करून त्यांचें



घेऊन ये. तें त्याल्यावर कदाचित माझ्या या अपमानाची भरपाई होईल."

खर राक्षस खरोखरीच भयंकर दुष्ट होता. त्याच्या अत्याचारामुळें जनस्थानांतील ऋषी व मुनींना फार त्रास होत असे. त्यानें आपल्या अनुयायांपैकीं निवडक चौदा राक्षसांना बरोबर देऊन शूर्पणखेला पाठविलें आणि म्हणाला—" तुम्ही जा आणि शूर्पणखा दाखवील त्या तिघांना ठार करून त्यांचें रक्त तिला प्यावला द्या!"

राक्षस शूर्पणखेबरोबर रामाच्या पर्णकुटी समोर येऊन उभे राहाले. शूर्पणखेनें तिघां-कडे बोट दाखविलें व म्हणाली—" हेच ते तिघे दुष्ट!"

शस्त्रास्त्रासहित राक्षसांना आलेले पाहून राम लक्ष्मणाला म्हणाला—" तूं सीतेला घेऊन कोठें तरी बाजूला जाऊन उभा राहा. मी या सर्वांचा समाचार घेतों."

राम सीतेला लक्ष्मणाबरोबर पाठवून आला आणि राक्षसांना म्हणाला—" माझ्यावर तुमचा राग कां? तुम्ही सर्व मला ठारकरण्या साठीं कां आला? ऋषी व मुनींच्या रक्षणासाठीं मी शस्त्र धारण केलें आहे. हें धनुष्य व बाण पाहून घ्या. त्या बोलानें तुम्ही ऐकलें नाहींत व परत गेला नाहींत तर तुम्हीं स्वतःचे प्राण मात्र व्यर्थ गमावून बसाल. तुम्हीं आलांत त्या वाटेनें ताबडतोब निघून जा."

राक्षस रामाजवळ जाब विचारायला व व त्याला शिक्षा द्यायला आले होते. रामाचें तें बोलणें ऐकून त्यांना राग आला. त्यांपैकीं एकजण म्हणाला—" पुरे झाली तुझी ही बडबड तूं आमच्या राजाच्या बहिणीचा अपमान केला आहेस. त्याच्या आज्ञेनें तुझा वध करण्यासाठीं आम्ही आलों आहों." असें सांगून त्यांनीं त्याच्यावर एकदम आपले भाले फेंकले."

रामानें आपल्या बाणांनीं ते भाले मध्येंच तोडून टाकले व बाण सोडून चौदा राक्षसांचा एका क्षणार्धांत वध केला.

रामाचा तो पराक्रम पाहून शूर्पणखा भ्याली व पळून गेली. ती रडत आपल्या भावाकडे गेली. तिला रडत आलेली पाहून खर राक्षसाला आश्चर्य वाटलें. तो विचारूं लागला—" आतां कां रडते आहेस? तुझ्या मनासारखें मी केलें. मी आपल्या उत्तम चवदा अनुयायांना तुझ्याबरोबर तिघांचा वध करण्यासाठीं पाठविलें होतें!"

ती म्हणाली—" होय, तूं पाठविले होतेंस त्यांना, हे खरें आहे. पण त्या सर्वांना एकट्या रामानें ठार केलें. त्याचा तो पराक्रम पाहून मला भीति वाटली. तो कोणी सामान्य मनुष्य दिसत नाहीं. दोघे पराक्रमी भाऊ दिसत आहेत. तूं आपल्या अनुयायांच्या वधाचा सूड घेण्यासाठीं स्वतः जावें असें सांगण्यासाठीं मी आले आहे. तूं त्या रामाला ठार करूं शकला नाहींस तर तुझ्या शौर्याच्या सर्व फुशारक्या फुकट आहेत. या जनस्थानाचा तूं राजा आहेस. तुझ्या राज्यांत शत्रु शिरला आहे. त्याचा वध केला नाहींस तर तो तुझा वध करून तुझें राज्य बळकावून घेतल्या



शिवाय राहणार नाहीं. हा माझा अपमान तर आहेच आहे, तुझा अपमान पण आहे. तूं त्याला तरी ठार कर नाहींतर त्याच्याशीं युद्ध करून वीरगति प्राप्त कर!"

शूर्पणखेनें इतर राक्षसांसमोर रामाच्या शौर्याचें वर्णन केलेलें ऐकून खर राक्षसाला भयंकर राग आला व म्हणाला—" मला रामाच्या पराक्रमाची परीक्षा घेऊन काय करायचें आहे? तुझा अपमान झालेला मला नाही पाहवत. म्हणून मी त्या तिघांचा वध करून तुझ्या मनाचें समाधान करणार आहें."



खर राक्षसाकडे चवदा हजार राक्षसांचें सैन्य होतें. त्याचा धाकटा भाऊ दूषण त्या सैन्याचा सेनापति होता. खर रथ त बसून पुढें निघाला आणि त्याचें सैन्य त्याच्या मागून निघ लें. त्याच्या सैन्यांत बारा मुख्य अधिकारी होते. दूषणपण एका रथांत बसून त्याच्याबरोबर निघाला.

हा खेपेस राक्षसांचें एक अफाट सैन्य येत आहे हें पाहून रामानें लक्ष्मणाला, सीतेला घेऊन गुहेंत, कोठें तरी सुरक्षित जागीं बसायला सांगितलें. दोघें निघून गेल्यावर राम धनुष्यबाण घेऊन राक्षस सैन्याची वाट पहात बसला.

तिकडून राक्षसांचे सैन्य युद्ध वाद्यें वाजवीत व ओरडत आलें. एकटा राम व समोर राक्षसांचें अफाट सैन्य. खर राक्षसाचा रथ रामाच्या पर्णकुटी समोर येऊन उभा राहाला. राक्षसांनीं रामावर बाणवृष्टि सुरु केली. रामानें विद्युत गतीनें बाण सोडून ते बाण अडवले शेंकडो राक्षसांना ठार केलें. राक्षसांची बाणवृष्टि चालूच होती. रामाच्या अंगावर जागोजागीं जखमा झाल्या. पण राम एक पाऊल देखील मागें सरकला नाहीं व त्यानें राक्षसांवर बाणवृष्टि चालू ठेवली. राक्षस पटापट मरून पडले.

राक्षस सेनेचा रामानें केलेला संहार पाहून कित्येक राक्षस आपल्या राजाच्या रथाकडे धांवले. तेव्हां दूषणनें त्यांना धीर दिला व तो रामावर चालून गेला. रामानें त्याच्यावर व त्याच्या अनुयायांवर गंधर्वास्त्राचा प्रयोग केला. सहस्रावधि राक्षसांचा संहार झाला. आतां राम व दूषण यांचें युद्ध सुरू झालें. त्या युद्धांत रामानें दूषणाचा सारथी व घोडे यांचा प्रथम वध केला व दूषणाचे दोन्हीं हात बाणानें विद्ध केले. दूषणबरोबर पांच हजार राक्षस आले होते. रामानें त्या सर्वांचा संहार केला.

राम एकटा होता पण त्यानें चवदा हजार राक्षसांना ठार केलें. आतां फक्त खर व त्रिशुर नांवाचा राक्षस दोघेच उरले होते. रामानें राक्षसांचा केलेला संहार पाहून खर राक्षसाला भयंकर राग आला. तो चवताळून रामाशीं युद्ध करण्यास जात असलेला पाहून त्रिशुर राक्षस त्याला म्हणाला—"मी रामाच्या समाचार घेतों. जर रामाचा हातून माझा मृत्यु झाला तर तूं त्याच्याशीं युद्ध कर." खर त्याला कबूल झाला.

त्रिशुर व रामाचें घोर युद्ध झालें. त्रिशुराचे घोडे व सारथी मृत्युमुखी पडले व त्याचा ध्वज रामानें खालीं पाडला. त्याच्या छातीला रामाचा एक बाण लागल्यामुळें तो मूर्च्छित होऊन जमिनीवर आदळला. तेव्हां रामानें तीन बाण सोडून त्रिशुराचा शिरच्छेद केला.

त्यानंतर राम व खर यांचें युद्ध सुरू झालें. खरानें रामाचे बाण तोडून त्याचें कवच पण तोडून टाकलें व त्याला मर्मस्थानीं एक बाण मारला. रक्ताची चिरकांडी उडाली. पण राम मागें हटला नाहीं. त्यानें अगस्त्य मुनींकडून मिळालेला बाण सोडून खर राक्षसाला विरथ केला. खरनें आपली गदा रामावर फेंकली. रामानें एक बाण सोडून गदेचे तुकडे करून टाकले. तेव्हां त्यानें एक झाड उपटून रामावर टाकलें. रामानें तें मध्येंच नष्ट करून टाकलें व क्षणार्धांत खर राक्षसाचा वध केला.

रामानें खर, दूषण वगैरे प्रतापी राक्षसांचा वध व त्यांच्या चवदा सहस्र अनुयायांचा नाश केलेला पाहून सीतेनें रामाच्या शौर्याचें कौतुक केलें.






देशांत सांपडलेले कांहीं शिलालेख. हे शिलालेख संस्कृत भाषेंत आहेत. कंबोज राज्याच्या थोरवीचीं प्रत्यक्ष चिन्हें म्हणजे अंगकोरवात व अंगकोरथाम ही दोन प्रसिद्ध देवालयें होत.

अंगकोरवात जगांतील आश्चर्यांपैकीं एक मानलें गेलें पाहिजे. प्रथम हें विष्णूचें देऊळ होतें. यांत अनेक गोपुरें होतीं. मधल्या गोपुराची उंची २१३ फूट आहे. या देवालयांत अद्भुत शिल्प पहावयास मिळतें.

अंकोगरथाम हें जयवर्मा यानें निर्मिलेलें राजधानीचें शहर आहे. याचें क्षेत्रफळ दोन वर्ग मैल आहे. चारी बाजूला उंच दगडी भिंत आहे व ३३० फूट रुंदीचा खंदकपण आहे. ("जगांतील आश्चर्यें" जानेवारीचा चांदोबा पहा.)

मलाया द्वीपसमूहांतील इंडियन आर्किपिलागोपर्य्यें दोन हिंदू राजवंश स्थापन झाले व ल्यास गेले. शैलेंद्र वंशाची स्थापना ८ व्या शतकांत झाली. असें सांगतात कीं मलायाचा चक्रवर्ती राजा चंपा व कंबोज देशावर स्वाऱ्या करीत असे. त्याची एका दिवसाची प्राप्ति २०० मण सोनें होती. रोज सकाळीं तो नदींत एक सोन्याचें नाणें अर्पण करीत असे. हें सर्व इतिहास लेखकांनीं लिहून ठेवलें आहे.

शैलेंद्रावर राजेंद्र प्रथम यानें अकराव्या शतकांत स्वारी करून त्याच्या राज्याचा कांहीं भाग आपल्या राज्यांत जोडला. शैलेंद्रानें लंकेवर स्वारी केली होती. पण त्याचा पराभव झाला. त्यानंतर शैलेंद्राचा प्रभाव कमी होत गेला. पुढें जावा द्वीप हिंदू राज्याचें केंद्रस्थान झालें. परंतु पंधराव्या शतकांत येथें मुसलमान धर्मावलंबियांनीं स्वारी केली.






[१०]

[चोरवाट पुरानें भरली तेव्हां भद्रदंडी मांत्रिकानें आपल्या शिष्यांना चमकावून दुसऱ्या वाटेनें बाहेर पडून जाण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण तो फसला. बाहेर पडल्याबरोबर राजगुरूनें त्याला बांधायला सांगून एका आडव्या वाशाला डुकरासारखा त्याला उलटा बांधून राजधानीकडे घेऊन चलायला हुकूम दिला. पुढें वाचा.]

सेनापतीनें ज्या सैनिकाला राजधानींत पुढें मांत्रिक कैद झाल्याची बातमी द्यायला पाठविलें होतें, त्यानें बातमी दिल्याबरोबर नगरांत दवंडी पिटविण्यांत आली. ती बातमी ऐकून प्रजेला आनंद झाला. लोक जागोजागीं गंमत पहायला जमा होऊं लागले. राजगुरूच्या कर्तबगारीमुळेंच या कामीं यश मिळालें, हें ओळखून लोक राजगुरूच्या अभिनंदनासाठीं तोरणें बांधूं लागले.

किल्ल्याच्या दिंडी दरवाज्यांत सर्व प्रथम राजगुरूनेंच प्रवेश केला. लोकांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली व त्याचा मुक्तकंठानें जयजयकार केला. थोड्या वेळानें सेनापतीनें व त्याच्या पाठोपाठ सैनिकांनीं मांत्रिकासह प्रवेश केला. डुकरासारखा मांत्रिक उलटा टांगलेला होता. त्याची शेंडी लोंबकळत होती. लोकांनीं चेष्टेनें त्याची शेंडी ओढली, कोणी नाक ओढलें तर कोणी कान.



परंतु वेळींच सेनापतीनें दरडावून बजा-वलें—"मांत्रिकाच्या अंगाला कोणी हात लावूं नये, ही स्वतः महाराजांची आज्ञा आहे. कारण त्याला एक असें गुपित माहीत आहे कीं याच्या मदतीनें राज्याचा खजिना सोन्यानें भरून जाईल."

ब्रह्मदंडी मांत्रिक सर्व धन त्याला एक-ट्यालाच मिळणार ही आशा धरून होता. पण त्याचें दुर्दैव, त्याला स्वतःच्या या स्थितीचा विचार करून फार वाईट वाटत होतें. त्यानें जमा झालेल्या लोकांना हात जोडून प्रार्थना केली—"बाबांनो! मी निर-पराध आहे, मला कां छळतां? मी अनेक चुका केल्या असतील, पण रानांत तुमच्या सेनापतीचा वध करणारा, विलक्षण जना-वरांचीं रूपें घेऊन येणारा मी नसून जयमल नांवाचा माझा एक मूर्ख शिष्य आहे. त्याला पकडा व शक्य झालें तर त्याच्याबरोबर फिरणारा त्याचा मित्र, एक गुराख्याचा पोर आहे, त्याला पकडा."

मांत्रिकाचें तें बोलणें लोकांना खरें वाटलें व त्यांनीं सैनिकांजवळ जयमल व गुराखी दोघांच्याविषयीं चवकशी सुरू केली. सैनिक म्हणाले—"आम्ही त्यांना पुष्कळ शोधलें. मांत्रिकानें सांगितलेल्या गुहेंत देखील जाऊन पाहिलें. पण ते त्या डोंगरांतल्या झाडींत कोठेंतरी गुडुप झाले म्हणून आम्ही त्यांना मागाहून धरतां येईल असा विचार केला."

तें ऐकून कांहीं तरुण काठी, भाला, तीरकमान जें हातीं आलें तें घेऊन दोघांना हुडकून काढण्यासाठीं त्या डोंगराकडे निघाले.

लखू, त्याचा म्हातारा बाप व जयमल तिघे डोंगरांत शिरून हत्तीची दरी ओलांडून दाट रानांत शिरले.

तिघे फार सावधपणें चालत होते. लखूला झाडींतून दूर शेकडों लोक ब्रह्म-पूरच्या पायवाटेनें रानांत भराभर येत असलेले दिसले. या उलट ब्रह्मपूरचे सैनिक परत जात असल्याचें पण त्यानें पाहिलें. हे जाणारे कोण आणि येणारे कोण असावेत याचा त्याला उलगडा पडेना.

परंतु जास्त लक्षपूर्वक पाहाण्यावर त्याला एवढेंमात्र दिसलें कीं ब्रह्मपुराकडून रानांत येणाऱ्या लोकांच्या हातांत काठ्या, बर्चीं व भाले होते. त्यावरून आपल्यावर आपत्ति येऊं शकेल अशी शंका साहजिकच त्याच्या मनांत येऊन गेली. तो चटकन झाडावर चढून मनाची खात्री करून घेऊन आला आणि बापाला व जयमलला त्यानें जें पाहिलें तें सांगितलें.

जयमल व म्हातारा दोघे झाडावर चढले व त्यांना पण लोक घाईघाईनें येत अस-लेले दिसले.

दोघे झाडावरून उतरले. जयमल लखूला म्हणाला—"त्या सैनिकांपेक्षां हे लोक जास्त आहेत. हे सर्वच आपला शोध काढायला रानांत शिरले तर आपल्याला पळवाट मिळणें अशक्य आहे. कारण डोंगरांतल्या सर्व वाटा येणें त्यांना कठीण वाटणार नाहीं. तसें पाहिलें तर निसटून पळून जाणें जवळ जवळ



अशक्यच आहे आपल्याला. काय करावें कांहीं सुचत नाहीं मला."

लखू व म्हातारा पण विचार करूं लागले. जर का त्यांनीं सर्वांना धरलें तर ते हाल हाल करून मारतील तिघांना.

म्हाताऱ्याच्या मनांत एक शंका आली, कदाचित ब्रह्मदंडीनें स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं आपल्या विरुद्ध लोकांना चिथविलें असेल व म्हणूनच लोक इकडे येत असतील. त्याला एक उपाय सुचला. तो म्हणाला—"आपण वेत करीत येथेंच उभे राहालों तर तिघेच्या तिघे सहजीं त्यांच्या हातीं










सांपडूं. त्यापेक्षां मी एक उपाय सांगतों तो करा. तुम्ही माझे हातपाय बांधून मला येथें दगडावर टाकून पळून जा. मी त्यांना हुलकावणी देऊन येथूनच परत पाठवीन."

लखूला तें आवडलें नाहीं. म्हाताऱ्या बापाला एकटा तेथें सोडून स्वतःचा जीव वांचविण्यासाठी पळून जाणें त्याला कसें आवडणार! जयमलला देखील त्याचें म्हणणें पटलें. पण म्हातारा म्हणाला—"तुम्ही माझ्या विषयीं बिलकुल काळजी करूं नका. राजगुरूनें मला पाहिलें आहे. तुम्हां दोघांना घेऊन येतों म्हणून मी सैनिकांना सांगितलें आहे. मी सांगेन कीं तुम्ही दोघांनीं मला धरून इथें असें टाकलें आहे. मी कशीतरी आपली सुटका करून घेईन. सर्वांनी कैद होण्यापेक्षां मी एकटानेंच या संकटाला तोंड देईन. तुम्ही येथून पाय काढा. वेळ फार थोडा उरला आहे."

शेवटीं अगदीं नाइलाजानें दोघांनीं म्हाताऱ्यानें सांगितल्याप्रमाणें रानटी वेल तोडून आणून म्हाताऱ्याचे हातपाय बांधून त्याला एका दगडावर ठेवून दिलें आणि ते पळून गेले. लखू जातां जातां म्हणाला—"बाबा! यदाकदाचित त्यांनीं तुम्हांला पाहिलें नाहीं तर आम्ही परत येऊन तुम्हांला सोडवून घेऊन जाऊं."

थोड्या वेळानें ब्रह्मपूरचे लोक रानांत शिरले. म्हातारा जोरजोरानें ओरडूं लागला—"धांवा! वांचवा!"

तो जोरजोरानें ओरडतच होता. त्याचा आवाज ऐकून लोक त्या बाजूला धांवले. म्हाताऱ्याला त्या स्थितींत पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. म्हातारा म्हणाला—"मला गरीबाला सोडवा! मला मांत्रिकाच्या दोघां शिष्यांनीं पकडून येथें बांधून ठेवलें आहे. मीच राजगुरूला जंगलाची वाट दाखविली व मीच त्यांना हुडकून काढलें."

दोघे तिथे धांवले व त्यांनीं म्हाताऱ्याला सोडविलें. एकानें म्हाताऱ्याला विचारलें—कोणत्या बाजूनें पळाले ते?"

"दोघे अट्टल चोर आहेत ते! दोघे भिकाऱ्याचा वेष करून ब्रह्मपुराकडेच गेले आहेत!" म्हातारा म्हणाला.

सर्वांना आश्चर्य वाटलें. एकदोघे जण म्हणाले देखील कीं त्यांनीं एकादोघा भिकाऱ्यांना वाटेंत पाहिलें होतें. स्वतःला शहाणा समजणारा एकजण म्हणाला—"आम्ही तिकडे त्यांना शोधणार नाहीं असें समजून ते गांवांत गेले आहेत म्हणावयाचें! सामान्यपणें देशद्रोही व बंडखोर लोक रानांत व डोंगराळ प्रदेशांत लपत छपत फिरतात. आम्ही त्यांना शोधायला रानांत येऊं असें समजून ते गांवांत गेले आहेत का! आहेत खरे लबाड! भिकाऱ्याचा वेष करून गेल्यामुळें आम्ही त्यांना ओळखूं शकलों नाहीं."

एकूण म्हाताऱ्यानें दिलेली थाप पचनी पडली. सर्व आले होते तसे परतले व राजधानींत जाऊन "मांत्रिकाचे शिष्य भिकाऱ्याचा वेष करून गांवांत हिंडत आहेत' असें ओरडून सांगूं लागले.



ब्रह्मदंडी राजासमोर हात जोडून प्राणभिक्षा मागत होता! राजगुरु, मंत्री वगैरे त्याच्याकडून त्या भयंकर दरीचें गुपित काढून घ्यायच्या प्रयत्नांत होते. पण तो सांगत होता कीं जोंपर्यंत त्याला अभयदान दिलें जात नाहीं तोंपर्यंत तो कांहीं एक बोलायला तयार नाहीं.

तेव्हां राजगुरु म्हणाला—"तूं स्वतःच्या प्राणाविषयीं अगदीं बेफिकीर रहा. मी महाराजांच्या वतीनें तुला अभयदान देतों." असें म्हणत राजगुरूनें संमतीसाठीं राजाकडे



वळून पाहिलें. राजानें होकारार्थी डोकें हल-वून आपली संमति दिली.

"तूं म्हणतोस तशी अलोट धनराशी भयंकर दरींत खरोखरच का आहे ? तूं म्हणतोस तें कसें खरें मानावयाचें ?" राजगुरूनें मांत्रिकाला विचारलें.

"आदरणीय राजगुरु ! मी स्वत: काळ-भैरवाच्या तोंडचे ते शब्द ऐकले आहेत. या अधिक माझ्याजवळ दुसरें प्रमाण नाहीं." ब्रह्मदंडी मांत्रिक म्हणाला.

"पण तूं म्हणतोस त्याच्यावर आम्ही विश्वास कसा करावयाचा ?"

"काळभैरवा ! काळभैरवा ! शांतं पापम् !" असें म्हणत ब्रह्मदंडीनें दोन्ही कानावर हात ठेवले आणि म्हणाला—"लागो-पाठ वीस वर्षे मी त्या काळभैरवाची उपासना करून त्याला प्रसन्न केलें. शेवटीं त्या भयं-कर दरींत जाण्यासाठीं ज्या माणसाची मला जरूर होती त्याला देखील मी धरून आणलें. मी म्हणतों त्यावर तुमचा विश्वास नसेल तर तो काळभैरवच मला साक्षी आहे !"

"राजगुरु ! हा मांत्रिक दुष्ट आहे खरा, पण त्याचबरोबर एक भक्त पण दिसतो आहे." राजा म्हणाला.

त्याचवेळीं राजवाड्याच्या दिंडी दर-वाज्याजवळ गलका ऐकून सेनापति तिकडे धांवला. पण तेवढ्यांत दोन सैनिक दर-बाराच्या दरवाज्यांतच त्याला भेटले. सेना-पति त्यांना पाहून थबकला. राजानें देखील दोघां सैनिकांना पाहिलें होतें. त्यानें त्यांना आंत येण्यास संकेत करीत विचारलें—"या आंत या दोघे ! काय भानगड आहे बाहेर ?"

"गांवांतल्या तरुणांनी कित्येक भिका-ऱ्यांवर मारहाण करून त्यांना ओढीत राज-वाड्यापर्यंत आणलें आहे. आम्ही मध्यें पडलों तर उलट आमच्यावरच त्या तरुणांनी

हल्ला केला." असें सांगून पुढें म्हणाले—"मांत्रिकाचे दोघे शिष्य भिकाऱ्याचा वेष करून गांवांत शिरले आहेत, म्हणे !"

"ही काय नवीन भानगड आहे सेनापति !" राजानें विचारलें.

"आम्ही ब्रह्मदंडीला पकडून राजधानींत घेऊन आलों तेव्हां तो म्हणाला कीं सर्व अत्याचार त्याच्या दोघां शिष्यांनीं केला आहे व ते आमच्या हातांतून निसटून डोंगरांत लपत छपत फिरत आहेत. तें ऐकून हीं तरुण मंडळी त्या दोघांना धरून आणण्यासाठीं गेली होतीं." सेनापति म्हणाला.

"ते दोघे भिकाऱ्याचा वेष करून हिंडत आहेत असें त्यांना कोणी सांगितलें म्हणें," सैनिक म्हणाले.

राजगुरूनें खालीं जमिनीवर डोकें टेंकून क्षमा मागणाऱ्या ब्रह्मदंडीला लाथ मारून उठायला सांगितलें आणि विचारलें—"एकलीस तूं ही बातमी ! आपल्या शिष्यांना भिकाऱ्याच्या वेषांत तूं ओळखूं शकशील कीं नाहीं !"

ब्रह्मदंडी एकदम उभा राहून म्हणाला—"हजार भिकाऱ्यांत मी त्यांना ओळखूं शकेन ! भिकाऱ्याचाच काय राजाचा वेष करून देखील ते आले तरी मी त्यांना ओळखूं शकेन."

मंत्री इतका वेळ कांहीं बोलला नव्हता. उठून उभा राहिला आणि म्हणाला—"महाराज ! माझ्या मतें गांवांतल्या सर्व भिकाऱ्यांना बोलावून घेऊन यावें."

राजानें आपली संमति मान हालवून दिली. मंत्री व सेनापति व्यवस्था करण्यासाठीं बाहेर निघून गेले. त्यांच्या आज्ञेनें सैनिक भिकाऱ्यांना पकडून आणण्यासाठीं निघाले. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# वृथा श्रम

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडापर्यंत गेला आणि झाडावरचें प्रेत काढून घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा ! तुझा हा सर्व श्रम वृथा आहे. तो पाहून मला भीमसेन महाराजांची आठवण होते. त्यानें देखील हट्टाला बळी पडून वृथा श्रम केला आणि शेवटीं यश तर मिळालेंच नाहीं, तोच स्वतः प्राणाला मुकला. तुला कंटाळा येऊं नये म्हणून त्याची गोष्ट सांगतो." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

प्राग्ज्योतिष नांवाच्या एका पुरातन नगरींत एक विद्वान ब्राह्मण रहात असे. त्याचें नांव पौंडिक होतें
शोडष शास्त्र व
संपादन केलें. त्
तर त्याला राजद

वैताळ



जागा मिळाली असती. पण तो होता स्वाभिमानी. कोणाच्या पदरीं नोकरी करणें त्याला पसंत नव्हतें. म्हणून त्यानें स्वतःच्या उदर निर्वाहासाठीं मंत्र विद्या व सिद्धी प्राप्त करून त्यांचा उपयोग करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें तो हिमालय पर्वतांत जाऊन राहाला व कित्येक योग्यांची सेवा करून अनेक सिद्धी प्राप्त करून घरीं परत आला. त्यानंतर त्यानें अनेक चकित करून सोडणारे चमत्कार घडवून आणले.

त्याची कीर्ति राजाच्या दरबारीं पोंचली. भीमसेन महाराजांनीं त्याला आपल्या दरबारीं बोलाविलें. राजाला त्याची भीति वाटत होती म्हणून त्यानें त्याला कैद करविलें आणि एक वर्षभर त्याला उपाशी काळकोठडींत कोंडून ठेवलें. पण आश्चर्य असें कीं त्याचें शरीर कृश होण्याऐवजीं जास्त बलिष्ठ झालें. राजाचे शिपाई दार उघडून आंत जाऊन पाहतात तर पौड्रिक एक वर्षापूर्वी जसा बसला होता. तसाच त्या जागीं बसलेला होता, भीमसेन महाराजांना जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां पौड्रिकानें अष्ट सिद्धी वश करून घेतल्या आहेत या गोष्टीची खात्री पटली. परंतु त्या बरोबर त्यांना त्याची जास्त भीति वाटूं लागली. म्हणून त्यांनीं पौड्रिकाला विष देऊन ठार करण्याचें ठरविलें.

पौड्रिक महाराजांचा निरोप घेण्यासाठीं जेव्हां आला तेव्हां महाराज त्याला म्हणाले—"पंडितवर! आपल्यासारख्या सिद्ध पुरुषाची ओळख झाल्यामुळें मनाला फार आनंद झाला. आज आपण माझ्याबरोबर जेवायला रहावें.

पौड्रिक महाराजांबरोबर जेवायला बसला. पौड्रिकाला ज्या पेल्यांत खीर दिली होती त्यांत विष कालवलेलें होतें. पौड्रिकाला अर्थातच तें माहीत होतें. तो राजाला म्हणाला— महाराज ! मी या वाटीतली अर्धी खीर आपणांला देतों."

पण महाराज म्हणाले—"अहो, मला आहे कीं निराळी. माझी वाटी पहा भरलेली आहे."

पौड्रिकानें चटकन एक चाकू घेऊन वडी कापतात तशी खीर कापली, आणि आश्चर्य म्हणजे पेल्यांतल्या खिरीच्या दोन वड्या पडल्या. एक वडी तो महाराजांना देऊं लागला. पण महाराजांनीं नकार दिल्यावर पौड्रिकानें दोन्ही वड्या खाऊन टाकल्या आणि वाटी वर भिरकावून दिली. वाटी वर छपराला चिकटून कांहीं वेळ भोंवऱ्या सारखी फिरत राहिली. राजाच्या पंक्तीला बसलेलें सर्व दरबारी आश्चर्यानें तें दृश्य पहात राहले.

थोड्या वेळानें त्यांनीं पौड्रिकाकडे पाहिलें, पण त्याची खुर्ची रिकामी पाहून व तो अदृश्य झालेला पाहून सर्व चकित झाले.

भीमसेन महाराजांनीं पौड्रिकाची धास्तीच घेतली. त्यांनीं पौड्रिकाला धरून आणण्यासाठीं सैन्य पाठविलें. सैन्यानें पौड्रिकाच्या घराला वेढा दिला. पण पौड्रिक गाईचें रूप घेऊन गोठ्यांत जाऊन उभा राहिला.



एक सैनिक हुशार होता. त्यानें गाई मोजून पाहाल्या. एक गाय वाढलेली पाहून तो गाईंना म्हणाला—"राजा तुमचें खरें रूप पहावें म्हणून येत आहे. तुम्ही स्वतःचें रूप घेऊन उभ्या रहा!"

एका गाईनें विचारलें—"खरेंच काय!"

तें ऐकून सैनिकाला वाटलें, चोर सांपडला व तो त्या गाई

पण तितक्यांत स

तेव्हां पौड्रिक

समजून सर्व सैनि

वृत्त राजाला जा







कांहीं काळ लोटल्यावर कोणाला तरी पौंड्रिक एका जागीं दिसला. त्यानें लगेच जाऊन राजाला ती बातमी दिली. राजा कांहीं तरी बक्षिस देईल अशी त्यांना आशा वाटत होती. राजानें त्याप्रमाणें पौंड्रिकाला धरून आणण्यासाठीं स्वत: सेनापतीच्या हाताखालीं एक मोठें सैन्य पाठविलें. पौंड्रिकानें निसटण्याचा प्रयत्न केला व तो कैद झाला.

राजानें पौंड्रिकाला प्राणदंड दिला. चांडाळ त्याला वधस्थानाकडे घेऊन जाण्यासाठीं आले तेव्हां त्यांना एका ऐवजीं दोन पौंड्रिक दिसले. एक काळकोठडींत होता व दुसरा बाहेर. सैनिकांनीं ती गोष्ट राजाला कळविली. राजानें हुकूम दिला दोघांचा शिरच्छेद करा. पण चांडाळ परत येतात तोंपर्यंत पौंड्रिक अदृश्य झालेला होता.

राजानें राजधानीच्या प्रत्येक दरवाज्यावर सक्त पाहारा ठेवला व पौंड्रिक बाहेर जातांना किंवा येतांना दिसला तर त्याला धरून आणण्यास सांगितलें. पण आश्चर्य म्हणजे एकाच्या जागीं तीन तीन चार चार पौंड्रिक जागोजागीं लोकांना दिसले. म्हणून खरा पौंड्रिक कोण हें कळायला मार्ग उरला नाहीं.

तेव्हां राजानें नादिरशाही हुकूम सोडला. जो कोणी पौंड्रिकासारखा दिसेल त्याचा जागच्या जागीं वध करण्यांत यावा. त्याप्रमाणें एकाचा वध करून सैनिक त्याला एका पोत्यांत कोंबून राजाकडे घेऊन आले. पण पोत्याचें तोंड उघडून पाहालें तेव्हां आंत त्यांना लाकडाचें एक ओणकेंच दिसलें.

अनेक वेळां अपयश आलें तरी भीमसेन महाराजांनीं आपला हट्ट सोडला नाहीं. त्यांनीं सेनापतीला बजावून सांगितलें कीं काय वाटेल तें झालें तरी त्या पौंड्रिकाचा वध केलाच पाहिजे. तेव्हां सेनापति दहा हजारांचें एक सैन्य घेऊन निघाला. त्यानें राजधानीच काय पण डोंगर व अरण्यें देखील हुडकून काढण्याचें ठरविलें.

एकदां सेनापति आपल्या तंबूजवळ उभा असतां त्याला दुरून पौंड्रिक येत असलेला दिसला. त्याच्या एका हातांत एक मडकें होतें व दुसऱ्या हातांत एक पोतें. त्यानें मडकें व पोतें जमिनीवर ठेवलें व म्हणाला—“सेनापति! मी तुला व तुझ्या सैन्याला मेजवानी देण्यासाठीं दारू व पंचपक्वान्नें घेऊन आलों आहें.” सेनापतीला वाटलें कीं स्वत:चें मंत्रबळ दाखविण्यासाठीं बहुतेक स्वारीचा प्रयत्न दिसतो आहे. सेनापतीनें पौंड्रिकाविषयीं पुष्कळ ऐकलें होतें व दुरून त्याला पाहिलें पण होतें. पण इतक्या जवळून त्याला कधींच पाहिलें नव्हतें. थोडा वेळ गंमत पहावी असा विचार करून तो पौंड्रिकाला म्हणाला—“तूं मेजवानी द्यायला आला आहेस खरा, पण माझ्या एवढ्या सैन्याला ही दारू कशी पुरेल?”

पौंड्रिक म्हणाला—“या मडक्यांतली दारू कमी पडणार नाहीं. व या पोत्यांतलें अन्न देखील कमी पडणार नाहीं. जितकें



काढून घ्याल तितकेंच तें त्यांत पुन्हां भरून येईल."

सैनिकांनीं पोटभर पक्वान्नें खाल्लीं व दारू पिऊन घेतली. नंतर तें मडकें व पिशवी उचलून घेण्यासाठीं ते परस्पराशीं भांडूं लागले कांहीं पुढें जाऊं लागले. पण आश्चर्य म्हणजे त्यांना जागचें हालतांच येईना. सर्व जमिनीला चिकटून राहाले. एक दोघे मडक्या जवळच होते. त्यांनीं उचलण्याचा प्रयत्न केला तर मडकें व पोतें जमिनीला चिकटून राहालें.

पौंड्रिक हंसत तेथून निघून गेला. त्यानें घडलेलें वृत्त राजाला सांगितलें आणि म्हणाला—"या पौंड्रिकाला धरणें आपल्याला वाटलें तसें तें सोपें नाहीं."

आणखी कांहीं दिवस लोटले. राजा आपल्या उद्यानांत फिरत असतां त्याला समोर पौंड्रिक दिसला. तो त्याला म्हणाला—"महाराज ! या, आपल्याशीं मला कांहीं बोलावयाचें आहे." राजा म्हणाला—"येतो." आणि चटकन घोड्यावर बसून पौंड्रिकाला धरायला धांवला. पण पौंड्रिक कांहींच बोलला नाहीं. तो चालूं लागला. राजा घोड्यावरून त्याचा पाठलाग करीत होता तरी तो पौंड्रिकाला धरूं शकला नाहीं.



कांहीं वेळानें घोडा इतका दमला कीं त्याच्या तोंडांतून फेस येऊं लागला आणि तो जमिनीवर कोलमडून पडला. अर्थातच राजा देखील जमिनीवर आदळला. पौंड्रिक कोठें निघून गेला, कोणाला कळलें नाहीं.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा ! मला एक शंका आहे. भीमसेन महाराजांना सुरवातीलाच ही गोष्ट कळली असणार कीं पौंड्रिकाला कैद करून त्याचा वध करणें अशक्य आहे. त्याला ही गोष्ट कळली नसली तरी त्यानें दाखविलेले एक दोन चमत्कार पाहून तरी त्याला ही गोष्ट








कळायला हवी होती. जी गोष्ट त्याच्या सेनापतीला देखील कळली होती, ती राजाला कळली नसेल, असें नाहीं मला वाटत. इतकें असून त्यानें पौंड्रिकाला धरण्याचा इतका हट्ट कां धरावा? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील, विसरूं नकोस."

विक्रमार्क म्हणाला—"भीमसेन महाराजांना पौंड्रिकाच्या मंत्रशक्तीची पूर्ण कल्पना होती. त्याला कैद करून त्याचा वध करणें देखील आपल्याला शक्य नाहीं हें देखील त्यांना माहीत होतें. पण तें कबूल करणें त्याला पसंत नव्हतें. दुसरा कोणी आपल्याहून मोठा किंवा बलिष्ठ आहे हें कोणताहि राजा कसें मान्य करील? त्यांत मला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. जो राजा आपल्या प्रजेपैकीं कोणालाहि स्वतःहून जास्त पराक्रमी व बलिष्ठ मानून स्वस्थ बसतो तो किती दिवस राज्य करणार? त्याचें सिंहासन डग-मगवणारा कोणी प्रतिस्पर्धी दिसला तर त्याचा कांटा दूर करणें हें राजाचें प्रथम कर्तव्य होऊन बसतें. म्हणून भीमसेन महाराजांनीं पौंड्रिकाचा वध करण्यासाठीं खटपट केली ती मला नैसर्गिकच वाटते. आतां स्वतःचा प्राण गमावून बसणें हा प्रश्न. मरण हें प्रत्येकाच्या वांट्यास येतेंच. कोणी सुटतो आहे का? पण तो मृत्यु शक्य तोंवर पुढें ढकलावा हा प्रत्येक मानवाचा प्रयत्न असतो. भीमसेन महाराजांनीं तोच प्रयत्न केला." राजाचें मौन अशा तऱ्हेनें भंग होतांच बेताळ अदृश्य झाला व पुन्हां परत जाऊन झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# गुलाम हिरकणी

[३]

चोरांचा डोळा चुकवून जमरूद निसटली ती घोड्यावर बसून संध्याकाळपर्यंत पळत राहाली. रात्रीं झाडाखालीं विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं उजाडतांच पुढें निघाली. सतत दहा दिवस वाळवंटांत प्रवास केल्या-नंतर तिला एका जागीं थोडीशी हिरवळ, आणखी पुढें गेल्यावर पाण्याचे ओढे, शेतें फळझाडें पण दिसलीं. एका झाडाखालीं विश्रांति घेऊन पुन्हां घोड्यावर बसून पुढें निघाली. ती एका मोठ्या राजधानीच्या नगरांत येऊन पोंचली. ती त्या नगराच्या द्वाराजवळ पोंचली तेव्हां तिला तेथें मोठी गर्दी दिसली व आश्चर्य म्हणजे तिला पाहून त्या लोकांना आनंद झाल्यासारखा जमरूदला वाटला.

अकस्मात् नगराचा भव्य दरवाजा उघ-डला व आंतून त्या गांवचे प्रमुख घोड्यावर बसून पुढें आले व त्यांनीं लवून मुजरा केला. त्याच वेळीं प्रजेनें "नव्या सुलतानांचा जय असो!" असा जयघोष केला.

जमरूद अर्थातच अजून पुरुष वेषांतच होती. पण तिला तें सर्व कांहीं कळेना. तिनें पुढें येऊन त्या नगराच्या प्रमुखांना विचारलें—"हा कोणाचा जयजयकार चालू आहे?"

"आपल्याला आमच्या या शहराचें राज्य करण्यासाठीं अल्लानें पाठविलें आहे. तो सर्वज्ञ आहे. म्हणूनच त्यानें आपल्यासारख्या योग्य तरुणाची निवड करून पाठविलें." नगर पिते म्हणाले.



जमरूद जास्तच चकित झाली. परंतु त्यांच्याशीं बोलल्यावर तिला कळलें कीं त्या गांवचा सुलतान मेल्यानंतर नागरिक नगराच्या मुख्यद्वारासमोर जमा होता. जो सर्व प्रथम बाहेरून गांवांत येतो त्याला सुलतान नेमण्यांत येतें. जमरूद सर्वांत प्रथम आली.

तिनें स्वतःची ओळख दिली नाहीं व म्हणाली—"कुलीन घराण्यांत माझा जन्म झाला आहे. देश पर्यटन करण्यासाठीं मी निघालों होतों व तुमच्या गांवीं सहजीं आलों. तुम्ही माझ्यावर ही जी जबाबदारी टाकली आहे त्या योग्य होण्याचा मी प्रयत्न करीन."

त्यानंतर जमरूदला सुलतानाचीं वस्त्रें देण्यांत आलीं व राज्यारोहण समारंभ झाला. दरबारी व मानकरी लोकांनीं लवून मुजरा केल्यावर सर्व नागरिकांनीं पण मुजरा केला.

जमरूदनें दान धर्म केला. खजिन्यांत वर्षानुवर्षे पडून राहालेली संपत्ति प्रजेच्या उपयोगी पडावी म्हणून तिनें प्रजेच्या हिताचीं कित्येक कामें केलीं. त्यामुळें राज्यांतल्या उद्योग धंद्यांना प्रोत्साहन मिळालें. व्यापार वाढला व राज्याची भरभराट झाली. या प्रजावत्सल सुलतानाला शतायु कर अशी प्रजेनें अल्लाजवळ दुवा मागितली. दरबारी मंत्री किंवा प्रजेला चुकून सुद्धां संशय आला नाहीं कीं आपला सुलतान पुरुष नसून एक स्त्री आहे.

हें सर्व झालें, पण जमरूदच्या मनाला चैन पडेना. कारण तिला अलीशारची सारखी आठवण येत होती. त्याच्या वांचून तिला जिणें व्यर्थ वाटूं लागलें. तिनें त्याच्या शोधार्थ पुष्कळ खटपट केली. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. अलीशारची पुन्हां भेट घडावी म्हणून तिनें नवस केले, उपास केले दानधर्म केला. प्रजेला वाटे, आपले सुलतान धर्म भोळे आहेत!



एक वर्ष लोटलें. एकाएकीं जमरूदला एक युक्ति सुचली. तिनें एक मोठें मैदान स्वच्छ करविलें. त्यांत एक मोठा शामियाना उभा केला. त्यांत राजधानींतल्या सर्व प्रजेला बसून जेवतां येईल एवढी जागेची व्यवस्था केली. नंतर तिनें राजधानींत दवंडी पिटविली कीं "दर महिन्याच्या पहिल्या तारखेला तेथें सहभोजनाची व्यवस्था करण्यांत आली आहे. जो कोणी गैर हजर राहील त्याला फांशीची शिक्षा देण्यांत येईल."

पहिल्या सहभोजनाला सर्व धनीमानी व गोरगरीब प्रजा हजर होती. जमरूद प्रत्येकाची चवकशी करण्याचें मिश करून प्रत्येकाला जवळ जाऊन पहात होती. सर्वांना आश्चर्य वाटलें. कित्येकांनीं सुलतानाच्या उदार स्वभावाचें कौतुक केलें.

त्या दिवशीं संयोगवश बरसूम पण त्या मेजवानीला आला होता. तो स्वतः समोरच्या लाडू जिलब्या संपवून दुसऱ्याच्या ताटलींतलींच पकालें पण लाटीत होता. जमरूदनें शिपायांना सांगून त्याला कैद करविलें. तिनें त्याला ओळखलें होतें.

पहिल्याच दिवशीं मेजवानींत विघ्न आलें. बरसूमला सुलतानासमोर उभें करण्यांत आलें.



जमरूदनें त्याला विचारलें—"कोण तूं आमच्या राजधानींत परवानगीशिवाय शिरणारा?"

बरसूम खोटें बोलला. म्हणाला—"माझें नांव अली आहे. मी एक दर्यावर्दी व्यापारी आहें!"

जमरूदनें एका ताटांत वाळू व एक तांब्याची काडी आणावयास नोकराला सांगितलें. वाळूवर कांहीं आडव्या उभ्या रेषा काढून ती म्हणाली—"तूं खोटें बोलतो आहेस! तुझें नांव बरसूम आहे. तूं एका गुलाम दासीला पळवून नेलें होतेंस कीं नाहीं? तिचा शोध काढीत तूं इकडे आला

आहेस. होय कीं नाहीं?" तिनें दरडावून विचारलें.

बरसूम जमरूदच्या पायांवर लोटांगण घालून म्हणाला—"मालक! माफ करा, चुकलों!"

सर्व दरबारी चकित होऊन पाहूं लागले. सुल्तानांना ज्योतिष विद्या देखील अवगत आहे तर!

जमरूदनें बरसूमला फांशीची शिक्षा देण्यास हुकूम सोडला. म्हणाली—"माझ्या राज्यांत असल्या खादाड व खोटें बोलणाऱ्यांना हीच शिक्षा दिली जाईल."

दुसऱ्या महिन्यांत पुन्हां मेजवानी झाली. सव बेता बेतानेंच पक्वान्नें खात होते. समोर ताटलींत जेवढें होतें तें देखील पुरें खाण्याचें कोणी साहस केलें नाहीं. सर्वांना धास्ती वाटत होती सुल्तानांनीं खादाड समजून फांशी दिली तर!

त्या मेजवानीला एक नवीन माणूस परगांवचा आला होता. त्यानें एका बाजूची सोयिस्कर अशी जागा स्वतःसाठीं निवडली आणि टेबलावर जीं पक्वान्नें ठेवलेलीं होतीं त्यावर भरपूर हात मारला. शिऱ्याचें ताट प्रथम रिकामें करून लाडू व जिलब्यांचीं ताटें पण रिकामी केलीं. त्याचें वागणें सर्वांना थोडें विलक्षण वाटलें.

तो अनोळखी मनुष्य चोरांच्या टोळीचा नायक होता. जमरूद म्हातारीच्या हातावर तुरी देऊन पळून गेल्यानंतर दोन दिवसांनीं तो परत आला. तेव्हां जमरूद पळून गेल्याचें व एक घोडा नाहींसा झाल्याचें कळलें. एक पुरुषी पोशाख पण नाहींसा झालेला दिसला. तो पोशाख करून हिंडणारा कोणी भेटला तर त्याला पकडून आणण्याचा हेतूनें तो निघाला होता आणि जमरूद ज्या देशाची सुल्तान झाली होती त्या देशांत आला. मेजवानीची गोष्ट ऐकून तो देखील मेजवानीला हजर झाला होता.

त्याला पाहतांच जमरूदनें त्याला ओळखलें व त्याला धरून आणण्यासाठीं तिनें कांहीं शिपाई पाठविले. शिपायांनीं त्याच्या मुसक्या बांधून त्याला सुल्तानासमोर उभें केलें.

"कोण तूं! काय करतोस! आमच्या राजधानींत येण्याचा काय हेतु होता तुझा?" जमरूदनें दरडावून विचारलें.

"माझें नाम रहमान आहे. मी एक प्रवासी आहें. गांव पहायला म्हणून आलों आहें." चोर म्हणाला.







जमरूदनें पहिल्यासारखें वाळूचें ताट व तांब्याची काडी मागवली. आडव्या उभ्या रेषा काढून लक्षपूर्वक रेखागणित केल्या-सारखें दाखवून म्हणाली—"तूं प्रवासी आहेस? तूं तर चोराच्या सोनेरी टोळीचा नायक आहेस! तूं कित्येक चोऱ्या केल्या आहेस व कित्येकांचे खून देखील केले आहेस. माझ्याजवळ तुझी लटपट चाला-वयाची नाहीं. काय तें खरें सांग नाहीं तर तुझी चामडी लोळवीन!"

चोरानें चटदिशी तिला ओळखलें. आपण जिच्या शोधार्थ हिंडत आहों तीच सुल्तानाचें सोंग करून येथें बसली आहे. पण तो कांहींच बोलला नाहीं. त्याच्या तोंडांतून शब्दच उमटेना. तो अडखळत म्हणाला—"सुल्तान म्हणतात तसा मी चोरांच्या टोळीचा खरोखरच नायक आहें. मला क्षमा करावी. मी या पुढें चोरीचा धंदा सोडून काम धंदा करीन."

"तुझ्या सारख्या अत्याचारी डाकू व लटेऱ्यांना जिवंत सोडणें म्हणजे धर्मद्रोह होईल!" असें त्याला उत्तर देऊन जमरूद म्हणाली—"घेऊन जा याला माझ्या डोळ्या-समोरून आणि याला तावतोब फांशी द्या."

सुल्तानाला ज्योतिष शास्त्राची चांगलीच माहिती आहे याची प्रजेला खात्री पटली. आपण लपवा लपवी केली तर सुल्तानाला ती कळल्याशिवाय राहणार नाहीं. सुल्तान तुरुंगांत टाकतील किंवा फांशी देतील या भीतीनें लबाड्यांना व लुच्चेगिरीला आळा बसला. राज्यांत शांतता नांदूं लागली.

तिसऱ्या खेपेला जेव्हां मेजवानी झाली तेव्हां सर्व आज कोणाची पाळी आहे हें पहात बसले. समोरच्या ताटाला कोणी हात लावला नाहीं. तिकडे कोणाचें लक्ष देखील नव्हतें.

कांहीं दिवसांपूर्वी त्या गांवाला एक पांढरी दाढीवाला आला. त्यानें सुल्तानाच्या मेजवानीची गोष्ट ऐकली. जो कोणी मेज-वानीला हजर रहात नाहीं त्याला सुल्तान फांशी देतो हें देखील त्याला कळलें होतें. म्हणून तो सुद्धां मेजवानीला हजर झाला.

तो रशीद होता. त्यानेंच जमरूदला प्रथम विकत घेण्याचा प्रयत्न केला होता व त्यानेंच आपला भाऊ बरसूम याच्या मदतीनें अलीशारच्या घरून जमरूदला पळवून नेलें होतें. जमरूद त्याच्या हातून निसटून गेल्यावर तिचा शोध काढण्यासाठीं त्यानें बरसूमला पाठविलें होतें. पण बरसूम एक महिना झाला तरी परतला नाहीं हें पाहून तो स्वतः त्याच्या व जमरूदच्या शोधार्थ निघाला आणि त्या गांवीं आला.

तो खायला बसला तेव्हां जमरूदनें त्याला तत्क्षण ओळखलें. ती कांहीं बोलल्या-शिवाय तेथून निसटून निघून गेली. लोकांना आश्चर्य वाटलें कीं सुल्तानानें या खेपेस कोणालाहि धरून नेलें नाहीं. परंतु त्यांना आश्चर्य करीत फार वेळ बसावें लागलें नाहीं. कांहीं शिपाई घाई घाईनें मेजवानीच्या शामियानांत शिरले व जेथें रशीद बसला होता तेथें सरळ येऊन उभे राहिले. रशीद चकित होऊन तिकडे पाहूं लागला. पण शिपायांनीं क्षणार्धांत त्याची नकली दाढी ओढून काढली आणि त्याला कैद करून सुल्तानासमोर उभें केलें.



"काय तुझें नांव? काय तें खरें सांग! येथें लपवालपव चालायची नाहीं. तूं वेष पालटून येथें कशाला आला होतास?" जमरूदनें दरडावून विचारलें.

रशीद म्हणाला—"सुल्तान! माझें नांव रुस्तुम आहे. मी एक गरीब फकीर आहें. गरिबावर दया करावी!"

जमरूदनें वाळूचें ताट व तांब्याची काडी मागविली व नेहमीसारख्या उभ्या आडव्या रेषा काढून ज्योतिष पाहल्यासारखें दाखविलें व म्हणाली—"लबाड लांडग्या! तूं सुलतानासमोर खोटें बोलतोस! तुझें नांव रशीद अल्दीन आहे. तूं ख्रिस्ती आहेस पण हें नांव धारण करून तूं मुसलमान व्यापाऱ्याचें सोंग करून हिंडतोस. एका मुसलमान दासीला तूं आपल्या घरीं पळवून नेलें नव्हतेंस? बोल!"

आपला बचाव करण्याचा प्रयत्न फुकट समजून व कदाचित खरें बोललें तर सुटका मिळेल असा विचार करून त्यानें सर्व कबूल केलें. पण जमरूदनें त्याला फांशीची शिक्षा दिली.

चोर व लबाड लोकांना पकडण्यासाठींच सुलतानानीं मेजवानी सुरू केली आहे कीं काय असें लोकांना वाटूं लागलें.

जमरूदनें ज्या हेतूनें मेजवान्यांचा कार्यक्रम सुरू केला होता तो हेतु पार पडला नव्हता. पण त्या प्रयत्नांत तिचे व अलीशारचे सर्व शत्रू मात्र सांपडले गेले याचा विचार करून तिच्या मनाचें थोडें समाधान झालें. तिचा प्रियकर कोठें असेल किती कष्ट सहन करीत असेल याचा विचार करीत ती बसली होती त्याच जागीं थोडी आडवी झाली व लगेच तिचा डोळा लागला.

पण थोड्या वेळानें तिची झोंप मोडली. ती देवासमोर गुडघे टेंकून बसली व प्रार्थना करूं लागली—"हे अल्ला! तुझ्या कृपेशिवाय माझी व माझ्या प्रियकराची भेट होणें शक्य नाहीं." रात्रभर ती रडत राहिली.

त्या दिवसापासून एक महिनाभर ती बाहेर आली नाहीं कीं कोणाला भेटली नाहीं. [पुढल्या अंकांत संपणार]





# भीमूचें पराक्रम

जमीनदारानें आपल्या जांवयासाठीं म्हणून एक खास नोकर नेमला होता. पण त्याला काम कांहींच नव्हतें. एकतर मुलगाच, त्यांत भीमरावांचा नोकर आणि काम कांहीं नाहीं. म्हणून त्याच्या माकडचेष्टा चालू होत्या. कधीं झाडावर चढ, कधीं भिंतीवरून उड्या मार, कधीं खुर्चीवरच नाच, एक न एक उद्योग चालू असायचा त्याचा.

भीमू आपल्या नोकराच्या या माकडचेष्टांचें कौतुक करीत पहात बसे. पण जमीनदाराला तें कसें आवडणार? जमीनदारानें एक दोनदां नोकराचा हा खेळखंडोबा पाहिला. त्यानें त्याला बाजूला बोलावून त्याचा कान पिळला आणि बजावून सांगितलें कीं पुन्हां असा धिंगाणा करतांना दिसलास तर नोकरीवरून काढून टाकीन.

एकदां जमीनदारानें जांवयासमोर नोकराला कोंचावरून फर्शीवर उड्या मारीत असतांना पाहिलें. पण भीमू त्याला कांहीं एक बोलला नाहीं व उलट गंमत पहात बसला. तें पाहून जमीनदारानें नोकराला—"चालता हो बाहेर!" असें दटावून बाहेर पाठविलें व जांवयाला म्हणाला—"या नोकराला खुशालचेंडूसारखा मोकळा सोडलात तर तो तुमच्या डोक्यावर चढेल! संभाळून रहा!"

तें ऐकून भीमू घाबरला. सासऱ्यानें सांगितलेलें खोटें का असणार, काय नेम? खरोखरच डोक्यावर चढून बसायचा! म्हणूनच हा उड्या मारण्याची संवय करीत असावा. याला डोक्यावर चढूं देतां कामा नये असा विचार करून भीमूनें एक युक्ति केली. तो एक धागोटें जवळ ठेवूं लागला.

नोकराची बढती ] [श्री. मा. गो. मोरे



नोकर असला किंवा त्याला बोलावयाचें झालें कीं डोक्याला पागोटें घालून उभा राही. बसून राहलों तर त्याला डोक्यावर सहज चढून बसतां येईल, म्हणून नोकर आला कीं डोक्यावर दोन्हीं हात ठेवून उभा राही. त्याला जें कांहीं सांगावयाचें असेल तें सांगून तो दूर निघून गेल्यावर डोक्यावरचे हात बाजूला करी व पागोटें काढून ठेवी. काय नेम कधीं डोळा चुकवून येऊन डोक्यावर चढेल म्हणून दार उघडें असेल तेव्हां तो बसत नसे. उभा राही किंवा खोलींतल्या खोलींत हिंडत राही.

एकदां लक्ष्मीनें नवऱ्याला, डोक्याला पागोटें घालून खोलींत फिरत असलेला पाहिलें. तिनें येऊन विचारलें—"हें काय सोंग केलें आहे?"

त्यावेळीं त्याचा नोकर तेथें सुदैवानें नव्हता. भीमू म्हणाला—"तुला काय माहीत. तो म्हणे डोक्यावर चढून बसेल! तुझ्याच वडिलांनीं सांगितलें मला. म्हातारी माणसें, त्यांना या नोकरांची चांगली माहिती असते. पहा ना, तो सारखा उड्या मारीत असतो. चांगली संवय झाली कीं चढून बसेल! म्हणून मी सावध रहावयाचें ठरविलें आहे."

तें ऐकून लक्ष्मी हंसू लागली. म्हणाली—"बाबांनीं सांगितलें त्याचा हा अर्थ नव्हे. जर नोकराला मोकळा सोडला तर तो पुढें तुमचें ऐकणार नाहीं, हा होता त्यांच्या म्हणण्याचा अर्थ!"

भीमूला एक मोठें ओझें डोक्यावरून उतरल्यासारखें वाटलें. कारण आजपर्यंत त्यानें सांगितलेलें नोकरानें केलें नाहीं असें कधीं झालें नव्हतें. म्हणून भीमू नोकराशीं पुन्हां पहिल्यासारखाच वागूं लागला.

एकदां भीमूनें आपल्या नोकराला थोडें पाणी घेऊन यायला सांगितलें. तो एक भांडें भरून पाणी घेऊन आला. भीमू म्हणाला—"एवढें का पुरणार आहे?" त्यावर तो मुलगा म्हणाला—"मला पहिल्यानें कां नाहीं सांगितलें, मी एक घागर भरून घेऊन आलों असतों." त्याला भीमूची भीति म्हणून वाटत नव्हती.

जमीनदार हें सर्व पहात होता. तो भीमूला म्हणाला—"पाहिलेंस, हा तोंडासमोर अशीं उत्तरें करूं लागला आहे. आतां तो डोक्यावर नाहीं चढणार तर काय?"

भीमू म्हणाला—"तो डोक्यावर चढणार नाहीं! असें मला स्वतः लक्ष्मीनें स्वतः सांगितलें!"

"डोकें तिचें! तिला काय कळणार मनुष्य स्वभाव! तो समोर अशीं उत्तरें करूं लागला तर एक दिवस डोक्यावर चढल्याशिवाय राहणार नाहीं, सांगून ठेवतों!" जमीनदार हें सांगून निघून गेला. भीमूला पुन्हां नोकराची भीति वाटूं लागली. तर मग लक्ष्मीच्या बापानें सांगितलें तेंच खरें! मोठीं माणसें! थोर माणसें सांगतील तसें वागावें लहानांनीं!

भीमूनें नोकराला बोलावून बजावून सांगितलें—"हें बघ, माझ्याजवळ कांहीं



बोलावयाचें झालें कीं समोर उभा राहून बोलावयाचें नाहीं! तोंड फिरवून बोलत जा! समजलें?"

पण नोकराच्या तें कांहीं लक्षांत येईना. म्हणून नोकर बोलूं लागला कीं भीमूच तोंड फिरवून बोलूं लागला.

एकदां भीमू नोकराशीं बोलत होता. नोकर समोर आला कीं भीमू तोंड फिरवून उभा राही. नोकर समोर येऊन बोलूं लागे! भीमू पुन्हां तोंड फिरवून उभा राही. नोकराला ती गंमत वाटली, पण भीमूला मात्र स्वतः भोंवती प्रदक्षिणा घालावी





लागली. लक्ष्मीनें तें दूरून पाहिलें आणि नवऱ्याला घेऊन विचारलें—"असें भोंवऱ्यासारखे गरगर काय म्हणून फिरतां आहां ?"

"कांहीं नाहीं ग ! तुझे बाबा सांगून गेले कीं याला समोर उत्तर करूं देऊं नका, नाहींतर हा खात्रीनें डोक्यावर चढेल. चढणार नाहीं म्हणून तूं सांगितलेंस तें देखील मी त्यांना सांगितलें. पण ते म्हणाले—"तिला काय कळतें !" आणि पहा ना हा मुलगा तरी ! समोर उत्तरें करूं नकोस म्हणून मी त्याला किती सांगितलें तरी तो कांहीं ऐकत नाहीं. मी त्यानें समोर उत्तर देऊं नये म्हणून स्वतःच तोंड फिरवून घ्यायचें ठरविलें आहे. समज, मी नाहीं तोंड फिरवलें व तो डोक्यावर चढून बसला तर !"

तें ऐकून लक्ष्मीला हंसूं आवरेना. म्हणाली—"अहो समोर उत्तरें न करणें म्हणजे मोठ्यांशीं नम्रपणानें वागणें. ते सांगतील तसें करणें असा आहे !"

"तुला ग काय कळतें ! तूं आपल्या बाबांच्याहून जास्त शहाणी आहेस होय ! तुला काय कळतें, हें तेच आतांच सांगून गेले. मोठीं माणसें सांगतील तसें वागावें. म्हणून मी तुझें कांहीं ऐकणार नाहीं !" भीमूनें दटावून सांगितलें.

या नोकराच्या वागण्यानें उगाच नवऱ्याला त्रास मात्र होत आहे हें पाहून तिनें आपल्या बाबांना दुसरा नोकर ठेवायला सांगितलें.

भीमूला तिनें तें येऊन सांगितलें तेव्हां तो म्हणाला—"याची पीडा गेली कीं पुरे. दुसरा नोकर ठेवल्याचा आनंद वाटेल मनाला !"







# तेथें पाहिजे जातीचें

"मला आजी नाहीं आवडत !" संजू आपल्या भावंडांना सांगूं लागला.

छोटू म्हणाला—"पाहिलेंत आजोबा, संजू म्हणतो कीं मला आजी नाहीं आवडत !"

आजोबांनीं चवकशी करून मुलांकडून त्याचें कारण काढून घेतलें. आजीनें बंडूच्या हातांत एक पैसा दिला पण संजूला मात्र दिला नाहीं. बंडू सर्वांत धाकटा. आजीनें पाठींत कळा येत आहेत बुके मारतोस का रे छोटू म्हणून छोटूला बोलावलें. छोटू पुढें येऊन उभा राहण्याच्या आधींच बंडू पाठींत बुके मारूं लागला. त्याला तें जमणार नाहीं म्हणून त्याला एक पैसा देऊन आजीनें—"जा, पैशाचें पेपरमींट घेऊन खा" असें सांगून त्याला पाठवून दिलें. तें पाहून संजू पण धांवत आला आणि म्हणाला—"आजी मी, आजी मी मारतों बुके पाठींत !" पण आजीनें—"तुला तें जमणार नाहीं बाळा !" म्हणून सांगून त्याला बाजूला बसायला सांगितलें. त्याला पैसा दिला नाहीं. म्हणून तो आजीवर रागावला होता व आजी चांगली नाहीं म्हणून सांगत सुटला होता.

तें सर्व कळल्यावर आजोबांनीं दोन्हीं नाकपुड्यांत खूप तपकीर कोंबली व म्हणाले—"अरे संजू ! बंडू सर्वांत लहान. तो बुके मारायला आला तर आजीनें पेपरमींट दिलें. पण तूं मोठा, तुला आजी पेपरमिंटाला पैसे देईल ! मी तुला एक गोष्ट सांगतों. नीट बस पाहूं !"

एका गांवीं एक गरीब शेतकरी रहात असे. दिवसभर काबाडकष्ट करून देखील त्याला व त्याच्या कुटुंबाला पोटभर खायला

मिळत नसे. ‘ राजाजवळच जाऊन थोडी मदत मागावी. राजानें मनांत आणलें तर आपली गरीबी एका क्षणांत दूर होऊन जाईल.’ असा विचार करून तो राजाकडे गेला.

थोरां मोठ्यांकडे जातांना रिकाम्या हातानें कधीं जाऊं नये असें त्यानें ऐकलें होतें. म्हणून तो शेतकरी एक कोंबडी बरोबर घेऊन गेला होता. त्यानें कोंबडी राजासमोर ठेवून हात जोडून आपलें गाऱ्हाणें निवेदन केलें.

राजानें सर्व कांहीं ऐकून घेऊन स्मित करून त्याला विचारलें—“ काय रे तूं ही एक कोंबडी घेऊन आलास. पण माझ्या घरीं सहा जण आहेत. मी, राणी, दोघे राजकुमार व दोघी राजकन्या. या सर्वांना ही कोंबडी कशी वाटून द्यायची ?”

शेतकरी गरीब होता खरा, पण हुशार होता. म्हणाला—“ त्यांत काय महाराज ? मला एक सुरी द्या, मी सहा जणांना छान वांटून देतों पहा.”

राजानें शेतकरी काय करतो हें पाहण्यासाठीं एक सुरी आणून द्यायला नोकराला सांगितलें.

शेतकऱ्यानें कोंबडीचें डोकें कापून राजासमोर ठेवलें व म्हणाला—“ महाराज, आपण राज्याच्या शीर्षस्थानीं आहां. म्हणून कोंबडीचें डोकें आपल्यासाठीं आहे.” कोंबडीची पाठ कापून म्हणाला—“ ही राणीसरकारांसाठीं. कारण सर्व कुटुंबाचा भार त्यांच्या पाठीवर असतो.” नंतर कोंबडीचे दोन्ही पाय कापून म्हणाला—“ हे दोन्ही दोघां राजकुमारांना. कारण दोघांना आपल्या पावलावर पाऊल ठेवून चालावें लागणार आहे.” नंतर कोंबडीचे दोन्ही पंख कापून म्हणाला—“ हे दोन्ही पंख दोघां राजकन्यांच्या वांट्याचे. कारण दोघींना येथून उडून जावें लागणार. उरलेला भाग माझ्या वांट्याचा. कारण मी आज महाराजांच्या घरचा पाहुणा आहें.”

शेतकऱ्याचें चातुर्य पाहून राजा थक्क झाला. त्यानें त्याला पुष्कळसें बक्षिस देऊन निरोप दिला. ही बातमी गांवभर पसरली. गांवांत एक लोभी शेतकरी होता. तो एकीच्या ऐवजीं पांच कोंबड्या घेऊन राजाकडे गेला व राजाला नजराणा म्हणून त्या कोंबड्या दिल्या.

त्याला पाहतांच त्याचा लोभीपणा राजानें ओळखला. स्मित करून म्हणाला—“ काय रे ! आम्ही तर सहा जण आहों आणि या













पांच कोंबड्या, कापल्याशिवाय कशा वांटून घ्यायच्या !"

'अरे अरे अरे ! आणखी एक कोंबडी आणली असती तर काय बिघडलें असतें !' मनांतल्या मनांत तो फार निराश झाला. आतां या कशा वांटायच्या !

तेव्हां राजा म्हणाला—"तुला नाहीं कळणार त्या कशा वांटायच्या त्या. काल आला होता न तुझा तो शेजारी, तो सांगेल कशा वांटायच्या त्या." असें सांगून राजानें त्या चतुर शेतकऱ्याला बोलवलें.

शेतकऱ्यानें सर्व समजून घेतलें व विचार करून म्हणाला—"महाराज मी सांगतों या कोंबड्या कशा वांटायच्या त्या. महाराज व राणीसरकार दोघांना मिळून एक कोंबडी. आपण दोघे व कोंबडी मिळून तीन झाले. आपल्या दोघां मुलांना मिळून एक कोंबडी. दोघं मुलें व कोंबडी मिळून तीन झाले. दोघी मुलींना मिळून एक. दोघी मुली व एक कोंबडी मिळून तीन झाले. आतां उरल्या दोन कोंबड्या. त्या दोन व मी मिळून आम्ही तीन होऊं. म्हणून त्या दोन माझ्या वांट्याच्या."

तो हिशोब पाहून राजा चकित झाला व दुसरा शेतकरी तर कांहीं बोलूंच शकला नाहीं. त्याच्या देखत राजानें त्याच्या दोन कोंबड्या त्या चतुर शेतकऱ्याला दिल्या व एक चांगलें इनाम वर देऊन त्याला निरोप दिला.

"म्हणून मुलांनो, नुसती नकल करून भागत नाहीं, थोडी अक्कल देखील हवी असते."

आजोबांची गोष्ट ऐकून सर्व मुलें खूप हंसली. संजू मात्र थोडा ओशाळल्यासारखा झाला.





# भुकेचें भूत

एकदां छत्रपुर नांवाच्या गांवचा राजा रात्रीं उताणा घोरत पडला असतां त्याच्या तोंडांतून एक भूत आंत पोटांत शिरलें. सकाळीं त्याला फार भूक लागलेली होती. त्याला रोजच्या सारखें जेवायला वाढलें. पण तें एका घासासारखें वाटलें त्याला. सैंपाकी व वाढणारे नोकर चकित झाले. निरनिराळीं पक्वान्नें करून ते वाढूं लागले. किती वाढलें तरी पान स्वच्छ. महाराजांचा जठराग्नि कोपला आहे अशी वर्दी त्यांनीं पंत प्रधानांच्या कानावर घातली. सकाळच्या फराळालाचे एवढे पदार्थ संपले तर जेवणाच्या वेळीं किती जेवतात कोणास ठाऊक ! म्हणून प्रधानांच्या सल्ल्यानें चार बकरे, दहा कोंबडीं, मण भर तांदुळाचा भात, पातेलें भर खीर, दोन टोपलीं लाडू असे पदार्थ तयार करून महाराजांना जेवायला वाढलें. महाराजांनीं तें सर्व फस्त केलेलें पाहून मात्र पंतप्रधान देखील घाबरला.

ही राक्षसी भूक भागवायला राज्यांतला अन्नपुरवठा पुरेसा पडणार नाहीं हें ओळखून राजाची राक्षसी भूक भागवण्यासाठीं गरीब खेडुतांचीं कोठारें जप्त करण्यास त्यानें सांगितलें. देशभर खळबळ उडून गेली.

राजानें पाहिलें कीं असा अत्याचार चालू राहाला तर प्रजा बंड करील. पण तो तरी काय करणार ! त्याची भूक कांहीं कमी होत नव्हती. म्हणून त्यानें आपल्या प्रजेची पिळवणूक बंद करून आपल्या मांडलिक राजांकडून अन्न सामग्री रूपें खंडणी वसूल करायला सुरवात केली.



पुढें कांहीं दिवसांनीं त्यानें मांडलिक राजांच्या राजधानीला भेट देऊन तेथें त्यांचा सत्कार घ्यावयाचें ठरविलें. महाराज येणार असें कळल्यावर खूष होण्याऐवजीं त्याच्या भुकेची कल्पना करूनच त्यांच्या अंगावर कांटा उभा राही.

एकदां काशीहून एक ब्रह्मचारी एका मांडलिकाच्या घरीं विद्याध्ययन संपवून आला. त्यानें राजाच्या या भयंकर भुकेची गोष्ट ऐकली. विद्वान लोक त्याला भेटायला आले होते. त्या राज्याचा मांडलिक राजा स्वतः विद्वत्सभेला हजर होता. ब्रह्मचारी स्वभावानें थोडा थट्टेखोर होता. तो थट्टा करून लोकांना खूप हंसवीत होता. एकदा राजा उदास बसून रहालेला पाहून ब्रह्मचाऱ्यानें कारण विचारलें. राजानें कांहीं लपवा लपवी केल्याशिवाय सर्व खरेंखरें तें सांगून टाकलें.

त्यावर तो ब्रह्मचारी म्हणाला—"महाराज जेवायला आले तरी आपणांला कांहीं त्रास होऊं नये याची जबाबदारी माझ्यावर. आपण अगदीं बेफिकीर रहावें. कांहीं काळजी करूं नये."

मांडलिक राजाला तें ऐकून आनंद झाला. सूर्यास्ताच्या सुमारास चक्रवर्ती राजा आला. त्याच्याबरोबर नोकर चाकर पण पुष्कळ होते. राजाबरोबर त्यांच्या जेवणा-खाण्याची व्यवस्था राजाला करावी लागली.

राजाच्या समोर पंचपक्वान्नें व फळ-फळावळ ठेवण्यांत आलीं. एका मिनिटांत राजानें त्या साऱ्याचा फन्ना उडवला. ब्रह्म-चारी दूर उभा राहून तें दृश्य पहात होता. त्याला देखील आश्चर्य वाटत होतें. गव-ताची एक काडी दातानें कुरतडत राजाला इतकी भूक कोठून लागते याचा विचार करीत तो समोरच बसला होता. तें पाहून चक्रवर्ती राजानें थट्टा केली—"मी तर छान पक्वान्नें झोडतों आहे आणि तुम्ही हें गवत काय खातां आहां?"

ब्रह्मचारी कांहींच बोलला नाहीं. जेवण खाण आटोपल्यावर तो त्या चक्रवर्ती राजाला म्हणाला—"महाराज आपण रागावणार नसाल तर एक विनंति करावी म्हणतों. आपण जेवण झाल्याबरोबर झोपत जावें, म्हणजे अन्न छान पचेल व आपली भूक पण वाढेल."

राजाला झोंप येतच होती. तो म्हणाला—"रोजची गोष्ट मी सांगत नाहीं. आतां मात्र मला झोंप येते आहे खरी." असें सांगून तो लगेच झोंपला देखील.

राजा झोंपल्यावर त्या ब्रह्मचाऱ्यानें राजाच्या नोकरांकडून राजाचे हात पाय बांधून ठेवले, आणि म्हणाला—"महाराजांची झोंप मोडली तरी त्यांचे हात पाय सोडूं नका. उद्यां सकाळीं मी स्वतः येऊन सोडीन. महाराजांचा राग सहन करायला मी समर्थ आहें."

राजाची झोंप मोडल्यावर त्याला भूक लागली. हातपाय बांधलेले पाहून तो मोठ-मोठ्यानें ओरडूं लागला. ब्रह्मचाऱ्यानें त्याच स्थितींत पंचपक्वान्नांचीं ताटें वाढून राजा



समोर आणून ठेवलीं. खमंग वास सुटला होता. अर्थातच राजाला भूक आवरेना. तो मोठमोठ्यानें ओरडूं लागला कीं एकेकाचीं डोकीं उडवतों पहा. पण ब्रह्मचारी समोर उभा होता. नोकर चाकर सुद्धां ताटें ठेवून निघून गेले. राजाची धडपड चालू होती. ब्रह्मचारी एक शब्द देखील बोलला नाहीं.

कांहीं वेळानें त्या ब्रह्मचाऱ्यानें जवळ येऊन राजाला त्यानें काशीला काय केलें याचें वर्णन करून म्हटलें—"महाराज, मी आपला विद्याभ्यास पुरा करून हिमालयांत हिंडत होतों. एका जागीं एक सिद्ध पुरुष

मला भेटला. त्याच्याबरोबर मी हिंडूं लागलों. तो एका जागीं मला घेऊन गेला. काय सांगूं महाराज, तेथें एक खिरीचा मोठा तलाव होता. तलावाच्या कांठीं दगड व गारगोट्यांच्या ऐवजीं लाडूच लाडू पसरलेले होते. डोंगराएवढे फळांचे ढीगच्या ढीग पडलेले होते. एक ओढा लागला. त्याचें पाणी नारळाच्या पाण्यासारखेंच किंबहुना त्याच्याहून गोड होतें.

असें वर्णन तोंडानें चालू होतें आणि तो हातानें पक्वान्नांचीं ताटें राजाच्या नाकासमोर नेत होता. राजा तोंड पुढें करूं लागला कीं तो ताट मागें नेऊन ठेवी. बराच वेळ हें चालू होतें. राजा तडफडत होता. त्याहून जास्त त्याच्या पोटांतल्या भुताचा जीव कासावीस होत होता. त्याला धीर धरवेना. ब्रह्मचाऱ्याच्या हातांतलीं पक्वान्नें खाण्यासाठीं तें बाहेर आलें. लगेच ब्रह्मचाऱ्यानें त्याची मुंडी धरून त्याला सैंपाकघरांतल्या चुलींत नेऊन टाकलें.

राजाचें भूत अशा तऱ्हेनें उतरवल्यावर ब्रह्मचाऱ्यानें राजाचे हात पाय सोडवले. राजा बेशुद्ध पडलेला होता. त्यांतच त्याला छान झोंप लागली. झोंप मोडली तेव्हां त्याला सर्व शरीर हलकें झाल्यासारखें वाटलें. ब्रह्मचाऱ्यानें हात जोडून क्षमा मागितली व म्हणाला—"महाराज, आपल्या पोटांत शिरलेलें भूत उतरवण्यासाठीं मला हें सर्व करावें लागलें.

राजाला सुद्धां आश्चर्य वाटलें कीं त्याला आतां इतर लोकांसारखीच भूक लागली. पहिल्यासारखी 'खा खा' होत नव्हती. त्यानें ब्रह्मचाऱ्याचे आभार मानले व त्याला इनाम देऊन निरोप दिला.





# म्हातारीचें चातुर्य

एका गांवीं रघुनाथ गुरुजी नांवाचे एक विद्वान शास्त्रीबुवा रहात असत. गांवांतल्या लोकांना वेदविद्या शिकवून गुरुदक्षिणा म्हणून त्यांना जें कांहीं मिळे त्यांतले थोडे पैसे वांचवून त्यांनीं चार पांचशें रुपये जमवून ठेवले होते.

एकदां काशीला विद्वानांचा शास्त्रार्थ होणार आहे हें ऐकून शास्त्रीबुवांनीं काशीला निघण्याचा विचार केला. परंतु जवळचे पैसे कोणाजवळ ठेवून जावें हा प्रश्न त्यांच्या समोर होता. शेवटीं बराच विचार करून त्यांनीं भिकूशेटकडे पैसे ठेवण्याचा निश्चय केला. भिकूशेट इतर वाण्यांसारखाच व्यापार धंदा करीत असे, पण आपण इनामाचे पैसे मिळवितों असें जगाला दाखविण्याचा त्याचा नेहमीं प्रयत्न असे.

शास्त्रीबुवा आले तेव्हां भिकूशेट म्हणाले—"शास्त्रबुवा! आतां तुम्हांला मी काय सांगूं? अहो! पैशाच्या बाबतींत कोणी कोणाचा विश्वास करूं नये बघा." ते दोघे बोलत असतां दुकानांतल्या नोकरानें थोडेंसें तूप एका बाईला देऊन तिच्याकडून पैसे घेऊन मालकाला दिले. पण भिकूशेटनें त्यालाच खूप झाडलें—"तुला कितीदां सांगितलें, व्यापारांत माणसानें चोख असावें. तूं तिच्याकडून सहा आणे म्हणजे सदतीस नवे पैसे घ्यायला पाहिजे होतेस. तिनें आठ आणे दिले व तूं तिला फक्त बारा नवे पैसे परत दिलेस. तेरा नको होते का द्यायला? ती पुन्हां आली म्हणजे तिचा तो नवा पैसा परत देऊन टाक!"

भिकूशेटचें तें बोलणें शास्त्रीबुवांना खरें वाटलें व तो एक प्रामाणिक व्यापारी असला

श्री आमराव माने



पाहिजे याची त्यांना खात्री पटली. त्यांनीं दुकानांतून त्यांना सामान खरेदी करावयाचें होतें तें घेतलें आणि घरीं गेले. एका पिशवींत पांचशें रुपये घेऊन ते परत भिकूशेट कडे आले व म्हणाले—"भिकूशेट, हे पांचशे रुपये आहेत. तुम्ही आपल्याजवळ ठेवून घ्या. मी काशीहून परत आल्यावर घेऊन जाईन."

पण भिकूशेट म्हणाला—"शास्त्रीबुवा, परक्याच्या पैशाला मी हात लावीत नाहीं. तुम्हीच ते आपल्या हातानें माझ्या घरांत तुम्हांला पाहिजे तिथें पुरून ठेवा. परत आल्यावर घेऊन जा."

भिकूशेट किती प्रामाणिक आहे पहा, असा विचार करीत शास्त्रीबुवांनीं त्याच्या घरांत एका जागीं खड्डा खणून त्यांत पैसे पुरून ठेवले व त्या जागीं चांगली खूण करून ठेवली.

शास्त्रीबुवा काशी यात्रेहून परत आल्यावर भिकूशेटच्या घरीं गेले व म्हणाले—"पैसे घेऊन जायला आलों आहें!"

"खुशाल घेऊन जा. त्यांत विचारायचें काय गरज! तुम्हींच पुरून ठेवले होते. जागा माहीतच असेल!" भिकूशेटनें विचारलें.

पण खड्डा खणून पाहिला तेव्हां त्यांना आंत पैसे मात्र दिसले नाहींत. त्यांनीं भिकूशेटला जाऊन विचारलें तेव्हां त्यानें कानावर हात ठेवले व म्हणाला—"तुम्ही कोठें ठेवलेंत हें तुमचें तुम्हांलाच माहीत! मी तिकडे आलों तरी का?"

भिकूशेटनें छान गळा कापला हें शास्त्रीबुवांना पटलें. पण ते काय बोलणार! एक शब्द देखील बोलल्याशिवाय घरीं निघाले.

वाटेंत त्यांना पार्वतीकाकू भेटल्या. त्यांना सर्व गांवकरी आजी म्हणत. त्यांनीं शास्त्रीबुवांचा उतरलेला चेहरा पाहून विचारलें—"काय, केव्हां आलात शास्त्रीबुवा? अन् तुमचा चेहरा का उतरलेला?"

शास्त्रीबुवांनीं घडलेली गोष्ट सांगितली. थोडा वेळ विचार करून म्हातारी म्हणाली—"तुमचे पैसे मी देवविते. पण मी सांगेन तसें मात्र करा!" तिनें त्यांना एक युक्ति सांगितली. शास्त्रीबुवा तयार झाले.

ती गोष्ट घडल्यानंतर सुमारें दोन महिन्यांनीं म्हातारी भिकूशेटकडे गेली व म्हणाली—"भिकूशेट माझा मुलगा दहा वर्षांपूर्वी विद्याभ्यासासाठीं म्हणून काशीला गेला होता. त्याच्याकडून बरेच दिवसांत पत्रबित्र कांहीं नाहीं. आतां या जगांत मी किती दिवसांची पाहुणी? म्हणून काशीला एकदां जाऊन ,यावें म्हणतें. त्याचें एकदां लग्न झालें म्हणजे मी सुटलें. माझ्याजवळ दोन हजाराचे दागिने आहेत ते मी तुमच्याकडे ठेवून जातें. म्हणे, शास्त्रीबुवा आपले पैसे ठेवून गेले होते. परक्याचें धन हें तुम्ही मातीमोल समजून त्याला हात देखील लावीत नाहीं अशी तुमची कीर्ति आहे. म्हणून तुम्ही माझे एवढे दागिने पण ठेवून घ्या."

भिकूशेटला आपलें भाग्यच उदयाला आलें असें वाटलें. त्यानें म्हातारीला तेंच



     

उत्तर सांगितलें. म्हणाला—"आजी, मी परक्याच्या पैशाला हात नाहीं लावत. तुम्ही स्वतःच जाऊन पाहिजे तिथें पुरून ठेवून द्या. माझी ना नाहीं."

इतक्यांत शास्त्रीबुवा तेथें आले. म्हणाले—"भिकूशेट मी चुकीच्या जागीं खणून पाहिलें असें वाटतें. आतां मला बरोबर जागा आठवली तेथें जाऊन खणून पाहातों."

भिकूशेट घाबरला. भिकूशेटनें विचार केला कीं म्हातारीला कळलें कीं शास्त्रीबुवांनीं पैसे पुरून ठेवलेले पैसे नाहींसे झाल्याचें कळलें तर ती आपले दागिने पुरून ठेवणार नाहीं व गांवभर या गोष्टीची चर्चा मात्र होईल. म्हणून तो म्हणाला—"शास्त्रीबुवा, तुमची चूक माझ्यादेखील लक्षांत आली. मी जाऊन बरोबर जागीं खणून पाहिलें तेव्हां तुमची पैशांची पिशवी मला सांपडली. मी उचलून ठेवली आहे." असें सांगत तो आंत गेला व शास्त्रीबुवांची पिशवी घेऊन आला.

"कोण शास्त्रीबुवाच का ? काशीहून केव्हां परत आलांत ? तेथें माझा मुलगा भेटला होता का ?" म्हातारीनें विचारलें.

शास्त्रीबुवा म्हणाले—"हा काय तुमच्या समोरच येतो आहे. तुमचा बाळू ना ? भेटला होता. तो आतां बाळशास्त्री झाला आहे. तो उद्यां परवांच येईल. त्यानें तुम्हांला निरोप पाठविला आहे माझ्याबरोबर."

"म्हणजे, या निमित्तानें काशीयात्रा घडेल म्हटलें होतें, ती घडत नाहीं एकूण !" असें सांगून म्हातारी शास्त्रीबुवांबरोबर आपले दागिने घेऊन निघून गेली.

भिकूशेट मात्र सटूटू झाल्यासारखा पहात उभा राहिला.





# अरण्यकांड

खर, दूषण, त्रिशिर वगैरे राक्षस वीर त्यांच्या चवदा हजार राक्षस सैन्यासह रामाच्या पराक्रमासमोर टिकाव धरूं शकले नाहींत व रामाच्या बाणांना बळी पडले. ती बातमी देण्यासाठीं रावणाचा अकंपन नांवाचा एक दूत आपला जीव वांचवून सरळ रावणाकडे गेला. रावणाला नमस्कार करून थर थर कांपत तो म्हणाला—"राक्षसराज ! जनस्थानांत आपले प्रमुख सरदार सैन्यासह युद्धांत ठार झाले. मी ही बातमी देण्यासाठीं पळून आलों आहे." तें ऐकून रावण क्रुद्ध होऊन म्हणाला—"काय म्हणतोस राक्षसांचें सर्व सैन्य ठार झालें ! कोण आहे तो दुष्ट ! त्याचा काळ जवळ आलेला दिसतो आहे. मी काळाला देखील भस्म करून टाकीन आणि सारें ब्रह्मांड उचलून पाताळांत पुरून टाकीन ! काय वाटलें काय त्याला ! कोण तो दुष्ट ! त्याचें नांव सांग !"

रावणाच्या त्या वचनांना ऐकून अकंपन राक्षसानें प्रथम अभयदान मागितलें व जनस्थानांत राक्षसांचा संहार कसा झाला त्याचें सविस्तार वर्णन केलें.

तें वर्णन ऐकून रावण म्हणाला—"त्या रामाच्या मदतीला सर्व देव धांवून आले असावेत कदाचित !"



"छे! नाहीं! राम पराक्रमांत इंद्राहून कांकणभर जास्तच असेल, कमी नाहींच नाहीं. अग्नीला नेहमीं त्याचा मित्र वायु जशी मदत करतो तशीच मदत रामाला त्याचा भाऊ लक्ष्मण करीत असतो. पण जनस्थानांत एकट्या रामानेंच सर्व राक्षसांचा वध केला आहे." अकंपन म्हणाला.

"तर मग मी जनस्थानांत जाऊन राम व लक्ष्मण दोघांचा वध करतो!" रावण ऐटींत म्हणाला.

पण अकंपन थोडा भीत भीतच व अडखळत म्हणाला—"मी रामाच्या शौर्याचें वर्णन कदाचित पुरें करूं शकलो नाहीं. तो ही सर्व पृथ्वी उचलून समुद्रांत बुडवूं शकेल. तो त्रिलोकाचा संहार करून नवीन सृष्टि करण्यास समर्थ आहे. त्याला ठार करावयाचें झाल्यास त्याला एकच एक उपाय आहे. त्याची बायको सीता ही अप्सरांहून सुंदर आहे. तिला पळवून आणतां आलें तर तिच्यासाठीं तो आत्महत्या देखील करून घ्यायला तयार होईल."

रावणानें थोडा वेळ विचार केला व म्हणाला—"तुझें म्हणणें ठीक आहे. मी उद्यांच जाऊन सीतेला हरण करून घेऊन येतों."

दुसऱ्या दिवशीं तो आपल्या रथांत बसून मारीच राक्षसाकडे गेला. मारीच राक्षस हा ताटका वधानंतर रामाशीं वैर करावयाचें नाहीं असें मनाशीं ठरवून एक आश्रम बांधून त्यांत रहात होता. रावणाचा सर्व प्रकारें सत्कार करून त्यानें येण्याचें कारण विचारलें.

तें ऐकून रावण म्हणाला—"मारीचा! तुला कळलेंच असेल, जनस्थानांतील आपल्या सर्व बंधुबांधवांचा रामानें वध केला आहे. मी त्याची पत्नी सीता हिला हरण करण्याचें



ठरवून तुझ्याकडे मदत मागायला आलो आहे!"

"तूं सीतेला हरण करणार? कोणी सुचविलें तुला हें? हा सल्ला तुझ्या मित्रानें तुला दिलेला नाहीं. कोणी तरी शत्रूच तुझा कांटा दूर करण्यासाठीं हा सल्ला देण्यास आलेला दिसतो आहे. तूं हा विचार सोड. लंकेला परत जाऊन बायकामुलांबरोबर सुखानें रहा." मारीच म्हणाला.

मारीच राक्षसानें सल्ला दिल्यावर रावण लंकेला परत गेला. त्यानें सीतेला हरण करण्याचा विचार पण मनांतून काढून टाकला. पण तेथें शूर्पणखा त्याची वाट पहात बसलेली होती. ती म्हणाली—"तूं भोगविलासांत गुरफटून पडलेला आहेस. तुझ्यावर येत असलेल्या संकटाची तुला कल्पना देखील नसेल. सर्व ऋषींच्या सांगण्यावरून त्यांच्यासाठीं सारें दंडकारण्य राखून ठेवण्याच्या हेतूनें रामानें तुझ्या चवदा हजार अनुयायांचा नाश केला व तुला ही बातमी देखील कळूं नये ह्रीच खरोखरच ही आश्चर्याची गोष्ट आहे. तुझें सर्व राज्य धुळीला मिळवून टाकण्यासाठीं रामाला पुढें करून सर्व ऋषींनीं चंग बांधला आहे. तूं आहेस कुठें!"





रावणाला ऋषींचें नांव ऐकतांच भयंकर राग आला. तो गरजला—"कोण आहे तो राम! त्यानें पराक्रम म्हणजे काय दाखविला!"

"अयोध्येचा राजा दशरथ याचा राम हा मोठा मुलगा आहे. तो दिसायला फार सुंदर आहे. त्याला युद्ध करीत असतां मी स्वत: डोळ्यांनीं पाहिलें आहे. मी त्याची शरवृष्टि पाहिली. पण तो भात्यांतून बाण केव्हां काढतो व केव्हां धनुष्यावर ठेवून सोडतो हें नाहीं दिसलें. एकक्षणांत त्यानें चवदा हजार राक्षसांचा वध केला, याहून जास्त प्रमाण त्याच्या पराक्रमाविषयीं तुला



काय पाहिजे? मी स्त्री आहे म्हणून त्यानें माझा वध केला नाहीं खरा. पण मला विद्रूप करून त्यानें माझा अपमान केला आहे. तूं माझा मोठा भाऊ आहेस म्हणून मी तुझ्याकडेच धांवत आलें.

रामाचा भाऊ लक्ष्मण हा फार क्रोधी आहे. तो पण शूर व पराक्रमी आहे. रामाची बायको सीता एक अप्रतिम सुंदर स्त्री आहे. मोठे मोठे डोळे, सोन्यासारखी गोरी, तुझ्या अंतःपुराची शोभा वाढविणारी आहे." शूर्पणखेनें म्हटलेलें शेवटचें वाक्य रावणाच्या मनावर बिंबलें.

रावणानें दरबार बरखास्त केला व सीतेचें हरण कसें करावें या विषयीं विचार करूं लागला. त्यानें विचार केला कीं सीतेला युद्ध करून हरण करून आणण्यापेक्षां चोरून पळवून आणणें जास्त बरोबर होईल. कारण इतक्या राक्षसांचा संहार करणाऱ्या रामाशीं युद्ध करून त्याला जिंकणें अशक्य आहे. पण त्यानें मनांतली ही गोष्ट मंदोदरीला व आपल्या मंत्र्यांना देखील सांगितली नाहीं आणि मनांतल्या मनांतच बेत ठरवून तो पार पाडण्याचें ठरविलें.

रावणानें आपल्या सारथ्याला बोलावून रथ घेऊन यायला सांगितलें. तो रथांत बसून पुन्हां मारीच राक्षसाच्या आश्रमांत पोंचला. थोड्याच वेळापूर्वी येऊन गेलेला रावण, परत आलेला पाहून मारीच राक्षसाला थोडें आश्चर्य वाटलें. त्यानें चकित होऊन त्याला विचारलें—"अरे! तूं आतांच तर परत गेलास, मग पुन्हां येण्याचें कारण! लंकेला सर्व सकुशल तर आहेत ना!"

"रामाला क्षमा करायला मी तयार नाहीं. तो दुष्ट आहे, क्रूर आहे, मूर्ख आहे व लोभी पण आहे! त्यानें माझ्या बंधुबांधवांचा संहार तर केलाच, माझी बहीण शूर्पणखा हिचें नाक व कान कापून तिचा अपमान केला आहे. त्याचा सूड म्हणून मी सीतेचें अपहरण करण्याचें ठरविलें आहे. माझ्या मदतीला येण्यासाठीं विनंति करायला तुझ्या-कडे आलों आहें. तूं पराक्रमी आहेस व चतुर पण आहेस. तुला मायावी रूपें धारण करतां येतात. तूं सुवर्णमृगाचें रूप घेऊन सीतेच्या आश्रमाजवळ हिंडत रहा. सीता तुला पाहून तुला धरून आणण्यासाठीं रामाला व लक्ष्मणाला खात्रीनें पाठवील. त्यावेळीं मी सीतेचें अपहरण करीन. परत आल्यावर आश्रमांत सीता नसलेली पाहून राम अग्नींत प्रवेश करील. यदाकदाचित तो युद्धाला आला तरी मी त्याला त्या मनःस्थितींत खात्रीनें जिंकून त्याचा वध करीन." रावण म्हणाला.

तें ऐकून मारीच तर भयभीतच झाला. तरी तो हात जोडून म्हणाला—"तूं रामाच्या शक्तीविषयीं व सीतेचें अपहरण झाल्यानंतर त्याची जी मनःस्थिति होईल तिच्याविषयीं केलेली कल्पना चुकीची आहे. तो दुष्ट नाहीं व क्रूर तर नाहींच नाहीं. त्याला मूर्ख व लोभी म्हणणें हा स्वतःचा मूर्खपणा आहे असें वाटतें मला. शूर्पणखा सीतेला खायला



धांवली म्हणून तिला ती शिक्षा मिळाली. खर व दूषण यांनीं स्वारी केली म्हणून रामाला त्यांच्याशीं युद्ध करावें लागलें. त्यांत ते मारले गेले त्याला आतां कोण काय करणार! ही रामाची चूक म्हणतां येणार नाहीं. हा राम पोरक्य असतांनाच इतका पराक्रमी होता कीं सहस्र हत्तींचें बळ अंगांत असणारा माझ्यासारखा देखील त्याच्या एका बाणानें समुद्रांत जाऊन पडला. तरी मला अक्कल आली नाहीं. मुनिवेष धारण करून तो फिरत असतां त्याला ठार करण्याच्या हेतूनें मी हरणाचें रूप घेऊन

दोघां राक्षसांबरोबर त्याच्या आश्रमांत गेलों. रामानें तीन बाण धनुष्यावर ठेवल्याबरोबर मी पळ काढला. दोघे राक्षस तत्काळ ठार झाले. आतां रामाच्या वाटेला जायचें नाहीं असें मी तेव्हांपासून मनाशीं ठरविलें. मला आज सर्वत्र रामच राम दिसत आहे. तुला या जगाचा वीटच आला असेल तर मात्र खुशाल रामाशीं वैर कर. मला मात्र या कारस्थानांत ओढूं नकोस."

पण रावण त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून म्हणाला—"तेहतीस कोटी देवांनी येऊन मला विनविलें तरी माझा निश्चय ढळणार नाहीं. मी केलेला निश्चय बरोबर आहे कीं चूक हें विचारायला मी तुझ्याकडे आलों नाहीं. मुकाट्यानें मी सांगितल्याप्रमाणें सुवर्ण मृगाचें रूप धारण करून सीतेचें मन मोहण्यासाठीं तूं गेलें पाहिजेस. तुला धरण्यासाठीं राम आलाच तर रामाच्या आवाजांत "सीते! लक्ष्मणा!" अशा हाका मार. म्हणजे लक्ष्मण पण येईल व सीता एकटी राहील. तूं माझें हें काम केलेंस तर माझें अर्धें राज्य मी तुला देईन. पण जर का तूं कबूल झाला नाहींस तर ही पहा माझी तलवार!"



मारीच म्हणाला—"मित्रा रावणा! अरे तूं मला मारायला ही तलवार दाखवितो आहेस ती तुला रामाशीं वैर करण्यास सांगणाराला कां नाहीं दाखवीत! तुझ्या या अविचाराचें खंडन तुझ्या मंत्र्यांनीं कसें नाहीं केलें आणि थोरल्या वहिनी मंदोदरी गांणी कशा स्वस्थ बसल्या? मला ठार करण्याचाच तूं विचार केला असशील तर माझी ना नाहीं. पण लक्षांत ठेव तूं, स्वतःबरोबर हा एवढा मोठा राक्षसांचा वंश, सोन्याची लंका सर्व नष्ट करणार आहेस. ही माझी भविष्यवाणी ऐकून ठेव!" असें सांगून मारीच रावणाबरोबर निघाला.

रावणाला मारीचाचा राग आला होता पण तो बरोबर यायला कबूल झाल्यामुळें राग गिळून रावणानें त्याचें प्रेमालिंगन केलें व त्याला आपल्या रथांत घेऊन आकाशमार्गें रामाच्या आश्रमाजवळ घेऊन पोंचला. आश्रम एका कदलीवनांत होता.

मारीच एका सुंदर सुवर्ण मृगाचें रूप घेऊन रामाच्या आश्रमाजवळच्या कुरणांत चरूं लागला. त्याचें सर्व अंग सोन्यासारखें चमकत होतें. त्यावर चांदीच्या रंगाचे गोलगोल डाग होते. पोटाचा भाग स्वच्छ पांढरा, खूर काळे. शेपूट इंद्रधनुष्यासारखें सप्तरंगी, गोंडस डोळे व तोंड सर्वच खरोखर मोहक होतें.

सीता फुलें तोडायला बाहेर आली व तिची नजर त्या हरणावर पडली. त्याची डौलदार मान व सुंदर काळीभोर शिंगें पाहिली व रामाला हाक मारली. रामाबरोबर लक्ष्मण पण बाहेर आला. त्याला पाहतांच लक्ष्मण म्हणाला—"दादा! मला हा कोणीतरी मायावी राक्षस वाटत आहे. कारण असलें हरण आपण कधीं पूर्वी पाहिलेलें मला तरी आठवत नाहीं."

सीतेनें लक्ष्मणाला गप्प बसायला सांगितलें व रामाला म्हणाली—"तें हरिण मला हवें आहे. जाऊन घेऊन या. त्याच्याबरोबर मी खेळणार आहें. काय पण रूप आहे त्याचें! तें जिवंत मिळालें तर आपण अयोध्येला जातांना घेऊन जाऊं. भाऊजींना (भरताला) तें फार आवडेल. जिवंत नेतां आलें नाहीं, तर त्याचें सुंदर चर्म तरी घेऊन जाऊं. तें मी छान जपून ठेवीन. या रानांतील ती एक कायमची आठवण म्हणून राहील."



# क्रेटर सरोवर

हल्लींच्या अमेरिका देशांतल्या टेरिगान राज्यांत पूर्वी कधीं १२,००० फूट उंच असा एक ज्वालामुखी पर्वत होता. त्याचीं शिखरें नेहमीं बर्फाखालीं झांकलेलीं असत. सुमारें ६,५५० वर्षां पूर्वी या ज्वालामुखी पर्वताचा स्फोट झाला व त्याची सुमारें एक मैल उंची कमी झाली, म्हणजे तो पर्वत खचला.

याचा परिणाम असा झाला की उरलेल्या पर्वतामुळें मधोमध एक मोठा खड्डा झाला. हा खड्डा ४०० फूट खोल आहे व त्याचा परीघ सहा मैल आहे. कालक्रमानें त्यांत पाणी सांठलें. खड्डा अर्धवटच भरला. पाणी वाढलें नाहीं की कमी झालें नाहीं. वर्षभरांत यांतलें जितकें पाणी कमी होतें तितकें पुन्हां त्यांत भरतें.

हेंच सुप्रसिद्ध क्रेटर सरोवर होय. क्रेटर याचा अर्थ ज्वालामुखीचें मुख असा आहे.

इ. सन १८५३ च्या १८ जूनला बेजली हिल्मन याच्या नजरेस प्रथम हें सरोवर आलें. आतां या सरोवराच्या चारीबाजूला अमेरिकेच्या सरकारनें २५० वर्ग मैल एवढ्या क्षेत्रफळाचें नॅशनल पार्क नांवाचें उद्यान बनविलें आहे. प्रवासी व यात्रेकरूंसाठीं बंगले, हॉटेल वगैरेंची व्यवस्था पण उत्तम आहे.






[ ११ ]

[इकडे जयमल व लखू भिकाऱ्याच्या वेषांत फिरत असतां सैनिक त्यांच्या शोधार्थ फिरत होते. तिकडे ते दोघे म्हाताऱ्याला बरोबर घेऊन ब्रह्मदंडीचें गुहेंत गुप्तस्थानीं ठेवलेलें सोनें घेऊन पळून गेले. दोघे आपलीं नांवें अनुक्रमें बलवीर व महावीर ठेवून घेऊन क्षत्रिय राजपुत्र म्हणून राहूं लागले. लखूचा म्हातारा बाप मौनानंद नांव धारण करून त्यांचा गुरु झाला. तिघे भयंकर दरीच्या वाटेनें निघाले.

इकडे ब्रह्मदंडी राजगुरूच्या आज्ञेनें शक्तिसिंह व जितवर्मा यांना बरोबर घेऊन भयंकर दरीकडे निघाला. केशव, लखू व त्याचा बाप तिघांना रात्रीं ब्रह्मदंडीनें पाहिलें. पण सुदैवानें तिघे त्यांच्या नजरेंतून सुटून जंग बहादुर नांवाच्या एका रानटी जातीच्या सरदाराला शरण गेले. त्या सरदारानें तिघांना ब्रह्मपुर राज्याच्या सीमेबाहेर पोंचविण्यासाठीं आपल्या दोघां विश्वासू अनुयायांना पाठविलें.

ब्रह्मपुर व कपिल राज्यांच्या सीमेवर वाहणारी नदी पार करून ते पुढें जाणार तेवढ्यांत त्यांना गुलामांचा व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्याच्या नोकरांनीं धरण्याचा यत्न केला. त्या झटापटींत लखूचा म्हातारा बाप व रानटी सरदाराचे अनुयायी निसटून पळून गेले. पण लखू व जयमलला त्या लोकांनीं धरलें आणि दोघांना कपिलपूरच्या एका व्यापाऱ्याच्या हातीं विकून टाकलें. वाटेंत लखू व जयमल दोघांनीं त्यांना धरून नेणाऱ्या सैनिकांना नदींत ढकललें व स्वतः नदींत उडी मारली. दोघे एका बेटावर येऊन पोंचले. तेथें त्यांना गोल गोल झोंपड्या दिसल्या. एका झोंपडीजवळ जात असतां आंतून त्यांना आवाज ऐकूं आला–"बलवीर व महावीर कोठें आहेत?"...पुढें वाचा.]



लखू व जयमल दोघे किंकर्तव्य विमूढ स्थितींत क्षणभर उभे राहाले. तो आवाज एका नरभक्षक जातीच्या सरदाराचा होता. दोघांनीं परस्परांकडे सहेतुक पाहिलें. काय करायचें हें नजरेच्या खुणा करून त्यांनीं ठरविलें.

जयमलनें गुपचूप वांकून झोंपडीजवळ पडलेला एक भाला उचलून घेतला. नंतर लखूच्या खांद्यावर हात ठेवून व त्याच्या कानाजवळ आपलें तोंड नेऊन हळूच त्याच्या कानांत म्हणाला—"आंत किती शत्रू आहेत पाहिलें पाहिजे. मी भाल्याच्या टोंकानें झोंपडीला भोंक करतों."

जयमलनें झोंपडीला भोंक केल्याबरोबर लखूनें आंत पाहिलें. आंत काळोख होता. एका बाजूला मशालीच्या उजेडांत दोघे तिघे पुसट दिसत होते. एकाच्या गळ्यांत नरमुंडमाळा होती. दुसरा त्याच्या सारखाच दिसत होता. पण त्याच्या गळ्यांत मुंडमाळा नव्हती. एका बाजूला एक तरुण जमिनीवर बसलेला दिसला. पण त्याचे हात पाय बांधलेले होते. तो त्यांचा कैदी होता. त्यालाच तो मुंडमाळा घालून बसलेला मनुष्य विचारीत होता—"त्या म्हाताऱ्याची आम्हांला गरज नाहीं. फक्त ते दोघे बलवीर व महावीर कोठें आहेत सांग!"

इतका भयंकर प्रसंग होता पण लखूला भीति वाटली नाहीं. हे दुष्ट लोक कोण बरें असावेत? आणि तो तरुण कोण बरें असावा? बाबा यांच्या हातीं सांपडले नाहींत ही एक आनंदाची गोष्ट घडली म्हावयाची. त्या दोघांना ठार करून त्या तरुणाला वांचविणें तितकेंसें कठीण नाहीं. असा विचार करून तो जयमलला हळूच म्हणाला—"फक्त दोघे शत्रू आहेत. त्यांना लोळविणें आपल्याला कठीण नाहीं."

पण जयमलनें त्याला तशी घाई करण्याचें कारण नाहीं असें खुणावलें. त्यानें स्वतः भोंकांतून आंत डोकावून पाहिलें. त्या तरुणाला पाहाल्यावर त्याला वाटलें कीं तो जंगबहादुर याचा अनुयायी असावा. त्याच वेळीं तो मुंडमाळा घालून बसलेला मनुष्य म्हणाला—"हा असा सुखेपणानें बोलणार नाहीं. याला थोडा मंडूककाढा पाज, म्हणजे उघडेल तो तोंड."

"जो हुकूम चंडमंडुकेश्वरा!" असें म्हणत तो अनुचर उठला व झोंपडीच्या एका कोपऱ्यांत ठेवलेलें एक भांडें घेऊन आला. नंतर एका लाकडी बाहुल्यासमोर तें तीनदां ओंवाळल्यासारखें करून त्या बंदी तरुणाच्या तोंडाजवळ नेत म्हणाला—"हा काढा पी. हा प्याल्यावर खोटें बोलणारा देखील खरें बोलूं लागतो."

जयमल लखूला हळूच म्हणाला—"हें बघ, हाच आहे तो चंडमंडूक! त्यानें त्या कैद्याला एक काढा पाजला आहे. तो प्याल्यावर तो खरें बोलेल म्हणे. पाहूं या, गंमत. त्यानंतर त्या चंडमंडूकाला व त्याच्या अनुयायाला यमलोकीं पाठवूं."

मंडूककाढा प्याल्याबरोबर तो बंदी तरुण खोकूं लागला. दोन तीनदां दारू पिऊन झिंगलेल्या माणसासारखा कांहीं वेळ




पेंगून म्हणाला—"महावीर व बलवीर येथेंच आहेत." तें ऐकतांच जयमल मागें सरकला व लखूला म्हणाला—"लखू! खरोखरच तो काढा खरें वदवणारा आहे. आपण येथेंच आहों हें त्या तरुणानें काढा प्याल्याबरोबर सांगितलें. आतां थांबून भागावयाचें नाहीं. आंत शिरून त्या दुष्टांना यमसदनीं पाठविलें पाहिजे." असें म्हणत तो झोंपडीच्या दाराजवळ गेला. चाहूल लागतांच चंडमंडूक घाबरला. "कोणी शत्रु दिसतो आहे." म्हणत त्याचा अनुयायी दरवाज्याकडे धांवला व ओरडला—"मंडुकेश्वरा! अदृश्य हो!"


चांदोबा



लखू व जयमल झोंपडींत शिरले. मंडुकेश्वराच्या नोकरानें त्यांच्यावर भाला उगारला, पण तेवढ्यांत जयमलची तलवार त्याच्या डोक्यावर पडली. तो ओरडत कोलमडून खालीं आदळला.

झोंपडींत शिरल्यावर तेथें जंगबहादुराचा तो अनुयायी त्यांना दिसला. पण चंडमंडुकेश्वर अदृश्य झालेला पाहून त्यांना फार आश्चर्य वाटलें. कोठें बरें गेला असावा !

जयमलनें जंगबहादुराच्या अनुयायाला सोडविलें व त्याला एका खांबाला टेंकून बसविलें. मंडूककाळ्याच्या गुंगींत तो पिंगा घालीत बसला होता. त्याच्या डोक्यावर थोडें पाणी शिंपडून जयमल त्याला म्हणाला—"तूं जंगबहादुराचा अनुयायी दिसतो आहेस. आम्ही दोघे तुझे मित्र ! आपण सर्व नदींत उडी टाकली होती आणि कपिलपुर राज्यांत पोंचलों होतों. तेथें तुम्ही मौनानंद स्वामींच्या बरोबर कोठें निसटून पळून गेलां होतां. त्यानंतर काय झालें ?"

जयमलचा तो प्रश्न ऐकून जंगबहादुराच्या अनुयायाला शुद्ध आली. त्यानें डोळे उघडून पाहालें. कांहीं वेळ जयमलकडे तर कांहीं वेळ लखूकडे आश्चर्य चकित होऊन तो पाहूं लागला. त्याला आनंद झाल्यासारखें दिसलें. तो बोलण्याचा प्रयत्न करूं लागला, पण तोंडांतून शब्द उमटेना.

"बलवीर, तूं त्याला भीति दाखवून त्याच्याकडून बदवण्याचा प्रयत्न करूं नकोस. त्याला थोडी विश्रांति घेऊं दे. आपण त्या चंडमंडूकाचा शोध काढूं या." लखू म्हणाला.

लखूच्या तोंडचे ते शब्द ऐकून मंडुकेश्वराचा तो सेवक उठण्याचा प्रयत्न करून ओरडला—"होय, चंडमंडुकेश्वरा ! हे मायावी ! आतां तुझी भेट शंभर वर्षांनींच घडणार. तोंपर्यंत आम्हीं तुझ्या पामर सेवकांनीं कसें जगायचें ?" असें ओरडत तो आपली छाती बडवूं लागला व डोकें आपटूं लागला.

त्याचें तें बडबडणें ऐकून जयमल त्याचा खांदा हलवून म्हणाला—"तुझ्या बतावण्यावर आम्ही भुलून जाऊं असें वाटलें होय तुला ? म्हणे, शंभर वर्षांनींच भेट होणार. बोल कोठें आहे तुझा मालक ? नाहींतर आतांच्या आतां तुझें नरडें दाबून टाकीन. काय समजलास काय तूं आम्हांला ?"

"तूं प्राण घेणार ? चंडमुंडकेश्वरासाठीं मरण आलें तर त्याच्याहून जास्त मोठें भाग्य तें काय असणार ? सरळ स्वर्गांतच जाईन मी. या लवकर, घ्या माझा प्राण. मला मुक्ति तरी मिळेल." असें म्हणत जमिनीवर पडलेला भाला उचलून तो जयमलला देऊं लागला.

जयमलला त्याचें तें वागणें जास्तच आश्चर्याचें वाटलें. चंडमंडूक याच झोंपडींत कोठें तरी लपून बसला आहे कीं कोठें पळून गेला आहे. त्याला कांहींच कळेना. इतक्यांत जंगबहादुराचा तो अनुयायी खाकरून उठून उभा राहिला व म्हणाला—"बलवीर आणि महावीर ! तुम्ही मला ओळखलेंत तर ! हा लबाड चोर आहे. याच्या बोलण्यावर विश्वास करूं नका. चंडमंडूक चोरवाटेनें



पळून गेलेला दिसतो आहे. ती वाट आपण हुडकून पाहिली पाहिजे.

जंगबहादुराच्या सेवकाचें तें बोलणें ऐकून चंडमुंडकेश्वराचा सेवक जोरानें हंसला व म्हणाला—"गुप्तमार्ग ! चंडमुंडकेश्वराला गुप्त मार्गाची गरज काय ? त्या दिव्य पुरुषाला असाध्य असें या जगतांत काय आहे ? पाण्यांत मिठासारखें विरघळून जाण्याची शक्ति त्याच्या अंगांत आहे. हवेंत वाफेसारखा अदृश्य रूपानें त्याला वावरतां येतें."

तो बोलत असतां मध्येंच त्याला थांबवून जंगबहादुराचा अनुयायी धांवतच त्याच्या



जवळ आला व रागानें त्याचा गळा दाबून त्याला म्हणाला—"लबाडा! तुझी लबाडी माझ्याजवळ चालणार नाहीं. आम्हांला गप्पांत गुंतवून आपल्या मालकाला दूर पळून जातां यावें हा तुझा प्रयत्न आम्हांला कळत नाहीं असें वाटलें होय तुला? मी याचे हात पाय बांधून ठेवतों आणि याच्या तोंडांत बोळे कोंबून ठेवतों. नाहींतर याची बटबट चालू राहील. हा कांहीं तरी खुणा करून आपल्या मालकाला आम्ही त्याला शोधून काढण्यासाठीं येत आहों हें कळवील." असें सांगून त्या जंगली तरुणानें खरोखरच चंडमुंडकेश्वराच्या अनुयायाला बांधून ठेवलें. नंतर तिघे झोपडींतला काना कोपरा छान हुडकून पाहूं लागले. जमिनीवर दोन तीन जागीं उड्या मारून पाहाल्या, कोठें चोर दरवाजा आहे का पाहायला. त्या जंगली तरुणानें मात्र अगदीं टीचभर जागा सुद्धां सोडली नाहीं आणि प्रत्येक ठिकाणीं पायानें व पायाच्या बोटांनीं दाबून पाहिलें. एका जागीं एकदम जमीन धंसली व जमिनीला एक भगदाड पडलें आणि तो आंत पडला. पडतांना तो ओरडला—"हा पहा, चोर दरवाजा!" खळगा विशेष खोल नसल्यानें त्याला लागलें नाहीं.

लखू व जयमल दोघांनीं खळग्यांत डोकावून पाहिलें आणि विचारलें—"तुला लागलें तर नाहीं? अरे आंत पायऱ्या दिसत आहेत! म्हणजे मंडुकेश्वर या चोरवाटेनें पळाला म्हणावयाचा."

जंगली तरुण म्हणाला—"त्याच्या अनुयायाला ढकला या खड्ड्यांत व त्याच्याच अंगाची एक पायरी करून उतरा खालीं. मंडूक येथेंच कोठें तरी लपून बसला असेल. लखू व जयमलनें मंडूकाच्या शिष्याला खालीं ढकललें व स्वतः खालीं उतरून चोर दरवाज्याचें







दार बंद करून घेतलें. नंतर मंडूकाच्या शिष्याला खालीं पायऱ्यावरून ओढून नेलें.

जंगली तरुणाचा अंदाज खरा ठरला. ती फक्त चोरवाट होती. आंत छान खोल्या होत्या. तें तळघर नसून एक मोठी गुहाच होती. वरची झोंपडी चोरवाटेची जागा कळूं नये म्हणून करून ठेवली होती. आंत मोठ मोठीं दालनें होतीं. तलवारी, भाले तीर, कमान वगैरे शस्त्रें तेथें ठेवलेलीं होतीं.

" लोकांना कळूं नये म्हणून वरची ती झोंपडी व इतर गोलझोंपड्या असाव्या. खरी राहण्याची जागा येथेंच दिसते आहे. मशाली पेटवून चला हुडकून काढूं त्या मंडुकेश्वराला. खात्रीनें आंत कोठें तरी लपून बसली असेल स्वारी."

लगेच तिघांनीं मशाली पेटवून घेतल्या व प्रत्येक खोली व दालन पाहूं लागले. पण त्यांना मंडुकेश्वराचा पत्ता लागला नाहीं.

इकडे लखू, जयमल व तो जंगली तरुण मंडुकेश्वराला शोधण्याचा प्रयत्न करीत असतां तो आपल्या एका अनुचराला बरोबर घेऊन बेटाच्या मध्यभागीं एका विहिरींतून बाहेर येत होता. ती विहीर म्हणजे पळवाट होती. बाहेर येत तो आपल्या अनुचराला म्हणाला—

" आपला जीव वांचला खरा. पण आपल्यावर चांगलें मोठें संकट आलें असें मला वाटत आहे. त्या ब्रह्मदंड्यानें मला चांगलेंच बनवलें म्हणावयाचें. ज्यांना धरून ठेवण्यासाठीं त्यानें आम्हांला सांगितलें होतें त्यांनाच त्यानें आम्हांला ठार करण्यासाठीं पाठविलें. मी मंडूककाढा पाजून त्या रानटी तरुणाकडून सत्य वदवीत होतों तेव्हां ते दोघे आंत पहात होते. त्या ब्रह्मदंड्याला जिवंत जाळल्या शिवाय माझ्या मनाला चैन पडणार नाहीं."

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# वर दान

विक्रमार्कानें आपला प्रयत्न सोडला नाहीं.

तो पुन्हां त्या वडाच्या झाडाजवळ गेला. तेथें झाडावर चढून त्यानें तें प्रेत खालीं उतरविलें आणि नेहमींप्रमाणें तें खांद्यावर टाकून तो मौनपणें स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. चार पावलें गेला असेल नसेल, तोंच प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—" राजा, तुला तुझ्या ह्या चिकाटीनें आणि कष्टाळू स्वभावानें किती तरी सिद्धी प्राप्त करून घेतां येतील आणि देवदत्ताप्रमाणें लोकोपकार करतां येईल. मग तूं आपली शक्ति अशा तऱ्हेनें कां उगीच वाया घालवितोस? तुला माहीत नसेल देवदत्ताची गोष्ट? सांगतों ऐक."

असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

एका गांवांत देवदत्त नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ राहात असे. तो फार उदार



होता. कोणीहि येऊन त्याच्याकडे कांहीं मागितलें कीं तो तें देऊन टाकीत असे. मग तो खरोखरच गरजू आहे कीं उगाचच मागत आहे, गरीब आहे कीं सुखवस्तू आहे ह्याचा विचार तो करीत नसे. त्याच्या ह्या दानी स्वभावामुळें तो जों जों दान करी तों तों त्याचा आनंद आणि समाधान वाढत असे. पण असल्या अविचारी आणि अपात्र दानाला कोणाची संपत्ति पुरी पडेल? थोड्याच दिवसांत त्याची धन दौलत संपून गेली. त्यानें घरदार, शेतीवाडी सर्व विकून दानधर्म केला आणि आपण स्वतः आपल्या बायकोमुलासह एका झोपडींत येऊन राहूं लागला. त्याला आपल्या पोटापाण्याची सुद्धां पंचाईत पडूं लागली. एवढें झालें तरी कोणी भिक्षेकरी आला तर तो आपल्या पुढील वाढलेलें पान त्याच्या समोर ठेवी.

दान करण्यासाठीं आतां देवदत्ताजवळ कांहींहि न उरल्यानें त्याला आपलें जिणें निस्सार वाटूं लागलें. एकदां तो आपल्या बायकोला म्हणाला—"मी जाऊन पैसे मिळवून आणतों तों पर्यंत तूं मोलमजूरी करून घर संभाळ." असें सांगून तो निघून गेला.

देवदत्ताला देणें चांगलें ठाऊक होतें, घेणें किंवा मिळविणें बिचाऱ्याला काय जमणार? कमाईसाठीं म्हणून तो निघाला खरा, पण कोठें तरी जाऊन आपलें जीवित कार्य संपवून टाकावें असा विचार करून तो घरून निघाला. तो जंगलांत एका झाडाखालीं बसून मृत्यूची वाट पाहूं लागला. त्याच्या कल्पनेप्रमाणें दोन तऱ्हेनें त्याला मरण संभाव्य होतें, एक उपासमार झाल्यानें, नाहींतर क्रूर श्वापदापासून.

देवदत्त ज्या झाडाखालीं बसला होता त्या झाडावर एक यक्ष होता. त्यानें देवदत्ताला पाहिलें. तो तप वगैरे कांहीं करत नसून नुसता कां बसला आहे हें विचारून घेण्याची त्याला इच्छा झाली. म्हणून खालीं येऊन त्यानें विचारलें कीं तूं कोण आणि येथें कशासाठीं बसला आहेस?

देवदत्तानें आपली सर्व हकीगत त्याला सांगितली व म्हणाला—"मी आपली सर्व धन दौलत कित्येक गरीबांना वांटून त्यांना सुस्थितींत आणण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळें मी मात्र अगदीं गरीब झालों आहें. तेव्हां आतां मला जगण्याची इच्छा नाहीं. मी येथें बसून मृत्यूची वाट पाहात आहें. यक्षाला त्याच्या परोपकारी वृत्तीचें कौतुक वाटलें. त्यानें त्याच्या हातांत एक लहानशी पेटी देऊन म्हटलें—"ही घे पेटी. ह्यांत हात घातलास कीं तुझ्या हातांत पैसे येतील. वाटेल तितका दानधर्म कर आणि आपल्या कुटुंबाचेंहि भरणपोषण कर. ह्या पेटीच्या सहाय्यानें तुला कष्टावांचून दानधर्म करतां येईल व सुखानें जगतां येईल. जा तूं घरीं." एवढें सांगून यक्ष अंतर्धान पावला.

ती पेटी पाहून देवदत्ताला फार आनंद झाला. तो देवाचा आशीर्वाद समजून त्यानें ती पेटी डोक्यावर उचलून घेतली आणि घरीं आला. त्यानें घरांत खाण्यापिण्या





पुरेसें सामान आणलें आणि पुन्हां पूर्वीप्रमाणें दानधर्म करूं लागला. संपत्ति सांठवून ठेवण्याकडे त्याचें लक्षच नव्हतें.

त्याच गांवांत दुर्मुख नावाचा एक माणूस होता. देवदत्ताच्या राहाणींतील फरक एकदम त्याच्या लक्षांत आला. तो विचार करूं लागला कीं ज्याच्याजवळ पोटापुरतें सुद्धां शिल्लक नव्हतें तो पुन्हां पूर्वीप्रमाणें कसा काय दानधर्म करतो. शेवटीं त्यांतील रहस्य काढून घेण्यासाठीं तो मुद्दाम दान मागायला देवदत्ताकडे गेला. त्यानें पेटींत हात घालून मूठभर नाणीं दुर्मुखाच्या हातावर ठेविलीं. हें पाहून दुर्मुखाला अधिकच आश्चर्य वाटलें. शेवटीं त्यानें विचारलेंच कीं तुमच्याजवळचें सर्व धन संपलें असतां हा दानधर्म कसा काय करतां?

"सर्व ईश्वराची कृपा." तो म्हणाला. एवढ्यानें दुर्मुखाचें समाधान झालें नाहीं. त्यानें देवदत्ताचें सर्व घर न्याहाळून पाहिलें. परंतु घरांत त्याला कोठेंच कांहीं दिसलें नाहीं. एकादी तिजोरी कीं कपाट कांहींच नाहीं. तो ल्हानशी लाकडी पेटी तेवढी त्याला मिळाली. त्याला वाटलें ह्या ल्हानशा पेटींतच कांहींतरी जादू असली पाहिजे. म्हणून एके दिवशीं रात्रीं त्यानें ती पेटी चोरून नेली.

मोठ्या आशेनें दुर्मुखानें ती पेटी उघडली. पण काय! त्यांत फुटकी कवडी-सुद्धां मिळाली नाहीं. रागानें त्यानें ती जोरानें फेंकून दिली, पण तिला कांहीं सुद्धां झालें नाहीं. म्हणून रागारागानें त्यानें एक दगड त्या पेटीवर टाकला. परंतु त्याला ल्हानसा पोचासुद्धां पडला नाहीं. शेवटीं कंटाळून त्यानें ती पेटी उंच फळीवर उचलून ठेवली.



देवदत्तानें आपलें गुपित सांगितलें नाहीं म्हणून दुर्मुख मनांतल्या मनांत जळफळूं लागला. ठीक आहे, मला न का सांगेना, राजाला तर सांगेलच कीं नाहीं. असा विचार करून तो राजाकडे गेला व म्हणाला—"महाराज, आपल्या गांवांत देवदत्त नांवाचा एक माणूस आहे. त्यानें आपली धनसंपत्ति दानधर्म करून सर्व घालवून टाकली आणि अगदीं गरीब झाला. पण कांहीं दिवसांपासून मी पाहातों आहे, तो पुन्हां पहिल्याप्रमाणें किंबहुना जास्तच दानधर्म करूं लागला आहे. मला वाटतें, त्याला कोठें तरी बराच मोठा खजिना सांपडला असावा. अर्थात त्यावर आपलाच न्याय्य अधिकार पोहोंचतो. ह्या साठीं आपल्याला फक्त सूचना देण्यासाठीं हा सेवक आलेला आहे. महाराजानें जसें योग्य वाटेल तसें करावें."

राजानें मंत्र्याकडे बोलावणें पाठविलें व तो आल्यावर म्हणाला—"जा, आणि देवदत्ताच्या घराची झडती घेऊन त्याला मिळालेला सर्व खजिना घेऊन ये."

"जी हुजूर." म्हणून मंत्री निघाला. त्यानें आपल्याबरोबर चार शिपाई घेतले



आणि सरळ देवदत्ताच्या घरीं गेला. देवदत्ताची झोपडी पाहतांच त्याला त्याच्या गरीबीची कल्पना आली. तरी सुद्धां त्यानें त्याच्या घराची झडती घेतली. त्यांत त्याला कांहीं सुद्धां मिळालें नाहीं. "मग तूं एवढा दानधर्म कसा करीत होतास?" मंत्र्यानें विचारलें. "एका यक्षानें माझ्यावर कृपा करून मला एक ल्हान पेटी दिली होती. त्यांत हात घातला म्हणजे मला पैसे मिळत असत. पण कालच कोणी तरी ती पेटी सुद्धां चोरून नेली. म्हणून आज मी कोणाला कांहींहि देऊं शकलों नाहीं, आणि

ह्याचें मला स्वतःला फार दुःख वाटत आहे. मंत्र्याला देवदत्ताचें बोलणें खरें वाटलें, आणि खऱ्या वस्तुस्थितीचा अंदाज लागला. तो तडक दुर्मुखाच्या घरीं गेला. त्याच्या घरींच त्याला ती पेटी मिळाली. "ही पेटी येथें कशी रे?" मंत्र्यानें विचारलें. त्यावर त्यानें आपली चोरी कबूल केली. पण त्यांत कांहीं नसल्याचें सांगितलें. मंत्र्यानें ती पेटी राजाला नेऊन दिली.

दुसऱ्या दिवशीं राजानें दरबारांत देवदत्ताला बोलाविलें आणि ती पेटी दाखविली. देवदत्तानें ती लगेच ओळखली.

"मग सांग, आतां तूं ह्यांतून धन कसें काढतोस तें. ही जादूची पेटी आहे, असें समजल्यावरून आम्हीं ही मागविली. आतां तूंच सांग, ह्या पेटींत जादू काय व कोठें आहे ती." राजा म्हणाला.

हें ऐकतांच देवदत्तानें पेटी उघडून त्यांत हात घातला व मूठभर पैसे काढून तेथें आलेल्या शिपायांच्या हातावर ठेवले.

"आम्हीं ह्यांत हात घातल्यावर कांहींच आलें नाहीं ना? मग तुझा काय मंत्र आहे तो आम्हांला सांग, नाहीं तर तुला प्रायश्चित भोगावें लागेल." राजा म्हणाला.

"महाराज, ह्यांत कांहीं मंत्र नाहीं आणि तंत्र पण नाहीं. माझ्या शिवाय दुसऱ्या कोणीहि ह्यांत हात घातला तर त्याला कांहीं मिळणार नाहीं." देवदत्त नम्रपणें म्हणाला.

थोड्यावेळानें मंत्र्याशीं कांहीं तरी मसलत करून राजा म्हणाला—"देवदत्ता, आपल्या राज्यांत ह्या पेटीचें फार मोठें महत्व आहे. तेव्हां ही दरबारांतच राहिली पाहिजे. आणि तुझ्या शिवाय इतर कोणीहि ह्याचा उपयोग करूं शकणार नाहीं म्हणून तुला रोज दरबारांत येऊन ह्याचा उपयोग करून दिला पाहिजे. ह्या कामसाठीं तुला योग्य तो पगार दिला जाईल."

देवदत्त काय बोलणार बिचारा. मुकाट्यानें राजाचें म्हणणें कबूल करून निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं राजानें एका दिवाणखान्यांत मोठमोठ्या थैल्या आणून रचून ठेवविल्या आणि देवदत्तास बोलावून त्याच्याजवळ ती पेटी देऊन सांगितलें कीं ह्या थैल्या द्रव्यानें भरून काढ. देवदत्तानें पेटींत हात घातला पण द्रव्य येईना. त्यानें पुन्हां पुन्हां प्रयत्न करून पाहिला पण व्यर्थ.











“ तुझ्यासारख्या कपटी माणसास मरणाची शिक्षाच ठीक.” राजा गरजला.

मी आतां दानधर्म कसा करूं ह्याच चिंतेंत देवदत्त होता. हें पाहून मंत्र्यानें राजाला सांगितलें कीं ह्या गरीबाची ह्यांत कांहीं चूक नाहीं. त्याला सोडून देणेंच बरें. राजाला त्याचें म्हणणें पटलें. निरर्थक वस्तु जवळ बाळगून काय उपयोग, म्हणून राजानें ती पेटी देवदत्ताच्या हवालीं करून त्याला सोडून दिलें.

देवदत्तानें घरीं येऊन पुन्हां एकदां पाहावें म्हणून त्या पेटींत हात घातला. प्रचीति आणि चमत्कार असा कीं पुन्हां त्याच्या हातांत द्रव्य आलें. त्याला फार फार आनंद झाला आणि तो पुन्हां दानधर्म करीत सुखासमाधानानें राहूं लागला.

एवढें सांगून वेताळानें गोष्ट थांबविली. म्हणाला—“ राजा ! पेटींतून द्रव्य काढण्याची शक्ति देवदत्तास मिळाली असतां सुद्धां राजाचा खजिना भरतांना कुठें गेली ती सारी शक्ति ? प्रश्नाचें उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर परिणाम माहीत आहेच. तुझ्या डोक्याचे शतशः तुकडे होऊन तुझ्या पायाशीं पडतील.”

“ वर आणि शक्ति ह्यांत फार फरक आहे. यक्षानें देवदत्ताला वर दिला होता कीं दानधर्मासाठीं तुला त्यांत द्रव्य मिळेल. पण राजानें ती एक शक्ति मानली व आपला खजिना भरण्याची त्याला आज्ञा दिली. म्हणून देवदत्ताच्या प्रयत्नानें सुद्धां त्यांत द्रव्य आलें नाहीं.

अशा रीतीनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य झाला व पुन्हां आपल्या झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# गर्वाचें घर खालीं

अंगिराला दोन पुत्र. बृहस्पति व संवर्त.

बृहस्पति हा कुशाग्रबुद्धीचा आणि संवर्त महान तपस्वी होता. संवर्त तपश्चर्येंत आपल्याहून पुढें आहे ही गोष्ट बृहस्पतीला न आवडल्यानें तो संवर्तला नाना तऱ्हेनें त्रास देऊं लागला. त्याचा छळ असह्य होऊन संवर्त एका वस्त्रानिशीं घरांतून निघून गेला. पुढें बृहस्पति देवांचा गुरु झाला.

कृतयुग संपून त्रेतायुगाला सुरवात झाली होती. अवीक्षिताचा मुलगा मरुत पृथ्वीपति होता. महा प्रतापी असल्यामुळें त्याला अपर विष्णुच समजत असत. ह्या राजवंशाचा पुरोहित बृहस्पतीच होता.

मरुताच्या समोर इंद्रालासुद्धां हार मानवी लागली. मरुताची वाढती कीर्ति त्याला असह्य झाली.

त्यानें एक दिवस बृहस्पतीला बोलावून सांगितलें कीं दोघांच्याकडलें पौरोहित्य मला पसंत नाहीं. तो म्हणाला—“ मी त्रैलोक्याचा अधिकारी. मला इंद्रपद मिळालें. तुम्ही माझे गुरु, पुरोहित आणि तुम्ही त्या मानवपुत्र मरुताकडे सुद्धां पौरोहित्य करावें. मला हें अगदीं अयोग्य वाटतें. मला वाटतें तुम्हांला माझें पौरोहित्य करावयाचें असल्यास त्याचें घर सोडून द्यावें.”

“ आपलें म्हणणें खरें आहे. आपणांपुढें त्या मरुताची काय गणती. मी आपल्या विचाराशीं सहमत आहें.” बृहस्पति म्हणाला.

मरुतानें समस्त भूमण्डल जिंकल्यावर एक मोठा यज्ञ आरंभिला. त्यानें बृहस्पतीला पुरोहित म्हणून बोलाविलें. बृहस्पति



म्हणाला—"आजपर्यंत मी आपला पुरोहित होतों. परंतु आतां तें काम माझ्याकडून होणार नाहीं. इंद्रानें मला तसें सांगितलें आहे.

आपण ह्या वंशाचे कुलगुरु. अचानकपणें आपण हें काय मनांत आणलें. आपल्या हातूनच ह्या यज्ञाची सांगता व्हावी." मरुतानें विनम्रपणें निवेदन केलें.

"छे! छे!! तें आतां शक्य नाहीं. देवेन्द्राची आणि तुझी काय बरोबरी. कुठें देव आणि कुठें मानव. मी इन्द्राचेंच पौरोहित्य करावयाचें ठरविलें आहे. ह्या पुढें मी तुझा पुरोहित नाहीं." असें सांगून बृहस्पतीनें मरुताला निरोप दिला.

बृहस्पतीच्या त्या कठोर उत्तरानें मरुत निराश झाला. पुढें काय करावें ह्या चिंतेंत चालला असतां त्याला वाटेंत नारद भेटला. "कसल्या विचारांत पडला आहेस. मला तरी सांग. माझ्याकडून जेवढी मदत होईल तेवढी करीन." नारदानें सहानुभूतिपूर्वक विचारलें.

"मी यज्ञासाठीं गुरूला बोलाविलें असतां त्यानें नकार दिला. इतकेंच नव्हें तर मर्त्य म्हणून आमचें यजमानत्व त्यानें झिडकारलें." मरुत खिन्न मनानें म्हणाला.

"एवढेंच ना! अरे तो नाहीं त्याचा भाऊ. कोणीहि असला म्हणून काय? हें बघ ह्या बृहस्पतीचा एक भाऊ आहे. त्याचें नांव संवर्त. त्याला तूं आपला पुरोहित कर." नारदानें सुचविलें.

"होय. पण तो कोठें भेटेल? त्याला कसें विचारावयाचें? कांहीं सांगाल?" मरुतानें विचारलें.

"बृहस्पतीच्याच त्रासामुळें तो वेड्या-सारखा भटकतो आहे. सध्यां विश्वेश्वराच्या दर्शनासाठीं काशीला गेला आहे. तेथ जाऊन त्याला भेट. पण तूं त्याला ओळख-णार कसा? असं कर, तूं काशीच्या प्रवेश-द्वाराशीं एक प्रेत जवळ ठेवून बस. प्रेत पाहतांच संवर्त मागें फिरेल. तूं त्याचा पाठलाग कर आणि निर्जन ठिकाणीं येतांच तूं त्याला शरण जा. 'तुला इकडे कोणी पाठविलें' असें विचारल्यास माझें नांव सांग." अशा तऱ्हेनें मार्ग दाखवून नारद निघून गेला.



नारदाच्या सांगण्याप्रमाणें मरुत एक प्रेत जवळ ठेवून काशीच्या प्रवेशद्वारीं बसून राहिला. थोड्या वेळानें संवर्त त्या बाजूस आला. परंतु प्रेतावर नजर पडतांच मागें फिरून पाहूं लागला. नारदानें सांगितलेली संवर्ताची खूण पटतांच मरुत त्याच्या पाठो-पाठ निघाला. बरेच दूर गेल्यावर संवर्त त्याला परतवण्यासाठीं त्याच्या अंगावर दगड माती, शेण जें हातीं आलें फेंकूं लागला. पण त्या सर्वांची मरुतनें थोडी देखील परवा केली नाहीं व संवर्तच्या मागें चालत राहिला. तेव्हां संवर्त धावूं लागला. मरुत् देखील त्याच्या पाठोपाठ धांवूं लागला.

पण किती वेळ धांवणार? संवर्त दमला व एका वडाच्या झाडाखालीं दगडावर



विश्रांति घेण्यासाठीं बसला. मरुत तेथें येऊन पोचला व नम्रपणें नमस्कार करून समोर उभा राहिला. संवर्तनें त्याला थोडें रागानेंच विचारलें—"मी कोण काय हें कळल्याशिवाय तूं माझ्या पाठीस कां लागला आहेस?"

मरुतनें, त्याला नारदानें जी ओळख व खूण सांगितली होती ती निवेदन करून आपलें पौरोहित्य करण्यास विनंति केली."

"पण मी अमक्या जागीं आहे व माझी ओळख अशी बिनचूक सांगणारा कोण हें नाहीं तूं सांगितलेंस?" संवर्तनें पुन्हां विचारलें आणि म्हणाला—"मी विचारलेल्या

प्रश्नाचें उत्तर खरें खरें सांगितलेंस तर ठीक, नाहींतर मी बजावून ठेवतों, मी तुला भस्म करून टाकीन."

मरुतनें, नारदानें सर्व सांगितलें असें सांगून गुरु होण्यास विनंति केली.

संवर्त म्हणाला—"माझ्यासारख्या विक्षिप्त माणसाला आपला गुरु करून घेणारा तूं तरी एक विक्षिप्तच. तूं माझा भाऊ बृहस्पति आहे, त्याच्याकडे जाऊन त्याला आपलें पौरोहित्य करावयास सांग."

मरुतनें, बृहस्पतीनें त्याचा कसा अपमान केला हें देखील सांगितलें. तेव्हां संवर्त म्हणाला—"मला तुझें पौरोहित्य करण्यास हरकत नाहीं. पण माझ्या आवडी निवडीचा तूं विचार कर. कारण माझ्या मनाप्रमाणें किंवा सांगण्याप्रमाणें तूं वागला नाहींस तर मला राग येईल व त्या कोपाग्नींत तूंच काय, तुझा सर्व वंश व तुझें सर्व राज्य नष्ट होईल."

मरुतनें सर्व कबूल केलें. संवर्तच्या मनाचें समाधान झालें. तो म्हणाला—"तुला इंद्रापेक्षां जास्त वैभव प्राप्ति होईल, याची जबाबदारी मी घेतों." संवर्तनें मरुताला वचन दिलें.



नंतर संवर्तानें मरुताला सांगितलें कीं शंकर कैलास पर्वतावर राहतो. तेथेंच मंजुवंत नांवाचा एक पर्वत आहे. त्या पर्वतावर सोन्याचा अलोट सांठा आहे. तूं शंकराचा अनुग्रह प्राप्त करून तूं तें सर्व सोनें उचलून घेऊन ये. त्या प्रमाणें मरुतानें आपल्या नोकरांना मोठमोठे गाडे घेऊन मंजुवंत पर्वतावर जावयास सांगितलें व स्वतः शंकराचा अनुग्रह व्हावा म्हणून यज्ञाची तयारी करूं लागला.

ही बातमी देवलोकांत पोंचली. आपला यजमान इंद्र याच्याशीं मरुत आतां बरोबरी करणार व आपलाच भाऊ संवर्त याच्या मदतीनें, ह्या काळजीमुळें बृहस्पति आजारी पडला.

इंद्र आपल्या गुरूच्या आजाराची गोष्ट ऐकून विचारपूस करण्यासाठीं आला. तेव्हां बृहस्पति म्हणाला—"तो मर्त्य मरुत माझा भाऊ संवर्त याच्या मदतीनें एक यज्ञ करीत आहे. तो यज्ञ पुरा झाला तर त्याचें वैभव तुझ्याहून मोठें होईल. तेव्हां वेळींच हा यज्ञ भंग करतां आला तर पहा."

इंद्रानें अग्नीला आपला दूत करून मरुतकडे पाठविलें. म्हणाला—"त्याला जाऊन





सांग कीं तुझ्या या यज्ञाचें पौरोहित्य करायला स्वतः बृहस्पति येत आहे.

इंद्राचा निरोप अग्नीनें मरुताकडे जाऊन निवेदन केला. तो निरोप ऐकून मरुत अग्नीला म्हणाला—“ तुझ्या म्हणण्याबाहेर मी नाहीं. पण माझ्या या यज्ञाला संवर्त यानें पौरोहित्य स्वीकारलें आहे व तें मी मान्य केलें आहे. माझ्यासारख्या मर्त्य मानवाच्या यज्ञाला देवांचा गुरु बृहस्पति यानें येण्याची काय गरज आहे?”

पण अग्नि म्हणाला—“ इंद्राची मैत्री किती उपयोगी आहे हें मी सांगण्याची गरज नाहीं. त्याचा गुरु जो बृहस्पति त्याची मर्जी संपादन केलीस तर तुला त्रिलोकपति होतां येईल.”

संवर्त इतका वेळ सर्व शांतपणें ऐकत बसला होता. पण आतां स्वस्थ बसणें त्याला बरें वाटलें नाहीं. त्यानें अग्नीला बजावलें—“ येथवर तूं बोललास तें पुरें झालें. यानंतर जास्त कांहीं बोललास तर मात्र मी तुलाच भस्म करून टाकीन.”

अग्नि संवर्ताच्या समोर जास्त उभा राहिला नाहीं. भीतीमुळें त्याचें सर्व अंग थर थर कांपत होतें. तो अयशस्वी होऊन परत आलेला पाहून इंद्र त्याला म्हणाला—“ तूं पुन्हां मरुताकडे जा आणि त्याला सांग, तूं मी सांगितल्याप्रमाणें वागला नाहींस तर मी वज्रायुधाचा प्रहार करून तुझा वध करीन.”

पण अग्नि हात जोडून त्याला म्हणाला—“ मला संवर्ताची भीति वाटते. तो मला भस्म करील.”

देवेंद्र स्मित करून म्हणाला—“ इतरांना भस्म करणें हा तुझा गुण आहे, तुला कोण भस्म करणार?”

“ देवेंद्रा! ह्या बोलण्यांत काय अर्थ आहे? अरे! तूं या त्रिलोकाचा स्वामी व



प्रभू आहेस! पण वृत्रानें तुझा पराभव केला नाहीं का?” अग्नीनें इंद्राला निरुत्तर करण्याच्या हेतूनें उत्तर दिलें.

पण इंद्र आपल्याच तोऱ्यांत म्हणाला—“ अरे! मी त्या वृत्रासुराला ढेकणासारखा चिरडून टाकला असता. पण मी दुर्लक्ष केलें व त्या संधीचा त्याला फायदा झाला. माझ्या हातांत वज्र असे पर्यंत माझी बरोबरी करण्याची हिंमत मर्त्य मानवाची तर काय, दानवाची देखील नाहीं!”

“ ही सर्व गर्वोक्ति सोडून दे, इंद्रा! कधीं तूं च्यवनावर वज्र प्रहार करून पाहिला होतास कीं नाहीं? पण तुझें वज्र व तें सोडणारा तुझा हात निस्तेज होऊन गेला, हें तूं विसरलास वाटतें? च्यवनानें एका भयंकर राक्षसाची सृष्टि करून पाठविलें होतें. तेव्हां तुझे डोळे दिपून गेले होते. हें सर्व तूं विसरलास वाटतें? त्या संवर्ताच्या सामर्थ्याची तुला कल्पना नसेल कदाचित, पण मला आहे.” त्यानें इंद्राला निरुत्तर केलें. तेव्हां इंद्रानें धृतराष्ट्र नांवाच्या एका गंधर्वाला मरुताकडे पाठविलें.

धृतराष्ट्र मरुताकडे जाऊन म्हणाला—“ राजा! तूं या यज्ञासाठीं बृहस्पतीला



आपला पुरोहित म्हणून नेमलें नाहींस तर इंद्र वज्रायुधाचा प्रयोग करील. या उपर तुझी मर्जी.”

मरुत म्हणाला—“ संवर्त माझे पुरोहित आहेत. मित्रद्रोह करणें हें तुमच्या गुरूलाच शोभतें, हें तूं आपल्या प्रभूला जाऊन सांग!”

धृतराष्ट्र म्हणाला—“ तूं इंद्राला ओळखत नाहींस असें दिसतें. तुला आकाशांत वीज कडाडलेली ऐकूं येत असेल. इंद्राच्या वज्रायुधाचाच तो आवाज आहे. संभाळून रहा! तुझा पुरोहित त्या वज्रायुधापासून तुझें

रक्षण करण्यास समर्थ आहे ना, याची खात्री करून घे !"

खरोखरीच वीज कडाडली. सारी यज्ञशालाच हादरली. सर्व घाबरून गेले. क्षणभर मरुत देखील भ्याला. तो संवर्ताला म्हणाला—"गुरुवर ! या वज्रायुधापासून माझें रक्षण करणें आपणांशिवाय इतर कोणालाहि शक्य नाहीं."

संवर्त म्हणाला—"मरुता ! तुला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मी ज्या यज्ञाचें पौरोहित्य स्वीकारलें आहे त्यांत विघ्न आणण्याची कोणाची छाती नाहीं. तूं अगदीं निर्धास्त रहा. तुझ्या इच्छेप्रमाणें हा यज्ञ पुरा होईल."

"तर मग आणखी एक विनंति आहे. स्वत: इंद्र व त्याचे अनुयायी देव या यज्ञाला हजर राहतील असें कांहीं तरी करावें. आमच्याबरोबर त्यांनीं सोमरस पान करावा अशी फार इच्छा आहे."

संवर्त "तथास्तु !" म्हणाले.

संवर्तानें आरंभिलेल्या यज्ञांत विघ्न आणण्याची शक्ति खरोखरच कोणाच्या अंगांत नव्हती. संवर्तानें सांगितल्याप्रमाणें इंद्राला निमूटपणें मर्त्यलोकांत उतरून यावें लागलें. इंद्र आपल्या सर्व अनुयायांसह यज्ञशालेंत आलेला पाहून मरुत त्याला सामोरा गेला. संवर्तानें पण त्याचें यथोचित स्वागत केलें व देवेंद्रासह सर्व देवांनीं सोमरस पान केलें. इंद्राचा गर्व परिहार झाला. हें सर्व संवर्ताच्या तपश्चर्येच्या प्रतापानें घडलें. इंद्रानें मरुताला आशीर्वाद दिला व त्याच्याशीं मैत्री करून घेतली. यज्ञ समारंभ संपल्यावर इंद्र पुन्हां अमरावतीला निघून गेला.





# भीमूचे पराक्रम

आपल्याला लिहितां वाचतां येत नाहीं ह्या गोष्टीचें भीमूला फार वाईट वाटत असें. लक्ष्मीलाहि ह्याचें वैषम्य वाटल्याविना राहिलें नाहीं. तिनें त्याला लिहावाचावयास शिकविलें. कष्टाचें फळ, थोडें का होईना, हातीं येतेंच. त्याचा जमीनदार सासरा देखील त्याला ह्या कामीं मदत करीत असे. त्याच्याकडे येणारीं सर्व कागदपत्रें अगोदर तो आपल्या जांवयाकडून वाचून घेत असे. मग स्वत: वाचून तीं आपल्या जांवयाला समजावून सांगत असे. जमीनदारीच्या कामाची भीमूला विशेष गोडी उत्पन्न झाली होती असें नाहीं. परंतु त्याला वाटत असें कीं आपला सासरा जें जें वाचतो तें सर्व आपण वाचलें पाहिजे.

त्याचा सासरा रोज रात्रीं निजण्यापूर्वी रामायणांतील कांहीं भाग वाचीत असे. मग त्याच्यावरच चष्मा काढून ठेवून झोपत असे. भीमूनें देखील त्याचें अनुकरण करण्याचें ठरविलें.

त्या दिवशीं रात्रीं सर्व झोपी गेले तरी भीमू झोपला नाहीं. सासऱ्याचें रामायण वाचन होईपर्यंत तो जागा राहिला आणि बायकोला 'मी आतां थोडें वाचून येतों, तूं झोप.' असें सांगून सासऱ्याचा चष्मा घालून रामायण वाचूं लागला. चाळिशी लावल्यानें त्याच्या डोळ्यास त्रास होऊन डोळ्यांतून पाणी येऊं लागलें. चाळिसाव्या वर्षीं सामान्यपणें चष्मा लावावा लागतो. भीमू तर लहान होता. पण सासऱ्याची नक्कल करण्याचें त्यानें ठरविलें होतें. म्हणून डोळ्यांतून पाणी येऊं लागलें तरी सुद्धां त्यानें वाचन थांबविलें नाहीं.

राक्षस ]

[ श्री. मा. गो. मोरे

वाचतां वाचतां त्याला मध्येंच डुलक्या येत, मध्येंच जाग येई. पुन्हां वाची, पुन्हां निजे. असें करीत वाचतां वाचतां तो रामा राक्षसांच्या युद्धापर्यंत आला आणि त्याला झोंप लागली.

झोंपेच्या गुंगीतच त्याला चाहूल लाग-ल्याचा भास झाला म्हणून त्यानें डोळे उघडले तों त्याला समोर एक चोर दिसला. भीमूला त्याची ती काळी कुट्ट व भयानक अशी आकृति दिसली. भीमू स्वभावानें भितरा नव्हताच. तो भ्याला नाहीं. त्यांत रामाच्या पराक्रमाच्या गोष्टी वाचून तो झोंपला होता. मनांत घोळत असलेला राक्षसच समोर आहे असें वाटून त्यानें रामा-प्रमाणें त्यास प्रश्न केला. म्हणाला—"हे राक्षसा! तुझें नांव काय? आणि तूं येथें कशासाठीं आला आहेस?" पण चोर त्याला दरडावून म्हणाला—"ओरडशील तर खबर-दार!" असें म्हणत त्यानें आपल्या हातांतील सुरा त्याच्यावर उगारला. त्या चोर राक्षसाचा उद्धटपणा त्या भीमू रूपी रामाला असह्य होऊन त्यानें आपल्या एका हातानें त्याचा सुऱ्याचा हात जोरानें खेंचून व पिळवटून दुसऱ्या हातानें त्याचें नरडें धरलें.

चोर पूर्ण सावध असून सुद्धां ह्या अन-पेक्षित हल्ल्यापुढें टिकूं शकला नाहीं. तो मोठ्यानें किंचाळला व धाडदिशी जमिनीवर कोसळला. घरांतील मंडळी व नोकरचाकर धांवून आले. सर्वांनीं मिळून चोराला चांगलेंच झोडपून काढलें. अशा तऱ्हेनें चोर पकडला गेला. आणि लोकांनीं पाहिलें कीं भीमूनें पकडून दिलेला चोर गांवांतील कुख्यात चोरांपैकीं एक होता.

[ पुढील अंकीं नवीन पराक्रम ]





# गुलाम हिरकणी

[ ४ ]

अलीशारनें म्हातारीच्या मदतीनें आपल्या प्रियतमेचा शोध तर लावला, परंतु केवळ निष्काळजीपणामुळें तो निजून राहाला. दुसऱ्या दिवशीं तो जागा झाला तेव्हां त्याला आश्चर्यच वाटलें. कारण तो एका गल्लींत असल्याचें त्याला आढळून आलें. आश्चर्य करीत त्यानें सहज आपल्या डोक्याशीं हात नेला तों त्याला दुसरा चमत्कार दिसला. त्याच्या डोक्यावरील पगडी सुद्धां नाहींशी झालेली त्याला आढळली.

तो पुन्हां म्हातारीकडे गेला आणि आपण केलेली चूक कबूल करून म्हणाला—"जमरूद कोठें आहे जरा सांगशील?" म्हातारी जमरूदच्या शोधासाठीं म्हणून गेली होती ती सुमारें एका तासानें परत आली. म्हणाली—"जमरूद कोठें तरी नाहींशी झालेली दिसते. आतां ती परत येईल असें मला वाटत नाहीं. बघ! केवळ तुझ्या हलगरजीपणामुळेंच तुझ्यावर हें संकट आलें आहे. आतां कोणी कांहीं करूं शकणार नाहीं, फक्त देवाचाच भरंवसा.

म्हातारीचें बोलणें ऐकून अलीशार लहान मुलासारखा ओकसा बोकशी रडूं लागला आणि त्यांतच त्याला घेरी येऊन तो बेशुद्ध होऊन खालीं पडला. म्हातारीच्या सेवे-शुश्रुषेनें त्याला शुद्ध आली. पण तो मानसिक व्यथेनें जवळ जवळ एक वर्षभर आजारी होता. त्याला चांगला बरा करण्यासाठीं म्हातारीनें लाख प्रयत्न केले. परंतु जमरूद पुन्हां भेटेल ही आशाच विरल्यामुळें तो

सौ. मालती देशमुख




दिवसेदिवस झुरतच चालला. शेवटीं म्हातारी त्याला म्हणाली—

"अरे, तूं असा पलंगावर पडून राहिलास तर तिचा शोध तरी कसा लागणार? मनुष्यानें कधीं आशा सोडूं नये. प्रयत्न करून पहा. कदाचित सांपडेलहि तुला."

म्हातारीचें म्हणणें त्याला पटलें. तो कांहीं तरी निश्चय करून उठला. स्नान वगैरे केलें. थोडासा पौष्टिक आहार घेतला. त्यामुळें त्याला जरा हुशारी वाटली. अशा प्रकारें एक महिना लोटल्यावर तो चांगला हिंडूं फिरूं लागला. नंतर त्यानें म्हातारीची रजा घेतली आणि निघाला. पण कोठें हें त्याचें त्याला माहीत नव्हतें. पाय नेतील तिकडे तो जात होता. कित्येकदां तो हताश होऊन तासन्तास बसून राही. पुन्हां उठून चालू लागे. आतां जमरूदची भेट अशक्य असें त्याला वाटूं लागलें. पण आंतील मन सांगे, ती भेटेल व जरूर भेटेल. जातां जातां तो जमरूदच्या राज्यांत येऊन पोहोंचला.

ज्या दिवशीं अलीशार जमरूदच्या शहरीं पोहोंचला त्या दिवशीं त्या शहरांत एक मोठी मेजवानी होती. ही त्या शहरांतील चवथी मेजवानी. मेजवानी चालली असतां जमरूद सर्व पाहुण्यांचें निरीक्षण करीत होती. पाहुणे नेहमींप्रमाणें आपापल्या जागीं बसून जेवत होते. परंतु ज्या ठिकाणीं शिरा पुरी, साय वगैरे ठेविलें होतें तेथें जाण्यास कोणी धजलें नाहीं. कारण लोक पूर्वींचे अनुभव विसरले नव्हते.

अलीशार तेथेंच आला. शिरापुरी, साय वगैरे ठेवलेली जागा रिकामी पाहून तो तेथें जाऊन बसला. त्याला तेथें बसलेला पाहतांच सर्व लोक भयचकीत होऊन त्याच्याकडे बघूं लागले. जमरूदनें देखील त्याला तेथें





बसतांना पाहिलें. लगेच तिनें त्याला ओळखिलें आणि तिच्याहि पोटांत धस्स झालें. आपली ही घाबरगुंडी कोणाला कळूं नये म्हणून ती हळूच जेथें होती तेथेंच बसली आणि तेथून अलीशारला न्याहाळूं लागली. त्याचें खाणें पोटभर होईपर्यंत ती कांहींहि बोलली नाहीं.

त्याला तेथें बसून खातांना पाहून सर्वांना आश्चर्यच वाटलें. कारण त्या ठिकाणच्या अन्नाचा एक घास घेतांच खाणाराला खाणें थांबवावें लागत असे. शिवाय सुल्तानाचे सैनिक येऊन त्याला पकडून घेऊन जात असत आणि मग तो बिचारा प्राणास मुकत असे.

अलीशारनें तेथें बसून पोटभर खाल्लें आणि मग डोळे मिटून प्रार्थना करूं लागला. त्याचें जेवण झालें असें पाहून जमरूदनें आपल्या सैनिकांना बोलावून आज्ञा केली. "त्या तरुणाला मोठ्या विनयानें बोलावून आणा." तिनें सांगितलें.

सैनिकांना त्याच्याजवळ येतांना पाहून 'ह्याचीहि पाळी आली' असें सर्वांना वाटलें. पण सैनिकांनीं त्याला धरून फरफटत ओढत न नेतां अगदीं नम्रतेनें बोलावून नेलें. म्हणाले—"आमचे सुलतान आपल्याशीं कांहीं बोलूं इच्छितात." अलीशार उठून त्यांच्याबरोबर जाऊं लागला.

लोक त्याच्या विषयीं तर्क वितर्क करूं लागले. कोणी म्हणाले—"ह्याचें आयुष्य आतां संपलें!" "सैनिकांनीं ओढून कसें नेलें नाहीं?" कोणी शंका केली, त्याला पोटभर खाऊं दिलें. एकंदरीत ह्याचावर संकट येण्याची शक्यता कमीच.

जमरूदच्या समोर त्याला नेऊन उभें केल्यावर तिनें इतरांप्रमाणें ह्यालाहि प्रश्न विचारले—"तुमचें नांव काय? काय काम



धंदा करतां? येथें कशासाठीं आलां आहांत?"

"माझें नांव अलीशार. माझे वडील खुरासान देशांतील एक व्यापारी होते. मी देखील तोच धंदा पुढें चालू ठेविला. परंतु जेव्हां दैव फिरलें तेव्हां मी तें काम सोडून दिलें. सध्यां मी आपल्या प्रियतमेच्या शोधार्थ हिंडत आहें आणि त्या करितांच येथें आपल्या देशांत आलों आहे. तिच्याशिवाय मला दुसरें कोणीहि नाहीं आणि तिच्याशिवाय मला सर्व शून्यवत झालें आहे." बोलतां बोलतां दुःखातिशयानें त्याला एकदम मूर्छा आली.

जमरूदनें त्याला गुलाबपाणी शिंपडवून सावध केलें. नंतर नेहमींप्रमाणें रेतीमध्यें तांब्याच्या काडीनें उभ्या आडव्या रेघा ओढल्या. नंतर त्याला लक्षपूर्वक पाहिल्या-प्रमाणें दर्शविलें आणि सर्वांना ऐकूं जाईल असें मोठ्यानें म्हणाली—"तूं जें जें सांगितलें आहेस तें सर्व खरें आहे. म्हणून मीहि तुला सांगतों कीं तुझी प्रेमिका तुला जरूर भेटेल."

मेजवानी संपल्यावर जमरूदनें सैनिकांना आज्ञा केली. "ह्याला उटणें लावून स्वच्छ चांगली आंघोळ घाला. राजवाड्यांतील उंची कपडे घालण्यास द्या आणि काळोख पडल्या-वर घोड्यावर बसवून अंतःपुरांत घेऊन या." असें सांगून ती राजवाड्यांत निघून गेली.

जमरूदला तो दिवस फार लांब, फारच लांब वाटूं लागला. राजवाड्यांत गेल्यापासून संध्याकाळ होण्याची ती मोठ्या उत्कंठेनें वाट पाहूं लागली. कोणच्याहि कामांत तिचें चित्त लागेना. एक एक क्षण तिला युगाप्रमाणें वाटूं लागला. शेवटीं तिन्हींसांजा होतांच ती आपल्या गुप्त खोलींत गेली आणि अलीशारला तेथें घेऊन येण्याची आज्ञा दिली. ती स्वतः अंधुक प्रकाशाच्या जागीं बसली.







ह्या मनुष्याविषयीं दाखविलेल्या आदरानें सर्वांना आश्चर्य वाटूं लागलें. सर्वांना वाटलें कीं ह्याला कांहीं तरी मोठें पद मिळणार. भाग्यवान आहे बेटा! आतां ह्याला कोणता हुद्दा मिळणार आहे याविषयीं तर्क वितर्क करीत सैनिक त्याला सुलतानाच्या गुप्त खोलींत घेऊन आले.

आल्याबरोबर अलीशारनें जमरूदला लवून मुजरा केला. तिनें त्याला विचारलें 'स्नान वगैरे झालें? खाणें पिणें उरकलें?" अशा तऱ्हेच्या सर्व प्रश्नांना त्यानें उत्तर दिलें 'जी हुजूर'. नंतर त्याला थोडें जलपान करवून आपल्याजवळ बसविलें. अलीशार आश्चर्य करूं लागला. तरी पण सुलतानाच्या इच्छेला त्यानें मान दिला. जमरूदनें स्मित करून त्याच्याकडे पाहून म्हटलें—"अजून सुद्धां तूं आपल्या हिरकणीला ओळखलें नाहींस!"

तिच्या तोंडचे हे शब्द ऐकल्यावर त्यानें तिच्या चेहेऱ्याकडे पाहिलें. तों पर्यंत त्यानें डोकें वर करून सुलतानाच्या तोंडाकडे पाहिलें देखील नव्हतें. त्याला स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच होईना. इतक्या दिवसा-नंतर आपल्या प्रेयसीला शेजारीं बसलेली



पाहून आणि आपल्या दीर्घ प्रयत्नाला आलेलें यश पाहून त्याला अतिशय आनंद झाला. जमरूदला तर आपल्या जिवाचें सार्थक झाल्यासारखें वाटलें, ह्यांत आश्चर्यच नाहीं.

दुसऱ्या दिवशीं जमरूदनें दरबारी पोषाख चढविला आणि आपल्या सर्व अधिकाऱ्यांना राजवाड्याच्या प्रांगणांत बोलावून म्हणाली—"मंडळी हो! ह्या युवकाला पाहिल्यापासून माझें मन त्याच्याकडे फार आकर्षित झालें आहे. त्यानें देखील मला आपल्या राज्यांत बोलाविलें आहे. करितां आपण आपल्या साठीं दुसरा राजा निवडावा. मी आजच ह्याच्याबरोबर प्रयाण करणार आहें. तुम्ही आजवर मला जो मान दिलात त्याबद्दल मी तुमची सर्वांची फारफार आभारी आहें. तुमचा सर्वांचा निरोप घेत असतां मला फार वाईट वाटत आहे."

सुलतानाच्या आज्ञेप्रमाणें कर्मचाऱ्यांनीं त्याच्या पाठविणीची सारी व्यवस्था केली. तऱ्हेतऱ्हेचीं पक्वान्नें करून शिदोरीला दिलीं. वस्त्रभूषणांनीं मोठमोठ्या पेट्या भरून दिल्या. नाना तऱ्हेच्या वस्तू भेट म्हणून दिल्या. नंतर एका सुंदरशा उंटावर एक उत्तम हौदा ठेवून त्यांत त्या दोघांना बसविलें. सर्व सामान सुमान उंटाच्या पाठीवर लादलें आणि त्यांना पाठवून दिलें.

हें सर्व घेऊन अलीशार आपल्या शहरांत आला. फकिरांना बराच दानधर्म केला आणि त्यांचा आशीर्वाद घेऊन आपल्याजवळ असलेल्या धनदौलतीवर आपले दिवस सुखानें घालवूं लागले.

पुढें त्यांना मुलेंबाळें होऊन त्यांचा वंशवृक्ष वाढत गेला. अशातऱ्हेनें अलीशार व जमरूद यांचें जीवन सुखाचें झालें. [संपूर्ण]





# पोपट पंजी

आजोबांनीं मोठ्या नातवाला बोलाविलें आणि त्याच्या हातांत दोन आणे देऊन म्हणाले—"जा तपकीर घेऊन ये." आजी नातवाला बाजारांत जात असलेला पाहून म्हणाली—"बाळ, एक नारळ पण घेऊन ये, बरं का!" इतक्यांत बाबांनीं बोलाविलें म्हणून तो तिकडे थांबला. ते म्हणाले—"शाई संपली आहे घेऊन ये." असें सांगून त्यांनीं त्याला एक रुपया दिला. पंधरा मिनिटांनीं तो शाई घेऊन आला. पण नारळ व तपकीर आणायला विसरला. विसरभोळा म्हणून सर्व मुलांनीं त्याची टिंगल केली. पुष्कळ दिवस मुलें त्याची थट्टा करीत राहिले.

तेव्हां आजोबा त्यांना म्हणाले—"हें पहा, प्रत्येकाला सर्वच लक्षांत राहतें असें थोडेंच आहे. कांहीं आठवतें व कांहीं आठवत नाहीं. जें आठवतें त्याची मात्र पोपट पंजी चालू असते. कांहींना कांहीं शब्द आठवतात तर कांहीं विसरतात. कांहींना अगदीं शेवटीं ऐकलें असेल तेवढेंच आठवतें. अशा एका माणसाची गोष्ट मी ऐकली आहे."

गोष्टीचें नांव ऐकतांच मुलें—"गोष्ट! गोष्ट! आजोबा गोष्ट!" म्हणून ओरडूं लागली. आजोबांनीं चिमटीभर तपकीर नाकांत कोंबली व गोष्ट सांगूं लागले.

एकदां मोठ्या नातवाला आजींनीं अवस केव्हां आहे हें शास्त्रीबुवांना विचारून यायला पाठविलें. तो शास्त्रीबुवांकडे गेला. आजीला नातवाच्या पोपटपंजीची चांगली पारख होती. म्हणून तिनें त्याला बजावून सांगितलें होतें कीं शास्त्रीबुवा सांगतील तें तू विसरून येशील. म्हणून वाटभर तें

सौ. रमाबाई सोमण

घोकत ये. त्यांनीं सांगितलें असेल अगदीं तसेंच्या तसें."

तो शास्त्रीबुवांकडे गेला. शास्त्रीबुवा म्हणाले—" अरे अवस आतां कोठें ? आज तर पौर्णिमा आहे. पंधरा दिवसांनीं येईल." नातू घोकत निघाला—" आतां कोठें आणखी पंधरा दिवसांनीं येईल."

वाटेंत एक कोळी कालव्यांत मासे धरीत असलेला त्याला दिसला. बराच वेळ मासे जाळ्यांत अडकले नाहींत. तो म्हणाला— " आतां केव्हां मासे सांपडणार व केव्हां मी घरीं जाणार ?"

त्याच वेळीं शास्त्रीबुवांचा निरोप घोकत मोठा नातू कालव्याजवळ येऊन पोंचला.

कोळ्यानें तें ऐकलें आणि त्याला इतका राग आला कीं तो म्हणाला—" कोण तो ? पुरून टाका त्याला."

तें ऐकून मोठा नातू शास्त्रीबुवांचा निरोप विसरला आणि कोळी जें म्हणाला तें घोकत निघाला—" कोण तो ! पुरून टाका त्याला." असें बडबडत स्वारी एका घराजवळ आली. त्या घरांत कोणी आजारी मनुष्य होता. त्या घरांत पुष्कळ गर्दी जमा झालेली दिसली. त्या रोग्याची ती नातेवाईक मंडळी



होती. त्यांना त्या मुलाची ती बडबड अशुभ वाटली. ते त्याला मारायला धांवले. मोठा नातू तेथून धूम पळत निघाला. पळत कांहीं अंतर निघून गेल्यावर त्याला कुंभाराचा आवा जळत असलेला दिसला. कुंभार सांगत होता—" जळूं दे हळूं हळूं !"

मोठा नातू कोळ्यानें म्हटलें होतें तें विसरला व " जळूं दे हळूं हळूं !" बडबडूं लागला. तेंच घोकत तो पुढें निघाला.

एका जागीं एका घराला आग लागली होती. लोक आग विझवण्यासाठीं घागरी, घेऊन धांवपळ करीत होते. त्याच वेळीं ही स्वारी बडबडत आली—" जळूं दे हळूं हळूं !"

" कोण रे तो ? चार घागरी पाणी ओता त्यांच्या अंगावर आणि त्याचें तोंड रंगवा !" एक जण म्हणाला.

मुलाच्या डोक्यांत तेंच शिरलें. तो ओरडत निघाला—" रंगवा त्याचें तोंड !" त्याला वाटेंत गांवचा पुजारी भेटला. त्या पुजाऱ्यानें त्या मुलाशीं भांडाभांड करायचें सोडून त्याला सांगितलें कीं " मुकाट्यानें आपल्या वाटेनें जा !"










मुलगा "मुकाट्यानें आपल्या वाटेनें जा!" घोकत घरीं आला. आजीनें त्याला विचारलें—"कोठें रे होतास इतका वेळ? काय म्हणाले शास्त्रीबुवा?"

"मुकाट्यानें आपल्या वाटेनें जा" म्हणाले शास्त्रीबुवा! नातवानें उत्तर दिलें.

"तूं लहान आहेस म्हणून तसें म्हणाले असतील. म्हणून जाऊन सांग कीं आजीनें विचारलें आहे, अवस केव्हां येणार?" आजी म्हणाली.

तो पुन्हां शास्त्रीबुवांकडे गेला आणि म्हणाला—"आजीनें विचारून यायला सांगितलें आहे कीं केव्हां येणार?" तो अवस शब्द विसरून गेला होता.

शास्त्रीबुवांना अर्थबोध झाला नाहीं म्हणून त्यांनीं विचारलें—"कोण, केव्हां येणार म्हणून विचारलें आहे?"

"कोणी नाहीं. केव्हां ती ती येणार म्हणून विचारलें आहे." मुलगा म्हणाला.

शास्त्रीबुवांनीं त्याच्याकडून काढून घेण्याच्या हेतूनें विचारलें—"एकादशी कीं अवस कीं काय विचारून यायला सांगितलें आहे?"

तें ऐकून त्याला तो शब्द आठवला व म्हणाला—"हो हो अवस!"

"अवसेला कोणाचें श्राद्ध आहे का? तुझ्या आजाचें कीं कोणाचें? मी येईन हं, जाऊन सांग आजीला." शास्त्रीबुवा म्हणाले.

शास्त्रीबुवांना, त्याचें घर कोठें आहे हें नीट समजाऊन सांगून अमावास्येच्या दिवशीं शास्त्रीबुवा येणार आहेत असें नातवानें आजीला सांगितलें. शेवटीं आजीला स्वतःच शास्त्रीबुवांकडे जाऊन अवस केव्हां आहे विचारून यावें लागलें.





# भोळसट बाळोबा

एका गांवीं एक मुलगा रहात असे. त्याचे वडील वारल्यानंतर त्याच्या आईनेंच त्याला लहानाचें मोठें केलें. त्याला बेताचेंच लिहितां वाचतां येत असे.

मुलगा अर्धवट खुळा आहे हें त्याच्या आईला माहीत होतें. म्हणून ती मुलाची फार काळजी वाही. पण स्वतःच्या मूर्खपणामुळेंच त्याला फार कष्ट सोसावे लागत.

एकदां मुलाला स्वतःच्या या भोळसट स्वभावाबद्दल फार वाईट वाटलें. तो आपल्या आईला म्हणाला—"आई, माझ्यामुळें तुला विनाकारण किती कष्ट सहन करावा लागत आहे."

"बाळ! देव जसें ठेवील तसें रहावें. सर्वांना सारखी बुद्धि असते का? देवानें तुला हुशार केलें नसलें तरी तुला चांगला स्वभाव दिला आहे. दोघां तिघांच्या बरोबरीची शक्ति तुझ्या अंगांत आहे." आईनें त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

परंतु त्यांतली एक गोष्ट देखील त्याला रुचली नाहीं. तो पुन्हां पुन्हां विचारी—"आई, मला केव्हां अक्कल येणार?"

एकदां आई कंटाळून म्हणाली—"जा, त्या डोंगरावर एक मांत्रिक बाई रहाते. तिच्याकडे जाऊन अक्कल उधार मागून घेऊन ये."

तो मुलगा आई जें म्हणाली तें खरें मानून पळत डोंगर चढून गेला. तेव्हां ती मांत्रिक बाई चुलीशीं सैंपाक करीत बसली होती.

तो तिला म्हणाला—"काकू! मला थोडी अक्कल उधार देतां का? सर्व म्हणतात मला

श्री. शशिकांत माने



अक्कल नाहीं. माझ्या आईलाच सर्व कामें करावी लागतात. माझी इच्छा असून देखील तिला कांहीं मदत करतां येत नाहीं."

त्या बाईनें त्याच्याकडे जरा न्याहाळून पाहिलें व म्हणाली.

"जी वस्तु तुला जास्त आवडते ती घेऊन ये म्हणजे ती तुला केवढी अक्कल द्यायची हें ठरवीन!"

मुलानें घरीं जाऊन त्या बाईनें त्याला जें सांगितलें होतें तें आईला जाऊन सांगितलें आणि विचारलें—"आई! मला सर्वांत जास्त कोणती वस्तु आवडते ग?"

"कोंबडीचें मांस! उद्यां तूं त्या बाईकडे एक कोंबडी घेऊन जा आणि अक्कल मागून घेऊन ये." आई म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं तो एक कोंबडी घेऊन त्या बाईकडे गेला आणि म्हणाला—"मला आवडणारी वस्तु घेऊन आलों आहें"

"पाहतें बरं का तूं म्हणतोस तें खरें आहे कीं नाहीं. एका प्रश्नाचें उत्तर दे पाहूं—पायाशिवाय कोण पळतें?" त्या बाईनें त्याला विचारलें. बराच वेळ डोकें खाजवून पाहाल्यावर तो म्हणाला—"मला नाहीं माहीत या प्रश्नाचें उत्तर."

"म्हणजे तूं सर्वांत जास्त आवडणारी वस्तु घेऊन आला नाहींस, हेंच मला कळलें आहे. जाऊन पुन्हां कांहीं तरी घेऊन ये. तुला स्वतःला जास्त आवडत असेल तें." ती बाई म्हणाली.

तो घरीं येऊन पाहातो तों त्याची आई आजारी अंथरुणावर पडलेली. कित्येक लोक तिला औषध पाणी करण्यासाठीं तेथें जमा झाले होते. चवकशी करतां लोक म्हणाले—"तिला अर्धांग वायु झाला आहे. औषध पाण्याचा उपयोग झाला नाहीं. तिनें त्याला जवळ बोलावून समजावून सांगितलें कीं बाळ,



आतां मी येतें. मला देवाघरचें बोलावणें आलें आहे. डोंगरावरच्या त्या बाईनें तुला अक्कल दिलीच आहे. आतां मी निश्चिंतपणें डोळे मिटीन." असें सांगून तिनें खरोखरच डोळे मिटले.

तो रात्रभर आपल्या आईसाठीं रडत होता,—"आई नाहीं, आतां मी काय करूं?" बराच वेळ रडत राहल्यावर त्याच्या डोक्यांत प्रकाश पडला कीं त्याला सर्वांत जास्त आवडणारी वस्तु म्हणजे आई. म्हणून आईचें प्रेत एका पोत्यांत घालून तें घेऊन डोंगर चढूं लागला. त्या बाईकडे पोंचल्यावर तो म्हणाला—"काकू! मला सर्वांत जास्त आवडणारी वस्तु मी घेऊन आलों आहें. मला बुद्धि द्या."

"तूं म्हणतोस तें खरें आहे कीं नाहीं, मी पाहणार आहें. मी विचारतें त्या प्रश्नाचें उत्तर दे, पाहू—"सोनें तर नाहीं पण सोन्यासारखी चमकणारी वस्तु कोणती?" त्या बाईनें त्याला विचारलें.

पुष्कळ वेळ विचार करून तो म्हणाला—"काकू, मला नाहीं माहीत."

त्यावर ती बाई म्हणाली—"तर मग या खेपेस येतांना जी वस्तु तुला सर्वांत जास्त आवडते ती घेऊन ये."



तो खुळा मुलगा आईचें प्रेत पुन्हां उचलून घेऊन घरीं निघाला. परंतु दमून भागून वाटेंतच एका जागीं तें पोतें ठेवून रडत पडून राहाला.

"कां रे रडतोस? कोण तूं?" कोणी-तरी प्रश्न केला. म्हणून तो डोकें वर करून पाहूं लागला. तेव्हां त्याला राधा नांवाची एक मुलगी समोर उभी असलेली दिसली. म्हणाला—"आई गेल्यापासून आज मी एकटा अनाथ झालों आहें. त्या मांत्रिक बाईनें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें मला देतां आली नाहींत."

ते प्रश्न ऐकून राधा हंसूं लागली. म्हणाली—"पायांविना नदी पळते आणि सोन्याहून अधिक सूर्य चमकतो. तुझ्या-सारख्यांची काळजी करायला कोणी तरी नेहमीं जवळ असलें पाहिजे. मी राहतें तुझ्याबरोबर आणि मी असें ऐकलें आहे कीं बेअक्कल माणसें आपल्या बायकोची फार काळजी घेतात. आपण लग्न करून बरोबर राहूं."

"तुला हरकत नसेल तर मला हरकत नाहीं. आपण दोघं लग्न करून घेऊं." भोळसट बाळोबा म्हणाले. दोघांचें लग्न झालें. राधा नवऱ्याची काळजी त्याच्या आईपेक्षां जास्त ठेवूं लागली. दोघांचा संसार सुखाचा झाला.

एकदां बाळोबांना वाटलें कीं आपल्याला जगांत सर्वांत जास्त आवडणारी वस्तु म्हणजे बायको आहे. असा विचार करून ते डोंगरावरच्या मांत्रिक बाईकडे बायकोला बरोबर घेऊन गेले. म्हणाले—"काकू ! या खेपेस मला सर्वांत जास्त आवडणारी वस्तु घेऊन आलों आहें. मला बुद्धि द्या."

"बरें तर हें सांग कीं एका वस्तूला जन्मल्याबरोबर तर दोनच पाय असतात, पण पुढें दोनाचे चार होतात ! अशी वस्तु कोणती ?" त्या बाईनें विचारलें.

बाळोबांना डोकें खाजवूं लागलेले पाहून राधानें हळूंच कानांत सांगितलें—"बेडूक !" तें ऐकून बाळोबा मोठ्यानें म्हणाले—"बेडूक !"

"तूं भोळसट असलास तरी तुझ्या बायकोला अक्कल आहे. दोघं अक्कल वांटून सुखानें रहा !" असें सांगून त्या मांत्रिक बाईनें दोघांना निरोप दिला.





# अरण्यकांड

तो मायावी मृग पाहून सीतेसारखाच रामाला देखील भ्रम झाला. तो लक्ष्मणाला म्हणाला—"तूं जटायु व सीता दोघांचें रक्षण कर. मी जाऊन धरून घेऊन येतों त्या हरणाला." असें सांगून राम धनुष्य व बाण घेऊन हरणामागें धांवला.

मारीच राक्षस अगदीं हरणासारखा दिसत होता. त्याचें चालणें, वळून पाहणें, सर्वच मोहक वाटे. राम जवळ आल्यासारखा वाटला कीं तो दूर जाई. अर्थातच राम त्याचा पाठलाग करीत दूरवर निघून गेला. हरणाला धरणें अशक्य आहे असें वाटल्यावर रामानें त्याच्यावर एक बाण सोडला.

मारीच राक्षसानें आपलें मृगरूप सोडलें व मरण्या पूर्वी राक्षस रूप घेऊन रामाच्या आवाजांत "सीते ! लक्ष्मणा...." असा हाका मारूं लागला.

रामाला त्याचें तें ओरडणें अशुभ वाटलें. राम विचार करायला जास्त वेळ थांबला नाहीं. लगेच परतला.

तिकडे रामाचा आवाज ऐकून सीता घाबरली. ती लक्ष्मणाला म्हणाली—"भाऊजी ! तो आवाज तुमच्या दादांचाच दिसतो आहे. लवकर धांवा, त्यांच्या मदतीला !"

सीतेच्या त्या बोलण्याकडे लक्ष्मणानें विशेष लक्ष दिलें नाहीं. तो म्हणाला—






















"वहिनी ! देव, दानव किंवा मानव यांपैकीं कोणाची देखील दादाला भीति नाहीं. तो एकटा सर्वांचा संहार करील. तो आवाज दादाचा नसून कोणातरी मायावी राक्षसाचा असावा. दादानें मला येथें रहावयास सांगितलें आहे. मी येथून हलणार नाहीं."

"ते संकटांत असतां तुम्ही त्यांच्या मदतीस धांवत नाहीं ? तुम्ही त्यांचे शत्रु आहां कीं मित्र ! माझ्या रक्षणासाठीं त्यांनीं तुम्हांला येथें रहावयास सांगितलें होतें. त्यांच्यावरच संकट आलें असतां तुम्ही त्यांच्या रक्षणाला धांवणें आवश्यक आहे. त्यांच्या जिवाला जर का कांहीं बरें वाईट झालें तर मी स्वतःच अग्निप्रवेश करीन माझ्या रक्षणाचा विचार तुम्ही सोडा." सीता म्हणाली.

लक्ष्मणानें सीतेची समजूत घालण्याचा अनेक प्रकारें प्रयत्न करून पाहिला. पण सीता उलट त्याला वाटेल तसें तोडून बोलली—"तूं रानांत आमच्याबरोबर कशासाठीं आलास ? रामासाठीं कीं भरतासाठीं. पण लक्षांत ठेव ! तुझा दुष्ट हेतु साध्य होणार नाहीं. तुझ्या किंवा भरताच्या हातीं मी लागेन अशीं स्वप्नें पहात असाल दोघे !"

लक्ष्मणाला आतां मात्र राग आला. तो म्हणाला—"स्त्रियांचा हट्ट प्रसिद्धच आहे. तुम्ही हें बोललात म्हणूनच मला जावें लागत आहे. पण तुम्हांला पश्चात्ताप करावा लागेल एवढें मात्र मी सांगून ठेवतों." असें रागानें म्हणत लक्ष्मण निघून गेला.

लक्ष्मण तिकडे निघून गेल्याबरोबर रावण एका संन्यासाचा वेष धारण करून रामाच्या पर्णकुटी जवळ भिक्षा मागायला म्हणून आला. भगवीं वस्त्रें घालून, हातांत कमंडलू घेऊन व खडावा घालून वेदांचा मंत्रोच्चार करीत तो पर्णकुटीसमोर उभा राहिला. सीता त्यावेळीं रडत होती. रेशमी साडी नेसून ती दारांत उत्सुकतेनें रामाची वाट पहात उभी होती.

रावणानें सीतेला विचारलें—"हे सुंदरी तूं कोण ? पार्वती कीं लक्ष्मी, कीं अप्सरा. मी त्रिलोकांत हें सौंदर्य कोठेंहि पाहिलें नाहीं. तूं राक्षसांच्या या देशांत कशी काय आलीस ? तूं एकटी दिसतेस ? तूं अशी रडत कां आहेस !"

सीतेनें रावणाला खरा संन्यासी समजून त्याला बसायला आसन दिलें आणि प्यायला पाणी देऊन म्हणाली—"जेवून जावें !"

रावणानें पुन्हां विचारलें—"पण तूं कोण काय हें नाहीं सांगितलेंस."

सीतेनें पतीच्या वनवासाचें कारण सांगून रावणाला त्याचें नांव कुळ गोत्र विचारलें आणि म्हणाली—"आपण एकटे या दंडकारण्यांत फिरत आहां आपल्याला राक्षसांची भयभीति वाटत नाहीं का !"

सीतेचा तो प्रश्न ऐकून रावण स्मित करून म्हणाला—"मला राक्षसांची भीति वाटण्याचें काय कारण ? मीच त्यांचा राजा रावण आहें. मला अनेक स्त्रिया आहेत. पण तुझी बरोबरी करूं शकेल अशी एक





देखील नाहीं. मी लंकेचा राजा आहें. माझी राजधानी समुद्रांत बेटावर एका उंच पर्वतावर आहे. तूं हें निर्जन जंगल सोडून दे आणि माझ्या अंत:पुरांत येऊन रहा. मी तुला आपली पट्टराणी करून घेईन. तुझ्या सेवेला पांच हजार दासींना नेमीन. आपण दोघं सुखानें लंकेवर राज्य करूं!"

तें ऐकून सीतेला प्रथम भय तर वाटलेंच. परंतु रावणाचीं दुष्ट वचनें तिला असह्य वाटलीं. ती रागानें म्हणाली—"रावणा! तुझा मृत्यु जवळ आलेला दिसतो आहे. तूं रामाचा पराक्रम पाहलेला दिसत नाहीं. त्या सिंहासमोर तूं कोल्हा कुत्र्यासारखा आहेस."

रावणाला सीतेचें तें वाक्य अपमानाचें वाटलें. तरी तो स्वत:चा राग गिळून म्हणाला—"सीते! तुला माहीत नसेल कदाचित! मी कुबेराचा भाऊ आहें. त्याचें पुष्पक विमान माझ्याजवळच आहे. माझा नुसता नामोच्चार झाला तरी देवांचा राजा इंद्र थर थर कांपूं लागतो. राम आहे भितरा. नाहींतर राज्य सोडून त्यानें वनवास ग्रहण केला असता का? तुला रामाचें भय वाटत असेल तर तें तूं मनांतून काढून टाक. तूं माझ्याबरोबर राहूं लागलीस आणि राम जवळपास फिरकला तर मुंगी-सारखा चिरडून टाकीन मी त्याला."

"कुबेराचा भाऊ स्वत:ला म्हणवून घेऊन तुला हें सर्व बोलणें शोभतें का? परस्त्रीकडे वाईट नजरेनें पाहणाऱ्याचा कुळनाश होतो हें तुला माहीत नाहीं वाटतें?" सीतेनें रावणाला विचारलें.

रावणाला सीतेचा राग आला. तो उभा राहिला. त्याचें तें राक्षसी रूप पाहून सीता घाबरूनच गेली. पर्वताकार काळें शरीर, निखाऱ्यासारखे लाल लाल डोळे आणि क्रुद्ध मुद्रा पाहून सीतेच्या मनाची जी स्थिति झाली असेल तिचें वर्णन करण्याची गरजच नाहीं. त्यांत रावण म्हणाला—"सीते! रावणाहून पराक्रमी पति तुला कोठून मिळ-णार? आज तूं मला नकार दिलास तर आयुष्यभर तुला रडावें लागेल, विसरूं नकोस." असें सांगून रावणानें सीतेला उचलून घेतलें आणि आकाशांत उडूं लागला. सीता मोठ-मोठ्यानें ओरडूं लागली—"रामा! लक्ष्मणा, धांवा! हे वनस्पतींनो व लतांनो! राम येईल तेव्हां त्याला सांगा कीं रावण सीतेला हरण करून घेऊन गेला!"

इतक्यांत सीतेला एका झाडावर बसलेला जटायु दिसला. ती त्याला म्हणाली—"हे जटायु! पहा, हा राक्षस मला उचलून घेऊन चालला आहे. रामचंद्राला ही गोष्ट अवश्य सांग!"

जटायु झाडावर पेंगत पडला होता. सीतेचा आवाज ओळखून तो उठून बसला आणि रावणाला संबोधन करून म्हणाला—"दुष्टा! तूं भित्र्यासारखा येऊन परस्त्रीला हरण करून नेत आहेस. स्वत:च्या स्त्रीचें रक्षण करणें हें जसें प्रत्येकाचें कर्तव्य आहे तसेंच इतरांच्या स्त्रीचें रक्षण करणें देखील





प्रत्येकाचें कर्तव्य आहे. तूं तर राजा आहेस. राजाच असा वागूं लागला तर इतर पामरजन काय करतील? मी वृद्ध आहें, तूं तरुण आहेस! तुझ्याजवळ शस्त्रें आहेत माझ्या जवळ एकहि शस्त्र नाहीं. तरी मी तुला सीतेला घेऊन जाऊं देणार नाहीं. लक्षांत ठेव."

असें सांगून जटायूनें रावणावर झडप घातली. आपल्या तीक्ष्ण चोचीनें व नखांनीं त्याचें सर्व अंग ओरबाडून काढलें. रावणानें सीतेला एका बाजूला ठेवून जटायूवर बाण सोडले. पण जटायूनें ते तोडून टाकल्यावर तो तलवार घेऊन त्याच्यावर धांवला. जटायूनें रावणाचा रथ तोडला, सारथी व घोडे ठार केले. तेव्हां रावण सीतेला उचलून आकाश-मार्गें उडूं लागला. जटायु पुन्हां आडवा येऊन उभा राहिला व म्हणाला—"हिम्मत असेल तर रामलक्ष्मणांशीं युद्ध करून सीतेला घेऊन जा. असें चोरासारखें येऊन परनारीला चोरून नेण्यांत तुझें पौरुष तें काय!"

पण रावणानें जटायूचे पंख कापले व त्याला क्षतविक्षत करून जमिनीवर पाडला. जटायु अर्धमृत स्थितींत जमिनीवर पडल्या-वर सीता जटायु जवळ धांवली व ओरडली—"हे रामचंद्रा! लक्ष्मणा! धांवा! माझें रक्षण करण्यास धांवणाऱ्या या वृद्ध जटायूला तरी वांचवा!"

रावणाला त्यावेळीं इतका राग आला होता कीं तो सीतेच्या अंगावर धांवला. सीता झाडाझुडपांत शिरून स्वतःचें रक्षण करण्यास धांवली. पण रावणानें तिचे केस धरून तिला ओढलें व तिला उचलून घेऊन आकाशमार्गानें पुन्हां उडूं लागला.

रावण जोरानें पळत होता. त्यावेळीं सीतेचे दागिने आकाशांतून खालीं पडूं





लागले. सीता रावणाला म्हणाली—"तूं भित्रा आहेस, चोर आहेस! तूं आतां जरी मला सोडून दिलेंस तरी राम तुला माफ करील. तूं ज्या विचारानें मला उचलून नेत आहेस तो विचार तूं सोडून दे. तें होणें शक्य नाहीं. रामाला सोडून मी फार दिवस जगणार नाहीं." रावणानें तिच्या बोलण्याकडे अर्थातच लक्ष दिलें नाहीं.

आकाशमार्गें जात असतां एका पर्वतशिखरावर सीतेला चारसहा वानर बसलेले दिसले. कदाचित यांच्याकरवीं रामाकडे ही बातमी पोंचती होईल. असा विचार करून सीतेनें पदर फाडून त्यांत आपले चार दागिने घातले व ते त्या माकडांजवळ टाकले. रावणाला तें कळलें नाहीं. त्या माकडांनीं मात्र सीतेला छान पाहिलें.

रावण नदनदी, पर्वत व गिरिकंदरा ओलांडून शेवटीं समुद्र पार लंकेला सीतेसह घेऊन पोंचला.

लंकेची राजधानी एक सुंदर नगरी होती. मोठमोठे रस्ते व दोन्ही बाजूला गगनचुंबी सोन्याच्या इमारती होत्या. रावणाचें अंतःपुर सप्त प्राकाराच्या आंत सुरक्षित स्थानीं होतें. रावण सीतेला आंत घेऊन गेला. तेथें त्यानें राक्षसी दासींना बोलावून सीतेवर कडक पाहारा ठेवण्यास सांगितलें. म्हणाला—"माझ्या आज्ञेशिवाय पुरुष असो कीं स्त्री, कोणी सीतेला भेटतां कामा नये. ती वस्त्राभूषणें कांहीं मागेल तर ते मात्र तिला हवे तितके द्या. त्यासाठीं माझ्या आज्ञेची वाट पाहण्याची गरज नाहीं. तिचें मन दुखेल असें कोणी जर तिच्याशीं बोलला तर मी स्वतःच्या हातानें त्याचा शिरच्छेद करीन."





[ १२ ]

[ लबू व जयमल दोघांनी त्या रानटी तरुणाचें रक्षण केलें नंतर ते तिघे मिळून ज्या चोरवाटेनें चंडमंडुकेश्वर पळाला होता त्या भुयारांतल्या वाटेनें चालूं लागले. तिकडे तो मंडूक आपल्या एका अनुचराबरोबर भुयाराच्या दुसऱ्या बाजूला जाऊन पोंचला होता. तें दुसरें द्वार म्हणजे एक विहिर होती. वर आल्यावर चंडमंडुकेश्वर ब्रह्मदंडी मांत्रिकानें फसविल्याबद्दल सूड कसा घ्यावा या विचारांत होता. पुढें वाचा]

चंडमंडुकेश्वराच्या अनुचराला मात्र त्याच्या सरदाराचें बोलणें बिलकुल बरोबर दिसलें नाहीं. ब्रह्मदंडीवर त्याचा संशय निव्वळ संशयच आहे असें त्याला वाटलें. कारण त्यानें ब्रह्मपुराच्या राजाकडून मंडुकेश्वराला पुष्कळ धन देवविलें होतें आणि असें वचन देखील देवविलें होतें कीं बलवीर व महावीर दोघांना धरून दिल्याबद्दल अर्धें राज्य मिळेल. मग तो मंडुकेश्वराचा विश्वासघातानें वध करण्यासाठीं कोणाला पाठवील! या खेरीज बलवीर व महावीर यांच्याशिवाय भयानक दरींत येणें शक्य नव्हतें. त्यानें मंडूकाला ही गोष्ट प्रथमच सांगितली होती व म्हणू-नच त्यानें दोघांना पकडण्याची जबाबदारी



मंडूकावर टाकली होती. बलवीर व महावीर अकस्मात या द्वीपांत आले. त्याचें कांहींतरी विशेष कारण असलें पाहिजे !

चंडमंडूकाचा अनुचर असा विचार करीत आपल्या धन्यासमोर हात जोडून उभा राहिला व म्हणाला—“ मंडुकेश्वरा ! एक विनंति करीत आहें,अशी घाई करूं नये. मला माझें मन सांगत आहे कीं या दोघांना ब्रह्मदंडीनें पाठविलेलें नाहीं. ज्यानें स्वतः येऊन आपल्या-जवळ मदत मागितली तो आपल्या विरुद्ध असा विश्वासघात कां करील हेंच मुळीं मला समजत नाहीं. त्याला त्यांत काय फायदा ! माझ्या मतें स्वतःच विचार करून पहावा.”

“ कर विचार ! सावकाश कर विचार ! तूं पहिल्यानें जाऊन त्या ब्रह्मदंड्याला बोलावून घेऊन ये.” पंधरा मिनिटांत त्यानें येथें आलें पाहिजे. तूं हें काम बजावलें नाहींस तर तुझी चामडी लोळवीन विसरूं नकोस.” चंडमंडूक गरजला.

मंडुकाच्या अनुचराला घाईघाईनें येतांना पाहून ब्रह्मदंडी व त्याचे दोघे अंगरक्षक शक्तिवर्मा व जितवर्मा या दोघांना आश्चर्य वाटलें. तिघे एका तंबूत बसलेले होते.

तिघांच्या मनांत तोच एक प्रश्न होत, नरभक्षक मंडुकेश्वराचा अनुचर इतक्या घाईनें कां बरें येत असावा ?

ब्रह्मदंडी जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांकडे वळून म्हणाला—“ पाहिलेंत तुम्ही त्याचें तोंड. रागानें डोळे कसे लाल झालेले दिसत आहेत. आपल्यावर कांहीं संकट तर येत नसेल ना ?”

“ खरें आहे तुमचें म्हणणें ! या नरभक्षक जातीचा काय विश्वास ? त्यांच्याशीं मैत्री करणें हा स्वतःचा मूर्खपणा आहे. मला प्रथम पासूनच तसें वाटत होतें व मी तसें म्हटलें होतें देखील. पण तुम्हीच माझ्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलेंत.” हें बोलत असतां जितवर्मांचें सर्व अंग रागानें थरथर कांपत होतें. “ त्यांच्याशीं आपण मैत्री केली नसती, त्यांना धनाचा लोभ दिला नसता, राज्याचा लोभ दाखविला नसता तर त्यांनीं आपल्याला जिवंत भाजून खाल्लें असतें. आपण त्यांच्या हातांत सांपडल्यावर दुसरें करणार तरी काय ?” ब्रह्मदंडीनें विचारलें.

ते अजून बोलतच होते. मंडुकेश्वराचा अनुचर ते बसले होते तेथें येऊन पोंचला. आल्याबरोबर रागाच्या भरांत तो ब्रह्मदंडीला म्हणाला—“ ब्रह्मदंडी ! तुझीं शंभर वर्षें भरलीं आहेत. मंडकेश्वर तुला उभा भाजून खाणार आहे आज. तो तुझी वाट पाहातो आहे. संभाळ !”

“ मला भाजून खाणार ? कां ? मी काय केलें त्यांच्या मनाविरुद्ध ? ब्रह्मपुराचें अर्धे राज्य त्याला द्यायचें मी वचन दिलें होतें. त्याला ! प्रमाण म्हणून मी त्यानें मागितलें तितकें धन देखील नाहीं का दिलें ?” ब्रह्मदंडीनें विचारलें.

“ त्या अर्ध्या राज्याच्या गोष्टी कशाला ? माहीत आहे तें त्याला. आमच्या सरदाराला ठार करण्यासाठीं तूं महावीर व बलवीर दोघांना कां पाठविलेंस ? मंडुकेश्वराच्या अनु-चरानें स्पष्टच विचारलें.



महावीराचें व बलवीराचें नांव ऐकतांच ब्रह्मदंडी ओरडला—“ हे काळभैरवा ! किती दिवसानंतर तुझी कृपा दृष्टि माझ्याकडे वळली आहे ? तर मग महावीर आणि बलवीर सांपडले तर ?”

तो पुन्हां जितवर्मा व शक्तिवर्माकडे वळून व जरा जवळ जाऊन म्हणाला—“ तुम्हाला लखू व माझा शिष्य जयमल दोघांचीं नांवें माहीत आहेतच. मग उठा ! आपण आतां सरळ त्या भयानक दरीकडेच जाऊं या !”



पण मंडुकेश्वराचा अनुचर मधें आडवा उभा राहून व एका हातानें त्याला धरून व गदगदा हलवून म्हणाला—" कोठें निघालास? खोटें कशाला बोलतोस? महावीर व बलवीर सांपडले म्हणून तुला कोणी सांगितलें? उलट त्यांच्या हातून मी व माझे सरदार स्वतःचा जीव मोठ्या मुश्कीलीनें वांचवूं शकलों. समजलें?"

"म्हणजे ते आहेत तरी कोठें? तर मग मंडुकेश्वर अजून आपल्या गुहेंतच आहे? चला लवकर त्यांना जाऊन पकडूं या! जितवर्मा व शक्तिवर्मा उठा लवकर!"



ब्रह्मदंडी जोर जोरानें ओरडूं लागला. ब्रह्मदंडी मांत्रिकाचें तें विचित्र ओरडणें व वागणें पाहून मंडुकाच्या अनुचराला तो निर्दोष असल्याची खात्री पटली. ब्रह्मदंडीनेंच स्वतः महावीर व बलवीर दोघांना पाठविलें आहे ही सरदाराची जी समजूत झाली ती चुकीची होती हें त्याला पहिल्यापासूनच वाटत होतें. आतां त्याचें वागणें व बोलणें पाहून त्याची खात्री पटली. पण मंडुकेश्वराचा राग कसा कमी करायचा? हें त्याला कळेना."

मंडुकेश्वराचा अनुचर कांहीं वेळ विचार करून मग ब्रह्मदंडीला एका बाजूला बोलावून घेऊन जाऊन त्याच्या कानांत सांगूं लागला— " आमच्या सरदाराला तुझा फार राग आला आहे. जें कांहीं तुला माहीत आहे तें सर्व खरें खरें सांगून टाक. तूं किती समजून सांगितलेंस आणि तरी देखील त्याच्या मनांतला संशय दूर झाला नाहीं तर सांग कीं तुझ्यावर मंत्राचा प्रभाव आहे. तुझ्या केसाला देखील धक्का लागणें शक्य नाहीं. महावीरला व बलवीरला जितवर्मा व शक्तिवर्मानें पाठविलें होतें असें सांगून वेळ मारून ने. त्या दोघांपैकीं एकाला मरावें लागेल. पण तूं वांचशील." तो इतका हळूं बोलत होता कीं तो काय बोलत होता हें जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांपैकीं एकाला देखील ऐकूं आलें नाहीं.

ब्रह्मदंडीच्या जिवांत जीव आला. त्यानें हळूच जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांकडे एकदां पाहिलें आणि म्हणाला—" मंडूकसेवकाग्रेसरा! बरोबर आहे तुझें म्हणणें! एका थोर पुरुषाच्या रक्षणासाठीं कित्येक लहानांचा बळी देणें आवश्यक असतें. हें शास्त्रमत आहे. तर चल, त्या मंडुकेश्वराच्या दर्शनाला जाऊं या!"

मंडकेश्वराचा अनुचर ब्रह्मदंडीबरोबर पुढें चालूं लागला. पाठीमागून जितवर्मा व शक्तिवर्मा चालूं लागले. दोघे पुढें परस्परांच्या कानांत काय बोलत होते हें त्यांना ऐकूं येत नव्हते. पण त्यांच्या त्या विचित्र वागण्याचा संशय मात्र या दोघांना येऊं लागला. त्या सर्व बेटावर मंडकेश्वराचेच नरभक्षक अनुचर रहात होते. चौथे चंडमंडूक होता त्या जागीं येऊन पोंचले तेव्हां चंडमंडूक विहिरींत डोकावून पहात होता व आपल्या नरभक्षक अनुचरांना कांहीं तरी सांगत होता. ब्रह्मदंडी व त्याच्या दोघां अनुयायांना



आलेले पाहून मंडुकेश्वर उठून उभा राहाला आणि विहिरीपासून दूर एका झाडाजवळ त्यांना बोलावून घेऊन गेला.

ब्रह्मदंडी प्राणभयानें थरथर कांपत उभा होता. मंडुकेश्वर त्याला म्हणाला—" ब्रह्मदंडी! भिण्याचें कारण नाहीं. तूं दगा करून त्या दोघांना माझ्याकडे पाठविलेंस असा मला संशय होता. पण आतांच रानांतून माझ्या कांहीं विश्वासु अनुचरांनीं येऊन महावीर व बलवीर दोघे या बेटावर कसे आले हें सांगितलें. गुलामांच्या व्यापाऱ्याच्या हातून स्वतःची सोडवणूक करून घेऊन दोघे इकडे



आले. आतां दोघे पिंजऱ्यांत सांपडल्यासारखे आहेत." असें म्हणत त्यानें त्या विहिरीकडे पाहिलें. तो आणखी पुढें म्हणाला—"ते माझ्या पाताळ भुवनांतून इकडूनच बाहेर येण्याच्या प्रयत्नांत आहेत. त्या टोंकाला मी कांहीं जणांना उभे केलें आहे व कांहीं आत शिरून त्यांना पिटाळीत इकडेच आणीत आहेत. आपण येथें त्यांची वाट पहातच आहों !"

मंडुकेश्वराच्या तोंडून तें ऐकल्यावर ब्रह्मदंडीला वर्णनातीत आनंद झाला. धन व संपत्तीनें भरलेली ती भयानक दरी त्याच्या डोळ्यासमोर उभी राहाली. जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांजवळ जाऊन तो त्यांच्या कानांत पुटपुटला—"ऐकलेंत ना तुम्ही सारें ! लखू व जयमल दोघांना जिवंत कैद केलें पाहिजे. त्यांच्याजवळ गुप्त आयुधें असणें शक्य आहे. तसेंच आवश्यक झाल्यास जयमल मारला गेला तरी चालेल. पण लखूला मात्र जिवंत धरलें पाहिजे.

नंतर सर्व त्या विहिरीजवळ जाऊन विहिरीच्या कठड्यावर जाऊन बसले. मंडुकेश्वर मधून मधून आंत डोकावून पहात होता व कान लावून चाहूल घेत होता. थोड्या वेळानें म्हणाला—"येत आहेत. पुढें पुढें येण्याचा आवाज ऐकूं येत आहे."

चंडमंडूक म्हणाला त्याप्रमाणें लखू व जयमल त्या रानटी तरुणाबरोबर त्याच बाजूला येत होते. पूर्वी त्यांनीं मंडुकेश्वराच्या शोधार्थ त्याचें सर्व पाताळ भुवन पालथें घातलें पण तो जेव्हां कोठें सांपडला नाहीं तेव्हां ते परतले. पण परत येऊन पाहतात तो तेथें त्यांना दरवाज्याजवळ कांहीं लोक असल्याचें कळलें म्हणून तेपरत फिरले. आपण आंत शिरलों आहों हें मंडुकेश्वराच्या अनुचरांना कळलें आहे व ते आपल्या मार्गे येत आहेत." तो रानटी तरुण म्हणाला.

जयमल मशाल घेऊन पुढें जाऊं या. पाहूं या. तरी ही वाट कोठें बाहेर निघते कीं नाहीं. पण जर का मंडुकेश्वरानें त्या टोंकाला पण पाहरेकरी ठेवले नसतील तर आपल्याला पळून जातां येईल. पण जर असतील तर मात्र जिवांत जीव असेपर्यंत त्यांच्याशीं आपण युद्ध करायचेंच."

त्या नरभक्षकांच्या हातीं मरण्यापेक्षां त्यांच्यापैकीं चार सहा जणांना जमिनीवर लोळवून मेलेलें बरें !" लखू म्हणाला.

असे आपसांत बोलत ते विहिरीच्या जवळ येऊन पोंचले. दुरूनच त्यांना कोणी बोलत असल्याचा भास झाला. जयमल थांबला व लखूला मार्गे ओढीत म्हणाला—"आपल्याला वाटलें तसे ते लोक आपली वाट पहात तेथें बसले आहेत.

लखू कांहीं बोलणार तितक्यांत त्यांना पाठीमागून दिव्याचा उजेड दिसला. लगेच तिथे आपापल्या तलवारी उपसून येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्यास तयार झाले. लखूनें जयमलला बाजूला सारलें व पुढें येऊन म्हणाला—"पाठीमागून येणारे लोक पोंचण्या



पूर्वी आपण बाहेर निघूं या. वर जे लोक पाहारा देत आहेत त्यांना बाटेला लावलें म्हणजे आपल्याला पळून जातां येईल."

त्याप्रमाणें तिघे निघाले.

"ते येत आहेत पहा! त्यांना जिवंत पकडलें पाहिजे, विसरूं नका!" ब्रह्मदंडी म्हणाला. त्याप्रमाणें त्याचे अनुचर जितवर्मा व शक्तिवर्मा सर्व सज्ज होऊन उभे राहाले.

"लवूच्या केसालाहि धक्का लागतां कामा नये. त्याच्याशिवाय भयानक दरींत आपल्याला कांहींच करतां येणार नाहीं. जितवर्मा सावध रहा! जर का त्याच्या केसाला देखील धक्का लागला तर पुन्हां दोघांना मी उभा जाळून टाकीन, उभा जाळून टाकीन. विसरूं नका!" ब्रह्मदंडीनें त्यांना बजावलें. ब्रह्मदंडी मांत्रिकाला उत्तर म्हणूनच कीं काय तिघे जोरानें धांवत आले आणि एकदम उडी मारून बाहेर येऊन उभे राहाले. सिंहासारखे सर्वांवर ते तुटून पडले व त्यांची फळी फोडून पलीकडे निघून गेले.

त्याच वेळीं दुरून झाडीच्या आडून अकस्मात् "मौनानंद महाराज की जय!" असा जयघोष ऐकूं आला. नंतर "या झाडावर बसलेल्या बीस जणांनीं पटापट उड्या टाका आणि त्या ब्रह्मदंडीला व मंडुकाला पकडा. जांभळाच्या झाडींत लपलेल्या लोकांना सांगा, विहिरींत उड्या टाकून भुयारांतून येणाऱ्या नरभक्षकांना वाटेला लावा." असा आवाज देखील ऐकूं आला.

"चंडमंडूका!" म्हणत मंडूक व "काल भैरवा!" म्हणत ब्रह्मदंडी ओरडत दुसऱ्या बाजूनें झाडींत पळून जाण्या साठीं धांवले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# वचनभंग

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला आणि झाडावरचें प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा मला एकंदर असें दिसत आहे कीं तूं वचनबद्ध होऊन त्याचें पालन करण्यासाठीं हा सर्व श्रम करीत आहेस. तसें असेल तर तुझा कांहीं दोष नाहीं. कारण वचनभंग केल्यानें अभिजित याला स्वतःचें जीवित घालवून बसावें लागलें होतें. तुला या रात्रीच्या वेळीं कंटाळा येऊं नये म्हणून मी अभिजितची गोष्ट सांगतों. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कधीं काळीं सत्त्व नावाच्या एका राज्यांत एक क्षत्रिय योद्धा रहात असे. त्याचें नांव अजित असें होतें. त्याला तशी मोठी पैतृक संपत्ति मिळाली नव्हती. तरी त्याच्या

वेताळाच्या गोष्टी



नांवीं लिहिलेलें एक गांव होतें. त्या गांवांतच त्याचा एक लहानसा किल्लापण होता. त्याला धनाचा तेवढा लोभ नव्हता पण कीर्तीचा लोभ मात्र फार होता.

अभिजितचा किल्ला एका डोंगराच्या पायथ्याशींच होता. तो घोड्यावर बसून त्या डोंगरांत शिकारीला जात असे. त्यामुळें धनुर्विद्येंत त्याला चांगलेंच यश मिळालें होतें.

नित्याप्रमाणें अभिजित एक दिवशीं शिकारीला गेला असतां त्याला तहान लागली. ती भागविण्यासाठीं तो एका ओढ्यावर पाणी प्यायला गेला. घोड्यावरून उतरून त्यानें स्वच्छ हातपाय धुतले व पोट भरून पाणी प्याला. पाणी पिऊन तो उभा राहिला तेव्हां त्याला समोर एका शिळेवर अप्सरसारखी सुंदर एक तरुण स्त्री बसलेली दिसली.

त्याला आश्चर्य वाटलें. तो पाणी प्यायला म्हणून नदींत उतरला त्यावेळीं त्याला तेथें कोणीच दिसलें नव्हतें. मग ही तरुणी कोठून आली? शेवटीं त्यानें त्या स्त्रीलाच विचारलें—"तूं या मर्त्य लोकांतली स्त्री दिसत नाहींस. अप्सरा तरी असावीस किंवा कोणी देवी तरी असावीस.

ती तरुणी स्मित करून म्हणाली—"मी जलकन्या आहें. मला चंद्रमुखी म्हणतात."

अभिजितला जेव्हां कळलें कीं ती तरुणी या मर्त्य लोकांतली स्त्री नसून एक जलकन्या आहे. तेव्हां तिच्याशीं बोलण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून तो तेथून निघाला. परंतु त्याचें मन त्या सुंदर तरुणीनें हिरावून घेतलें होतें. त्या चंद्रमुखीच्या मुखावर त्याचे डोळे चकोर पक्षासारखे मुग्ध होऊन गेले होते. त्याचे पाय तेथून हालतच नव्हते. ती तरुणी पण अभिजितच्या सौंदर्यावर मुग्ध झाली असावी. कारण ती एकटक त्याच्याकडेच पहात बसली होती. डोळ्यांना डोळ्यांची भाषा समजते. अभिजित निघून जाणें तर दूरच, ती बसली होती तेथें लोहचुंबक लोखंडाला ओढतो तसा येऊन तिच्या जवळ उभा राहिला. त्या तरुणीनें स्मित करून त्याचें स्वागत केलें.

दोघे बराच वेळ परस्परांशीं बोलत राहालीं. सूर्यास्ताची वेळ होत आली तेव्हां त्यांना कळलें कीं आतां आपापल्या घरीं परत जाण्याची वेळ झाली आहे. अभिजित म्हणाला—"हे प्रेयसी! तूं माझें मन चोरलें आहेस. मी घरीं गेलों तरी माझें मन तुझ्याजवळच राहणार. मला भूक लागणार नाहीं व झोंप येणार नाहीं. तुझें रूप सारखें माझ्या डोळ्यासमोर नाचत राहील. म्हणून तूं माझ्याबरोबर चल. मी तुझ्याशीं लग्न करून तुला आपल्या हृदयसिंहासनावर बसवीन."



चंद्रमुखी म्हणाली—"माझ्या मनाची अगदीं तशीच स्थिति झाली आहे. माझे पाय येथून हालतच नाहींत. मी या मर्त्यलोकांतली सामान्य स्त्री नसलें तरी प्रेमाच्या बाबतींत माझ्या मनाची स्थिति तशीच आहे. मी आपला जलवास सोडून तुझ्या घरची दासी व्हायला तयार आहें. परंतु माझी एक अट आहे. माझ्याशीं विवाहबद्ध झाल्यावर परस्त्रीचा विचार देखील तुझ्या मनांत आलेला मला खपणार नाहीं. मला वचन देऊन तूं तें मोडलेंस तर तुला स्वतःचें जीवितच घालवून बसावें लागेल. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करून काय तें ठरव."

अभिजित स्मित करून म्हणाला—"पहिल्याच भेटींत तूं अशा अटी घालूं लागलीस तर तुझ्याबरोबर आयुष्यभर किती अटींचें दडपण माझ्यावर येऊन पडेल, कोण जाणें! पण तुला मी तूं मागितलेलें हें वचन द्यायला तयार आहें.' दोघं अभिजितच्या किल्ल्यांत गेलीं. दोघांचें

समारंभानें लग्न झालें. अभिजितच्या गांवच्या लोकांनीं या लग्नाची सर्व जबाबदारी आपल्या खांद्यावर घेतली होती. त्यांनीं त्या लग्नप्रसंगीं वधुवरास अनेक प्रेमोपहार देऊन दोघांचें अभिनंदन केलें.

अभिजितच्या आनंदाला भरती आल्यासारखें झालें. त्याच्या जीवितांत कसलीहि उणीव म्हणून राहिली नाहीं. आपला शौर्य व पराक्रम दाखवून कीर्ति संपादन करण्याची फक्त एक इच्छा त्याच्या मनांत राहून गेली. लवकरच ती इच्छा पुरी होण्यास देखील त्याला एक उत्तम संधी मिळाली.

साल्व राज्याचें एका शेजारच्या राज्याशीं भाऊबंदकीमुळें युद्ध सुरू झालें. राज्यभर सैन्य भर्ती सुरू झाली. त्या युद्धांत पराक्रम गाजवणारास सन्मान व पारितोषिकें दिली जातील अशीं राजातर्फे वचनें देण्यांत आलीं.

ही घोषणा ऐकून अभिजितच्या मनांत कीर्तीची अभिलाषा उत्पन्न झाली व त्यानें चंद्रमुखीला त्याविषयीं विचारलें. म्हणाला— "या युद्धांत मला जी कीर्ति मिळेल त्याची वांटेकरीण तूं पण होशील. आपण तसे श्रीमंत पण नाहीं. या युद्धांत धन व मान दोन्हीचा भरपूर लाभ होईल."



चंद्रमुखीनें आनंदानें त्याला निरोप दिला आणि स्वतःच्या हातानें त्याला कवच व शिरस्त्राण घातलें. म्हणाली— "मी प्रत्येक क्षण तुझी आठवण करीत राहीन."

अभिजितनें युद्ध संपल्याबरोबर घरीं परत येण्याचें वचन दिलें. म्हणाला— "तुझ्या प्रेमाचें कवच सदा माझें रक्षण करीत राहील."

तो घोड्यावर बसून साल्व राजाकडे गेला. राजानें त्याला आपला एक पंच हजारी सरदार म्हणून नेमलें व युद्धाला पाठविलें. अभिजितनें त्या युद्धांत चांगलाच पराक्रम गाजविला. त्याच्या पराक्रमामुळेंच साल्व राजाला युद्धांत जय मिळाला.

राजानें अभिजितच्या शौर्याची प्रशंसा केली व त्याला पारितोषिक व वस्त्र देऊन त्याचा सन्मान केला.

अभिजितला चंद्रमुखीला दिलेल्या वचनाची आठवण होती. म्हणून तो राजाचा निरोप घेत म्हणाला—"महाराज! मी ज्या कामासाठीं आलों होतों तें पुरें झालें आहे. आतां मला निरोप द्यावा."

राजा म्हणाला—"युद्ध संपून एक दिवस देखील झाला नाहीं. विजयोत्सवाची तयारी





आहे. म्हणून तो उत्सव संपल्यावर तूं जा." राजाच्या शब्दाला मान देणें अभिजितला आवश्यक होतें.

विजयोत्सव फारच मोठ्या प्रमाणावर साजरा झाला. अभिजितच्या शौर्याची सर्वत्र वाखाणणी झाली. अभिजितला घरीं परत जाण्याची घाई होती. म्हणून त्यानें अगदीं नाइलाजानें पुन्हां निरोप मागितला.

ह्या खेपेस राजानें आपला खरा मानस व्यक्त केला. म्हणाला—"फक्त पारितोषिक देऊन व तुझा सन्मान करून मी तुझ्या ऋणांतून कसा मुक्त होईन. तूं माझ्या राज्यावर इतके उपकार केले आहेस कीं मी तुला आपल्या सर सेनापतीच्या पदावर नेमीत आहें. आणखी आतां मी तुला काय सांगूं, माझ्या मागें माझ्या गादीचा वारस तूच व्हावास अशी माझी इच्छा आहे. एकुलती एक मुलगी आहे. तिचा हात तुझ्या हातांत दिला कीं मी तुझ्यावर राज्याची सर्व जबाबदारी टाकून वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करीन. म्हणून तूं घरीं परत जाण्याचा विचार सोडून दे."

अभिजितला प्रथम तें सर्व खरेंच वाटेना. कोठें तो एक सामान्य सरदार आणि कोठें साक्षात् राजकन्येशीं त्याचा विवाह! एवढेंच नव्हे तर राज्यलक्ष्मी देखील त्याला वरमाला घालणार. राजकन्या रूपानें चंद्रमुखीहून कमी होती असें देखील नाहीं. तिच्याशीं लग्न झालें तरी चंद्रमुखीचाच आपल्या प्रेमावर अधिकार राहणार. राजकन्येशीं विवाह हा फक्त राजाच्या मनाचें समाधान व्हावें म्हणून. तो स्वतःच्या मनाची समजूत घालूं लागला. राज्य मिळालें तर चंद्रमुखीबरोबर जास्तच सुखानें आयुष्य घालवतां येईल. चंद्रमुखीचें प्रेम व राज्यलक्ष्मी या दोन्हींमध्यें त्याच्या मनाची ओढाताण होऊं लागली. म्हणून त्यानें एका ज्योतिष्याकडे जाऊन त्याचें मत विचारण्याचें ठरविलें.

ज्योतिष्यानें त्याचा हात पाहिला त्याची जन्मकुंडली पाहिली आणि म्हणाला—"मर्त्य मनुष्य व जलकन्या यांचा विवाह शास्त्रविरुद्ध आहे. तो मुळीं विवाहच नव्हे. तूं तिला पत्नी समजून राहलास व राजकन्येशीं विवाह न करून धर्माचरण केलें नाहींस तर इहलोक व परलोक दोन्ही हातचे घालवून बसशील. म्हणून तू त्या जलकन्येचा विचारच मनातून काढून टाक आणि राजाच्या इच्छेप्रमाणें राजकन्येशीं विवाह करून मोकळा हो."

अभिजितचा विवाह राजकन्येशीं मोठ्या थाटामाटानें झाला. विवाहोत्तर तो नदीवर स्नानासाठीं गेला असतां पाण्यांत बुडी मारल्याबरोबर तो पाण्यांत बुडाला. बराच वेळ झाला तरी वर न आलेला पाहून राजाच्या शिपायांनीं सर्व नदीचा तळ हुडकून पाहिला. परंतु अभिजितचें प्रेत देखील सांपडलें नाहीं.

इकडे अभिजित ज्यावेळीं पाण्यांत बुडाला त्याच वेळीं तिकडे चंद्रमुखीची किंकाळी अभिजितच्या महालांत गांवकन्यांना ऐकूं आली. नोकर चाकर धांवले. पण चंद्रमुखी



त्यांना कोठेंहि दिसली नाहीं. त्यानंतर अभिजित त्याच वेळीं बुडून मेल्याचें त्यांनीं ऐकलें.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा, मला हें कळत नाहीं का अभिजितनें चंद्रमुखीला दिलेल्या वचनाचें पालन कां केलें नाहीं? तिच्यावरचें प्रेम कमी होऊं लागलें होतें म्हणून कीं राजाचा जांवई होण्याची इच्छा त्याच्या मनांत अधिक प्रबळ होऊं लागली होती म्हणून? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस, तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

"राजकन्येशीं विवाह करण्यांत अभिजितनें कांहीं मोठी चूक केली, असें नाहीं मला वाटत. चंद्रमुखीवरचें प्रेम कमी होऊं लागलें होतें हें देखील बरोबर नाहीं. चंद्रमुखीशीं विवाह झाल्यावर त्याच्या आयुष्यांत कसलाहि उणीव राहणार नाहीं, ही त्याची समजूत चुकीची होती. पुरुषाचें जीवित फक्त स्त्री-प्रेमानें पूर्ण होत नाहीं. पुरुषाला कीर्तीची अभिलाषा असते. अभिजित योद्धा होता. त्याला पराक्रम गाजवून कीर्ति संपादन करायला संधी मिळतांच तो चंद्रमुखीला सोडून जायला तयार झाला. त्या युद्धांत त्यानें जो पराक्रम दाखविला त्याचमुळें त्याला राजाचा जांवई होण्याचा मान मिळाला. तो कीर्तीचा भुकेला होता. ती त्याला मिळाली." राजा म्हणाला.

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व त्या झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# गंधर्व राजकन्या

बसरा नगरींत हसन नांवाचा एक तरुण रहात असे. हसन या शब्दाचा अर्थंच मुळीं सुंदर असा आहे. तें नांव त्याला सार्थक असेंच होतें. तो आईबापाचा एकुलता एक मुलगा होता. दुर्दैवानें त्याचे वडील तो लहान असतांनाच परलोकीं गेले. त्याच्या वडिलांनीं त्याच्यासाठीं अलोट धन व जमीनजुमला ठेवला होता. पण मित्रमंडळींच्या संगतींत चैन करून होतें नव्हतें तें सर्व तो घालवून बसला.

पुढें त्याच्या आईनें तिचे स्वतःचें म्हणून जें स्त्री धन होतें तें विकून मुलाला एक जव्हेऱ्याचें दुकान काढून दिलें. तो दुकानांत बसून जव्हेऱ्याचा धंदा करूं लागला. त्या वाटेनें जाणारे लोक दुकानासमोर क्षणभर उभे राहून त्याचें सौंदर्य डोळे भरून पाहून घेत.

एकदां इराण देशांतला एक म्हातारा हसनचें सौंदर्य पाहून दुकानासमोर उभा राहिला. त्याची लांब पांढरी दाढी व डोक्याला बांधलेलें पागोटें पाहून तो कोणी मोठा विद्वान मौल्वी असावा असें हसनला वाटलें.

दुपारच्या नमाजाची वेळ होती. रस्तेगल्ल्या रिकाम्या झाल्या. म्हाताऱ्यानें दुकानांत येऊन नमस्कार केला. हसननें देखील सलाम करून बसायला सांगितलें.

म्हातारा स्मित करून म्हणाला—"बेटा! मला मूलबाळ नाहीं. तुला पाहून तुला दत्तक घ्यावें अशी इच्छा मनांत उद्भवली. दागिन्यांच्या या दुकानांत बसून आपलें जीवित व्यर्थ घालविण्याची तुला जरूरच नाहीं. मला जी विद्या अवगत आहे ती



मिळविण्यासाठीं कित्येकांनीं आपलें सर्व आयुष्य खर्ची घातलें आहे. पण त्यांना ती मिळाली नाहीं.

हसननें त्या म्हाताऱ्याचे आभार मानले व त्याच्या इच्छेप्रमाणें त्याचा दत्तकपुत्र होण्यास कबूल झाला.

"उद्यां!" असें उत्तर देऊन म्हातारा निघून गेला.

हसन आनंदांत दुकान बंद करून घरीं गेला आणि आईला ती बातमी दिली.

त्याची आई म्हणाली—"बेटा! हे पारशी लोक अग्निपूजक असतात. त्यांना सोनें करण्याची रीत माहीत आहे. पण त्यांची मैत्री करणाऱ्याला मरण निश्चित."

हसन म्हणाला—"आई, आपण तर गरीबच आहों. आमच्या जवळून कोण काय घेणार? तो म्हातारा हुशार व चतुर दिसतो आहे. त्याच्या कृपेनें आपल्याला कांहीं फायदाच होईल असें मला वाटतें."

आतां आई काय बोलणार? हसनला रात्रभर झोंप लागली नाहीं. उजाडतांच तो दुकानांत जाऊन बसला. थोड्या वेळानें तो पारशी म्हातारा आला. म्हणाला—"बेटा! तुझें लग्न झालें का?"

"अजून झालें नाहीं. आई पाठीस लागली आहे, पण मी आजपर्यंत टाळीत आलों." हसन उत्तरला.

"फार छान! आपली विद्या ब्रह्मचारी तरुणालाच द्यावी असें माझ्या मनांत होतें. तुझ्याजवळ तांब्याची तार किंवा एखादा तुकडा आहे का?" म्हाताऱ्यानें विचारलें.

हसननें तांब्याची एक जुनी फुटकी ताटली दाखविली.

"छान मिळाली! ह्या ताटलीचे बारीक तुकडे करून ते भट्टींत वितळवून आण." वृद्ध पारशी म्हणाला. बोलतांना तो आजूबाजूला पहात होता.

हसननें तांबें वितळवल्यावर पारशी "हक! मक! बक! तांब्याचें सोनें होऊं दे!" असें तीनदां म्हणाला. नंतर आपल्या पागोट्यांतून कागदाची एक पुडी काढून त्यांतली शदराच्या रंगाची पूड कीं कसलें तरी चूर्ण तांब्याच्या रसांत टाकलें. तें वितळलेलें तांबें आटूं लागलें आणि पाहतां पाहतां सोनें झालें.

तें पाहून हसन चकित झाला. त्यानें तें सोनें दगडावर घासून पाहिलें, शंभर कशी सोनें होतें.

म्हातारा हसनला म्हणाला—"बाजारांत जाऊन हें सोनें विकून ये. कोणाला सांगूं नकोस कोठून घेऊन आलास तें."

हसननें तें सोनें दोन दिनारांना विकलें. तो पैसे घेऊन आपल्या आईकडे गेला. म्हणाला—"हें सर्व त्या म्हाताऱ्या पारशाच्या कृपेनेंच मिळालें आहे. त्याच्या आईच्या मनांत निरनिराळ्या शंकाकुशंका येऊं लागल्या. पण त्यानें त्या शंकांकडे दुर्लक्ष केलें आणि घरांत तांब्याची जितकी भांडीं होतीं सर्व घेऊन दुकानांत गेला."



म्हातारा दुकानांतच बसलेला होता. हसनला पाहून त्यानें विचारलें—"हीं सर्व भांडीं कशाला घेऊन आला आहेस?"

"ह्या सर्वांचें सोनें करूं या!" हसन म्हणाला.

म्हातारा हंसून म्हणाला—"वेड्या, एका दिवसांत तुझ्याकडे एवढें सोनें झालेलें पाहून लोकांना शंका नाहीं का येणार? आणि मग ही विद्या गुप्त कशी राहणार?"

"तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. पण तुमची ही विद्या लवकर अवगत करून घ्यावी म्हणून मी घाई केली." हसन म्हणाला.











म्हातारा जास्तच मोठ्यानें हंसला व म्हणाला—"ही विद्या भर बाजारांत का कोणी शिकतो ? तुला ही विद्या शिकायचीच असेल तर सर्व सामान घेऊन तूं माझ्या घरीं ये."

हसननें तें कबूल केलें व म्हाताऱ्याबरोबर निघाला. जात असतां वाटेंत त्याला त्याची आई म्हणाली होती तें आठवलें. पारशी अग्निपूजक असतात, म्हणजे नास्तिक असतात. त्याच विचारांत तो एका जागीं थबकला.

"बेटा, तुझ्या मनांत कांहींतरी शंका असावीसें वाटतें मला तुझ्या चेहऱ्यावरून. तुला माझ्या घरीं येऊन ही विद्या शिकायला हरकत असेल तर मी तुझ्या घरीं येऊन तुला ही विद्या शिकवायला तयार आहें." म्हातारा म्हणाला.

हसननें विचार केला, तसें केलें तर आईच्या मनांतली भीति दूर होईल.

म्हातारा हसनबरोबर त्याच्या घरीं गेला. त्याला बऱ्हांड्यांत उभा करून हसन घरांत गेला व आईला म्हणाला—"आई ! तो म्हातारा पारशी आला आहे. तो माझ्याबरोबर जेवेल. आपल्या घरचें मीठ खाल्ल्यावर आपल्या विरुद्ध कांहीं करण्याची हिंमतच त्याला होणार नाहीं."

त्याची सूज्ञ आई म्हणाली—"बेटा ! तूं म्हणतोस तें सर्व खरें आहे. अरे पण या नास्तिकांचा काय विश्वास ? या गोष्टींवर त्यांचा विश्वास असेल तर ना ? तुझ्या बऱ्यासाठीं मी हें सगळें सांगत आहें. तूं म्हणालास तसा मी सैंपाक करून ठेवतें. माझी ना नाहीं. पण तो आंत आल्यावर मात्र मी समोर येणार नाहीं. मी घरांतच राहणार नाहीं. मी शेजारीं जाऊन बसेन." आई म्हणाली.

सांगितल्याप्रमाणें हसनच्या आईनें सर्व सैंपाक केला आणि मेजावर सर्व पदार्थ आणून ठेवून ती शेजारच्या घरीं जाऊन बसली.

नंतर हसन म्हाताऱ्याला आंत बोलावून घेऊन आला. दोघे जेवायला बसले. "आमच्या घरीं जेवलांत म्हणजे तुमचें आमचें जवळचें नातें झालें असें म्हणतां येईल नाहीं ?" हसन म्हणाला.

"होय तर, हें नातें अगदीं प्रेमाचें व पवित्र आहे. तुझ्यावर माझें पितृतुल्य प्रेम नसतें तर तुला ही विद्या शिकविण्याचा विचार तरी माझ्या मनांत आला असता का ? तूंच विचार करून पहा." असें म्हणत म्हाताऱ्यानें पागोट्यांतून कसली तरी पुडी काढली व म्हणाला—"पहा हें चूर्ण ! कित्येक मण सोनें तयार करायला पुरेल सहस्रावधि वनस्पतींचा अर्क काढून मी हें तयार केलें आहें. हें कसें तयार करायचें हें मी तुला शिकवणार आहें." असें सांगून म्हाताऱ्यानें ती पुडी हसनला दिली.

हसन ती पुडी उघडून पहात होता. त्याचा डोळा चुकवून तेवढ्यांत म्हाताऱ्यानें हसनच्या समोरच्या ताटलींत कांहींतरी भूल देण्याचें चूर्ण टाकलें आणि म्हणाला—"ठेव आतां ती पुडी बाजूला. आतां आपण आधीं



जेवूं या." एक घास तोंडांत घातल्याबरोबर हसन बेशुद्ध होऊन पडला.

"आतां तूं माझ्या तावडींतून कोठें पळतोस, पाहतों !" म्हणत म्हातारा उठला. त्यानें हसनला एका दोरीनें बांधून घरांतली एक कपड्यांची पेटी रिकामी केली. त्या पेटींत हसनला घालून घरांत जी चीजवस्तु त्याला उचलण्या जोगी वाटली उचलून पेटींत टाकली आणि पेटी घेऊन निघाला.

एका मजुराला बोलावून त्यानें ती पेटी त्याच्या डोक्यावर ठेवली व सरळ बंदरगावर निघाला. तेथें एक जहाज तयार होतें.




जहाजाच्या कप्तानानें म्हाताऱ्याला पाहाल्या-बरोबर त्याला लवून मुजरा केला. म्हाताऱ्यानें सांगितल्या जागीं पेटी उतरवून ठेवली आणि लगेच नांगर उचलून जहाज सोडलें.

थोड्या वेळानें हसनची आई घरीं परत येऊन पाहाते तों तेथें हसन नव्हता व पेटी पण नव्हती. घरांतल्या कांहीं बहुमूल्य वस्तु पण नाहींशा झालेल्या दिसल्या. तिच्या मनांत धस्स झालें. हसननें अदल्या दिवशीं रात्रीं जें सोनें व पैसे आणले होते तें देखील अदृश्य झाले होतें. पेटींतले कपडे जमिनीवर फेकलेले व दरवाजा उघडा. ती मोठ्यानें रडूं लागली. तिला जी भीति वाटत होती, शेवटीं तेंच झालें.

शेजाऱ्यांनीं येऊन तिला धीर दिला. तिनें आपल्या घराच्या मागल्या बाजूस एक समाधि बनविली. दिवसभर त्या समाधी जवळ बसून बिचारी रडत राही.

हसनला उचलून नेणारा म्हातारा पारशी कोणी तांत्रिक होता. त्याचें नांव बहराम असें होतें. त्यानें तंत्रविद्या शिकण्यासाठीं कित्येक तरुणांचे बळी दिले होते. ह्या खेपेस हसनची पाळी होती.

जहाज समुद्रांत असेपर्यंत तो हसनला शुद्ध येऊं नये म्हणून औषध हुंगायला देत असे. त्यानें त्याला पेटीबाहेर काढलें नाहीं. कांहीं दिवसांनीं जहाज त्याला पाहिजे होतें त्या जागीं लागलें. बहराम पेटी घेऊन समुद्र-किनाऱ्यावर आला. त्यानें हसनला बेशुद्ध स्थितींतच बाहेर काढलें. त्याला बांधलेली दोरी सोडली. नंतर हसनला शुद्ध यावी म्हणून त्यानें एक औषध त्याला हुंगवलें.

हसननें डोळे उघडून पाहिले तेव्हां तो एका निर्जनस्थानीं समुद्रकाठीं आहे हें त्याला कळलें. पण तो अनोळखी प्रदेश त्याला दिसला. कारण त्या देशाच्या वाळूंत काळे, पांढरे, तांबडे व हिरवे दगड त्याला दिसले. तो चकित होऊन इकडे तिकडे पाहूं लागला तेव्हां एका दगडावर म्हातारा पारशी बसलेला त्याला दिसला. आपल्याला फसवून तो येथें घेऊन आला आहे हें ओळखायला त्याला फारसा वेळ लागला नाहीं. त्याला आईनें जें सांगितलें होतें तेंच शेवटीं खरें झालें. तो म्हाताऱ्याजवळ जाऊन म्हणाला—"हें सर्व काय केलें तुम्ही बाबा! तुम्ही तर आमच्या घरचें मीठ देखील खाल्लें आहे!"




म्हातारा जोरानें हंसून म्हणाला—"अग्नि-पूजक बहरामला मीठ-बीठ खाल्ल्याचें काय? आजपर्यंत तुझ्यासारख्या नऊशें नव्याण्णव तरुणांचा मी बळी दिला आहेस. तुला आतां सुटका नाहीं. तूं देखील आपल्या अल्लाला विसरून माझ्यासारखी अग्नीची पूजा करायला शीक."

"नीच, पाजी! जीभ गळून पडेल तुझी!" हसन दरडावून म्हणाला.

बहरामनें लगेच आपला स्वर बदलला व म्हणाला—"परीक्षा घ्यायला हें सर्व मी बोललों होतों. हें सर्व तुला खरें वाटलें वाटतें? तूं या परीक्षेंत उत्तीर्ण झाला आहेस. एकान्त जागीं तुला विद्या शिकवितां यावी म्हणून मी येथें तुला घेऊन आलों होतों. तो समोर डोंगर दिसतो ना तुला. त्याचें शिखर पहा मेघांना म्हणजे ढगांना टेकलें आहे. म्हणून या पर्वताला मेघपर्वत असें नांव आहे. याच पर्वतावर आपणांला हवे असलेले वनस्पती मिळतात. तो डोंगर चढून जावयाचें आहे आपल्याला."

हसनचा संदेह थोडा कमी झाला. तो बहरामला म्हणाला—"तो डोंगर तर भिंती-सारखा उभा दिसतो आहे. त्यावर कसें चढून जायचें?"

“आपण त्या डोंगरावर चढून जाण्याची गरजच काय? आपण पक्षासारखे त्या डोंगरा भोंवती घिरट्या घालूं.” सांगून बहरामनें आपल्या पागोट्यांतून तांब्याची एक ताटली बाहेर काढली. त्या ताटलीवर कोंबडीचें कातडें होतें. कातड्यावर कांहीं तरी लिहिलेलें होतें.

बहरामनें ती ताटली एका बोटानें वाजवली. त्याबरोबर धूळ उडूं लागली व समोर पंख असलेला एक घोडा त्यांना दिसला. त्या घोड्याच्या नाकांतून ज्वाला येत होत्या. बहराम त्या घोड्यावर बसला व त्यानें हात पुढें करून हसनला पण बसायला सांगितलें. लगेच घोडा पंख फडफडवून आकाशांत उडूं लागला. एका क्षणांत तो पर्वताच्या शिखराभोंवती घिरट्या घालूं लागला. शिखरावर उतरतांच घोडा पुन्हां अदृश्य झाला.

हसनला आतां मात्र खरोखर भीति वाटूं लागली. त्यानें चहूंकडे पाहिलें, वनस्पती किंवा हिरवळ त्याला कोठें दिसली नाहीं. बहराम म्हणाला—“आतां देव आला तरी तो तुझें रक्षण करूं शकणार नाहीं!” असें सांगून तो हंसूं लागला.

त्याचें तें राक्षसी हास्य पाहून हसन थोडा भ्याला खरा, पण पुन्हां स्वतःला सावरून म्हणाला—“नीच, दुष्ट माणसा! अल्ला वर आहे! तोच माझें रक्षण करील.” असें म्हणून त्यानें म्हाताऱ्याच्या हातांतली ती जादूची ताटली हिसकावून घेतली व दुसऱ्या हातानें त्याला डोंगरावरून खालीं ढकललें. बहरामचा कडेलोटच झाला. तो खालीं एका खडकावर आदळला आणि या भूमीवरचें त्या राक्षसी तांत्रिकाचें अस्तित्व कायमचें नाहींसें झालें. (पुढें चालू)





# आईचें ऐका

“आजोबा पहा हो, अशोक आईचें मुळींच ऐकत नाही.” मुलांनीं अशोकच्या विरुद्ध तक्रार सांगितली.

“अशोक! होय का रे?” आजोबांनीं त्याला जवळ बोलावून प्रेमानें विचारलें.

“पहा ना आजोबा! मी कांहीं केलें तरी मला आई रागवते. हें करूं नकोस तें करूं नकोस. सारखें तिचें रागावणें चाललें असतें. पाण्यांत खेळूं नकोस. मी मनीची शेपटी पकडली तर पकडून ओढूं नको म्हणते. पेरूच्या झाडावर चढूं नकोस. असें सारखें तिचें चाललें असतें.” अशोकनें आईच्या विरुद्ध तक्रार सांगितली.

“वेड्या, तुझ्या चांगल्यासाठींच तर ती सांगते! उगाच कां सांगेल? तूं आहेस लहान. तुला कळत नाहीं. म्हणून थोर माणसें सांगतील तसें वागावें आणि आईनें सांगितलेलें सर्वांत प्रथम ऐकावें. तुला उंटाच्या पिल्लाची गोष्ट माहीत नाहीं वाटतें?” आजोबांनीं विचारल्याबरोबर सर्व मुलें म्हणालीं—“उंटाच्या पिल्लाची गोष्ट! सांगा आजोबा तीच गोष्ट! तुम्ही कधीं कधीं सांगितली नाहीं!” मुलें म्हणालीं.

आजोबांनीं नाकांत तपकीर कोंबली आणि गोष्ट सांगूं लागले.

पूर्वी कधीं मारवाडांतल्या एका राजानें आपल्या मुलीचें लग्न मेवाडच्या राजकुमाराशीं करून दिलें. हुंडा म्हणून एक हजार उंटच दिले. लग्न होऊन मुलीची पाठवणीची वेळ झाली. ऐन वेळीं एक उंटीण आजारी पडली म्हणून तिच्या ऐवजीं तिचें पिल्लूंच राजानें पाठवायचें ठरविलें.

त्या पिलाला आपल्या आईला सोडून राहण्याची इच्छा नव्हती. ह्या अशोकालाच पहा ना! आईचें ऐकत नाहीं. पण आई नसली तर एक क्षणभर देखील एकटा रहायला तयार नसतो. तें पिल्लूं सुद्धां आपल्या आईकडे पळून आलें.

त्या वेळीं त्याची आई फारच आजारी होती. ती त्याला म्हणाली—"बाळ! आतां मी किती दिवस जगणार? जा तूं आपल्या भावाकडे. नेहमीं त्याच्या बरोबर रहा बरं का? आपल्या भावाला भेटायला जाशील तेव्हां वाळूच्या टेकडीवर किंवा ज्या जागीं कोणी पूर्वी पडाव केला असेल अशा जागीं कधीं विश्रांतीसाठीं थांबूं नकोस. उंटांच्या रांगेंत चालतांना कधीं टोकाला राहून चालूं नकोस, मध्यें रहात जा. नेहमीं आपल्या मोठ्या भावाबरोबर चाल. मी सांगितल्या-सारखा वागलास तर तुला आयुष्यभर कधीं त्रास होणार नाहीं." असें सांगून उंटीणीनें कायमचें डोकें टेकलें.

उंटांचें पिल्लूं कांहीं वेळ रडत राहालें व नंतर उंटांच्या कळपांत आपल्या भावाला भेटून त्याच्या बरोबर राहण्यासाठीं म्हणून निघून गेलें.



वाटेंत संध्याकाळीं काळोख पडला. विश्रांति घ्यायचा विचार करून तें नेमकें वाळूच्या एका टेकडीवर चढून बसून राहालें. त्यानें विचार केला, आईनें सांगितलें आहे खरें, पण पाहूं या तर काय होतें तें! रात्रीं जोराचा वारा सुटला. उंटाच्या पिलाला थंडी वाजूं लागली. तेव्हां त्याला कळलें कीं आईनें उंच जागीं झोपूं नये असें सांगितलें होतें तें कां.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां तें पुढें निघालें. रात्रीं कोठें तरी विश्रांतीसाठीं थांबण्याचें त्यानें ठरविलें. एका जागीं माणसांचीं व उंटांचीं पावलें दिसलीं. तेथें उंटांचा तांडा थांबला असावा असें त्याला वाटलें. असल्या जागीं सुद्धां आईनें झोपूं नकोस असें सांगितलें होतें नाहीं का? पण पाहूं या तर काय होतें तें! असा विचार करून उंटाचें पिल्लूं त्या जागीं पडून राहालें.

ज्या जागीं प्रवासी कांहीं वेळ उतरतात त्या जागीं खाऊन पिऊन उरलेले पदार्थ टाकून जातात. त्याच्या वासानें रानटी जनावरें तेथें येतात. अगदीं तसेंच झालें. रात्रीं लांडग्यांचें ओरडणें ऐकून उंटाच्या पिलाची झोप मोडली व तें घाबरून तेथून



घूम पळत सुटलें. आईनें अशा पडावाच्या जागीं उतरूं नये असें जें सांगितलें होतें तें कां आतां कळलें त्याला. आईच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा त्यानें विचार केला.

दुसऱ्या दिवशीं उंटाचें पिल्लूं त्याचा भाऊ होता त्या कळपांत जाऊन पोंचलें. पण आईच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून तें कळपाच्या अगदीं समोरच्या टोंकाला चालूं लागलें. तें पिल्लूं सावकाश चालूं लागलें कीं मागच्या उंटांना राग येई व ते त्याच्या शेपटीला व पाठीला चावूं लागले. पुढें चालणें बरोबर नाहीं असा विचार करून मग तें सर्वांत मागें चालूं लागलें. उंट हाकणारे मागच्या उंटालाच मारीत. म्हणून त्या पिलाला मार बसूं लागला. मागें चालणें बरोबर नाहीं हें तेव्हां त्याला कळलें व तें पुढें धांवूं लागलें. पण त्याच्या नाका तोंडांत धांवत असतां वाळू जाऊं लागली. 'अगदीं पुढें किंवा अगदीं मागें कां चालूं नये हें आईनें कां सांगितलें होतें तें आतां कळलें.' असा विचार करून तें पिल्लूं कळपाच्या मधोमध त्याचा मोठा भाऊ चालत होता त्याच्याबरोबर चालूं लागलें. तेव्हां मात्र त्याला कांहीं त्रास झाला नाहीं. वेळेवर दाणापाणी मिळे. भावाबरोबर गप्पा मारीत तें आनंदानें चालूं लागलें.

आजोबांनीं येथवर गोष्ट सांगितली व म्हणाले—"म्हणून मी तुम्हांला सांगत होतों कीं थोर मोठे सांगतील तसें, निदान आई सांगेल तसें वागावें. नाहींतर त्या उंटाच्या पिलाची जी गत झाली ती होईल."

सर्व मुलें मोठमोठ्यानें ओरडूं लागलीं—"उंटाचें पिल्लूं !" उंटाचें पिल्लूं !"

अशोक मात्र ओशाळल्या सारखा झाला.





# सतीचें वाण

आटपाट नगर होतें. तेथें एक राजा रहात असे. त्याचें नांव चित्रवर्मा. त्याला आठ मुलें झालीं व शेवटीं एक मुलगी झाली. अर्थातच आई बापाची फार लाडकी होती ती. कधीं तिला ते डोळ्याआड होऊं देत नसत. तिचें नांव त्यांनीं सीमंतिनी ठेवलें.

ज्योतिष्यांनीं मुलीची जन्मकुंडली पाहून सांगितलें कीं मुलीच्या कपाळीं वैधव्य लिहिलें आहे. तें कळल्यापासून चित्रवर्मा फार काळजींत पडला. त्यानें ही गोष्ट तिच्या मनाला दुःखी करणें बरोबर होणार नाहीं, असा विचार करून सांगितली नाहीं व तिच्यासाठीं योग्य वर शोधूं लागला.

परंतु असल्या गोष्टी किती दिवस लपून राहणार ? सीमंतिनीला तिच्या भावी पतीवर येणाऱ्या संकटाची कल्पना आली. तिनें सोमवारचें व्रत सुरू केलें आणि शिव नामाचा जप करूं लागली.

पुढें कांहीं दिवसांनीं तिचें लग्न चित्रांगद नांवाच्या निषध राजकुमाराशीं झालें. हा चित्रांगद नलदमयंतीचा नातू व इंद्रसेनाचा मुलगा होता. विवाहानंतर चित्रवर्मानें आपल्या जांवयाला घरजांवई करून ठेवलें व सर्व प्रकारें त्याची काळजी घेऊं लागला.

एकदां चित्रांगद नावेंत बसून कोठेंतरी जात असतां जोराचें वादळ सुटलें व त्यामुळें नांव पाण्यांत बुडाली. चित्रांगदाला कांहीं नागकन्यांनीं पाहिलें व त्या त्याला घेऊन पाताळ लोकांत गेल्या. नागांचा राजा तक्षक हा चित्रवर्माचा स्नेही व मित्र होता. त्यानें चित्रवर्माचा जांवई म्हणून चित्रांगदाचा सर्व प्रकारें सत्कार केला. चित्रांगद पाण्यांत बुडाल्यानंतर बरेच दिवस परत न आलेला

त्या दिवशीं सीमंतिनीचें व्रत होतें. सीमंतिनीनें वस्त्राभूषणें वांटलीं. अर्थातच सुमेध-सोमवंतांनीं पण वस्त्राभूषणें घेतलीं.

सुमेध सोमवंताला म्हणाला—"कोणाला कळण्यापूर्वी आपण विदर्भ देशांत परत गेलें पाहिजे. पण सोमवंताला पुरुषवेष धारण करणें अशक्य झालें. कारण त्याला स्त्रीत्व मिळालें होतें. सोमवंताची सोमवती झाली होती. सोमवतीनें सुमेधाला पति मानून त्याच्या-बरोबर सुखानें संसार करण्याचें ठरविलें.

आपला एकुलता एक मुलगा सोमवंत सोमवती होऊन स्वदेशीं परत आला हें जेव्हां बापाला कळलें तेव्हां त्याला राग आला व तो विदर्भ देशाच्या राजाला असली थट्टा केल्याबद्दल खूप रागावून म्हणाला— "तुझ्या ह्या थट्टेमुळें माझ्या मुलाला स्त्री रूप मिळालें."

विदर्भ राजाला आश्चर्य तर वाटलेंच, वाईट देखील वाटलें. त्यानें पार्वती परमेश्वरांचें ध्यान करून त्यांची आराधना केली. तेव्हां पार्वतीनें प्रकट होऊन त्याला विचारलें—"तूं आमची कां आठवण केलीस!"

राजा म्हणाला—"देवी, सोमवतीचा पुन्हां सोमवंत होईल असें कांहीं तरी कर."

देवी म्हणाली—"तें आतां अशक्य आहे. सीमंतिनीनें ज्याला स्त्रीवस्त्र दान केलीं तो स्त्री झाला. त्याला आतां मी काय करूं. तिच्यासमोर जें जोडप्यानें जातात त्यांचें प्रेम अखंड राहातें!" असें सांगून देवी अंतर्धान पावली.

आई बाप काय करणार? त्यांनीं दोघांचा संसार सुखाचा होवो, असा आशीर्वाद दिला.



# खरा चोर

एकदां एका जहाजांत चोरी झाली. खरा चोर कोण हें कळेना. ज्या ज्या खलाश्यावर संशय होता त्यांना अकबर बादशहाकडे पाठवलें. अकबरानें बिरबलाला खरा चोर कोण हें ओळखायला सांगितलें.

बिरबल चोरांना म्हणाला—"कोणी चोरी केली आहे हें मी उद्यां सांगेन. जो चोर असेल तो स्वतःच येऊन आपला अपराध कबूल करील. सर्वांनीं ठरल्या वेळीं हजर झालें पाहिजे."

चोर घरीं गेले व बिरबलानें सांगितल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं दरबारांत हजर झाले. बिरबल त्यांना म्हणाला—"बरें तर काढा आपापला सदरा आणि अल्लाचें नांव घेऊन हात पुढें करा." चौघा चोरांनीं त्याप्रमाणें केलें. नंतर बिरबल प्रत्येकाच्या हातावर एक गोळी देत म्हणाला—"आतां ही गोळी खा. जो चोर असेल तो गोळी खाल्ल्याबरोबर मरून पडेल." चोराचा चेहरा कावराबावरा झाला. त्यानें आपली चोरी कबूल केली.



त्या दिवशीं सीमंतिनीचें व्रत होतें. सीमंतिनीनें वस्त्राभूषणें वांटलीं. अर्थातच सुमेध-सोमवंतांनीं पण वस्त्राभूषणें घेतलीं.

सुमेध सोमवंताला म्हणाला—"कोणाला कळण्यापूर्वी आपण विदर्भ देशांत परत गेलें पाहिजे. पण सोमवंताला पुरुषवेष धारण करणें अशक्य झालें. कारण त्याला स्त्रीत्व मिळालें होतें. सोमवंताची सोमवती झाली होती. सोमवतीनें सुमेधाला पति मानून त्याच्या-बरोबर सुखानें संसार करण्याचें ठरविलें.

आपला एकुलता एक मुलगा सोमवंत सोमवती होऊन स्वदेशीं परत आला हें जेव्हां बापाला कळलें तेव्हां त्याला राग आला व तो विदर्भ देशाच्या राजाला असली थट्टा केल्याबद्दल खूप रागावून म्हणाला—"तुझ्या ह्या थट्टेमुळें माझ्या मुलाला स्त्री रूप मिळालें."

विदर्भ राजाला आश्चर्य तर वाटलेंच, वाईट देखील वाटलें. त्यानें पार्वती परमेश्वरांचें ध्यान करून त्यांची आराधना केली. तेव्हां पार्वतीनें प्रकट होऊन त्याला विचारलें—"तूं आमची कां आठवण केलीस?"

राजा म्हणाला—"देवी, सोमवतीचा पुन्हां सोमवंत होईल असें कांहीं तरी कर."

देवी म्हणाली—"तें आतां अशक्य आहे. सीमंतिनीनें ज्याला स्त्रीत्व दान केलें तो स्त्री झाला. त्याला आतां मी काय करूं. तिच्यासमोर जें जोडप्यानें जातात त्यांचें प्रेम अखंड राहातें!" असें सांगून देवी अंतर्धान पावली.

आई बाप काय करणार? त्यांनीं दोघांचा संसार सुखाचा होवो, असा आशीर्वाद दिला.



## खरा चोर

एकदां एका जहाजांत चोरी झाली. खरा चोर कोण हें कळेना. ज्या ज्या खलाश्यावर संशय होता त्यांना अकबर बादशहाकडे पाठवलें. अकबरानें बिरबलाला खरा चोर कोण हें ओळखायला सांगितलें.

बिरबल चोरांना म्हणाला—"कोणी चोरी केली आहे हें मी उद्यां सांगेन. जो चोर असेल तो स्वतःच येऊन आपला अपराध कबूल करील. सर्वांनीं ठरल्या वेळीं हजर झालें पाहिजे."

चोर घरीं गेले व बिरबलानें सांगितल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं दरबारांत हजर झाले. बिरबल त्यांना म्हणाला—"बरें तर काढा आपापला सदरा आणि अल्लाचें नांव घेऊन हात पुढें करा." चौघा चोरांनीं त्याप्रमाणें केलें. नंतर बिरबल प्रत्येकाच्या हातावर एक गोळी देत म्हणाला—"आतां ही गोळी खा. जो चोर असेल तो गोळी खाल्ल्याबरोबर मरून पडेल." चोराचा चेहरा कावराबावरा झाला. त्यानें आपली चोरी कबूल केली.





# भीमूचे पराक्रम

भीमूला शिकविण्याचा त्याच्या बायकोनें पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तिला थोडें देखील यश आलें नाहीं. तेव्हां तिनें नवऱ्याच्या मनांत देवभक्ति उत्पन्न करून देवाची पूजा नित्यनियमितपणें करण्यास सांगितलें. कदाचित देव प्रसन्न होईल व थोडी बुद्धि देईल असें तिला वाटलें. बायकोच्या सांगण्याप्रमाणें भीमू रोज गांवाबाहेरच्या देवळांत जाऊन पूजा करूं लागला.

त्याच गांवीं एक गोसावी येऊन राहूं लागला होता. तो देवळाच्या वाटेवर एका तळ्याच्या काठीं झाडाखालीं बकध्यान धरून बसत असे. त्या गोसाव्यानें भीमूच्या बौद्धिक पराक्रमाच्या गोष्टी ऐकल्या होत्या. एके दिवशीं भीमू देवळांत जात असतां त्या गोसाव्यानें त्याला हाक मारली—"बेटा भीमू ! इकडे ये जरा !"

गोसाव्याचा साधुवेष पाहून व त्यानें नांवानें हाक मारलेली पाहून त्याला दिव्य दृष्टि असावी असें भीमूला वाटलें. त्यानें जवळ जाऊन त्या गोसाव्याला साष्टांग नमस्कार केला आणि हात जोडून उभा राहला.

"बेटा ! तूं रोज देवदर्शनाला जातोस. अशी देवभक्ति या कलियुगांत कोठून येणार ? तुला देवानें सद्बुद्धि दिली म्हणून त्याच्यावर तुझें मन रमलें आहे. पण हें पहा देवळांत देवाचें दर्शन कोठून होणार तुला ? देवळांत तर देवाची मूर्त असते, देव नसतो. पण तुला प्रत्यक्ष देवाचें दर्शन घडावें म्हणून तुला मी बोलावलें. तुला देव दर्शन हवें आहे, होय ना ?" गोसाव्यानें विचारलें.

"होय, बुवा ! त्या देवाचें दर्शन कसें घडतें, देव कोठें आहे ?" भीमूनें गोसाव्याला विचारलें.

"देव माझ्या म्हणण्याप्रमाणें वागतो. मी सांगेन त्याला दर्शन देतो. मी सांगेन तसें तूं केलेंस तर देव तुला दर्शन तर देईलच, तूं मागशील तें देखील देईल." गोसावी म्हणाला.

"आपण म्हणाल तें करायला मी तयार आहें." भीमू म्हणाला.

"बरें तर, तूं या तलावांत एक मिनिट भर बुडी मारून बस, देवाचें दर्शन घडेल. अंगांतला सदरा, गळ्यांतला कंठा व बोटांतली अंगठी मात्र काठावर काढून ठेव." गोसावी म्हणाला.

भीमूनें डोळे मिटून त्या कपटी गोसाव्यानें जसें सांगितलें तसें केलें व जें व्हायचें तेंच झालें. गोसावी भीमूचा सदरा, कंठा व अंगठी घेऊन पळून गेला.

इतक्यांत भीमूच्या डोक्यांत एक गोष्ट आली. आपल्याला देवाचें दर्शन झालें तरी तें बायकोला होणार नाहीं. एकट्यानें देवाचें दर्शन घडलें तर पाप लागेल. असा विचार करून त्यानें डोकें बाहेर काढलें. त्याला



गोसावी पळतांना दिसला. भीमूनें जोर जोरानें हाक मारायला सुरवात केली—"बुवा ! अहो बुवा ! थांबा ! तुम्हांला एक गोष्ट विचारावयाची आहे !" म्हणत भीमू गोसाव्याच्या पाठी मागून धांवूं लागला. भीमूचा आवाज ऐकून गोसावी जास्तच जोरानें पळूं लागला.

भीमू पळण्यांत कमी नव्हता. त्यानें जाऊन गोसाव्याला गांठलेंच. म्हणाला—"तुम्ही देवाला बोलवायला निघालांत वाटतें ? तशी घाई नाहीं !

गोसाव्याची घाबरगुंडी उडून गेली होती. त्यानें भीमूचा सदरा, कंठा व अंगठी भीमूच्या तोंडावर टाकली व आपली सुटका करून घेऊन पुन्हां पळूं लागला.

भीमू ओरडून विचारूं लागला—"अहो बुवा ! पुरें ऐकून घ्या ! पुरें ऐकून घेतल्या-शिवाय असे पळतां काय ? माझ्यावर इतके कां रागावलात ?" म्हणत भीमू पुन्हां गोसाव्याच्या मागून धांवूं लागला.

आरडाओरड ऐकून जवळ पासचे लोक धांवत आले व त्यांनीं त्या गोसाव्याला धरलें. तोंपर्यंत भीमराव देखील येऊन पोंचले होते. एकानें गोसाव्याची नकली दाढी उपटली. तेव्हां तो गोसावी नसून चोर आहे हें सर्वांना कळलें. त्यांनीं त्याला पोलीस ठाण्यावर नेलें. तेथें पोलिसांनीं सांगितलें कीं तो एक अट्टल चोर आहे व कित्येकदां तुरुंगांत जाऊन आला आहे. त्याचें नांव ऐकूनच त्या पंचक्रोशींतले लोक भीत असत. असल्या चोराला भीमूनें धरून दिल्याबद्दल पोलीस इन्स्पेक्टरानें भीमूची पाठ थोपटली व गांवकऱ्यांनीं भीमरावांची खूप स्तुति केली.





# नाग मुकुट

स्विट्‌झरलंड देशांत एक राजा होता. त्याला एक मुलगी होती. एकहि मुलगा नव्हता. राजा व राणी दोघांनीं पुष्कळ नवस केले. पण त्यांना मुलगा झाला नाहीं. म्हणून दोघं मुलीलाच मुलगा मानून तिचें कोडकौतुक करूं लागले.

एकदां बापलेक कोठेंतरी हिंडायला निघालीं. त्यांना रानांत एका जागीं एक म्हातारी बाई सांपाशीं बोलत खेळत असलेली दिसली. ती गारुडीण असावी असें वाटलें त्यांना. राजकुमारीनें तिला विचारलें—"हीं असलीं कामें करून लोकांना फंसवणें हाच धंदा करतेस वाटतें तूं !" म्हातारीला राग आला. तिनें आपली जादूची कांडी तिच्या अंगाला लावली. राजकुमारी पाहतां पाहतां सांप झाली व बापाच्या अंगाला बिलगून राहाली. बापाचें हृदय कळवळून आलें. ती म्हातारी म्हणाली—"बापाजवळ आतां कशाला जातेस ? तुला आतां सांपासारखेंच जीवित घालवावें लागेल." असें सांगून तिनें तिच्या डोक्याला जादूची कांडी लावली. राजकन्या नागकन्या झाली व हताश होऊन वारूळांत शिरली.

राजा इतका वेळ भयचकित होऊन सर्व पहात होता. मुलीचा विरह त्याला असह्य झाला. रागाच्या भरांत तलवार उपसून तो म्हातारीला मारायला धांवला. तेव्हां म्हातारी म्हणाली—"खबरदार ! तूं एक पाऊल देखील पुढें टाकलेंस तर तुला देखील सांप करून नागलोकांत पाठवीन."

राजा म्हातारीसमोर हात जोडून विनवणी करूं लागला कीं माझ्या मुलीचे अपराध



पोटांत गिळून तिला माफ कर! म्हातारी म्हणाली—"मंत्र टाकण्याची शक्ति माझ्या अंगांत आहे. तो परत घेण्याची नाहीं. तुझ्या मुलीला कोणत्याहि प्रकारें कष्ट होणार नाहीं. ती नागलोकाची राणी म्हणून राहील. तिच्यासाठीं एक लहानसा मुकुट करून तूं माझ्याकडे आणून दे. तीन दिवसांनीं तूं याच जागीं ये. तो मुकुट ज्या दिवशीं सहजीं वितळून अगर फुटून चुरा होऊन जाईल त्या दिवशीं तुझ्या मुलीला पुन्हां मनुष्यरूप मिळेल." राजानें घरीं जाऊन तसा एक मुकुट करवून म्हातारीला आणून दिला. तो राजकन्येकडे नागलोकांत पोंचता झाला. पाठवतांना त्या म्हातारीनें तो मंत्रवून पाठविला होता. तो मुकुट ज्या वस्तूंत असे ती वस्तु कधीं संपत नसे. धान्याच्या कोठारांत ठेवला कीं किती धान्य काढलें तरी तें पुन्हां भरून येई. खजिन्यांत ठेवला कीं खजिन्यांतून किती सोनें काढलें तरी तो पुन्हां भरून येई. हळू हळू त्या मुकुटाचें विशेष लोकांना कळलें व तो चोरून न्यायचा कित्येकांनीं प्रयत्न केला.

"एकदां एका सरोवराच्या काठीं एक तरुण हिंडत असतां त्याला काठावर एक लहानसा सुंदर मुकुट दिसला. त्या वेळीं एक सांप पाण्यांत पोहोत असलेला त्यानें पाहाला. कदाचित तो त्या सांपाचा असावा असा विचार करून त्यानें तो उचलला व धूम पळाला. पण त्याचा पाठलाग करीत तो मोठा सांप आपलें एक मोठें सैन्य घेऊन आला. स्वतःचा बचाव करण्यासाठीं तो तरुण एका झाडावर चढला.

इतक्यांत एक स्त्री त्या बाजूला आली. ती स्त्री म्हणाली—"मला सांपांचा मंत्र माहीत आहे. तूं तो मुकुट टाक खालीं माझ्याकडे. मी संभाळून ठेवतें."



पण तो तरुण म्हणाला—"तूं पहिल्यानें त्या सांपांना पळवून दाखव. तुझा काय विश्वास?" त्या गारुडिणीनें मंत्र म्हटला, त्याबरोबर सांप खरोखरच दूर पळून गेले. तेव्हां तो तरुण झाडावरून खालीं उतरला. म्हणाला—"माझ्यावर माझ्या आई वडिलांचा व त्यांच्या मोठ्या कुटुंबाचा भार आहे. पाहिजे तर तूं देखील आमच्या घरीं येऊन रहा. तुझ्या जेवणाखाण्याची जबाबदारी माझ्यावर." ती स्त्री मुलाकडला तो मुकुट चोरून न्यायचें मनाशीं ठरवून त्याच्याबरोबर त्याच्या घरीं रहावला तयार झाली.

त्या तरुण माणसानें तो मुकुट कांहीं दिवस फार जपून बाळगला. तो मुकुट जोपर्यंत त्याच्या जवळ होता तोंपर्यंत त्याला कोणत्याहि गोष्टीची कमतरता भासली नाहीं. त्या गारुडीणीला तो मुकुट कोठें आहे, एकदां कळलें व ती तो चोरून पळून गेली. त्या तरुण माणसानें पुष्कळ शोध केला पण त्या गारुडिणीचा पत्ता लागला नाहीं.

त्या गारुडिणीचें भाग्य पालटलें. तिनें तो मुकुट गव्हाच्या डब्यांत ठेवला होता. त्यांतले गहूं कधीं संपतच नसत. ती गहूं



विकून स्वतःचा उदर निर्वाह करूं लागली व खूप श्रीमंत झाली. पण एकदां चुकून तिनें गहूं दळायला पाठविले तेव्हां त्याबरोबर तो मुकुट पण पाठवून दिला.

गिरणीच्या मालकानें गहूं ओतले व गिरणी सुरू केली. पण तासभर झाला व पिठाची पोत्यामागून पोतीं भरत गेलीं तरी गहूं संपेनात. त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें गव्हांत हात घालून पाहिलें तेव्हां त्याला तो मुकुट सांपडला. त्यानें तो पैशाच्या पेटींत ठेवला. तेव्हांपासून त्याची पैशाची पेटी सदा भरलेली असायची. दुसऱ्या दिवशीं त्या गारुडिणीनें येऊन गिरणीवाल्याशीं भांडण केलें गिरणीचा मालक म्हणाला—"गव्हाबरोबर दळून निघाला असेल." तेव्हां निराश होऊन बिचारी निघून गेली. एकदां गिरणीच्या मालकानें विचार केला कीं त्या बाईच्या गव्हाबरोबर तो मुकुट ठेवून दळल्यानें कित्येक पोतीं पीठ निघालें. आपण तसें देखील पैसे मिळवावे. त्यानें गव्हाबरोबर तो मुकुट गिरणींत टाकला व गिरणी सुरू केली. पण त्याच्या दुर्दैवानें नेमका त्याच दिवशीं तो मुकुट गव्हाबरोबर दळला गेला.

नागमुकुटाचा चुरा झाल्याबरोबर नाग-कन्येला राजकन्येचें रूप मिळालें. तिनें पुष्कळ वैभव भोगलें होतें. पण तें सर्व तिला आपल्या म्हाताऱ्या बापाच्या प्रेमासमोर फिकें वाटत असे. म्हणून ती धांवत आपल्या बापाकडे गेली. मुलगी परत येऊन भेटल्याचा बापाला फार आनंद झाला.

पुढें कांहीं दिवसांनीं योग्य वर पाहून बापानें तिचें लग्न करून दिलें व आपल्या जांवयाला आपलें राज्य देऊन टाकलें.





# अरण्यकांड

नंतर रावण अंतःपुरांतून बाहेर आला. कांहीं निवडक विश्वासपात्र राक्षसांना बोलावून म्हणाला—"तुम्ही जनस्थानांत जाऊन रहा. खर व दूषण यांचा रामानें वध केला आहे. त्या रामाशीं आतां माझें कायमचें वैर झालें आहे. तुम्ही त्याच्यावर सारखी पाळत ठेवा. गुप्तपणें येऊन तो काय काय करतो सर्व बातमी मला देत जा. संधी साधून त्याचा वध करतां आला तर पहा. मी तुम्हांला भरपूर बक्षिस देईन. तुमच्या कर्तबगारीवर माझा पूर्ण विश्वास आहे. म्हणून मी तुमची निवड करून या कामावर तुम्हांला पाठवीत आहें."

राक्षस जनस्थानांत निघून गेल्यावर रावणाचें लक्ष सीतेकडे गेलें. तो अंतःपुरांत परत गेला. तेथें सीता उदास मनानें बसलेली होती.

सीतेच्या इच्छेविरुद्ध रावणानें आपलें वैभव दाखविण्याच्या हेतूनें आपला राजवाडा तिला दाखविला. तो राजवाडा म्हणजे वैभवाचें माहेरघरच होतें. पाहाणाराचे डोळे दिपून जायचे. पण सीतेचें लक्ष त्या महालाकडे नव्हतें. तिच्या मनासमोर रामचंद्राची मूर्ती सतत उभी होती. तिला दुसरें काय दिसणार ?

जागोजागीं सुंदर चित्र विचित्र रंगाचे पक्षी, मोती, रत्न व जवाहिरें जडलेले खांब,



चंदनाचे दरवाजे व खिडक्या सोन्याच्या भिंती, चांदीची जमीन, हस्तीदंती जिना सर्व दाखवीत रावण सीतेला वरच्या मजल्या-वर घेऊन आला व म्हणाला—" तूं मला प्राणाहून प्रिय आहेस. तूं माझ्याशीं लग्न केलेंस तर मी तुला आपली पट्टराणी करून घेईन व मंदोदरी वगैरे राण्या बटकी होऊन तुझी सेवा करतील. ह्या माझ्या लंकेंत इंद्र व त्याची प्रजा देव यांना प्रवेश नाहींच, प्रत्यक्ष ब्रह्मदेव, विष्णु व महेश यांनादेखील माझ्या परवानगी शिवाय लंकेंत पाऊल टाकायला मज्जाव आहे. मग तुला सोड-विण्यासाठीं कोण येणार? मी स्वतः तुझा एक दास म्हणून तुझी सेवा करायला तयार आहें. तूं पूर्वजन्मीं कांहीं तरी पाप केलें होतेंस म्हणून तुला या जन्मीं वनवास मिळाला. पण आतां तूं या लंकेची राणी म्हणून राज्य कर. पुष्पक विमानांत बसून आपण तूं सांगशील तिकडे विहार करूं.

पण रावणाच्या या विनवण्या फुकट गेल्या. सीता जमिनीकडे पहात रावणाला उद्देश्यून म्हणाली—" राक्षसा! तुला आमच्या मानव जातींतली पतिभक्ति काय कळणार? मी एकदां ज्याला वरमाला घातली त्याला सोडून परपुरुषाचा विचार देखील माझ्या मनांत कसा येईल? तुझी शंभर वर्षे मात्र भरत आलीं आहेत. तूं मला बांधून ठेव अगर माझ्या अंगाचे तुकडे तुकडे करून कोल्ह्यां कुत्र्यांसमोर टाक या जन्मीं व पुढील जन्मीं माझ्या हृदयांत श्री रामचंद्राच्या मूर्तीचाच सतत वास राहील."

रावणाला राग आला. म्हणाला—" मी तुला एका वर्षाचा अवधि देतों. या अवधींत जर का तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें माझी राणी व्हायला तयार झाली नाहींस तर हाल हाल करून तुझा जीव घेईन."

नंतर त्यानें कांहीं राक्षस स्त्रियांना बोलविलें आणि म्हणाला—" हिला अशोक वाटिकेंत घेऊन जा. तुम्ही हिच्यावर कडक नजर ठेवा. हिला माझ्या पराक्रमाची माहिती सांगून हिचें मन वळवून पहा!"

अशोक वाटिका म्हणजे इंद्राचें नंदनवनच होतें. तेथें वृक्ष वनस्पतींना नेहमीं कोवळी पालवी असे. त्या वनांत सहा ऋतूंत वसंत ऋतूचाच वास असे. राक्षस स्त्रियांनीं सीतेला एका अशोक वृक्षाखालीं पोंचतें केलें व तिच्या चारी बाजूला पाहारा देण्यासाठीं बसून राहाल्या. सीता रामाची आठवण काढून सारखी टिपें गाळीत होती.

तिकडे राम हरणाला ठार करून त्याला आपल्या खांद्यावर उचलून घेऊन आश्रमाकडे परत येत होता. त्या वेळीं कोल्हा ओरडला. तो अपशकून समजून रामाचें मन फार चिंतित झालें. सीतेला कोणी राक्षस उचलून घेऊन गेला कीं काय? निरनिराळ्या प्रकारच्या शंकाकुशंका त्याच्या मनांत येऊं लागल्या. हा सुवर्ण मृग आला काय, त्याच्या मागें आपण धांवलों काय, मरतांना तो माझ्या आवाजांत ओरडला काय, हा सर्व राक्षसांचा कट दिसतो



आहे! पण लक्ष्मण असेपर्यंत सीतेजवळ येण्याची कोणाची छाती नाहीं. तितक्यांत लक्ष्मणाला समोर धांवत येत असलेला पाहून मनांत आलेली शंका पक्की झाली.

रामानें लक्ष्मणाचा हात धरून त्याला विचारलें—" तूं इकडे कशाला धांवत आलास लक्ष्मणा? सीतेला आश्रमांत एकटीला सोडून येण्याचा हा अविचार तूं कां केलास? सीता आतां आश्रमांत भेटते कीं नाहीं मला शंका आहे. सीता आश्रमांत भेटली नाहीं तर मी तरी जगून काय करणार? कैकेयीला ही बातमी कळली तर तिच्या मनाचें खात्रीनें

समाधान होईल. त्या राक्षसाचा आवाज ऐकून तुझ्यासारख्या शूरवीरानें घाबरून जावें याचें मला आश्चर्य वाटतें! मी खर व दूषण व त्यांच्या सहस्रावधि अनुयायांचा संहार केला म्हणून रागानें त्यांनी सुडाच्या भावनेनें हें सर्व केलें आहे. सीतेला त्यांनीं मारून टाकलें असावें अशी मला शंका येत आहे. काय करावें कांहीं सुचत नाहीं."

सीतेनें जीं दुर्वचनें सांगितली होतीं ती सर्व सांगून लक्ष्मण म्हणाला—"मी अगदीं असह्य झाल्यानें निघून आलों. नाहीं तर मी असा अविवेक करीन असें वाटतें का तुला?"

"सीता रागानें कांहीं तरी म्हणाली म्हणून तूं माझ्या आज्ञेचें उल्लंघन करणें बरोबर होईल का? माझ्यावर संकट येणें शक्य नाहीं हें माहीत असून सुद्धां तूं आलास हें अगदीं चुकलें तुझें." राम म्हणाला.

रामाला भय वाटत होतें तसेंच झालें. सीता पर्णशाळेंत नव्हती. ती ज्या बाजूला नेहमीं फिरायला जात असे तिकडे सुद्धां नव्हती. आश्रम भयाण वाटत होता. दोघे मटकन खालीं बसले.

पण कांहीं वेळानें दोघे सीतेच्या शोधार्थ "हा सीते! हा सीते!" असा आक्रोश



करीत हिंडूं लागले. राम वृक्ष-लता, पशु पक्षी सर्वांना विचारूं लागला. सीतेला कोणी पाहिलेंत का!" दोघे विक्षिप्तासारखे रानांत फिरूं लागले. त्यांना श्रम होई. दूर हताश मनानें पुन्हां "सीते! सीते!" म्हणून हांक मारीत दोघे तिकडे धांवत!"

एक दोनदां त्यांना असें वाटलें की सीता कोठें तरी लपून बसली आहे व ते म्हणत—"आतां आम्ही फार दमलों आहों. पुढें ये."

लक्ष्मण रामाची ती स्थिति पाहून म्हणाला—"दादा! येथें रडत बसून काय फायदा? चल सर्व जंगल हुडकून काढूं या. जाऊन किती दूर जाणार?" दोघांनीं तो प्रयत्न पण करून पाहिला.

पण राम सीतेच्या विरहामुळे इतका दुःखी झाला होता कीं बेशुद्ध होऊन जमिनी-वर पडला. लक्ष्मणानें पाणी शिंपडून व इतर उपाय करून त्याला शुद्धीवर आणलें व धीर दिला. पण रामाच्या मनाचें कसें समाधान होणार? आतां तर लक्ष्मण जें बोले वा सांगे तें दुःखावेगामुळें रामाला ऐकूं येईनासें झालें. तो लक्ष्मणाला म्हणाला—"जग मला मूर्ख व भितरा म्हणेल. सीतेशिवाय आतां मी कोणत्या तोंडानें अयोध्येला परत जाऊं?





सीतेशिवाय अयोध्येचा राजवाडा मला भयाण भुताच्या घरासारखा वाटेल. मी परत आल्याचें ऐकून आपल्या लाडक्या मुलीला भेटण्यासाठीं जनक राजा धांवत येईल. त्याला मी काय उत्तर देणार! सीतेशिवाय हें जीवित व्यर्थ भार आहे. तूं मला येथें सोड व अयोध्येला एकटाच जा. भरतालाच राज्य करायला सांग. सीता गेली व तिच्या बरोबर मी देखील गेलों असें सांग त्याला!"

रामाचा तो करुणाजनक शोक ऐकून लक्ष्मणाला किती दुःख झालें असेल याची कल्पना देखील करवत नाहीं. शेवटीं लक्ष्मणानें रामाला थोडा धीर दिल्यावर दोघांनीं पुन्हां सीतेचा शोध सुरू केला. एका जागीं कांहीं फुलें पडलेलीं रामाला दिसलीं. रामानें तीं सीतेच्या वेणींतलीच पडलेलीं फुलें आहेत हें ओळखलें. पुढें राक्षसाच्या व सीतेच्या पावलांच्या खुणा स्पष्ट दिसल्या. तेथेंच नंतर मोडलेला रथ, मृत सारथी व घोडे रामाला दिसले. तेथेंच एका जागीं रक्त सांडलेलें दिसलें. तें सीतेचेंच कीं काय अशी एक शंका रामाच्या मनांत येऊन गेली.

तोंपर्यंत रामाच्या मनांत राक्षस जातीवर राग नव्हता. पण सीतेचें रक्त सांडलें आहे असें त्याच्या मनाला वाटल्यापासून मात्र राक्षसांची जात निर्वंश करून टाकण्याचा रामानें निर्धार केला. "सीतेला निमूटपणें परत पोंचती केली नाहीं तर त्रिलोकाचा ध्वंस करीन!" रामानें घोष केला.

लक्ष्मण म्हणाला—"दादा! येथें तर एकाच राक्षसाची पावलें उमटलेलीं दिसत आहेत. यासाठीं त्रिलोक नष्ट करण्याची प्रतिज्ञा करण्याची काय गरज? ज्या राक्षसानें सीतेचें अपहरण केलें आहे. त्यालाच आपण शोधून काढूं या!"

इतक्यांत त्यांना दूर कोणी कण्हत असल्याचा आवाज ऐकूं आला. अर्धमृता-

वस्थेंत पडलेला तो जटायु होता. "हाच सीतेला खाऊन आतां लोळत पडला आहे!" असें म्हणत रामानें धनुष्यावर तीर चढविला.

"मला रावणानें अर्धमृत करून सोडलें आहे, आतां आणखी तूं काय ठार करणार? तो सीतेला घेऊन जात होता. मी त्याला अडवलें व त्यानें माझी ही दशा केली आहे. मी त्याचा रथ मोडला, सारथ्याला व ठार केलें घोड्यांना ठार केलें. पण त्या दुष्टानें तलवारीनें माझे पंखच कापून टाक-ल्यावर मी काय करणार? तो सीतेला घेऊन आकाश मार्गानें पळून गेला आहे."

तें ऐकून रामाला राक्षसांचा राग तर आला पण त्याबरोबर सीता अजून जिवंत आहे हें ऐकून त्याचें मन क्षणभर शांत झालें. सीतेला उचलून घेऊन जाणारा राक्षस कोण, हें देखील कळलें होतें. राम आपल्या उपकारकर्त्या जटायूला पोटाशीं धरून रडूं लागला. "मी विनाकारण तुझ्यावर संशय केला. क्षमाकर. मी त्या रावणाचें काय नुकसान केलें. सीतेचें अपहरण करण्यांत त्याचा काय हेतु?"

जटायूला दम लागला होता व प्राण कंठापर्यंत आले होते. तरी स्वतःला सावरून म्हणाला—"रावण दक्षिणेकडे गेला आहे. तो कुबेराचा भाऊ आहे!" एवढें बोलत असतांच त्यानें डोळे फिरविले. रामाच्या कृपेनें तो कित्येक दिवस निश्चिंतपणें रहात होता. शेवटीं तो रामाच्या सेवेखातर प्राण-त्याग करून वैकुंठलोकीं गेला.

रामानें शास्त्रोक्त पद्धतीनें जटायूची अंत्येष्टी करून पिंडदान केलें. नंतर तर्पण आदि केलें व जटायूनें सांगितल्याप्रमाणें सीतेच्या शोधार्थ दक्षिणेकडे निघाला.





# पेट्रा शिलानगर

आजकालच्या जॉर्डन देशांत "डेड सी" (मृत समुद्र) नांवाच्या समुद्राच्या दक्षिणेस एक अति प्राचीन असें एक शिलानगर आहे. दोन हजार वर्षांपूर्वी या नगरावर नबातियनांचें राज्य होतें. इ. स. १०५ मध्यें ट्रोजन नांवाच्या रोमन चक्रवर्तीनें नबातियनांचा पराभव करून हें नगर आपल्या साम्राज्यांत सामील केलें.

कित्येक शतकें या नगराविषयीं माहिती कोणालाहि नव्हती. गेल्या शतकांतच या नगराची माहिती लागली. हें नगर सर्वच्या सर्व डोंगरांत कोरीव लेण्यासारखें आहे. त्यांत राजवाडा, कोठारें, समाधी, देवळें, सामान्य प्रजेसाठीं घरें, सर्व गुहेच्या रूपांतच आहे. या नगरांत ज्या जागीं पूर्वी कधीं व्यापाराची मोठी पेठ होती त्या जागीं बिदावन जातीचे लोक राहतात. या प्राचीन नगराची माहिती न कळण्याचें कारण म्हणचे या नगराभोंवतीं डोंगराळ प्रदेश आहे. फक्त एका चिंचोळ्या दरींतून या नगरांत प्रवेश करतां येतो. ही दरी सुमारें एक मैल लांब आहे व तिच्या दोन्हीं बाजूला उंच पर्वत आहेत.






[ १३ ]

[ चोरवाटेनें चंडमंडूक पळून जाऊन पलीकडे ब्रह्मदंडी मांत्रिकाला भेटला. तेथें त्यांनीं लखू व जयमल यांची वाट पाहिली. परंतु शेवटीं ते भुयाराच्या विहिरीवजा द्वारांतून बाहेर आले तेव्हां मंडूक व ब्रह्मदंडी दोघांना झाडींतून जयघोष ऐकूं आला. तो जयघोष मौनानंद स्वामींचा होता. तो ऐकून ते पळाले. पुढें वाचा. ]

लखू, जयमल व तो रानटी तरुण बाहेर आल्याबरोबर चंडमंडूक व ब्रह्मदंड्याला ळत असलेले पाहून आश्चर्यें चकित झाले. ांच्याबरोबर कांहीं नरभक्षक रानटी जातीचे क देखील पळत असलेले दिसले. इतक्यांत डावरून लखूचा बाप आणि गडेजंग चा अनुयायी तो रानटी तरुण दोघांनीं ापट उड्या मारल्या.

आपल्या बापाची भेट झाल्यानें लखूला फार आनंद झाला. हात वर करून तो जोरानें ओरडला—" बाबा !"

तो पुढें धांवणार तेवढ्यांत एक भयंकर आवाज विहिरींतून ऐकूं आला.

तेव्हां जयमल व लखूला कळलें कीं कोणी तरी भुयारांतून बाहेर येत आहे. त्याच वेळीं म्हातारा त्यांच्या पाठीमागें



येऊन पोचला. दोन पावलांवरच तो त्यावेळीं असेल. मोठ्यानें हंसून म्हणाला—" त्या दुष्टांना मी अशी हुलकावणी दिली कीं....! मी म्हणालों कीं या झाडावर वीस, आणि जांभळाच्या झाडावर बेचाळीस जण आहेत. तें ऐकून व तें खरें समजून सर्व पळाले. आतां कांहीं वेळ तरी भीति नाहीं."

नरभक्षक त्यांचा पाठलाग करीत आहेत हें लखूच्या बापाला कळलें नाहीं पण हें समजायला लखूला वेळ लागला नाहीं. तो म्हणाला—" बाबा! अजून या संकटांतून आपल्याला सुटका मिळालेली नाहीं. नरभक्षकांच्या टोळ्या एका मागून एक बाहेर येत आहेत!" तो बोलत असतां दहा बारा नरभक्षक भुयारांतून बाहेर आले.

तो रानटी तरुण जेथें उभा होता त्याच्या पाठीमागच्या झाडावरून आवाज ऐकूं आला कीं " आपण उगाच इतका वेळ भ्यालों. या म्हाताऱ्यानें आपल्याला छान फंसविलें. सर्व मिळून हे तर पांचच जण दिसत आहेत!" तो आवाज चंडमंडूकाचा होता.

त्याच्या बोलण्याकडे मलदंडीचें लक्ष होतें कीं नाहीं. कोणास ठाऊक? कारण तो " हे काळभैरवा! उपासकांच्या वटवृक्षा! लखूला ठार करूं नका. त्याला जिवंत पकडा. तो मेल्यावर आपण सर्व जिवंत राहालों तरी फुकट. भयानक दरी.... सोनें....चांदी....अर्धें राज्य...." भ्रम झाल्यासारखा मोठमोठ्यानें ओरडत होता.

एका क्षणांत बदललेली परिस्थिति पाहून म्हातारा थोडा घाबरला. किती दिवसांनीं मुलाची भेट झाली. पण आनंदानें बसून बोलणें नशिबीं नाहीं. आतां जिवावर उदार होऊन दोघांनीं युद्ध केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असा विचार करून तो ओरडला—

" अरे भिऊं नकोस रे! आपल्या हातांत तलवार असेपर्यंत आमच्या केसाला देखील धक्का पोचविण्याची शक्ति कोणांत नाहीं." असें म्हणत म्हाताऱ्यानें तलवार उपसली व नरभक्षकांवर तुटून पडला.

म्हाताऱ्यानें उत्साह दिल्यावर गडेजंग जिवावर उदार होऊन युद्धास तयार झाला. तो होता देखील तसाच शूर. त्याला स्वतःच्या जिवाचें भय कधींच नव्हतें. त्यानें आपली तलवार उपसली व नरभक्षकांचा संहार सुरू केला. त्यानें चार सहा जणांना जमिनीवर लोळविलें तितक्याच जणांना यमसदनीं पाठविलें. परंतु नरभक्षकांची संख्या वाढत होती. झाडी आडून टोळ्या मागून टोळ्या येत होत्या. लखू, जयमल व रानटी तरुण युद्ध करीत मागें सरकत होते. ते त्या झाडीपर्यंत येऊन पोचले.

" अरे इतक्या मोठ्या शत्रूशीं समोरासमोर युद्ध करणें शक्य नाहीं. पळा रानांत आणि लपून बसा कोठें तरी. आम्ही दोघे देखील पाय काढतों. भेटूं मागाहून." तो म्हाताऱ्याचा आवाज होता. त्यानें दोघां नरभक्षकांना, जे अगदीं जवळ उभे होते ठार केलें आणि जंगलांत शिरला. गडेजंग



देखील म्हाताऱ्याच्या मागें निघून गेला. तिकडे लखू, जयमल व तो रानटी तरुण स्वतःचें रक्षण होणें आणि इतक्या नरभक्षकांशीं युद्ध करून त्यांना जिंकणें अशक्य आहे हें ओळखून मागें सरकत झाडींत शिरले. पण नरभक्षक जोर जोरानें ओरडत चारी बाजूनें जवळजवळ येत होते. कोंडींत सांपडल्यासारखी त्यांची स्थिति झाली होती.

" ठार करा या दुष्टांना! त्या लखूला देखील! यांना जिवंत धरणें सोपें नाहीं. अशक्यच आहे. आम्ही त्याला जिवंत धरण्याच्या हेतूनें थोडें पडतें घेत आहों व



त्यांना याचा फायदा होत आहे. पहा त्यांनीं माझ्या किती अनुयायांचा संहार केला ?

"लखूला ठार करणार ? काळभैरवा ! भयानक दरी !" ब्रह्मदंडी पुटपुटला. तें त्याला कसें पटणार ? ज्याला धरण्यासाठीं इतका प्रयत्न केला त्यालाच जर या मूर्खांनीं ठार केलें तर लटाटोपव्यर्थ.

मांत्रिकाचें पुटपुटणें चंडमंडूकाच्या कानावर पडलें. त्याला भयंकर राग आला. त्यानें आपली काठी ब्रह्मदंडीच्या पोटावर जोरानें हाणलीव विचारलें—"थेरड्या ! तुला भयानक दरीची काळजी पडली आहे. नहीं का ! तुझा पायगुणच अशा कांहीं विचित्र आहे. राक्षसा ! तूं या बेटावर पाऊल ठेवलेंस तेव्हांपासून माझें भाग्य माझ्याविरुद्ध उलटलें आहे. मला अर्ध्या राज्याचा मोह दाखवून माझ्याचा अनुयायांचा तूंच संहार चालविला आहेस. थांब, तुझी चामडी लोळवतो व तिचा डफ करून तुझ्या चितेसमोर वाजवितों !" दांत ओठ चावून चंडमंडूक म्हणाला.

मंडकाचें तें बोलणें ऐकून ब्रह्मदंडी गयावया करूं लागला. नरभक्षकेश्वरा ! इतका रागावलास तर कसें चालेल ? आजपर्यंत मी जो जगलों तो शरीर बळामुळें नाहीं, मंत्र बळामुळें. तूं मला म्हातारा म्हणालास पण मी म्हातारा वयोवृद्ध नसून मंत्र वृद्ध आहें. हें विसरूं नकोस."

"तूं इतका मोठा मंत्रवृद्ध आहेस तर टाक ना आपला मंत्र ! पहा, तो लखू व तुझा शिष्य माझ्या अनुचरांच्या हातांतून निसटून पळत आहे. त्याला आपल्या मंत्रानें बांधून कां नाहीं ओढून आणीत आपल्या समोर ? पाहूं या तरी तुझें मंत्रबळ !" चंडमंडूकानें पुन्हां काठी ब्रह्मदंडीच्या पोटावर हाणली.

ब्रह्मदंडी "ओय ओय !" करून ओरडत थरथर कांपत मंडूकाच्या पायां पडला आणि म्हणाला—"नरभक्षक कुलोत्तमा ! आपला हात जरा मागें घे ! माझ्या मनांत आलें तर मी त्या दोघांना जागच्या जागीं भस्मीभूत करून टाकीन. हें बेट आकाशांत उडून क्षीरसागरांत फेंकून देईन. अष्टग्रह खालीं पृथ्वीवर आदळतील. समुद्र उकळूं लागेल आणि त्याच्या उकळत्या पाण्यांत ही पृथ्वी मी फेंकून देईना."

ब्रह्मदंडीच्या त्या गप्पा ऐकून चंडमंडूक शांत होण्याऐवजीं जास्त तापला. त्यानें ब्रह्मदंडीच्या दंडावर दोन्ही बाजूंनीं दोन झड्या मारल्या आणि म्हणाला—"तुझी वटवट पुरी कर !"

नंतर तो धावरून पळत येणाऱ्या आपल्या नरभक्षक अनुचरांजवळ धांवत गेला. त्याचे अनुयायी जखमी होऊन ओरडत येत होते—"मंडूकेश्वरा ! वांचव ! वांचव आम्हांला ! आम्ही आपल्या शक्तीची पराकाष्ठा केली. पण त्यांना थोपवून ठेवणें आम्हांला शक्य झालें नाहीं. उलट त्या दुष्टांनीं आमच्या अनेक साथी नरभक्षकांना ठार केलें आणि मंडूक पर्वतांत पळून गेले आहेत." बोलत





असतां त्यांना दम लागला. तें ऐकून चंडमंडूक रागानें थरथर कांपूं लागला व भीतीनें त्याच्या सर्व अंगाला दरदरून घाम सुटला. लखू व जयमल दोघांनीं त्याला केव्हांच ठार केलें असतें. पण सुदैवानें त्यांच्या हातांतून निसटून तो भुयारांत शिरला व स्वतःचा बचाव करूं शकला.

"ते तिघे डोंगरांत पळून गेले. तो म्हातारा आणि त्याच्याबरोबर आलेला तो चोर पण रानांत पळून गेले आहेत? मूर्खांनो तुम्ही त्यांना जाऊं कां दिलेंत?" चंडमंडूक ओरडून म्याला होता. पण स्वतःला सावरून आपल्या अनुचरांवर आग पाखडीत होता. "चल व्हा चालते. उद्यां सकाळच्या आंत सारा डोंगर व सारें जंगल पालथें घालून त्या पांचही जणांना जिवंत धरून माझ्याबरोबर हजर करा, त्यांचीं प्रेतें जरी माझ्यासमोर हजर केलींत तरी चालेल. पण जर का हें काम पुरें झालें नाहीं...." असें म्हणत त्यानें आपली काठी जोरानें उगारली आणि ब्रह्मदंडीकडे व त्यांच्याकडे डोळे वटारून पाहूं लागला.

"लखूला...." ब्रह्मदंडीच्या तोंडांतून एवढेच शब्द तोंडावाटे बाहेर पडले. ब्रह्मदंडीची मुद्रा पाहून त्यानें स्वतःच्या तोंडावर हात ठेवून तोंड बंद करून घेतलें.

चकित होऊन मंडुकानें ब्रह्मदंडीला विचारलें—"तुझे दोघे अंगरक्षक कोठें आहेत? पळून गेले वाटतें? दिसत नाहींत म्हणून विचारतों." काठीच्या टोकानें ब्रह्मदंडीला डिवचून मंडूकानें विचारलें.

चंडमंडुकानें विचारलें तेव्हां ब्रह्मदंडीचें पण तिकडे लक्ष गेलें. तोंपर्यंत जितवर्मा व शक्तिवर्मा जवळच आहेत असें त्याला वाटत होतें. दोघे डोळे चुकवून केव्हां निसटून निघून गेले हें त्याला मुळींच कळलें नाहीं. मला नरभक्षकांच्या हातांत सोडून स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं दोघे पळाले कीं काय? तो मोठ्यानें ओरडून हांका मारूं लागला—"जितवर्मा! शक्तिवर्मा...."

एका झाडावरून ओरडून ते म्हणाले—"आलों!....ब्रह्मदंडी!" आणि माकडांसारखे झाडावरून पटापट उड्या मारून खालीं उतरले.

"येथें युद्ध चालू होतें आणि तुम्ही दोघे झाडावर बसून गंमत पहात होता होय?" चंडमंडूकानें दरडावून विचारलें.

"झाडावर स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं लपून बसलों होतों!" जितवर्मा म्हणाला. पण शक्तिवर्मा म्हणाला—"जयमलच्या डाव्या हातावर कोणी वार केला आणि त्या म्हाताऱ्याचें नाक कोणी उडवलें? माझ्या तलवारीचा प्रताप मंडूका, तूं ओळखला नाहींस!"

पण मंडूकाच्या मनाचें त्या उत्तरानें समाधान होण्याऐवजीं त्याचा संशय मात्र फार वाढला. ब्रह्मदंडी तोंड वेंगाडून म्हणाला—"मला तें माहीतच होतें. माझे अंगरक्षक असे पळपुटे भितरे नाहींत." मंडूक त्याच्याकडे पहात उभा होता. पण तो आपल्या दोघां अंगरक्षकांना म्हणाला—



"पाहतां काय? शिरा या डोंगरांत आणि हुडकून काढा त्या पांचही जणांना. लखूच्या जिवाला अपाय होऊं नये, याची काळजी मात्र घ्या!"

तिकडे ते तिघे—लखू, जयमल व तो रानटी तरुण डोंगरांत लपायला झाडाची पोकळी किंवा गुहा सांपडते का पहात होते.

एकट्या लखूच्या अंगाला एकहि जखम झालेली नव्हती. पण दोघांना बरेंच लागलें होतें. परंतु तसें भिण्याचें कारण नव्हतें. जयमल व रानटी तरुणानें झाडाचा पाला चुरगळून त्याचा रस जखमांवर पिळला.

नरभक्षक त्यांच्या शोधार्थ येत आहेत हें त्या तिघांना माहीत होतें. लखूला स्वतःच्या जिवापेक्षां त्याच्या म्हाताऱ्या बापाची फिकीर जास्त वाटत होती. बाबा त्या नरभक्षकांच्या हातून निसटून पळाले असतील का ?

"लखू ! तूं अगदीं बेफिकीर रहा ! तुझे वडील त्यांच्या हातांत सांपडणें शक्यच नाहीं. ते खात्रीनें निसटून पळाले आहेत. आपण डोंगरांत पळालों, ते रानांत पळाले असतील. दोघांची भेट कोठें तरी होईलच. ये आपण ह्या गुहेंत शिरून बसूं." जयमलनें दोन दगडा आड गुहा दाखवीत त्याला म्हटलें.

तिघे दगड बाजूला सरकवून आंत शिरले आणि दगड जसेच्या तसे पुन्हां ठेवून दिले. खरोखरच आंत एक गुहा होती. गुहेंत पाय टाकल्याबरोबर तो रानटी तरुण दचकून सरकला आणि म्हणाला—"हें पहा, येथें तर कोणाचें तरी भूत दिसत आहे ! येथें धोका आहे आपल्याला."

जयमलनें गुहेंत जास्त न्याहाळून पाहिलें. तेथें त्याला माणसाचे दोन अस्थिपंजर दिसले. तो हंसून म्हणाला—"गड्या, हे तर अस्थिपंजर आहेत. भुतें नाहींत. भिण्याचें कारण नाहीं. चुन्याचा ढीग आहे समज ! आपण ...." तो बोलतच होता, इतक्यांत त्यांना 'भुस्स' आवाज ऐकूं आला आणि जिकडून आवाज आला तेथून एक दगड खालीं पडला. त्याच्या मागें एक मोठें भगदाड होतें. एक नाग एका विचित्र प्राण्याचा विळखा घालून त्याचा जीव घेण्याच्या प्रयत्नांत होता. त्या सांपाचा फूत्कार व त्या प्राण्याचें ओरडणें ऐकून तिघांची घाबरगुंडी उडून गेली.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# सत्व परीक्षा

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या वाटेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, मला असें वाटत आहे कीं कोणी तरी तुझी सत्व परीक्षाच घेत असला पाहिजे. या परीक्षेंत तूं यशस्वी होशील कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. पण तुझा श्रम अल्प का होईना हलका करतां यावा म्हणून मी तुला एक लहानशी चटकदार गोष्ट सांगतों." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात नाहीं.

एका राजाला एका मागून एक चार मुली झाल्या. पण सर्व अल्प वयींच मरण पावल्या. राजा व राणी दोघे नेहमीं फार दुःखी रहात.

राणी पुन्हां गरोदर असतांना राजाकडे एक साधु आला. त्याला मंत्रविद्या चांगली










अवगत होती. चार मुली अल्पवयींच वारल्या हें ऐकून त्याला देखील फार वाईट वाटलें. थोडा वेळ विचार करून तो म्हणाला—"राजा! मुलाचें तोंड पाहाणें तुझ्या नशिबी नाहीं. तुझ्या मुलींचा जीव घेणारी कोणीतरी दुष्ट कृत्या किंवा राक्षसी असावीसें वाटतें. या खेपेस देखील तुला मुलगीच होईल. पण हिच्या जिवाला धक्का लागूं नये याची जबाबदारी मी घेतों. मुलगी झाल्यावर तिला सोळा वर्षें पुरी होईपर्यंत कोठें घराबाहेर जाऊं देऊं नकोस. सोळाव्या वर्षीं तिचें लग्न करून दे. तिच्यासाठीं योग्य वर निवडण्यास युक्ति मी तुला सांगतों. मी सांगून ठेवतों त्या जागीं एक आरसा ठेवून दे. या आरशांतून जो तुझ्या मुलीला पाहूं शकेल तोच तिचा पति होईल. कोठें जाण्याची गरज नाहीं. वर स्वतः चालून तुझ्या घरीं येईल."

त्या मांत्रिकानें राजवाड्याच्या चारी बाजूला मंत्र टाकला. नंतर त्यानें राजवाड्याच्या अंतःपुरांत एका जागीं एक मोठा आरसा लावून ठेवला.

मांत्रिकानें सांगितल्याप्रमाणें राणीला मुलगीच झाली. त्या मुलीचें नांव मेखला असें ठेवण्यांत आलें. मांत्रिकाच्या आज्ञे-प्रमाणें मेखला राजवाड्याबाहेर गेली नाहीं व लहानाची मोठी झाली. तिला कोणी पाहिलें नाहीं. परंतु तिच्या अप्रतीम सौंदर्याची ख्याति मात्र दूर दूरच्या गांवीं पसरली.

तिला पाहण्यासाठीं व तिच्याशीं विवाह करण्याच्या हेतूनें अनेक राजकुमार येऊं लागले. राजानें सर्व राजकुमारांच्या राहण्याची व्यवस्था आपल्या अतिथिगृहांत केली.

राजकुमारांनीं आपल्या नोकरांकरवीं राजाकडे सांगून पाठविलें कीं आम्ही राज-कन्येला प्रथम पाहून तिच्याशीं विवाह



करणें इष्ट आहे कीं नाहीं हें कळवूं. राजानें उत्तर पाठविलें कीं माझ्या मुलीचें रूप आरशांत दिसेल. मुलगी पसंत पडल्यास विवाहासंबंधीं इतर गोष्टी बोलतां येतील. त्याप्रमाणें पाहुणे राजकुमार आरशांत राज-कुमारीचें रूप पहायला जात व ती दिसली नाहीं म्हणजे निराश होऊन परत येत.

आशा तऱ्हेनें कांहीं महिने निघून गेले. एकदां पुष्प वर्ण देशाचा युवराज वत्सर कित्येक देशांचें पर्यटन करीत आपल्या नोकरांचाकरांसह त्या देशांत येऊन पोंचला. त्यानें मेखलाचें नांव देखील ऐकलें नव्हतें. राजानें आपल्या अतिथि-गृहांत त्याच्या राहण्याची उत्तम व्यवस्था करून दिली. आतांपर्यंत राजानें जितके राजकुमार पाहिले होते त्या सर्वांत वत्सर हाच राजाला आपल्या मुलीसाठीं पसंत पडला. परंतु जोंपर्यंत तो आरशांत राजकन्येला पाहून लग्नाची गोष्ट काढीत नाहीं तोंपर्यंत त्या विषयीं त्याच्याशीं बोलणें काढणें राजाला इष्ट वाटलें नाहीं.

वत्सर अतिथि गृहांतल्या आरशा समोरून जात असतां त्याला त्या आरशांत स्वतःचें तोंड दिसलें नाहीं. त्या ऐवजीं एका सुंदर



राजकन्येचें प्रतिबिंब दिसलें. तिचें सौंदर्य पाहूनच वत्सर बेशुद्ध होऊन पडला.

परंतु तो मूर्छित कां झाला हें कोणाला कळलें नाहीं. नोकरचाकर उपचार करूं लागले. राजाच्या कानावर ती गोष्ट गेली. राजा देखील धांवत आला. राजवैद्यांनीं येऊन औषधोपचार केल्यावर राजकुमाराला शुद्ध आली. तेव्हां बेशुद्ध होण्याचें कारण सर्वांना कळलें.

तें ऐकून राजाला परमानंद झाला. मांत्रिकानें सांगितल्याप्रमाणें हाच आपला जांवई होणार असा विचार करून राजा



म्हणाला—"युवराज ! ज्योतिष्यानें सांगितल्याप्रमाणें राजकन्येशीं विवाह करण्यास योग्य वर तूंच आहेस. तुला माझी मुलगी पसंत असेल तर मी मुहूर्त पाहून लग्नाची तयारी करतों." वत्सरनें होकर दिला.

सुमुहूर्तावर वत्सर व मेखला यांचा विवाह झाला. सासुरवाडी कांहीं दिवस राहून वत्सर सपत्नीक स्वदेशीं निघाला. वाटेंत नावेंत प्रवास करीत असतां एक विचित्र गोष्ट घडली.

वत्सर याचा एक नोकर कबर नांवाचा होता. तो याच्या वत्सर कडे अंगरक्षक म्हणून काम करीत असे. एका युद्धांत युवराजाच्या रक्षणासाठीं युद्ध करीत असतां तो आपला डावा हात घालवून बसला. त्यानंतर वत्सरनें त्याला आपला एक विश्वासपात्र नोकर म्हणून स्वतःजवळ ठेवून घेतलें.

नाव नदीपलीकडे जात असतां कबर याला दुरून दोन आवाज ऐकूं आले.

"सासरी जाणाऱ्या या मुलीवर तीन संकटें ओढवणार आहेत." एक आवाज होता.

"तीं संकटें कोणती बुवा ?" दुसरा आवाज होता.

"पलीकडे गेल्यावर नदी कांठीं युवराजाला एक सुवर्ण अश्व दिसेल. तो त्यावर स्वारी करण्यासाठीं जाईल व बसल्याबरोबर घोडा अदृश्य होईल." पहिला आवाज म्हणाला.

"मग यांतून राजकुमाराला वांचविण्यास उपाय काय ?" दुसऱ्या आवाजानें विचारलें.

"एकच एक उपाय आहे. कोणी तरी त्यावेळीं तेथें असलें पाहिजे व युवराज घोड्यावर बसण्यापूर्वी तो घोडा ठार आला पाहिजे. अशा तऱ्हेनें एक संकट टळेल. परंतु दुसरें संकट समोर उभें राहील. घरी पोंचल्यावर युवराजाला व युवराणीला नवीन वस्त्रें धारण करण्यासाठीं देण्यांत येतील. त्यांत जरीकाठी पैठणी पाहाल्याबरोबर ती नेसण्याचा मोह युवराणीला आवरणार नाहीं. पण ती पैठणी नेसल्याबरोबर राजकन्या जळून भस्म होऊन जाईल. पण ती पैठणी नेसण्यापूर्वी जर कोणी ती उचलून विस्तवांत टाकली तर ती जळून जाईल व दुसरें संकट पण टळेल." पहिला आवाज म्हणाला.

"तिसरें संकट कोणतें ओढवणार आहे ?" दुसऱ्या आवाजानें विचारलें.

"सुनेच्या गळ्यांत महाराणी एक मोहन माळ घालील. त्यांतला किडा राजकुमारीला चांवेल व राजकुमारी तत्काळ मरून जाईल. त्या वेळीं कोणी पुढें येऊन राजकुमारीच्या हाताचेंच रक्त काढून त्याचे तीन थेंब तिच्या डोळ्यांत घालील तर राजकुमारीवरील हें संकट देखील टळेल. ह्या संकटांचें गुपित जर का कोणाला कळलें किंवा सांगितलें तर त्या संकटांतून युवराज व युवराणीचें रक्षण करणें तर दूरच ऐकणारा स्वतःच दगडाची मूर्त होऊन जाईल." पहिला आवाज म्हणाला.

तें संभाषण तेथेंच थांबलें. कबरला तें ऐकून आश्चर्य वाटलें. आपल्या धन्यावर व धनीणीवर येणाऱ्या संकटांची कल्पना करूनच



कबरच्या अंगावर शहारे उभे राहाले. ज्याच्या अन्नावर हा देह वाढला तो त्याच्या रक्षणार्थ खर्ची पडला नाहीं तर तो स्वामीद्रोह ठरेल असा विचार करून त्यानें त्या विषयीं तोंडावाटे एक शब्द देखील बाहेर काढायचा नाहीं व सर्व गोष्टी वेळेवर साधायच्या असा मनाशीं विचार केला.

ती गोष्ट इतर कोणाला माहीत नाहीं व तें संभाषण इतर कोणी ऐकलें नाहीं या गोष्टीची कबर यानें खात्री करून घेतली होती.

नदी काठीं उतरल्याबरोबर त्यानें ऐकलें होतें तसा एक सुवर्ण अश्व खरोखरच



काठावर उभा होता. युवराजानें त्याला पाहिलें व त्याच्यावर बसण्यासाठीं पुढें जाऊं लागल्याबरोबर कवरनें तलवार उपसून त्या घोड्याला ठार केलें.

"हें काय केलेंस? उगाच मुक्या प्राण्याचा असा जीव कां घेतलास?" युवराजाला राग आला.

"मी जें केलें तें ठीकच केलें आहे. कारण मला विचारूं नका." कवर म्हणाला.

राजधानींत पोंचल्यावर राणीनें आपल्या सुनेसाठीं पैठणी आणली. मेखला त्या पैठणीला हात लावणार इतक्यांत कवरनें ती पैठणी राणीच्या हातांतून काढून घेतली व सैंपाकघरांत जाऊन चुलींत टाकून दिली.

या खेपेस आपल्या स्वामीभक्त नोकराचा विक्षिप्तपणा युवराजाला असह्य वाटला. पण कवरनें ह्या खेपेस देखील तेंच उत्तर दिलें—"मी जें केलें तें तुमच्या बऱ्यासाठीं म्हणूनच केलें आहे. पण तें कसें हें तुम्ही विचारूं नये व मी सांगूं नये ह्यांतच सर्वांचें हित आहे."

इतक्यांत महाराणीनें एक रत्नहार सुनेला घातला. तो हार घातल्याबरोबर मेखला बेशुद्ध होऊन पडली. सर्व किंकर्तव्य विमूढ उभे असतां कवरनें खिशांतून चाकू काढला व मेखलेचा हात एका बाजूला थोडा कापला. रक्ताची चिरकांडी उडाली. पण तो थोडा देखील भ्याला नाहीं. त्यानें रक्ताचे तीन थेंब घेऊन राजकन्येच्या डोळ्यांत घातले.

तोंपर्यंत सर्व पहात उभे होते. पण कवरनें जें केलें तें सर्व प्रत्येकाला अमानुष कृत्य वाटलें. वत्सरला वाटलें कीं आतां राजकन्या जिवंत राहणें शक्य नाहीं. त्या सर्वांला कारण कवर आहे असा विचार करून युवराजानें कवरला कैद करण्यास सांगितलें.

पण कवर साहस करून म्हणाला—"तुम्हांला वाटत असेल कीं मी राजकन्येचा जीव घेतला. पण मी हें सर्व जें केलें तें राजकन्येला वांचविण्यासाठींच केलें. राजकन्येला पुनर्जन्म मिळाला."

"याचें डोकें फिरलें आहे कीं काय? हा आणखी कांहीं दिवस जिवंत राहला तर राजकन्याच काय सर्व राजघराण्यांतील प्रत्येक जण मरून जाईल. म्हणून प्रथम याचें डोकें उडवा." युवराज म्हणाला.

आतां तर मरण येणारच आहे. मग जें ऐकलें तें सांगून टाकण्यांत काय हरकत आहे असा विचार करून कवरनें सर्व सांगून टाकलें व तो दगड होऊन जागच्या जागीं उभा राहाला.

कवर दगडाचा पुतळा झाल्यानंतर राजकन्येला शुद्ध आली. वत्सरला आपल्या चुकीबद्दल फार वाईट वाटलें. एका स्वामीभक्त नोकरावर विश्वास न करून त्यानें त्याचें व स्वतःचें देखील नुकसान करून घेतलें.

कांहीं वर्षांनीं मेखलेला दोन मुलें झालीं. परंतु वत्सरला त्याच्या कौटुंबिक सुखांत



एका गोष्टीची नेहमीं उणीव भासे. कारण कवरचा पुतळा त्याला सदा समोर दिसे.

एकदां दोघं आपल्या दोघां मुलांबरोबर कवरच्या पुतळ्याजवळ उभीं असतां त्यांना एक आवाज कोठून तरी ऐकूं आला. त्यांनीं परस्परांशीं बोलणें क्षणभर बंद केलें व तो आवाज लक्षपूर्वक ऐकूं लागले.

"कवरसाठीं इतका शोक करण्याचें काय कारण? तो जिवंत व्हावा असें तुला खरोखरच वाटत असेल तर त्याला एकच एक उपाय आहे. तूं आपल्या दोघां मुलांना बळी देऊन आपल्या नोकराला जिवंत करून घे."

तें ऐकून वत्सर तलवार काढून आपल्या दोघां मुलांना ठार करायला पुढें सरसावला. पण तोंपर्यंत जो दगडाचा पुतळा होऊन तेथें स्वस्थ उभा होता तो पुढें येऊन म्हणाला— "थांब! थांब!" आणि त्यानें दोघां राजकुमारांना उचलून घेऊन पोटाशीं धरलें.

कबर पुन्हां जिवंत झालेला पाहून दोघांना फार आनंद झाला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— "राजा, मला एका गोष्टीची शंका वाटत आहे. वत्सर आपल्या दोघां मुलांना बळी द्यायचें ठरवून कबरला जिवंत करणार होता. पण त्या शिवाय तो जिवंत कसा काय झाला? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून जर दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

विक्रमार्क म्हणाला—"मेखलावर ओढवलेलीं संकटें वत्सरला परीक्षा आहे कीं काय असें वाटलें. पण त्याचा अंदाज? चुकला व कबरसारखा एक स्वामीभक्त नोकर त्याला पारखा झाला. त्याला फार वाईट वाटलें. पश्चात्ताप वाटला. त्याचा पश्चात्ताप खरा आहे कीं खोटा ह्याची सत्व-परीक्षा घेण्यासाठीं त्या अदृश्य शक्तींनीं त्याची आणखी एक परीक्षा घेतली. या खेपेस तो यशस्वी झाला. वत्सरची परीक्षा घेणाऱ्या शक्ती दुष्ट नव्हत्या. त्यांना वत्सरच्या मुलांचा बळी घ्यायची इच्छा नव्हती. म्हणून कबर वेळींच जिवंत होऊन बोलूं लागला."

अशाप्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व जाऊन झाडाला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# च्यवन कथा

भृगु महर्षींची गोष्ट पुराणांत प्रसिद्धच आहे. त्यांचा जन्म ब्रह्मदेवाच्या हृदयांतून झाला. त्यांच्या मोठ्या पत्नीला एक मुलगा झाला. त्याचें नांव कवि असें होतें. ह्या कवीचा मुलगाच शुक्राचार्य. तो राक्षसांचा गुरु म्हणून पुढें प्रसिद्ध झाला.

एकदां देवांनीं राक्षसांचा पराभव करून त्यांचा संहार करण्याचें ठरविलें. पण भृगूच्या बायकोनें त्यांचें रक्षण केलें. तेव्हां देवांच्या वतीनें स्वतः विष्णूनें येऊन आपल्या सुदर्शन चक्रानें भृगु पत्नीचा शिरच्छेद केला. भृगूला अर्थातच विष्णूवर फार राग आला. त्यानें विष्णूला शाप दिला कीं तुला देखील मानव जन्म घेऊन पत्नी-विरहाचें दुःख सहन करावें लागेल. म्हणूनच विष्णूनें त्रेतायुगांत अवतार घेतला. तेव्हां त्याला सीतेचा विरह सहन करावा लागला.

भृगूला आणखी अनेक पत्नी होत्या. एकीचें नांव पुलोमा असें होतें. एकदां भृगूनें पुलोमाला होमकुंडाजवळ बसून होमांत आहुती देण्याचें काम दिलें व स्वतः दुसऱ्या एका कामासाठीं कोठें तरी निघून गेला. त्यावेळीं पुलोम नांवाचा एक राक्षस तेथें आला. पुलोमाला तेथें बसलेली पाहून राक्षसानें अग्नीला विचारलें—"ही कोण?"

"ही भृगुपत्नी पुलोमा आहे!" अग्नि म्हणाला. तें ऐकून पुलोम म्हणाला—"प्रथम हिच्याशीं माझा विवाह झाला. त्यानंतर भृगूनें हिच्याशीं लग्न करून घेतलें." असें सांगून पुलोम राक्षसानें डुकराचें रूप धारण केलें व पुलोमाला उचलून घेऊन निघाला.

श्री. वा. रा. सोमण



पुलोमा त्या वेळीं गरोदर होती. तिच्या पोटांतील शिशु बाहेर आला व पुलोम राक्षसाकडे क्रुद्ध होऊन पाहूं लागला. त्याच्या डोळ्यांतून ज्वाळा बाहेर येत होत्या. त्यांत पुलोम राक्षस भस्म झाला. पुलोमाचा तोच मुलगा पुढें च्यवन म्हणून पुराणांत प्रसिद्ध झाला.

च्यवनानें कित्येक वर्षें तप केलें. तो समाधिस्त असतां त्याच्यावर वारूळ वाढलें. तो ज्या जागीं तप करीत होता तेथें वैवस्वत राजाचा मुलगा शर्याति हा आपली सुस्वरूप कन्या सुकन्या हिच्यासह ससैन्य वनविहार करण्यास आला. एका वारुळांतून उजेडाचे झोत येत असलेले पाहून सुकन्येला आश्चर्य वाटलें. तिनें नोकराकरवीं तें वारूळ खणविलें. त्यामुळें च्यवनाला जखम झाली व रक्त वाहूं लागलें. च्यवनाला राग आला. त्यानें शर्यातीच्या सैनिकांचें मलमूत्र आपल्या तपोबलानें थांबवून टाकलें. त्यामुळें सैनिकांना पोटांत असह्य कळा येऊं लागल्या.

खरी चूक सुकन्येची होती. पण शिक्षा मिळाली सैनिकांना. शर्याति च्यवनाकडे गेला व म्हणाला—"मुलीच्या चुकीमुळें हा अपराध घडला. क्षमा करावी."

"तूं आपल्या मुलीचें लग्न माझ्याशीं करून दिलेंस तर मी आपला मंत्र परत घेईन." च्यवन म्हणाला. शर्याति त्याला कबूल झाला व त्यानें सुकन्येचा विवाह च्यवनाशीं करून दिला. च्यवन म्हातारा होता व स्वभावानें अत्यंत क्रोधी होता. तरी सुकन्येनें सर्व प्रकारें त्याची सेवा करून त्याचें प्रेम संपादन केलें.

एकदां अश्विनी कुमार च्यवन ऋषींच्या आश्रमीं आले. च्यवन ऋषि त्यांना म्हणाले—"तुम्ही माझें वार्द्धक्य नाहींसें करून मला यौवन दिलेंत तर मी शर्यातीकडून यज्ञाचा



भाग देववीन व सोमरस पान पण करवीन." त्यांनीं तें कबूल केलें. ते म्हणाले—" आम्ही सांगतों तसें तूं केलेंस तर तुला यौवन-प्राप्ति होईल.

नंतर ते सुकन्येकडे गेले व तिला म्हणाले—" तूं तरुण आहेस. ह्या म्हाताऱ्या बरोबर किती काळ आयुष्य कंठणार ? तूं आमच्या बरोबर आलीस तर तुला तरुण पति मिळेल."

तें ऐकून सुकन्येला राग आला. तिनें च्यवनाकडे जाऊन अश्विनीकुमारांविरुद्ध तक्रार सांगितली. पण च्यवनाला राग आला नाहीं. तो म्हणाला—" त्यांच्या सांगण्याप्रमाणें एखाद्या तरुणाला आपला पति मानून त्याच्या बरोबर रहा." तेव्हा सुकन्या अश्विनीकुमारांकडे जाऊन म्हणाली—" मी तुमच्या बरोबर यावयास तयार आहें. मला तरुण पति दाखवा."

अश्विनीकुमारांनीं शेजारच्या ओढ्यांत बुडी मारली व त्याच वेळीं च्यवनानें पण त्याच ओढ्यांत बुडी मारली. पण ज्यावेळीं तिघे बाहेर आले त्यावेळीं सुकन्येला तिघे तरुण दिसले. त्यांपैकीं आपला पति कोण हें सुकन्येनें ओळखलें नाहीं. अश्विनीकुमारांनीं च्यवनाकडे बोट दाखविल्यावर सुकन्या आपल्या पतीबरोबर आश्रमांत परत आली.

कांहीं काळानें शर्याति आपल्या मुलीला व जांवयांना यज्ञसमारंभांत भाग घेण्यासाठीं निमंत्रण करायला आला. तेथें एका तरुणाची सेवा करीत मुलीला बसलेली पाहून त्याच्या मनांत मुलीवर संशय आला.

पण सुकन्येनें पूर्ववृत्त सांगून अश्विनी कुमारांच्या कृपेनें तिच्या पतीला तारुण्यलाभ कसा झाला हें सांगितलें.

शर्यातीनें यज्ञ केला. च्यवनानें आपल्या वचनाप्रमाणें अश्विनीकुमारांना यज्ञभाग





द्यायला शर्यातीला सांगितलें तेव्हां इंद्रानें त्यांत विघ्न आणलें. म्हणाला—" दोघे अग्निभाग घेण्यास अधिकारी नाहींत." पण च्यवनानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व त्यांना यज्ञभाग देवविला. इंद्राला राग आला. त्यानें वज्राचा आघात करून च्यवनाला ठार करण्याचें ठरविलें. पण च्यवनानें इंद्राचा उगारलेला हात जागच्या-जागीं स्थिर करून टाकला. एवढेंच नव्हें तर च्यवनानें एक यज्ञ करून त्यांतून मंद नांवाचा एक राक्षस उत्पन्न केला. तो राक्षस यज्ञवेळीं हजर असलेल्या देवांना गिळून टाकण्यासाठीं धांवला. इंद्रानें च्यवनाचे पाय धरले व त्याची माफी मागितली. अश्विनी-कुमारांनीं सर्व देवांबरोबर बसून सोमरस पान केलें.

एकदां च्यवनानें गंगा व यमुना या दोन्हीं नद्यांच्या संगमांत बारा वर्षें तपश्चर्या केली. जेव्हां कांहीं कोळ्यांनीं त्या जागीं आपलें जाळें फेंकलें तेव्हां माशांबरोबर च्यवन देखील जाळ्यांत सांपडला त्याला पाहून कोळ्यांनीं माफी मागितली. तेव्हां तो त्यांना म्हणाला—" हे मासे बारा वर्षें माझ्याबरोबर या संगमांत वास करीत आले आहेत. आमचें परस्परांवर प्रेम आहे. ह्यांना तुम्ही विकणार असाल तर यांच्याबरोबर मला देखील विकून टाका."

त्या कोळ्यांनीं ती गोष्ट त्यांच्या देशाचा राजा नहुष याला जाऊन सांगितली. नहुष राजानें च्यवनाजवळ येऊन कोळ्यांना क्षमा करण्यास विनंति केली.

" त्यांनीं आपल्या कर्तव्याचें व कुल-धर्माचें पालन केलें आहें. ह्यांत त्यांची चूक काय ? तुला पाहिजे असेल तर तूं माझ्या शरिराची योग्य असेल ती किंमत देऊन मला सोडवून घे." च्यवन राजाला म्हणाला.

"कोळ्यांना एक हजार मोती देतों," नहुष राजा म्हणाला.

"पण माझी किंमत तेवढीच का आहे!" च्यवनानें राजाला विचारलें.

राजा म्हणाला—"मी एक कोटी मोती द्यायला तयार आहें. अर्धें राज्य द्यायला तयार आहें. पाहिजे तर सर्व राज्य द्यायला तयार आहें." पण च्यवनानें त्याला विचारलें—"राजा, माझी किंमत एवढीच?"

कर्मधर्मसंयोगानें गविजातु नांवाचे ऋषि तेथें आले. ते म्हणाले—"शास्त्रप्रमाणें फक्त गायच ब्राह्मणाची किंमत आकारण्यास योग्य ठरतें. कोळ्यांना एक गाय देऊन च्यवनाला सोडव. राजानें एक गाय दिल्यावर च्यवनाच्या मनाचें समाधान झालें.

राजाकडून गाय घेऊन कोळ्यांनीं ती गाय च्यवनालाच दान केली. च्यवनानें कोळ्यांवर संतुष्ट होऊन कोळी व मासे सर्वांना आशीर्वाद दिला.

एकदां देव आपसांत बोलत होते कीं भृगु वंश व कुशिक वंश दोन्ही एकत्र होण्याचा योग आहे. च्यवनाला ते आवडलें नाहीं. कांहीं तरी उपाय करून कुशिक वंशाचा नाश करण्याचें मनाशीं ठरवून तो कुशिकाच्या घरीं गेला. राजा व राणी दोघांनीं त्याचें आतिथ्य केलें. च्यवनानें जी सेवा करण्यास सांगितली ती त्यांनीं केली. च्यवन म्हणाला—"मी झोपत आहें. मी उठेपर्यंत तुम्ही दोघं माझ्या पायगती बसा.

राजा व राणी च्यवनाच्या पायांजवळ बसून राहिलीं. च्यवन एकवीस दिवस झोपून होता आणि राजा व राणी निराहार त्याच्या पायगती बसून होतीं. च्यवन जागा झाला व एक शब्द देखील बोलल्याशिवाय उठून बाहेर निघून गेला. राजा व राणी देखील त्याच्या पाठोपाठ निघालीं. कांहीं अंतर चालून गेल्यावर च्यवन अदृश्य झाला. आतां तीं दोघं काय करणार? परत आलीं तेव्हां च्यवनाला पलंगावर झोपलेला पाहून पुन्हां त्याच्या पायगती जाऊन बसलीं.

च्यवन जागा झाल्यावर राजा व राणीनें त्याच्या स्नानादीची सर्व व्यवस्था करून दिली. स्नानादि आटोपून च्यवन त्यांना म्हणाला—"आतां तुम्ही मला रथांत बसवून रथ ओढा." राजा व राणी रथ ओढूं लागलीं. च्यवनानें कांटेरी काठीनें त्यांना बडविलें. दोघांचें सर्व शरीर रक्तबंबाळ झालें.











इतकें सर्व झालें तरी राजा राणीनें चिकाटी सोडली नाहीं. शेवटीं च्यवनाला त्यांच्या सहन शक्तीसमोर हात टेंकावे लागले. तो रथांतून खालीं उतरला व दोघांच्या अंगावरून त्यानें हात फिरवला. सर्व जखमा भरून आल्या व त्यांचा सर्व थकवा दूर झाला. दोघांना पुनः तारुण्यलाभ झाल्या-सारखें वाटलें. च्यवन त्यांना म्हणाला—"मी जप करण्यासाठीं गंगेवर जात आहें तुम्ही दोघं उद्यां तेथें या." असें सांगून च्यवन निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं कुशिक राणीबरोबर गंगेवर च्यवन जप करीत बसला होता तेथें आला. च्यवनानें आपल्या योगबळानें त्यांना स्वर्ग व तेथील वैभव दाखविलें. त्यांनीं स्वर्गांत प्रवेश केला. त्याच वेळीं च्यवन अदृश्य झाला. पुन्हां प्रगट होऊन त्यानें दोघांना काय पाहिजे तो वर मागून घ्यायला सांगितलें. कुशिक राजानें च्यवनाला विचारलें—"आपण एकवीस दिवस झोंपलांत तें कशासाठीं ?"

"तुमच्या व आमच्या वंशांचा संबंध होणार आहे हें ऐकून मी संधी पाहून तुमच्या कुळाचा नाश करण्याचें ठरविलें होतें. मी ही सर्व परीक्षा, सत्वपरीक्षाच म्हणा पाहिजे तर, करून पाहिली. पण शेवटीं मलाच माघार घ्यावी लागली. तुमच्या नातवाला ब्रह्मतेज लाभेल." च्यवनानें त्यांना आशीर्वाद दिला.

कुशिकाचा नातूच विश्वामित्र. कुशिकाला गाधी नांवाचा मुलगा झाला व त्याचा मुलगा तेच विश्वामित्र मुनि. विश्वामित्र क्षत्रिय वंशांत जन्मले. पण सर्व देवांनीं त्यांना ब्रह्मर्षि म्हणून मान दिला.





# गंधर्व राजकन्या

[ २ ]

हुसन स्वतः तर एका संकटांतून मुक्त झालाच. त्याबरोबर त्यानें आपल्या शत्रूला देखील यमलोकीं पाठविलें.

त्यानें हातांतली तबकडी गरगर फिरवून पाहिली. पण तिचा उपयोग कसा करावयाचा हें त्याला कळलें नाहीं. आपण चुकून कांहीं तरी केलें तर त्याचा परिणाम उलटाच व्हायचा या भीतीनें त्यानें ती तबकडी एका जागीं आपल्या कपड्यांतच लपवून ठेवली व चारी बाजूला एकदां दृष्टि फिरवून पाहिली.

तो पर्वत, व तो उभा होता तें शिखर, ढगापलीकडे आकाशांत डोकें वर काढून जणुं कांहीं पहात होतें, ती जागा मात्र पुष्कळ समतल होती. एक देखील झाड किंवा झुडुप त्याला दिसलें नाहीं. सपाट कातळच त्याला दिसला. दुसऱ्या टोकाला त्याला ज्वाळा दिसत होत्या. जिथें मनुष्यवस्ती नाहीं तेथें विस्तव कोठून असणार व विस्तवा-शिवाय ज्वाळा कोठून येणार असा विचार करून तो ज्या दिशेला त्याला ज्वाळा दिसत होत्या त्या दिशेनें चालूं लागला.

तो जवळ जाऊं लागला तसतसा त्या ज्वाळांऐवजीं त्याला एका राजवाड्यासारखी एक इमारत दिसूं लागली. त्या राज-वाड्याच्या चारी टोकाला चार उंच मीनार होते त्यावर गोलघुमट होते. स्तंभांवर व घुमटांवर सोन्याचा पत्रा बसविलेला होता. सूर्याचा प्रकाश त्या पत्र्यावर पडला कीं तो झळके व दुरून ज्वाळाच भासत.










हसन दमलेला तर होताच. या वाड्यांत कोणी मनुष्य रहात असेल कीं कोणी यक्ष, गंधर्व किंवा देव रहात असेल? कोणी असो. आपण आंत जाऊन कोणत्या तरी कोपऱ्यांत विश्रांति घ्यायला कांहीं हरकत नाहीं. असा विचार करून हसन दिंडी दरवाज्यांतून आंत शिरला. राजवाड्यासमोर एक विस्तीर्ण पटांगण होतें व दुतर्फा गालिचासारखी हिरवळ होती. तें एक उद्यानच होतें.

त्यानें त्या संगमरमरी पटांगणांत पाऊल टाकल्याबरोबर त्याला समोर एका दगडी बांकावर दोन तरुणी बसलेल्या दिसल्या. प्रथम त्यांना हसन दिसला नाहीं. पण दोघींपैकीं धाकटीची नजर हसनवर गेली व ती आपल्या बहिणीला म्हणाली—“कोणी तरी परका मनुष्य आलेला दिसतो आहे. दुष्ट बहरामानें आजपर्यंत कित्येक तरुणांचा जीव घेतला. पण हा जिवंत वांचला कसा?”

हसनला त्या तरुणींचें सर्व बोलणें छान ऐकूं आलें. तो दोघींना नमस्कार करून म्हणाला—“मी त्यांपैकींच एक दुर्दैवी तरुण आहें!” बोलत असतां त्याच्या डोळ्याला टिपें आलीं. धाकटीला त्याची फार कींव आली. ती आपल्या बहिणीला म्हणाली—“अक्का! ह्याला आपला भाऊ मानून ठेवून घेऊं या का?”

ती हसनला आपल्या महालांत बोलावून घेऊन गेली. त्याला सुंदर वस्त्रें अंगांत घालायला दिलीं. नंतर दोघी बहिणींनीं त्याला आपल्याबरोबर जेवायला बसायला सांगितलें.

त्यांचें तें आदरातिथ्य पाहून हसन म्हणाला—“मी इतका दमलों आहे कीं तें माझें मलाच ठाऊक. त्यानें स्वतःची दुःखकथा सविस्तर सांगितली.





त्यानें आपली दुःखकथा संपविल्यावर धाकटीनें आपली दुःखकथा सुरू केली. ती म्हणाली. “आम्ही दोघी गंधर्व कन्या आहोंत. आम्ही एकंदर सात बहिणी. आम्ही एकाच बापाच्या मुली. पण आमची सर्वांची आई मात्र एक नाहीं. मी सर्वांत धाकटी व ही आमची सर्वांची मोठी अक्का. बाकी पांच बहिणी बाहेर शिकारीसाठीं गेल्या आहेत. लवकरच त्या परत येतील. आमच्या वडिलांची अशी समजूत आहे कीं आमच्याशीं कोणीच लग्नाला तयार होणार नाहीं. आम्हांला सर्व आयुष्य अविवाहितच कंठावें लागेल असा विचार करून आमच्या बाबांनीं या निर्जन स्थानीं हा राजवाडा आमच्यासाठीं बांधला. तसें पाहिलें तर हा देश फार सुंदर आहे, एवढेंच नव्हे तर धनधान्यपूर्ण पण आहे. जिकडे पहावें तिकडे फुलझाडें व फळझाडें आहेत. मोठमोठीं सरोवरें आहेत व त्यांत राजहंस विहार करतात. या राजवाड्यांत आम्हांला स्वर्गीतलीं सर्व सुखें प्राप्त आहेत. एकाच गोष्टीची कमतरता भासते आम्हांला. कोणी नवीन चेहरा दिसत नाहीं. परस्परांचा चेहराच काय तो आम्हांला नेहमीं दिसतो. पण तूं आल्यानें ती उणीव पण नाहींशी झाली आहे. म्हणून आम्हांला जास्तच आनंद होत आहे.

दोघी बहिणी आपल्या त्या मानलेल्या भावाशीं बोलत असतां पांची बहिणी शिकार संपवून घरीं परत आल्या. एक भाऊ लाभल्याचा त्यांना देखील फार फार आनंद वाटला. त्यांनीं त्याच्याकडून वचन घेतलें कीं तो नेहमीं त्यांच्या बरोबरच राहील कोठें निघून जाण्याचा विचार देखील मनांत आणणार नाहीं.

हसनला ती नवीन जागा फार आवडली. आपल्या बहिणींबरोबर शिकारीला










जाण्यांत, गप्पा मारण्यांत व थट्टामस्करी करण्यांत किती महिने लोटले हें त्याला कळलें नाहीं.

त्याला आपल्या बहिणींविषयीं जितका अभिमान वाटे तितकाच, किंबहुना त्याहूनहि जास्त अभिमान त्यांना आपल्या भावाविषयीं वाटे. दऱ्याखोऱ्यांतून हिंडत फिरत त्यांचा वेळ आनंदानें जाऊं लागला. त्यांची परस्परांशीं चांगलीच ओळख झाली.

एकदां सर्वजण मिळून एका झाडाखालीं खेळत असतां आकाशांत एकाएकीं धुळीचे लोट जमा झाले. सूर्य देखील दिसेनासा झाला. त्याच वेळीं वीज कडाडल्याचा आवाज ऐकूं आला.

सर्व राजकुमारी भिऊन गेल्या व हसनला म्हणाल्या–" तूं जाऊन कोठेंतरी लपून बैस."

सगळ्यांत धाकट्या राजकन्येनें हसनला एका झुडपाआड नेऊन बसविलें.

तिकडे गंधर्वांचें एक मोठें सैन्य येऊन राजवाड्याच्या पटांगणांत दाखल झालें. गंधर्वराजाच्या सन्मानार्थ राजकन्यांच्या वडिलांनीं एक मेजवानी दिली होती. त्या मेजवानीला हजर राहण्यासाठीं राजकन्यांना घेऊन जायला तें सैन्य आलें होतें.

तें कळल्यावर सर्वांत धाकट्या बहिणीनें येऊन हसनला तें सांगितलें व म्हणाली– " तुला एकट्याला येथें ठेवून जावें लागत आहे. पण त्याला नाइलाज. हें घे किल्ल्यांचें जुडगें. आम्ही परत येईपर्यंत या राजवाड्याचा तूंच मालक." नंतर एक नीलमणी बसविलेली किल्ली देत म्हणाली–" या किल्लीनें जें कुलुप उघडेल त्या खोलींत मात्र जाऊं नकोस."

नंतर सातहि बहिणी त्याचा निरोप घेऊन त्यांना घेऊन जाण्यासाठीं आलेल्या सैनिकांबरोबर निघाल्या.






त्या निघून गेल्यावर तो राजवाडा हसनला सुनासुना वाटूं लागला. हसन उदास व दुःखी मनानें सर्व राजवाडाभर फिरला. त्याच्या बहिणींच्या म्हणून ज्या ज्या वस्तु त्याला दिसल्या त्या सर्व त्यानें पाहाल्या. त्या जेथें बसत वा हिंडत तेथें तो कांहीं वेळ बसे. पण त्याच्या मनाला चैन पडेना. हिंडत हिंडत तो जी खोली उघडूं नकोस म्हणून राजकन्येनें सांगितलें होतें त्या खोलीजवळ आला. त्यानें ती किल्ली बाहेर काढली पण त्याला धाकट्या बहिणीनें बजावून सांगितलेली गोष्ट आठवली.

पण त्याच्या मनांत विचार चालू होते. ही खोली उघडूं नकोस असें तिनें कां सांगितलें? असें आहे तरी या खोलींत काय? कांहींहि असो, तिनें बजावून सांगितलें आहे त्या प्रमाणें वागलें पाहिजे. पण ती खोली मनांत सारखी घोटाळूं लागली. त्या मुळें त्याला झोंप देखील आली नाहीं. शेवटीं त्यानें ती खोली उघडण्याचें मनाशीं ठरविलें. तरी उजाडेपर्यंत मनाला आवरून ठेवण्याचा त्यानें निश्चय केला. पण पुन्हां त्यानें विचार केला उघडावयाचें ठरविल्यावर पुन्हां सकाळपर्यंत वाट पाहण्याची तरी काय गरज? त्यानें एक दिवा लावला आणि त्या किल्लीनें दरवाजा उघडून तो आंत गेला.

त्या खोलींत त्याला कांहींच दिसलें नाहीं. टेबल, खुर्च्या, बांकें, गलिचा किंवा चटाई एक देखील वस्तु नव्हती. एका बाजूला एक शिडी मात्र उभी केलेली त्याला दिसली. तो त्या शिडीवरून वर छपरावर गेला.

वर जाऊन पाहिलें तेव्हां त्याला एक दुसरेंच आश्चर्य वाटलें. तेथें त्याला एक सुंदर उद्यान दिसलें. फुलझाडें पुष्कळ होतीं



उद्यानापलीकडे एक सुंदर सरोवर होतें. त्यांत आकाशाचें प्रतिबिंब स्वच्छ व सुंदर दिसत होतें. सरोवरापलीकडे त्याला एक दुसराच विचित्र राजवाडा दिसला. त्या राजवाड्याचें शिखर आकाशाला टेकलेलें होतें. त्या राजवाड्यापासून सरोवरापर्यंत पायऱ्या बांधलेल्या होत्या. सरोवराच्या काठावर एक सुंदर रत्नखचित संगमरमरी बांक होतें. त्या बांकाच्या चारी बाजूला चार गुलाबी रंगाच्या स्फटिकाचे खांब होते व त्यांवर हिरव्या रंगाचा रेशमी चांदवा लावलेला होता. त्या सिंहासनासारख्या बांकाची कारीगिरी राजाच्या सिंहासनाला लाजवील अशी होती.

हसन तें दृश्य अश्चर्य चकित होऊन पहात असतां आकाशांतून दहा पक्षी त्या सरोवराच्या काठीं येऊन उतरले. एक पक्षी त्या सिंहासनावर जाऊन बसला व इतर पक्षी त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहाले. सर्वांत आश्चर्य म्हणजे त्या पक्ष्यांच्या-जागीं हसनला सुंदर स्त्रिया दिसल्या. त्यानंतर त्या, सरोवरांत उतरून स्नान करूं लागल्या. परस्परांवर पाणी उडवीत त्या जलक्रीडा करूं लागल्या. त्यांच्या त्या हंसण्या खिदळण्यानें दिगदिगंत दुमदुमलें.

त्यांच्या पैकीं एक स्त्री फारच सुंदर होती. तिच्या सौंदर्यावर हसन मोहित झाला. तो एका झाडाआड लपून तिच्याकडे टक लावून पाहूं लागला. तिचें चालणें, फिरणें, बोलणें हंसणें सर्वांतच त्याला एक तऱ्हेचें गोड आकर्षण वाटलें.

कांहीं वेळ जलक्रीडा करून सर्व स्त्रिया बाहेर आल्या व वस्त्रें बदलून चांदण्या रात्रींत गाणें म्हणत उद्यानांत हिंडूं फिरूं लागल्या. त्यांपैकीं कोणी तरी एक म्हणाली—"चला आतां, उजाडण्याची वेळ



झाली." लगेच पक्ष्यांचें रूप घेऊन त्या सर्व उडून गेल्या.

हसन बराच वेळ त्या सुन्या जागीं बसून राहाला. तोंपर्यंत प्रेम ही काय वस्तु असते हें त्याला माहीत नव्हतें. पण त्याची जाणीव झाल्यापासून मात्र त्याला ती जागाच काय, स्वत:चें जीवित देखील सुनें सुनें-सें भासूं लागलें. तो दिवस एका युगासारखा वाटला त्याला. पुन्हां संध्याकाळीं तो त्या सरोवराच्या काठीं येऊन बसला. पण त्या दिवशीं त्या स्त्रिया आल्या नाहींत. दुसऱ्या दिवशीं पण आल्या नाहींत.



हसनची भूक, तहान, झोंप सर्व हरपली. त्याचें मन निराश झालें. आतां जिवंत राहण्यांत तरी काय अर्थ आहे? याच विचारांत तो झुरत चालला.

दहा दिवसांनीं गंधर्व राजकन्या आपल्या वडिलांकडून परत आल्या. आल्या-बरोबर सर्वांत धाकटी बहीण त्याच्या शोधार्थ निघाली. हसनची ती दशा पाहून तिला फार वाईट वाटलें. म्हणाली—"ही काय रे तुझी दशा? कसा अगदीं वाळून गेला आहेस. पहा, तुझें तोंड काळ-वंडलें आहे. डोळे खोल गेले आहेत. काय झालें काय तुला? काय तें खरें खरें सांग!"

हसन म्हणाला—"आतां तुझ्याजवळ लपवालपवी कसली? मी करायला नको होती ती चूक केली आणि तिचें फळ भोगीत आहें. मला कोण मदत करणार? असा शेवटीं मी जगाचा कायमचा निरोप घेईन."

"तूं असें मन लहान करून कां घेतोस? आम्ही आहों कीं. तुला सुखी करण्यासाठीं आम्ही सगळ्या बहिणी आपले प्राण जरी वेंचावे लागले तरी त्याला तयार आहों.



पण तूं जर का असा कांहीं हट्ट केलास तर मी तरी विहिरींत उडी टाकीन."

"मी गेल्या दहा दिवसांत कांहीं खाल्लें किंवा प्यालों नाहीं!" असें सांगून घडलेलें सर्व वृत्त त्यानें तिला सांगितलें.

हसनला वाटत होतें कीं जी गोष्ट करूं नकोस म्हणून त्याच्या बहिणीनें त्याला सांगितली होती ती केल्याबद्दल ती रागावेल. पण ती रागावली नाहीं. उलट ती त्याला म्हणाली—"ज्या अप्सरेवर तुझें मन बसलें आहे तिच्याशीं तुझी भेट करून द्यायचा प्रयत्न मी करीन. पण ही गोष्ट तूं इतर बहिणींना सांगतां कामा नये. हें मी तुला सांगून ठेवतें. समज कधीं पुन्हां या दरवाज्याची किंवा त्याच्या किल्लीची गोष्ट निघालीच तर तूं तुला त्या विषयीं जणुंकांहीं, माहीतच नाहीं असें दाखव. तुला कोणी विचारलेंच कीं तूं असा कां वाळून कांटा झाला आहेस तर एवढेंच सांग कीं तुमच्या साठींच!"

नंतर ती आपल्या बहिणींना जाऊन म्हणाली—"पाहिलेंत आपल्या गैरहजेरींत हसनची काय दशा झाली आहे ती. बिचारा खाटेला खिळला आहे. तो आपल्या आईची आठवण काढतो आणि रडत असतो. अगदीं पहावत नाहीं अशी झाली आहे दशा त्याची.

तें ऐकून गंधर्वकन्यांना पण फार वाईट वाटलें. त्यांनीं त्याच्याकडे धांवत जाऊन विचारपूस केली. त्यांनीं आपल्या वडिलांच्या देशांतून जे जे खाद्यपदार्थ आणले होते ते त्याला खायला दिले. जें जें त्यांनीं पाहिलें तें त्याला सांगितलें.

पुरा एक महिना त्यांनीं त्याची सेवा केली, तेव्हां त्याची तब्येत थोडी थोडी सुधारली.



पुढें कांहीं दिवसांनीं गंधर्वकन्या शिकारी साठीं निघाल्या. सर्वांत धाकटी बहीण हसन-ला मदत करण्यासाठीं म्हणून एकटी मागें राहाली.

सर्व बहिणी निघून गेल्यावर ती हसनला सरोवराकाठच्या बागेंत घेऊन गेली. म्हणाली—"पहा, या सरोवराच्या काठावर आंघोळीसाठीं किती सुंदर पायऱ्या बांधल्या आहेत. तूं ज्या स्त्रीवर मोहित झाला आहेस तिनें कोठें आंघोळ केली होती?" हसननें तिला ती जागा दाखविली.

"असें होय! त्या तर गंधर्व राजाच्या मुली होत्या व त्यांच्याबरोबर आलेल्या त्यांच्या कांहीं मैत्रिणी! त्या गंधर्व राजाच्या पदरींच आमचे वडील नोकरी करतात. गंधर्व राजाच्या सर्वांत धाकट्या मुलीवरच बहुतेक तूं भाळला असशील. गंधर्व राजा-च्या नगरीं मनुष्यांना काय, पण इतर गंधर्वांना देखील प्रवेश मिळत नाहीं. त्या मुली दर पौर्णिमेला पक्ष्याचा वेष करून या सरोवरावर जलक्रीडेला येतात. आंघोळ झाल्यावर पुन्हां पक्ष्यांचें रूप घेऊन निघून जातात. पक्ष्यांचा तो वेष नसला तर गंधर्वलोकांत जातां येणार नाहीं. तूं येथेंच लपून रहा व पक्ष्यांचा वेष काठावर ठेवून ती पाण्यांत उतरली कीं तूं तिचा वेष लपवून ठेवून दे. तिनें किती विनवण्या केल्या तरी तिला तो परत देऊं नकोस. तूं तिला तो वेष दिलास तर तुझ्याबरोबर आम्ही व आमच्या बरोबर आमचे वडील सर्वां-च्याच जिवाला धोका आहे. तूं तिचे केस धरून तिला ओढून घेऊन ये. ती तूं सांगशील तें कबूल करील. त्यानंतर काय हें करायचें पाहून घेऊं."

हसनला फार आनंद झाला. तो आपल्या बहिणीबरोबर परत राजवाड्यांत आला.



दिवसभर तो त्या राजकन्यांबरोबर गप्पा मारीत बसला.

दुसऱ्या दिवशीं पौर्णिमा होती. संध्या-काळ झाल्याबरोबर तो सरोवराच्या कांठीं जाऊन एका झाडाआड लपून बसला. थोड्या वेळानें गंधर्वराजाची ती कन्या आपल्या बहिणी व मैत्रिणींबरोबर त्या सरो-वरावर स्नानास आली. पक्ष्यांचीं वस्त्रें काठावर टाकून त्या पाण्यांत उतरल्या. हसन भीतभीत तेथें गेला व ज्या गंधर्व राजकन्येवर त्याचें मन बसलें होतें तिच्या वांटचा तो पक्षीवेष उचलून घेऊन तेथेंच लपून बसला.

थोड्या वेळानें ती पाण्यांतून बाहेर आली. पण तेथें आपला तो पक्षीवेष नसलेला पाहून ती जोरानें ओरडली. तिचा आवाज ऐकून तिच्या बहिणी व मैत्रिणी पाण्यांतून बाहेर आल्या. सर्व वृत्त त्यांना देखील कळलें. त्यांनीं तिला मदत तर केली नाहींच, आपली सुद्धां अशीच दुर्गत व्हायची कदाचित, असा विचार करून पक्षीरूप घेऊन त्या उडून गेल्या. ती राजकन्या एकटीच मागें राहाली.

आतां ती एकटी होती. अगदीं घाबरून गेली होती. त्यावेळीं हसन पुढें आला. तिला पाहून-विशेषकरून ती घाबरलेली पाहून, हसनचें हृदय द्रवलें. ती त्याला पाहतांच सरोवराकडे धांवली. तो तिला धरायला धांवला. शेवटीं तिचे केस धरून तो तिला ओढून घेऊन आला. तिनें देखील डोळे मिटून त्याच्याबरोबर चालण्याचें ठरवल्यासारखें भासलें. हसन तिला धरून आपल्या खोलींत घेऊन गेला. त्यानें तिला खोलींत बंद केलें व आपल्या बहिणीकडे गेला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# ❋ विवेकानंदांचें बालपण ❋

कलकत्याला विश्वनाथ दत्त नांवाचे एक नामां-कित वकील होते. १२ जानेवारी १८६३ रोजीं त्यांच्या पत्नी सौ. भुवनेश्वरीदेवी यांना एक पुत्ररत्न झालें. आई वडिलांनीं त्याचें नांव नरेंद्र असें ठेवलें. मुलगा कुशाग्रबुद्धि व अत्यंत खोडकर होता. दोन दाई होत्या त्याला पाळायला. पण त्याला आवरणें कठीण जाई. कधीं त्यानें हट्ट धरला कीं मनांत येईल तें होईपर्यंत तो कोणाचें ऐकत नसे. पण आईनें हलुच शंकराच्या नांवाचा उच्चार त्याच्या कानाजवळ केला कीं लगेच तो आपला हट्ट सोडून देई.



त्याची शरीरयष्टी उत्तम होती. तो नित्य नियमित व्यायाम करी कुस्तीची त्याला हौस होती. लाठी, फुटबॉल वगैरे खेळांची त्याला फार आवड होती. त्यामुळें शरीर सौष्ठवाबरोबर शारीरिक शक्तीचा लाभ पण त्याला झाला होता.

गरिबांविषयीं त्याच्या मनांत फार कळकळ होती. जें त्याच्या जवळ असे तें तो गरिबांना वांटून टाकी. या साठीं एकदां आईनें रागावून त्याला एका खोलींत कोंडून ठेवलें. त्या वेळीं एक भिकारी घरासमोर भीक मागायला आला. खोलींत दुसरें कांहीं द्यायला नव्हतें. आईचें एक पातळ होतें. तेंच त्यानें खिडकींतून बाहेर त्या भिकाऱ्याच्या हातांत फेंकलें. गरीब व गरजू लोकांवरचें त्याचें हें प्रेम वयाबरोबर वाढतच गेलें.

विद्याभ्यासांत देखील नरेन्द्र हुशार निघाला. प्रत्येक विषयांत त्याचा पहिला नंबर असे. एकदां गुरुजी वर्गांत शिकवीत असतां सर्व मुलें गडबड करीत होतीं. मास्तरांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं बरोबर उत्तरें फक्त नरेन्द्रच देऊं शकला.

त्याच्या साहसाचें एक उदाहरण पहा. एकदां तो आपल्या सवंगड्याबरोबर शेजाऱ्याच्या झाडावर चढून खेळायला म्हणून गेला. मुलें हात पाय मोडून घेतील या भीतीनें तो शेजारी त्यांना म्हणाला—"या झाडावर भूत आहे! तुम्ही कोणी चढूं नका!" पण नरेन्द्र झाडा-वर चढला व आपल्या मित्रां-ना म्हणाला—"अरे भूत-बीत कांहीं नाहीं. चला रे सर्व!"

नरेन्द्राच्या मनांत लहानपणा पासूनच देवावर विश्वास होता. देवाचें प्रत्यक्ष दर्शन व साक्षात्कार घडावा म्हणून त्यानें तपश्चर्या केली व गुरु रामकृष्ण परमहंस यांच्या कृपेनें त्याची ती इच्छा पण पूर्ण झाली.

संन्यास घेतल्यावर नरेन्द्र विवेकानंद या नांवानें प्रसिद्ध झाला. त्याच्या ज्ञानाचा प्रकाश जगभर पसरला. त्याची शतसांवत्सरी या वर्षीं हिंदुस्तानभर थाटामाटानें साजरी होत आहे.



# भीमूचे पराक्रम

एका गांवीं भीमूच्या सासऱ्याच्या म्हणजे जमीनदाराच्या नातेवाइकाची मुलगी वारली. त्यांना भेटायला जमीनदार सकुटुंब निघाला. अर्थातच भीमू पण बरोबर होताच. सर्व प्रेताजवळ बसून रडत होते. असला प्रसंग त्यापूर्वी त्यानें कधीं पाहिला नव्हता. प्रेताला आंघोळ घालणें, नवीन वस्त्रें घालणें, मंत्रोच्चार स्मशानयात्रा, दहन संस्कार, नवऱ्यानें बायकोला अग्नि देणें वगैरे गोष्टी भीमूला विचित्र वाटल्या.

अन्त्येष्टिक्रिया झाल्यानंतर देखील भीमू-च्या मनांत त्याच गोष्टी घोळत होत्या. रात्रीं स्वप्नांत देखील त्याच गोष्टी त्याला दिसूं लागल्या. पण तो मृतदेह मात्र बदलला होता—त्याच्या स्वतःच्या बायकोचा—लक्ष्मीचा होता. सर्व रडत होते. तिला आंघोळ घातली व तिला स्मशानांत नेण्यांत आलें. अग्नि घेऊन त्यालाच पुढें चालावें लागलें होतें. चिता रचून तिच्यावर देह ठेवण्यांत आला व त्यानेंच अग्नि दिला. चिता पेटली व त्यांत लक्ष्मीचा देह जळून गेला. स्वप्नांतच तो जोरजोरानें रडूं लागला.

पण तें ऐकून लक्ष्मीची झोंप मोडली. तिनें त्याला जागें करून विचारलें—"झालें तरी काय?"

भीमू बायकोचा आवाज ओळखून घाबरून जाऊन ताडकन उठला आणि उभा राहून म्हणाला—"तूं तर मेली होतीस! मी स्वतः तुझ्या देहाला अग्नि दिला. तूं भूत आहेस. हो बाजूला."

लक्ष्मी हंसत म्हणाली—"कांहीं तरी अशुभ स्वप्न पडलें वाटतें. अहो, मी अजून जिवंत आहें—पहा समोर उभी आहें."

पण भीमूच्या मनावर स्वप्नाचा असा कांहीं पगडा बसला होता कीं त्याला स्वप्नच खरें वाटलें व लक्ष्मीचें बोलणें खोटें भासलें. म्हणाला—"नाहीं, तूं भूत आहेस!" असें सांगून खोलीच्या एका कोपऱ्यांत बसून त्यानें डोळे घट्ट मिटून घेतले. लक्ष्मीला काय करावें हें सुचेना.

उजाडल्यावर भीमू आपले सर्व कपडे आवरून घरीं निघून जाण्याची तयारी करूं लागला. बायकोनें विचारलें—"कोठें निघा-लांत?"

"मी आतां या घरांत राहणार नाहीं. आजीकडे जातों आहें." भीमू म्हणाला.

"ठीक आहे. जाऊन या आजींना भेटून! त्यांना देखील या विचारून! पण जातांना, कां तिकडे जात आहां, कोणाला सांगूं नका म्हणजे झालें." लक्ष्मी म्हणाली. कारण लक्ष्मी भूत झाली आहे म्हणून स्वारी बडबडत गेली तर गांव भर हंसूं व्हायचें.

भीमू कांहीं एक बोलल्या शिवाय आजी-कडे निघाला. त्याला पूर्वी कधीं स्वप्न पडलें नव्हतें म्हणून स्वप्नांत पाहिलें तें सर्व खरेंच वाटलें.



स्वप्न पडलें ] [ श्री. मा. गो. मोरे

सकाळीं जावई बापू दिसत नाहींत हें पाहून सर्व विचारपूस करूं लागले. लक्ष्मी म्हणाली—"रात्रीं कांहीं तरी वाईट स्वप्न पडलें. आजीला भेटायला गेले आहेत."

वाटेंत भीमू एका धर्मशाळेंत उतरला. तेथें रात्रीं झोंपल्यावर त्याला आणखी एक स्वप्न पडलें. त्याची आजीच वारली. त्याच्या चारीबाजूला त्याचे गांवकरी एकत्र होऊन विचारपूस करीत होते. त्यालाच आजीची अन्त्येष्टीक्रिया करावी लागली. तो जोर जोरानें रडूं लागला—"बायको मेली, आजी पण सोडून गेली! आतां मी तरी जिवंत राहून काय करूं?" स्वप्नांतच तो रात्रींत गडबडा लोळत रडत होता.

पण झोंप मोडल्यावर उठून पाहातो तर तो धर्मशाळेंतच होता. कपड्यांना राख लागलेली नव्हती. तेव्हां भीमूला कळलें कीं त्यानें जें पाहिलें तो सर्व भ्रम होता. भीमू त्याच विचारांत घरीं पोचला. आजी जिवंत होती. तिनें भीमूला सासुरवाडची खुशाली विचारली. त्यानें तिला येण्याचें कारण विचारलें. भीमूनें कांहीं लपवून ठेवलें नाहीं. सर्व सांगून टाकलें.

सर्व ऐकून आजी म्हणाली—"अरे वेड्या! तुझ्या बायकोनें सांगितलें तें सर्व खरें होतें—तें सर्व स्वप्न होतें. स्वप्नांत पाहिलेलें तुला खरें वाटलें. तुला स्वप्न ही गोष्टच मुळी नवी आहे. पुढें लक्षांत ठेव. बायको सांगेल तें सर्व ऐकत जा आणि तसा वागत जा! उगाच असें कांहीं तरी वेड्यासारखें करूं नकोस."

त्या दिवशीं आजीकडेच राहून भीमू दुसऱ्या दिवशीं सासुरवाडी परतला.

[ पुढल्या महिन्यांत आणखी एक पराक्रम ]





# स्वतःचें घाळ

मोठ्या नातवाची परीक्षा जवळ आली होती आणि स्वारी खेळांत गर्क होती. तेव्हां आजोबांनीं त्याला विचारलें—"कायरे, परीक्षा जवळ आली आणि तूं गांवभर भटकतोस काय? बसून वाच कांहीं!"

"पुस्तकें काय वाचायची आजोबा? सर्व मुख्य धडे मी वाचले आहेत. गेल्या वर्षी देखील मी असाच पास झालों होतों." मोठा नातू ऐटींत म्हणाला.

"असा गर्व करूं नये. तुझ्या या गप्पां वरून मला एका घमेंडखोर शिकाऱ्याची आठवण झाली. युक्ति माणसाला वेळीं अवेळीं उपयोगी पडते. पण तिच्यावर विसंबून राहणाराला कधींकधीं तोंडघशी पडावं लागतं." आजोबा म्हणाले. शिकाऱ्याचें नांव ऐकतांच मुलें धांवत आलीं.

"शिकाऱ्याची गोष्ट काय आजोबा? सांगा आम्हांला त्या शिकाऱ्याची गोष्ट!" आजोबांनीं नाकांत तपकीर कोंचली व गोष्ट सांगू लागले.

एक शिकारी होता. शिकार करण्यांत तसा कांहीं पटाईत नव्हता. पण रानटी जनावरांच्या ओरडण्याची तो छान नकल करी. हरणें दिसलीं कीं हरणांसारखें बोले. त्याचा आवाज ऐकून हरणें जवळ आलीं कीं तो बाण मारी.

शिकारीची गोष्ट सोडा, स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं सुद्धां तो तशीच कांहीं तरी युक्ति करी. एकदां त्यानें हरणासारखा आवाज काढल्याबरोबर लांडगे आले. लांडग्यांना त्याचा वास माहीत असता तर त्यांनीं फाडून खाल्लें असतें त्याला. पण तो

सिंहासारखा आवाज काढी. तो ऐकून लांडगे भिऊन पळून जात. कधीं वाघ आल्यासारखें वाटलें कीं तो अस्वलासारखा आवाज करी आणि तो ऐकून वाघ पळून जात. त्या शिकाऱ्याला युक्ति व स्वतःची शक्ति यांतील भेदच मुळीं कळत नव्हता. स्वतःला जगांत सर्वांत मोठा शिकारी समजून तो घमेंडींत रहात असे.

एकदां एका झाडाआड उभा राहून तो हरणासारखा ओरडला आणि हरणा-ऐवजीं लांडगेच येऊन थडकले.

लांडग्यांना पाहून तो वाघासारखा ओरडला. लांडग्यांना वाटलें कीं वाघ असावा आणि ते पळून गेले. पण वाघाचा आवाज ओळखून एक वाघच तिकडे आला. शिकारी अस्वलासारखा ओरडूं लागला. तो आवाज ऐकून व खरें अस्वल येत आहे असें वाटल्यानें वाघ मागें सरकला. पण एका बाजूनें दोन अस्वलें आलीं व त्यांना कसें पळवून लावावें हें त्याला सुचेना. म्हणून त्यानें तेथून पाय काढण्याचा विचार केला. पण अस्वलें का त्याला सोडणार? त्यांनीं त्याला फाडून खाल्लें. तो जर का चांगला शिकारी असता तर हरण असो कीं वाघ असो, लांडगा असो कीं अस्वल असो, तेथून पळून जाण्याचा विचारच त्याच्या मनांत आला नसता. त्यानें एका क्षणांत त्यांना ठार केलें असतें. अशा युक्त्या शोधीत तो बसला नसता."

आजोबांनीं गोष्ट सांगून मोठ्या नात-वाला सावध केलें—"गेल्या वर्षी युक्तीनें पास झाला असशील. पण दर खेपेला ती तुझ्या उपयोगी पडेल असें समजून बेऊं नकोस."





# अरण्यकांड

झाडेंझुडपें कापीत व जंगल साफ करीत राम लक्ष्मण जनस्थान पार करून तीन कोस दूर क्रौंचारण्य नांवाच्या वनांत येऊन पोंचले. वाटेंत सीतेविषयीं विचार पूस करीत क्रौंचारण्य पार करून ते मातंग ऋषींच्या आश्रमाजवळ येऊन पोंचले. तेथें त्यांना एक मोठी गुहा दिसली. त्या गुहेंत काळोख होता.

राम लक्ष्मण त्या गुहेजवळ पोंचल्याबरोबर त्यांना आंतून घाण वास आला व समोर एक राक्षसीण येऊन उभी राहाली. गुहे-सारखें मोठें तोंड, मडक्यासारखें पोट डुकरासारखे मोठे दांत व मगरी सारखें खडबडीत अंग सर्वच भयंकर. ती वाघा-सिंहांना फाडून खात असे. राम लक्ष्मणांना पाहून ती पुढें आली. तिनें लक्ष्मणाला पकडलें.

ती त्याला म्हणाली—"माझें नांव अयोमुखी आहे. इतक्या दिवसांनीं मला मना-सारखा एक प्रियकर मिळाला आहे. चल आपण दोघं लग्न करून घेऊं. हें सर्व जंगल माझेंच आहे. यांत आपण मनसोक्त विहार करूं."

लक्ष्मणाला राग आला. त्यानें तलवार उपसून तिचे नाक-कान कापून टाकले. एक तर दिसायला ती तशीच विद्रूप होती. नाक व कान कापल्यावर तर तिचें रूप

जास्तच भयंकर दिसूं लागलें. ती ओरडत किंकाळ्या फोडीत पळून गेली.

नंतर दोघे पुन्हां सीतेच्या शोधार्थ पुढें निघाले. थोड्या वेळानें त्यांना एक भयानक आवाज ऐकूं आला. सारे आकाश दुमदुमलें. ज्या बाजूनें तो आवाज ऐकूं आला त्या दिशेला दोघे गेले. एका झाडाखालीं त्यांना एक विचित्र आकृति दिसली.

ती आकृति म्हणजे जणुं कांहीं एक लहानशी काळी कुट्ट टेकडीच. तिला डोकें नव्हतें कीं गळा नव्हता व पाय देखील नव्हते. छातींत एक डोळा होता. पोटा खालीं तोंड होतें. त्या विचित्र आकृतीला हात मात्र होते.

ती विचित्र आकृति म्हणजे कबंध राक्षस. तो एका जागीं बसून आपल्या लांब व बळकट हातांनीं दुरून जाणाऱ्या जनावरांना किंवा माणसांना धरून खात असे.

राम व लक्ष्मण जवळ पोंचतांच त्यानें दोघांना धरलें आणि त्यांना ओढूं लागला. त्याच्या अंगांत जेवढें बळ होतें तें एकवटून त्यांनीं दोघांनीं स्वतःची सुटका करून घेण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण सर्व फुकट गेला.



लक्ष्मण म्हणाला—“दादा! मी याच्या हातीं बळी गेलों तरी चालेल. तूं सुटका करून सीतेच्या शोधार्थ जा.”

राम लक्ष्मणाला धीर देत होता. इतक्यांत कबंध म्हणाला—“दोघांनीं कोठें जाण्याची गरज नाहीं. माझ्या पोटांत तुमच्यासाठीं पुष्कळ जागा आहे!”

तें ऐकून रामाची देखील पांचावर धारण बसली. क्षणभर पूर्वीं त्यानें लक्ष्मणाला धीर दिला होता. पण आतां तो स्वतःच भयभीत होऊन म्हणाला—“भाग्यच विरुद्ध असल्यावर कोण रक्षण करणार? आपलें दोघांचें शौर्य आज निरुपयोगी ठरणार. शूर रणांगणावर मरतात. पण नशिबीं अशा तऱ्हेनें मरण लिहिलें आहे कीं काय?”

पण लक्ष्मणाला चेव चढला. तो रामाला म्हणाला—“दादा! हा आपल्याला आतां गिळणार. याचें सर्व बळ याच्या हातांत आहे. याचे हातच कापून टाकूं या.”

कबंधनें तें ऐकलें व त्यांना गिळण्यासाठीं त्यानें ‘आ’ पसरला. पण त्याच वेळीं रामानें त्याचा उजवा हात व लक्ष्मणानें डावा हात तलवारीचा एकच वार करून कापून टाकला.





तेव्हां कबंध जोरानें ओरडत जमिनीवर आदळला.

त्यानें रामलक्ष्मणाला विचारलें—"कोण तुम्ही ?" लक्ष्मणानें दोघांची ओळख सांगून विचारलें—"आणि तूं कोण ? तुझें हें विचित्र रूप तुला कसें काय मिळालें आणि या रानांत तूं कां रहात आहेस ?"

"तरमग तुम्हीच का राम व लक्ष्मण ? बरें झालें कीं मी याच रानांत आलों. मी स्वतःची गोष्ट सांगतों." असें सांगून कबंध आत्मवृत्त सांगूं लागला. म्हणाला—"पूर्वी इंद्र देखील माझ्या हातचा मार खाऊन समोरून पळाला आहे. हें रूप घेऊन ऋषी व मुनींना मारून खाणें हाच माझा मुख्य धंदा व आहार होता.

"एकदां स्थूलशिर नांवाच्या मुनींना मला ह्या रूपांत पाहिलें व त्यांनीं मला शाप दिला कीं तुला हेंच रूप कायमचें राहील. तेव्हांपासून मी असा आहें. पण मी मुनींच्या पायां पडून त्यांची क्षमा मागितली. तेव्हां ते म्हणाले—"राम या वनांत येईल तेव्हां तुझे दोन्ही हात कापून टाकील व तुझा दहन संस्कार करील. तेव्हां तुला स्वस्वरूप प्राप्त होईल.

"स्थूलशिर ऋषींच्या शापांतून आज मी मुक्त होत आहें. मी पूर्वीं तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें होतें. ब्रह्मदेवानें मला दीर्घायुष्य दिलें आहे. म्हणून प्रत्यक्ष देवेन्द्रानें जरी वज्राचा आघात केला तरी माझ्या केसाला देखील धक्का लागणार नाहीं, असा विचार करून मी त्यालाच युद्धासाठीं आव्हान केलें. तेव्हां इंद्रानें वज्र टाकून माझें डोकें व पाय माझ्या अंगांत चेपून माझी ही दशा केली. हें रूप घेऊन मी कोठें जाणार व काय करणार ? मी इंद्राचेच पाय धरून क्षमा मागितली व मला या रूपांत जिवंत ठेवण्याऐवजीं माझा जीव घेऊन मला मुक्त कर अशी विनंति केली. पण इंद्र म्हणाला—"तुला ब्रह्मदेवानें दीर्घायुष्य दिलें आहे. तेव्हां तुझा प्राण हरण करणें माझ्या हातीं नाहीं."

पण मला खायला प्यायला तोंड देखील राहिलें नाहीं. मग जिवंत कसें रहावयाचें ? मीच इंद्राला प्रश्न केला.

तेव्हां इंद्रानें मला हे लांब हात दिले. पोटांत तोंड करून दिलें. त्यानंतर स्थूलशिर ऋषींनीं शाप दिला. आज मी त्या शापांतून मुक्त होत आहें. आजपर्यंत जीव जन्तु, मनुष्य जो कोणी मिळे त्यांना खाऊन मी आपला उदर निर्वाह करीत आलों."

कबंधाचें आत्म वृत्त संपल्यावर राम म्हणाला—"रावण सीतेला उचलून घेऊन गेला आहे. त्याचें नांव मला माहीत आहे. पण तो राहतो कोठें हें नाहीं मला माहीत. त्याच्या अंगांत किती बळ आहे, त्याच्या जवळ कोणकोणती शस्त्रास्त्रें आहेत व त्याच्या मदतीला कोण कोण आहे यापैकीं एका गोष्टीची देखील मला माहिती नाहीं. सीतेच्या शोधार्थ आम्ही निघालों आहों. या प्रयत्नांत तुझ्या मदतीची मला अपेक्षा आहे."





कबंध म्हणाला—"मला आतां तरी दिव्य ज्ञान नाहीं. पण तूं माझी दहन क्रिया करून मला मुक्त केलेंस तर मला पुन्हां स्वस्वरूप मिळेल. तेव्हां मी तुला शक्य तेवढी मदत करीन."

राम लक्ष्मणांनीं त्याच्यासाठीं एका जागीं चिता रचली व चितेवर त्याचा तो विचित्र देह ठेवून अग्नि दिला. त्या चितेंतून एक दिव्य देह धारी पुरुष सुंदर वस्त्रालंकार परिधान करून प्रगट झाला. तो हंसांच्या विमानांत बसून आकाशांत उडत असतां म्हणाला—"सीतेच्या शोधार्थ तूं जात आहेस. या कामीं तुला वानरांचा सुग्रीव राजा याची मदत मिळेल. तो देखील स्वतःचें राज्य घालवून बसला आहे. मोठ्या भावाच्या भीतीनें तो पंपासरोवरानजीक ऋष्यमूक पर्वतावर रहात आहे. त्याच्याबरोबर त्याचे चौघे मंत्रीपण आहेत. तो वालीचा धाकटा भाऊ आहे. पराक्रमी आहे व सत्यभाषी आहे. सीतेचा शोध काढण्याच्या कामीं तो तुझी मदत करूं शकेल. तूं प्रथम त्याच्याकडे जा. अग्नीला साक्षी ठेवून त्याच्याशीं सख्य करून घे. तो मागेल ती मदत तूं त्याला दे व तो तुला मदत करील. त्याच्याकडे वानरांचें फार मोठें सैन्य आहे. ते सीतेचा शोध काढण्याचा कामीं तुला मदत करूं शकतील." एवढें सांगून व ऋष्यमूक पर्वताकडे जाण्याची वाट दाखवून कबंध निघून गेला.

सुग्रीवाला भेटण्यासाठीं राम व लक्ष्मण पंपा सरोवराकडे निघाले. ते दुसऱ्या दिवशीं पंपा सरोवराच्या पश्चिमी किनाऱ्यावर येऊन पोंचले. तेथेंच शबरीचा सुंदर आश्रम होता.

आश्रमांत मातंग मुनि रहात असत. त्यांची शिष्यमंडळी पण बरीच मोठी होती. शबरी नांवाची एक वृद्ध संन्यासिनी त्या सर्वांच्या सेवेला होती. रामचंद्र चित्रकूट

पर्वतावर येऊन राहूं लागला. त्या वेळीं मातंग ऋषींचे शिष्य आपले ऐहिक कार्य संपूर्ण झालें असें ठरवून स्वर्गारोहण करण्यापूर्वी तिला म्हणाले होते कीं राम तुझ्या आश्रमांत येईल. त्याचा सत्कार करून त्याचे आशीर्वाद घे. तुला सद्गति लाभ होईल!" तेव्हां पासून शबरी रामाच्या दर्शनाची प्रतीक्षा करीत आपल्या आश्रमांत बसून होती. दर रोज ती रानांतली फळें रामचंद्राला अर्पण करण्यासाठीं एकत्र करून ठेवीत होती. पण इतक्या वर्षांनीं तिला तिच्या श्रमाचें फळ लाभलें."

शबरीनें राम लक्ष्मणांना नमस्कार केला. तिनें रामाला आपला आश्रम दाखविला. आश्रमांत मुनींनीं आपल्या तपोबलानें त्या आश्रमांत सप्तसमुद्र निर्मित केले होते. त्यांची यज्ञ वेदिका पण आजपर्यंत जशीच्या तशी होती. हार, तुरे, फुलें व फळें मुनींनीं यज्ञासाठीं एकत्र केलीं होतीं तीं. सर्व तशी ताजी व टवटवीत होतीं. तें दिव्य दाखवून शबरी रामाला म्हणाली—"रामा! तुझ्या दर्शनानें माझें इहकार्य संपलें. आतां मी आपल्या धन्यांच्या म्हणजे मातंग मुनींच्या शिष्यांच्या दर्शनासाठीं स्वर्गांत जातें." नंतर शबरीनें अग्नि-प्रवेश केला व ऊर्ध्व दिशेला निघाली.

रामानें सप्त समुद्रांचें स्नान केलें. तर्पणादि केल्यावर त्याच्या मनाला एक तऱ्हेचें समाधान वाटलें. पुढील कार्याबद्दल त्याचा उत्साह वाढला व मनांत नवीन आशा उत्पन्न झाली. तो लक्ष्मणाबरोबर पंपा सरोवरावर गेला. स्नान करून लक्ष्मणाला म्हणाला—"लक्ष्मणा! या सरोवरा नजीकच कोठें तरी ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव राहातो. तूं त्याच्याकडे जा." [अरण्यकांड संपूर्ण]





# १६. ग्रेट स्फिन्क्स

ही जगांतली सर्वांत मोठी दगडी मूर्त किंवा पुतळा आहे. ही जगांतली सर्वांत जुनी अशी मूर्त पण आहे. ही अंदाजें ५००० वर्षे जुनी मूर्त आहे. १८९ फुट उंचीची ही मूर्त एक टेकाडें पोखरूनच कोरलेली असावी. मूर्तीचे पुढील पाय निराळ्या दगडांचे आहेत. या मूर्तीचें शरीर सिंहाचें व डोकें माणसाचें आहे. हें डोकें प्राचीन काळांतील इजिप्त देशाचा राजा फराओ याचें असावें. सिंहाचें शरीर २४० फुट लांब व उंची ६६ फुट आहे. त्याच्या पायावर वाळूचे थर जमा होऊन पाय दिसतनासे झाले आहेत. वाळवंटांत सोसाट्याचा वारा सुटला म्हणजे पुतळ्याच्या मानेपर्यंत वाळूचा ढीग सांचत असे. मुसलमानांनीं स्वारी केली तेव्हां त्यांना फक्त तोंडच दिसलें. ही देवाची मूर्त असेल असें समजून त्यांनीं तोडण्याचा प्रयत्न करून पाहिला. या मूर्तीचें ऐतिहासिक महत्व ओळखून इजिप्तच्या सरकारनें वाळूचा ढीग बाजूला सारून मूर्तीचा जीर्णोद्धार केला. आज जगांतील आश्चर्यांमध्यें ही मूर्त एक मुख्य आहे.






[ १४ ]

[लखू व त्याचे साथी जयमल आणि तो जंगली तरुण तिघांची भेट लखूच्या म्हाताऱ्या बापाशीं झाली. परंतु ते परस्परांशीं कांहीं बोलण्यापूर्वीच नरभक्षक मंडूकेश्वराच्या अनुयायांशीं युद्ध करीत असतां स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं त्यांना पळून जावें लागलें. लखू व त्याचे साथी एका डोंगराच्या टोंकाला येऊन पोंचले. तेथें एका गुहेंत त्यांना एक भयंकर सांप दिसला. पुढें वाचा]

लखू व जयमल गुहेंत सांप दिसल्यावर गुहेच्या खिंडारांतून बाहेर पहात होते. पण त्यांचा साथी जंगली तरुण गुहेंतच खोल अंधारांत कांहीं तरी न्याहाळून पहात होता. त्याला एका कोपऱ्यांत धनुष्यबाण दिसले. तो चटकन पुढें गेला व धनुष्य उचलून घेतलें. दोरी बांधली व भाता खांद्याला बांधून तो धांवत लखू व जयमल उभे होते तेथें येऊन उभा राहाला.

दोघांना आश्चर्य वाटलें. लखूनें विचारलें—"तुला धनुष्यबाण कोठें मिळाले? आणि तीर सोडण्याची तयारी दिसते आहे? तूं त्या भयंकर सांपावर किंवा त्या विचित्र जनावरावर सोडणार आहेस कीं काय?"



गोमान्गानें होकारार्थी मान हलवल्यावर लखूनें त्याचा हात धरला—"तुझ्या एका बाणानें त्यांच्यापैकीं एक देखील मरणार नाहीं. पण ते दोघे आपल्याला खायला मात्र येतील इकडे! पण तुला हे धनुष्य-बाण कोठें मिळाले?"

त्या जंगली तरुणानें गुहेंतला तो कोपरा दाखविला. लखू तिकडे धांवला व एक धनुष्य उचलून घेऊन म्हणाला—"वेळेवर हें धनुष्य आपल्याला मिळालें. तो जयमल उभा होता तेथें आला आणि म्हणाला—"चल, लवकर बाहेर पळालें पाहिजे."

"हे धनुष्य व बाण, ज्यांचे अस्थिपंजर आपल्याला येथें दिसत आहेत त्यांचे असावेत. पण हे दोघे येथें आले का व कोणी ठार केलें यांना?" जयमलनें लखूला विचारलें.

"या प्रश्नाचें उत्तर मिळण्यापूर्वीच कदाचित आपण त्यांच्या शेजारीं जाऊन पडूं?" लखूला जयमलचा तो संथपणा रुचला नाहीं.

जयमल पुढें कांहीं बोलणार, तेवढ्यांत तो सांप व तो भयंकर प्राणी गुहेच्या मागच्या बाजूला येऊन आदळले. त्यांच्या धक्क्यानें सारी गुहा हादरली. ते उभे होते ती जागा एकदम खचली व एका मोठ्या खड्ड्यांत ते तिघे पडले. सुदैवानें तिघांना बेताचीच इजा झाली.

तिघांनीं उठून अंगावरची धूळ व माती झाडली व उठून उभे राहाले. फक्त अंग खरचटलें होतें. "नशीब म्हणून आपण वांचलों!" लखू म्हणाला.

"तें खरें, पण या गुहेंतून बाहेर कसें निघावयाचें?" जयमल म्हणाला.

गोमान्ग रांगत त्या खड्ड्याच्या एका टोंकाला गेला व मागें वळून म्हणाला—"लखू! आपण वांचलों आतां कसली देखील भीति नाहीं. आपण या डोंगरांतल्या गुहांच्या जाळ्यांत सांपडलों असलों तरी मला दूर उजेड दिसतो आहे. आपण त्या बाजूला रांगत रांगत जाऊं या. बाहेर निघालों कीं मग कसली भीति नाहीं."

गोमान्गच्या सांगण्याप्रमाणें दोघे तो उभा होता तेथें गेले. त्यांना देखील दूर उजेड दिसला. ज्या भोकांतून उजेड येत आहे तें गुहेचें तोंड असणार. पण तेथें पोंचेपर्यंत वाटेंत किती अडथळे येतात कोण जाणें? आणि तेथें पोंचल्यावर जर का समोर दरी असली तर बाहेर निघणें अशक्य!

तरी धीर करून जयमल म्हणाला—"चला जाऊं या. गुहेंत मागें पुढें वाटाच वाटा दिसत आहेत. पण आपण कोणत्या वाटेनें सुरक्षित जागीं पोंचूं हें देवच जाणें. म्हणून ज्या बाजूनें उजेड दिसत आहे त्या बाजूनेंच प्रथम जाऊन पाहूं या."

लखू पुढें निघाला व दोघे त्याच्या पाठोपाठ चालूं लागले. लखूला त्याच्या म्हाताऱ्या बापाची फार काळजी वाटत होती. आतां तर स्वतःचा बचाव कसा करून घ्यायचा हाच प्रश्न समोर उभा होता. या गुहांच्या जाळ्यांतून सुटका मिळणें हें मोक्षपटांतील सांप व शिड्यांच्या चढाओढी



सारखें वाटूं लागलें. त्यांचीं पावलें भीतभीत पुढें पडत होतीं. जयमलनें तें ओळखलें व म्हणाला—"लखू! देवावर भरंवसा ठेवून पुढें चल. समोर जो उजेड दिसत आहे तोच या निराशेच्या वेळीं आपल्याला आधार आहे."

जयमल बोलतच होता, तेवढ्यांत मध्यें त्यांना एक विलक्षण आवाज ऐकूं आला. कांहीं वेळानें पंख फडफडण्यासारखा आवाज ऐकूं आला.

लखूनें तलवार उपसली व समोर आलेल्या संकटाला तोंड देण्यासाठीं सज्ज होऊन




उभा राहिला. जयमल त्याच्या पाठीमागें उभा राहून आश्चर्यचकित होऊन तिकडे पाहूं लागला. गोमान्ग जोरानें ओरडला— "भूत!" तें ऐकून जयमल खूप हंसला. लखूचा हात भाल्याकडे गेला. तोंपर्यंत गोमान्गनें नेम धरला होता.

गुहेच्या खडबडीत वाटेच्या छपराला चिकटून बसलेली एक काळी आकृति दिसली त्यांना. त्या काळोखांत त्या आकृतीचे पांढरे दांत स्पष्ट दिसत होते.

"गोमान्ग हें भूत नसून एक राक्षसी वटवाघूळ आहे. ठीक त्याच्या डोक्याला नेम लागेल अशा तऱ्हेनें सोड तीर चुकतां कामा नये." जयमल म्हणाला.

गोमान्गनें सोडलेला बाण त्या वटवाघळाच्या डोक्याला लागला व तें तडफडत जमिनीवर येऊन पडलें. त्याचा आक्रोश चालू होता. त्या आवाजानें सारी गुहा दुमदुमत होती.

गोमान्ग पुढें गेला व तडफडत पडलेल्या वटवाघळाला बाणानें डवचून पाहिलें. अजून जीव होता, पण हालचाल मंद पडत चालली होती. गोमान्ग म्हणाला—"मी जंगलांत जन्मलों व जंगलांतच वाढलों. पण इतकें मोठें वटवाघूळ उभ्या आयुष्यांत पूर्वी कधीं पाहिलें नाहीं.

"खरें बोलायचें तर मी देखील पूर्वी पाहिलें नाहीं. मला वाटतें आपण एका दुसऱ्याच जगांत येऊन पोंचलों आहों." जयमल म्हणाला.

"तूं म्हणत होतास ती भयंकर दरी हीच तर नव्हे? किंवा त्या दरींत जायची वाट असेल कदाचित!" लखू म्हणाला.

"तुम्हांला लांडग्यांच्या ओरडण्यासारखें ओरडणें ऐकूं येत आहे का?" गोमान्गनें विचारलें.

लखू व जयमल दोघांनीं थोडावेळ ऐकण्याचा प्रयत्न केला व म्हणाले— "कोणीतरी प्राणी ओरडत आहेत असा भास होतो आहे खरा!"

"तर मग भिण्याचें कारण नाहीं! जेथें लांडगे असतात तेथें त्यांच्या भेटाचीं सांवजें पण असतात. म्हणजे आपल्याला खाण्या-पिण्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. पोटभर खायला मिळेल." गोमान्ग म्हणाला.

"पण खाण्या-पिण्याची गोष्ट जिवंत वांचलों तर ना? या गुहेच्या जाळ्यांतून सुटका मिळाली तर." लखू म्हणाला.

"माझे कान तिखट आहेत. मला पुढें जाऊं द्या. मी तुम्हांला ते लांडगे आहेत तेथें घेऊन जातो." असें सांगून गोमान्ग सावधपणें पावलें टाकीत त्या बाजूला निघाला. चार सहा मिनिटें गुहेंत चालल्यानंतर गुहेच्या एका टोंकाला छान मोठा उजेड दिसला त्यांना. दिवसाचा उजेड असतो तसा. तो पाहून तिघे आनंदानें नाचूं लागले. गुहेच्या बाहेर लहान लहान रोपटीं व दूर मोठमोठीं झाडें पण दिसूं लागलीं. लांडग्यांचा आवाज जास्तजास्त जवळ येऊं लागला.




लखू व त्याचे साथी त्या गुहेंतून बाहेर आले. गुहेच्या एका बाजूला मैदानांत हरणांचा एक कळप उभा होता. व त्याच्या चारी बाजूला चार लांडगे घिरट्या घालीत होते व मोठमोठ्यानें ओरडत होते. जे लांडगे जवळजवळ येत होते त्यांच्याशीं झुंज घेण्यासाठीं मोठमोठालीं शिंगें असलेलीं हरणें पुढें येत होतीं.

"लांडग्यांशीं झुंज घेणारीं हरणें मी कधीं पाहिलीं नाहींत." जयमल म्हणाला.

"मी तर एक मेंढा पाहिला आहे लांडग्याला लोळवणारा. जिवावर उदार

होऊन झुंजणारा प्राणीच यशस्वी होतो" गोमान्ग म्हणाला.

त्यांचें परस्परांशीं असें बोलणें चालू असतां लांडग्यांची नजर त्यांच्यावर पडली. हरणांना तिकडे सोडून ते लखू व त्याचे साथी उभे होते तिकडे धांवले. लखूनें एक बाण एका लांडग्यावर सोडला. नेम बरोबर लागला. व तो जोरानें ओरडत जमीनीवर आदळला. इतर लांडगे चवताळून लखू व त्याच्या मित्रांचे लचके तोडण्यासाठीं धांवले. पण गोमान्ग व जयमलनें त्यांच्यावर बाण सोडले. गोमान्गाचा नेम बरोबर लागला. दोनच लांडगे उरले होते. ते भिऊन रानांत पळून गेले.

गोमान्गनें हंसत विचारलें—"तो हरणांचा कळप कोठें नाहींसा झाला?"

"तूं पाहिलें नाहींस वाटतें? तीं हरणें तर केव्हांच पळून गेलीं. तुला काय वाटलें कीं लांडग्यांच्या हातून सुटका मिळाल्यावर आपली वाट पहात तीं उभी राहतील?" लखूनें थट्टेंत विचारलें.

"तुझी थट्टा राहूं दे. आपल्याला तर भूक लागली आहे. एका हरणाचा तर मी एकटाच फडशा उडवीन." गोमान्ग म्हणाला.





"अरे भूक सर्वांनाच लागली आहे. पण आपणां सर्वांना खायला तो ब्रह्मदंडी भुकेला बसला आहे हें विसरूं नकोस. तो व त्याचा मित्र तो मंडुकेश्वर आपल्या नर-भक्षक अनुयायांसह सर्व डोंगर चाळून पालथा घातल्याशिवाय राहणार नाहीं." जयमल म्हणाला.

गोमान्गनें चारी बाजूला पुन्हां एकदां एकादें सावज दिसतें का पाहिलें. पण त्याच्या मनांत दुसराच एक विचार आला. म्हणाला—"ही दरी त्या नरभक्षकांची नसावी असें मला वाटत आहे. येथलीं झाडें झुडपें सर्वच और आहेत. लखू तुला काय वाटतें?"

लखूनें पण दूरवरचा प्रदेश लक्षपूर्वक पाहिला व म्हणाला—"या गुहांतून भटकत भटकत आपण कदाचित दुसऱ्याच बेटांत पोंचलों असणें शक्य आहे. पण सावध राहिलें पाहिजे. त्या नरभक्षक जातीच्या बेटांतून सुटका मिळाली असली तरी हें बेट त्याहून कमी धोक्याचें असेल अशी समजूत करून घेणें बरोबर होणार. येथें जास्त धोका देखील असूं शकेल."

नंतर तो जयमलकडे वळून म्हणाला—"माझे बाबा त्या नरभक्षकांच्या बेटांतून निसटून बाहेर गेले असतील नाहीं?"

"मला तरी शंका नाहीं. तुझ्या वडिलां-सारखा हुशार व चतुर मनुष्य मी आजपर्यंत पाहिला नाहीं. शत्रूच्या हातावर तुरी देऊन ते केव्हांच निघून गेले असतील. त्या एकट्यानें शेकडों नरभक्षकांना कशी छान हुलकावणी देऊन फंसविलें होतें. व त्यांच्या बरोबरचा तो गडेजंग देखील मोठा वस्ताद दिसला."

लखूच्या मनाला थोडा धीर मिळाला. म्हणाला—"पाहूं या कांहीं खायला मिळालें तर! तहान पण खूप लागली आहे मला.

कुठें तरी पाणी नक्की असणार! नाहीं तर हरणें नसती दिसलीं."

तिघे डोंगराच्या पायथ्याशीं आले व रानांत हळूंहळूं चालू लागले. सूर्य पश्चिमेकडे वळला होता. तिघांना भूक लागली होती. झाडांवर फळें किंवा मधमाशीचें पोळें कोठें दिसेल म्हणून गोमान्गची नजर वर झाडांवर होती. तो चालत असतां एका जागीं जमीन खचली व त्याचा पाय अडकला. तो जोरानें ओरडला. जयमल जवळच होता त्यानें चटकन ओढून त्याला बाहेर काढले.

जागा दिसायला सपाट दिसली. मग गोमान्गचा पाय जमिनींत कसा काय रुतला? त्याला कांहीं कळेना. लखूनें तेथें पडलेल्या काटक्या व पाचोळा बाजूला सारून पाहिलें. तेथें त्यांना कांहीं खांबांचीं टोकें जमिनीवर आलेली दिसलीं. ते खांब एका सांपळ्याचे होते. सांपळ्यांत एक सिंह सांपडला होता व तडफडत होता. त्याचें कण्हणें स्पष्ट ऐकूं येत होतें.

"हा सांपळा आहे तर! जनावरें व माणसें जो कोणी सांपडेल त्याला धरण्यासाठीं हा सांपळा कोणीतरी ठेवलेला दिसतो आहे. थोडा उशीर झाला असता तर गोमान्ग आंत गडप झाला असता.

त्याच वेळीं त्यांच्यावर चारी बाजूनें दगड व काठ्यांचा वर्षाव सुरू झाला. लखू व त्याचे साथी विचार करीत बसले नाहींत, जमिनीवर उपडे निजले व आपले बाण अंगावर आडवे उभे ठेवले. नंतर उठून त्यांनीं चारी बाजूला पाहिलें. पण कोणी मनुष्य आढळला नाहीं.



# विचित्र दंड

राजा विक्रमादित्यानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, मला असें वाटूं लागलें आहे कीं कोणी तरी तुला विनाकारण दंड दिला आहे. कित्येक निरपराध लोकांना देखील विनाकारण दंड दिला जातो, हें मला माहीत आहेत. याचें उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

एका खेडेगांवांत पंढरी नांवाचा एक गरीब मनुष्य रहात असे. जगांत तो एकटा होता. तो एका श्रीमंताच्या घरीं काम करीत असतां एकदां त्याच्या धन्याकडे कांहीं पाहुणे मंडळी तीर्थयात्रा करीत वाटेंत एक दिवस विश्रांति घ्यायला म्हणून उतरली.



त्यांच्या तोंडीं वृंदावन क्षेत्राचें वर्णन ऐकून स्वत: तें क्षेत्र पाहून येण्याची इच्छा त्याच्या मनांत उद्भवली.

परंतु पंढरीजवळ वाट खर्चासाठीं एक फुटकी कवडीदेखील नव्हती. धन्याच्या मनांत आलें असतें तर हिंदुस्तानांतली सर्व क्षेत्रें पाहून येतां आलें असतें. पण धन्या-कडे मदत मागण्याची इच्छा त्याच्या मनांत नव्हती. म्हणून तो कोणाला कळविल्या-शिवायच एक दिवस उठून वृंदावन क्षेत्राच्या दर्शनार्थ निघाला. वाटेंत धर्मशाळा आहेतच उतरायला. दोन भाकऱ्या कोणीतरी वाढीलच जेवायला. जवळ पैसे वगैरे असले तर चोरीची भीति. एकूण पंढरीनें जवळ पैसे वगैरे कांहीं एक घेतलें नाहीं. वृंदावनला जाण्यासाठीं पायींच निघाला.

वाटेंत तो एका धर्मशाळेंत उतरला. त्या दिवशीं ती धर्मशाळा रिकामीच होती. दुसऱ्या दिवशीं उजाडतांच तो निघाला तेव्हां धर्मशाळेच्या अधिकाऱ्यानें येऊन त्याला विचारलें—"ही आपली पिशवी मागें सोडून कां निघालास बाबा! असा निष्काळजीपणा केलास तर पुढें कसें होईल?" असें सांगून त्यानें ती पिशवी पंढरीच्या हातांत दिली आणि म्हणाला—"बरें तर जा, आतां!" असें सांगून तो निघून गेला.

पंढरीला तें सर्व कांहीं कळलें नाहीं. त्याला वाटलें कीं धर्मशाळेच्या अधि-काऱ्याला त्याची गरीबी पाहून दया आली असावी व त्यानें कांहीं तरी खायला म्हणून शिदोरी बांधून दिली असावी. परंतु त्यानें पिशवींतलें सामान बाहेर काढून पाहिलें तेव्हां त्याला पिशवींत पैसे व एक धोतरजोडी दिसली. ती पिशवी दुसऱ्याच कोणाची तरी होती. पण अधिकाऱ्याला ती पंढरीचीच असावी असें वाटलें. म्हणून त्यानें ती त्याला आणून दिली होती. पंढरी परत करायला म्हणून धर्मशाळेंत गेला. पण धर्मशाळेला कुलुप होतें. तो अधिकारी कोठेंतरी कामासाठीं निघून गेला होता. पंढरीनें विचार केला कीं वाट पहात बसलों तर ऊन वर येईल व एक दिवस फुकट जाईल. या पिशवीचा मालक वाटेंत भेटला तर त्याला त्याची पिशवी परत देऊन टाकतां येईल. असा विचार करून तो पुढें निघाला.

दैवयोग असा कीं त्याच दिवशीं कांहीं यात्रेकरू त्याला वाटेंत भेटले व त्यांपैकीं कांहीं जण वृंदावनलाच निघाले होते. त्यांच्याबरोबर प्रवास केल्यास प्रवासांत कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं असा विचार करून पंढरी त्यांच्याबरोबर निघाला.

कांहीं अंतरावर एक नदी लागली. नदी-पार जाण्यासाठीं नावेंत बसून जावें लागलें. प्रत्येकानें नावाड्याला एकेक पैसा दिला. पंढरीनें कांहींच दिलें नाहीं. नावाड्यानें पैसा मागितला तेव्हां पंढरी म्हणाला—"माझ्याकडे एक पै देखील नाहीं." त्यावर एक यात्रेकरू म्हणाला—"काय रे! तुझ्या पिशवींत तर पैसे खणखणताहेत! आणि पै देखील नाहीं, काय म्हणतोस?"



दुसऱ्या एकानें पंढरीच्या हातांतली पिशवी काढून घेऊन उघडून पाहिली व म्हणाला—"पैसे तर आहेतच. कोरे कपडे देखील आहेत. फाटके कपडे घालून फिरतो आहे आणि पैसे नाहींत म्हणून म्हणतो आहे. या वयांत इतके पैसे सांठवूं लागला तर पुढें काय होईल काय ठाऊक?"

आणखी एक दोघे म्हणाले—"चोरांच्या भीतीनें जवळ पैसे नाहींत असें म्हणत असेल. पण काय रे! आम्ही इतके जण बरोबर असतां चोरांचें काम भय?" पंढरी काय उत्तर देणार? पंढरीनें नावाड्याला



पैसा दिला व पुढील प्रवास नवे कपडे घालून करूं लागला. वाटखर्चाला त्या पिशवींतले पैसे त्यानें वापरले. पिशवीचा मालक भेटल्यावर त्याची पिशवी परत करावयाची गोष्ट तो पार विसरून गेला.

त्यापुढचा प्रवास आनंदांत पुरा झाला. पिशवींत पैसे होते तोंपर्यंत कसला कष्ट व त्रास होणार? वृंदावन क्षेत्रीं सर्व देवळें व प्रेक्षणीय स्थळें पाहून पंढरीच्या मनाचें समाधान झालें. ज्या हेतूनें तो धरून निघाला होता तो पार पडला. तो परत घरीं निघाला.

परत येत असतां वाटेंत तो त्याच धर्मशाळेंत उतरला. त्याच्या हातांत तीच पिशवी होती. ती पाहून धर्मशाळेंत उतरलेल्या एका माणसानें त्याचा हात धरला आणि विचारूं लागला—"चोरा, माझे कपडे घालून तूं राजरोस फिरत आहेस! कोठें आहेत पिशवींतले पैसे?"

पिशवींत पैसे नव्हतेच. पंढरीनें ती पिशवी त्याला कशी मिळाली हें थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न केला. पण तो मनुष्य त्याला बोलूंच देईना. म्हणाला—

"काढ माझे दोनशें रुपये. नाहीं तर चल कोतवालाकडे!"

शेवटीं त्याला पोलीस ठाण्यावर जावें लागलें. पिशवीच्या मालकानें धर्मशाळेंत पिशवी विसरून गेल्याचें सांगितलें व म्हणाला कीं आठवण झाल्यावर मी पिशवी शोधायला म्हणून गेलों तोंपर्यंत पिशवी नाहींशी झालेली दिसली. या माणसानें ती पिशवी चोरली होती. ह्याच्या हातांतली ही पिशवी माझी आहे व ह्याच्या अंगावरचे कपडे पण माझेच आहेत.

पंढरीनें सर्व पैसे खर्च झाल्याचें व पिशवींतले कपडे त्यानें वापरल्याचें कबूल केलें.

कोतवालानें पंढरीला न्यायाधिशासमोर उभें केलें. न्यायाधीश म्हणाला—"तूं पिशवींतले पैसे प्रवासांत खर्चून टाकले आहेस, म्हणून तूं ते परत केले पाहिजेस. तूं गरीब आहेस व इतके पैसे परत करणें तुला शक्य नसेल तर तूं याच्या घरीं दोन वर्षें नोकरी करून हे पैसे फेड. तुझ्या खाण्या-पिण्याची जबाबदारी यांच्यावर राहील. पंढरीनें त्या प्रमाणें पिशवीवाल्या-कडे दोन वर्षें नोकरी करून कर्जफेड केली.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! केलेल्या अपराधाबद्दल पंढरीला शिक्षा भोगावी लागली असें वाटतें का तुला? त्यानें अपराध करून क्षेत्रदर्शन केल्याचें पुण्य त्याला मिळालें असेल का? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

विक्रमादित्य म्हणाला—"न्यायाधिशा-समोर येण्यापूर्वींच पंढरीला क्षेत्रदर्शनाचें पुण्य मिळालें होतें. त्याच्या मनांतली इच्छा पूर्ण झाली होती. दोन वर्षें पिशवीवाल्या-च्या घरीं त्याला जी नोकरी करावी लागली ती तशी मोठी शिक्षा होती असें नाहीं मला वाटत. पूर्वी तरी नोकरी करून त्यानें कितीसे पैसे जमा केले होते? दोन वर्षें त्याला पोट भर खायला मिळालें हें काय कमी होतें? म्हणजे न्यायाधिशानें त्याला जो दंड दिला तो खरोखरी दंड ठरतच नाहीं."

अशा तऱ्हेनें मौन भंग झाल्यामुळें वेताळ अदृश्य झाला व जाऊन झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# गंधर्व राजकन्या

[ २ ]

हसननें आपल्या मानलेल्या बहिणीला जाऊन सांगितलें कीं गंधर्वराजाची सर्वांत धाकटी कन्या त्यांच्या खोलींत आली आहे. तें ऐकून ती राजकन्येला जाऊन भेटली व म्हणाली—"राजकन्या! आपल्या आगमनानें आमचें घर पवित्र झालें आहे."

पण गंधर्व राजकन्या दुःखी होऊन थोडीशी रागांतच म्हणाली—"तूं आपल्या राजाच्या कन्येचा असा अपमान कसा करूं दिलास? य:कश्चित मनुष्याच्या हातीं गंधर्व-राजकन्येचा अपमान होऊं देण्यास तूं कारण झालीस. माझ्या वडिलांच्या शक्तीची कल्पना मर्त्य मानवाला नसेल कदाचित, पण तुला तर होती. तूं फितूरी केली नसतीस तर तो मला सरोवरापासून येथवर घेऊन आला असता का?" हसनची धाकटी बहीण म्हणाली—"हा तरुण कोणी सामान्य तरुण नाहीं. सदाचरणी आहे. दैव प्रेरणेनें त्याचें मन राजकन्येवर बसलें. प्रेमीजनांनीं परस्परांच्या चुका गिळून परस्परांवर प्रेम करावयाचें असतें. राजकन्येला अगदीं प्रथम पाहिलें तेंव्हांपासूनच राजकन्येनें त्याचें मन चोरलें आणि पुन्हां भेट न झाल्यामुळें त्याला तो विरह इतका असह्य झाला कीं त्यानें अन्न-पाणी सुद्धां सोडलें होतें. बरोबर आणखी नऊजणीं होत्या. पण त्यानें त्या सर्वांत आपलीच निवड केली."

तें ऐकून व आतां सुटका मिळणें पण अशक्य आहे हें ओळखून गंधर्व राजकन्येनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. "मौनं संमति













लक्षणम्" अशी म्हण आहे. हसनच्या वहिणीनें गंधर्व राजकन्येला सुंदर वस्त्रें आणून दिलीं व सर्व प्रकारें सत्कार करून तिचें दुःख हलकें करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं गंधर्व राजकन्या तिला म्हणाली— "कदाचित पितृविरह माझ्या नशिबीं लिहि-लेला होता."

नंतर हसनची वहीण त्याला भेटली व म्हणाली—"आपल्या प्रियतमेचें मन वळविणें आतां तुझ्या हातीं आहे. तिच्या दुःखी मनाला जास्त दुःख होईल असें कांहीं बोलूं नकोस किंवा करूं पण नकोस. अगदीं नम्रपणें गोड बोलून तिच्या समोर आपलें मन उघडें केलेस तर ती तुझ्या प्रेमाचा स्वीकार करील."

हसन खोलींत आल्यावर गंधर्व राजाची कन्या त्याचें अप्रतिम सौंदर्य पाहून चकित झाली. तिनें त्याला पूर्वी डोळे भरून पाहिलें देखील नव्हतें. त्याच्यावरचा राग थोडा का होईना कमी झाला. हसन म्हणाला— "राजकन्या, मी तुझा दास आहें. तुझ्या इच्छेविरुद्ध मी नाहीं. मी तुला निर्दयपणानें येथवर ओढून घेऊन आलों. त्या अपराधा-बद्दल मला क्षमा कर. धर्माविरुद्ध मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. धर्मप्रमाणें निकाह लावून मी तुला स्वदेशीं म्हणजे बगदादला घेऊन जाईन. वाटेल तितक्या दासदासी तुझ्या सेवेला नित्य हजर राहतील. तेथें माझी आई आहे. तिच्या सारखी धर्मभीरु स्त्री दुनियेंत मिळणें शक्य नाहीं. ती तुला आपल्या मुलीप्रमाणें प्रेमानें वागवील."

गंधर्व राजाच्या कन्येनें त्याचें उत्तर दिलें नाहीं. तितक्यांत दरवाज्यावर कोणी-तरी थाप मारल्याचा भास झाला. हसननें दरवाजा उघडला. सर्व बहिणी शिकार करून



परत आल्या होत्या. हसनची तब्येत चांगली सुधारलेली पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. हसन गंधर्व राजकन्येविषयीं कांहींच बोलला नाहीं. बहिणी जी शिकार घेऊन आल्या होत्या ती त्यानें आंत नेऊन ठेवली.

मोठ्या बहिणीनें त्याला जवळ घेऊन विचारलें-"तुझी तब्येत आतां छान सुधा-रलेली दिसते आहे!"

हसन थोडा लाजला. त्याच वेळीं धाकटी बहीण तेथें येऊन पोंचली. तिच्याकडे त्यानें नुसतें पाहिलें.

धाकटी बहीण प्रसंग ओळखून थट्टेनें म्हणाली—"आपण नाहीं बोलत बुवा! मनांतलें गुपित ज्याचें त्याला ठाउक! त्यांत प्रेमीयुगलांच्या भानगडींत आपण नाहीं पडणार!"

"त्यांत लाजायला काय झालें! तूंच सांग की हसन!" पण हसन जास्तच लाजला व निमूटपणें उभा राहिला.

शेवटीं धाकट्या बहिणीनें घडलेलें वृत्त सांगितलें. सर्वांनीं हसनचें अभिनंदन केलें व त्याला बरोबर घेऊन गंधर्व राजकन्या ज्या खोलींत होती तेथें गेल्या. त्यांनीं तिचें देखील अभिनंदन केलें. त्यांनींच तिचा



हात हसनच्या हातांत देत दोघांना, 'नांदा सौख्य भरें', असा आशीर्वाद दिला. गंधर्व राजकन्या प्रथम जरी रागावली होती तरी त्याचें सौंदर्य प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्यानंतर ती त्याच्यावर भाळली होती. एकूण दोघांचा विवाह दोघांच्या इच्छेप्रमाणेंच झाला.

नवदंपती त्या महालांत चाळीस दिवस राहालीं. एकदां रात्रीं हसनला स्वप्नांत आई दिसली. ती हसनची बरेच दिवस भेट न झाल्यामुळें रडत होती. हसनला तें दृश्य पहावेना. तो स्वतः देखील रडूं लागला. हसनच्या बायकोनें नणदांना ती गोष्ट जाऊन



सांगितली. त्या धांवत भेटायला आल्या. हसननें जें स्वप्न पाहिलें होतें तें सांगितलें.

तेव्हां धाकटी बहीण म्हणाली-"तर मग तूं आईकडे जा. पण दर वर्षी एक महिना भर आमच्याकडे आलें पाहिजे."

तरी जायचें कसें हा प्रश्नच होता. पण धाकट्या बहिणीनें हसन जवळची म्हाताऱ्या बहरामची तबकडी घेऊन वाजवली. त्या बरोबर उंट, घोडे, खेचरें वगैरे वाहनें समोर धांवत येऊन उभीं राहालीं. हसन गंधर्व-राजकन्येला घेऊन सुंदरशा दोन खेंचरांवर बसला व बहिणींचा निरोप घेऊन स्वदेशीं निघाला. दोघं लवकरच घरीं पोंचले. हसन बसरा नगरांत आपल्या घरासमोर खेचरा-वरून उतरत असतां त्याला त्याच्या आईचें रडणें ऐकूं आलें. तो स्वतःला आवरूं शकला नाहीं. रडतच त्यानें दारावर थाप मारली. त्याच्या आईनें येऊन दार उघडलें. पण समोर अनपेक्षितपणें मुलाला आलेला पाहून तिला आनंदातिरेकानें घेरी आली व ती बेशुद्ध होऊन जमिनी-वर पडली.

हसननें व त्याच्या बायकोनें मिळून तिला आंत नेलें व तिची सेवा-शुश्रूषा केली. तिला लवकरच शुद्ध आली. म्हातारी आपल्या सुंदर सुनेला पाहून फार खूष झाली. त्यांत आपली सून एक गंधर्वराज-कन्या आहे हें ऐकून तर तिला काय करूं व काय न करूं असें झालें.

तिनें तिच्याकडे तिचे स्वतःचे म्हणून ठेवलेले दागदागिने जरीकाठी रेशमीवस्त्रें वगैरे जें कांहीं होतें तें सर्व आणून सुनेला दिलें.

दुसऱ्या दिवशीं ती आपल्या मुलाला म्हणाली—"बेटा! आपलें हें घर आणि हें बसरा शहर तुझ्या बायकोला शोभत नाहीं. म्हणून आपण बगदाद शहरीं जाऊं या आणि तेथें सुखानें राहूं या."

हसनला देखील ती सूचना पटली. त्यानें आपलें घर सामानासकट लिलावांत विकून टाकलें आणि तबकडीच्या सहाय्यानें बगदाद शहरीं येऊन पोंचला. त्यानें एक सुंदर महाल एक लाख दीनार देऊन विकत घेतला व त्यांत खुर्च्या, टेबलें पडदे, झुंबरें वगैरे लावून त्यांत थाटानें प्रवेश केला.

त्यानें शेंकडो दासदासी विकत घेतल्या. त्याच्या महालांतलें वैभव बगदाद शहरांत इतर कोठेंहि नव्हतें. त्याच्या घरांत गंधर्व राजकन्या सुखानें राहाली. नऊ महिन्यांनीं तिला एक जुळें झालें. दोन्हीं मुलेंच होतीं. एकाचें नांव नासिर व दुसऱ्याचें मन्सूर असें ठेवण्यांत आलें.

वर्ष संपण्यापूर्वीं त्याला बहिणीला दिलेल्या वचनाची आठवण झाली. तो प्रवासाची तयारी करूं लागला. आपल्या बहिणींना भेट म्हणून जें जें न्यावेंसें त्याला वाटलें त्या सर्व वस्तू विकत घेऊन त्यानें आपल्या आईला प्रवासाला निघत असल्याचें सांगितलें. म्हणाला—"आई! मुख्य गोष्ट सांगायची राहूनच गेली. तुझ्या सुनेचें तें











पक्ष्यांचें वस्त्र मी एका जागीं लपवून ठेवलें आहे. मी परत येईपर्यंत त्यावर लक्ष ठेव. कारण तिची नजर त्यावर पडली व तिला आपल्या बाबांची व बहिणींची आठवण झाली तर उडून जाईल कदाचित. जर का उडून गेली तर मात्र तिला परत घेऊन येणें, मलाच काय, कोणाला देखील शक्य नाहीं."

"अरे हें सर्व सांगण्याची काय गरज? म्हातारपण आलें म्हणून मला हें सर्व कळत नाहीं का? तूं अगदीं बेफिकीर रहा! तुझ्या बायकोची काळजी मी वाहीन. पण तूं मात्र शक्य तितका लवकर ये!" त्याची आई म्हणाली.

पण भावी कोणाला कळत असतें का? त्या दोघांना हें देखील कळलें नाहीं कीं दोघांचें बोलणें आड उभी राहून गंधर्व राजकन्या ऐकत होती. हसन आंत गेला मुलांचा पापा घेतला व बायकोला लवकर परत येईन असें सांगून तिचा निरोप घेतला.

तो आलेला पाहून त्याच्या बहिणींना अपार आनंद झाला. धाकट्या बहिणीला तर फारच आनंद झाला. तिनें आपली खोली उत्तमोत्तम फुलांचे हारतुरे लावून सजवली होती.

हसननें तिला आपल्या दोघां जुळ्या मुलांचें वर्णन करून सांगितलें. तो आपल्या बहिणींबरोबर शिकारीला गेला. त्यांच्या-बरोबर तो हिंडला फिरला व कांहीं काळ तो आपल्या मुलां बायकोला देखील विसरला.

मनुष्य भावी काय आहे हें कधीं ओळखत नाहीं व तें ओळखणें त्याला शक्य देखील नाहीं. हसन देखील तें ओळखूं शकला नाहीं तर त्यांत आश्चर्य काय!

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]






# अष्टावक्र

एकपाद नांवाचे एक ऋषी होते. त्यांच्या पत्नीचें नांव सुजाता. ऋषींचा शिष्यवर्ग पण मोठाच होता. ऋषी रात्रंदिवस शिष्यांना शिकवीत.

पुढें कांहीं दिवसांनीं सुजाता गर्भवती असतां तिच्या पोटांतलें मूल बोलूं लागलें—"बाबा! आतां सुटी द्या आपल्या शिष्यांना. विचारे पेंगूं लागले आहेत पहा!"

एकपाद ऋषींना मुलाचा तो उर्मटपणा आवडला नाहीं. ते म्हणाले—"अभ्या-साच्या वेळीं तूं असें कांहीं तरी वांकडे म्हणजे वक्र बोललास म्हणून तूं आठ जागीं वक्र होऊन जन्म घेशील." मुनींनीं रागानें शाप देऊन टाकला.

प्रसवकाळ जवळ येऊन ठेपला. औषध, पथ्यपाणी घरांत कांहीं नाहीं. एकपाद ऋषी जनकराजाकडे धन सहाय्य मागायला गेले. तेथें वरुणाचा मुलगा वंदी उभा होता. तो दरबारांतल्या विद्वान पंडितांचा शास्त्रार्थांत पराभव करून त्यांना पाण्यांत बुडवून ठेवीत होता. एकपाद ऋषींना देखील त्यानें प्रश्न टाकला व त्यांचा देखील पराभव करून टाकला व त्यांना पाण्यांत बुडविलें.

सुजाता आपला भाऊ उद्दालक याच्या घरीं बाळंत झाली व तिला एक मुलगा झाला. बापानें दिलेल्या शापाप्रमाणें त्याचें अंग आठ जागीं वक्र होतें. म्हणून त्याचें नांव अष्टावक्र असें ठेवण्यांत आलें. उद्दालकाला देखील त्याच वेळीं एक मुलगा झाला. त्याचें नांव श्वेतकेतु असें ठेवण्यांत आलें. पति घरीं न आल्या-मुळें सुजाता आपल्या भावाकडेच राहूं



लागली. अष्टावक्र श्वेतकेतु बरोबर विद्याभ्यास करीत असे.

एकदां अष्टावक्र आपल्या मामाच्या मांडीवर बसला होता. श्वेतकेतूनें त्याला पाहिलें आणि म्हणाला—" माझ्या बाबांच्या मांडीवर तूं कां ? जा आपल्या बाबांच्या मांडीवर जाऊन बैस." त्यानें त्याचा हात धरून खालीं ओढलें. अष्टावक्राला फार वाईट वाटलें.

तो रडत आपल्या आईकडे गेला आणि विचारूं लागला-" आई ! माझे बाबा कोठें आहेत ग ?"

ती म्हणाली—" बाळ ! तूं जन्मण्यापूर्वी ते धन सहाय्य मागण्यासाठीं जनकराजाकडे गेले व अजून घरीं परत आले नाहींत."

तें ऐकून अष्टावक्र आपल्या वडिलांच्या शोधार्थ जनकपुरीला गेला. तेथें त्याला कळलें कीं राजाच्या दरबारांत वंदी नांवाच्या वरुणपुत्रानें एकपाद ऋषींचा वाद-विवादांत पराभव केला व त्यांना पाण्यांत बुडवून ठेवलें आहे.

अष्टावक्रानें दरबारांत जाऊन वंदीला आव्हान केलें. दोघांचा शास्त्रार्थ झाला. वंदीचा पराभव झाला. त्यानें अष्टावक्र जें मागेल तें द्यायचें कबूल केलें. अष्टावक्रानें प्रथम आपल्या वडिलांना व इतरांना जिवंत करण्यास सांगितलें. वंदीनें त्याप्रमाणें कबूल केलें आणि सर्वांना जिवंत केलें.

अष्टावक्र विवाहयोग्य झाला होता. अष्टावक्रानें, वदान्य मुनींची सुप्रभा नांवाची एक मुलगी होती तिच्याशीं लग्न करण्याची इच्छा दर्शविली. त्यानें वदान्य ऋषींना भेटून मनांतली इच्छा व्यक्त केली. वदान्य ऋषींनीं अष्टावक्र मुनींची परीक्षा घेण्याचें ठरविलें. म्हणाले—" मी मुलगी द्यायला तयार आहें. पण एका अटीवर. तूं एकदां उत्तरेकडे जाऊन आलें पाहिजेस ! उत्तरेकडे कुबेराची अलकानगरी आहे. आणखी पुढें गेल्यावर तुला एक स्त्री दिसेल. तिला पाहून तूं परत ये ! मग पाहूं !" वदान्य म्हणाले.

अष्टावक्रानें ती अट कबूल केली आणि उत्तरेकडे निघाला. तो कुबेराची राजधानी अलकापुरी येथें येऊन पोंचला. स्वतः कुबेर त्याच्या स्वागतासाठीं सामोरा आला. त्यानें त्याला आपल्या राजवाड्यांत नेलें व राजसी थाटानें त्याचें आतिथ्य केलें. तेथें रंभा, उर्वशी, तिलोत्तमा वगैरे अप्सरांचें नृत्य पहात एक वर्ष लोटलें. कुबेराचा निरोप घेऊन अष्टावक्र पुढें निघाला. पुढें एक अरण्य लागलें. तेथें एक सोन्याचा राजवाडा त्याला दिसला. अष्टावक्रानें राजवाड्यांत प्रवेश केल्याबरोबर अनेक स्त्रियांनीं पुढें येऊन त्याचें स्वागत केलें. आंतून अप्स-रातुल्य सौंदर्य असलेली एक तरुण स्त्री पुढें आली व तिनें त्याचें अभिवंदन केलें. त्या स्त्रीनें अष्टावक्र मुनींना आपल्या प्रेमपाशांत बांधण्याचा अहोरात्र प्रयत्न केला. पण तिचे सर्व प्रयत्न फुकट गेले. अष्टावक्र म्हणाले—" मी ब्रह्मचर्य व्रत घेतलें आहे. तेव्हां माझा नाद तूं सोडून दे !"



दुसऱ्या दिवशीं अष्टावक्र मुनि स्नान करून परत आल्यावर तिनें पुन्हां विवाह करून घेण्यास विनंति केली. अष्टावक्र म्हणाले—"वयानें दिसायला तूं लहान दिसतेस. लग्नाची गोष्ट तूं करावयाची नसून तुझ्या आईवडिलांनीं काढायला हवी. बरें हें सर्व सोड. प्रथम तूं आहेस कोण हें सांग."

तें ऐकून स्मित करून ती म्हणाली—"मी उत्तर दिशा आहें. तुझी परीक्षा घेण्यासाठीं वदान्य मुनींनीं मला नेमलें होतें. तूं या परीक्षेंत यशस्वी झालास. आतां तूं घरीं जा. तुझा सुप्रभाशीं विवाह होईल व आयुष्यभर तूं सुखी होशील."

अष्टावक्र परत फिरला. वदान्य मुनींना भेटला. सुमुहूर्तावर सुप्रभाशीं त्याचा विवाह झाला.

पुराणांत अष्टावक्रां विषयीं आणखी एक गोष्ट सांगतात. त्यांनीं पाण्यांत राहून अनेक वर्षें तप केलें होतें. त्यावेळीं रंभा वगैरे अप्सरांनीं नृत्य करून त्यांना प्रसन्न केलें. ऋषींनीं अप्सरांना वर मागून घ्यायला सांगितलें.

"विष्णूशीं विवाह करण्याची इच्छा आहे आमच्या मनांत. तो वर द्यावा." अप्सरा म्हणाल्या.

"कृष्णावतारीं गोपिकारूपें तुम्ही जन्मलांत कीं विष्णूच्या प्रेमाचा लाभ तुम्हांला होईल."

अष्टावक्रानें वर दिला.

अष्टावक्र मुनि पाण्यांतून बाहेर आल्यावर त्याला पाहून अप्सरा हसूं लागल्या. अष्टावक्राला अर्थातच त्या गोष्टीचा राग आला. त्यानें त्यांना शाप दिला कीं कृष्णाच्या प्रेमिका म्हणून तुम्हांला मान मिळाल्यावर तो नसेल त्यावेळीं रानटी लोक तुमचा अपमान करतील.





# अंधेर नगरी

"कोण रे तो मोठ्यानें वाचीत आहे?" आजोबांनीं दरडावून विचारलें.

"आपल्या घरीं नाहीं आजोबा. शेजाऱ्च्या मुलानें शंभर टक्के मार्क मिळावे म्हणून आजपासून अभ्यासाला सुरवात केली आहे." मुलें म्हणालीं.

"मोठ्यानें वाचलें म्हणजे जास्त मार्क मिळतात वाटतें?" आजोबांनीं थट्टेत विचारलें.

"आजोबा! अशोकचा मित्र तो गोपाळ आहे ना तो रोज एक तास अभ्यास करतो. त्याला गेल्या वर्षी परीक्षेंत साठ ते सत्तर टक्के मार्क मिळाले. म्हणून अशोक शंभर पैकीं शंभर मार्क मिळावे म्हणून जोरानें अभ्यास करतो आहे." एक नातू म्हणाला.

"अरे, याला म्हणतात वेडेपणा! कोणी पंधरा मिनिटांत पाव शेराचा भात खाल्ला म्हणून तो एका तासांत एक शेराचा खाऊं शकेल का? मला एक गोष्ट आठवते आहे या...." आजोबांचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच मुलें ओरडूं लागलीं—"गोष्ट! गोष्ट! आजोबा? ती गोष्ट सांगा!"

"बरं बरं, सांगतों पण गलका करूं नका!" असें सांगून आजोबांनीं दोन्हीं नाकपुड्यांत तपकीर कोंबली आणि गोष्ट सांगूं लागले.

एका देशांत एक राजा राज्य करीत असे. तो राजा वयानें लहान होता. नुकताच गादीवर बसला होता. गादीवर बसल्याबरोबर त्याचें लग्न झालें. लग्नाची गोष्ट निघाल्यापासून सर्व गोष्टी त्याच्या मना-



प्रमाणें घडूं लागल्या. राज्याची प्राप्ति वाढली. देशांतली बंडाळी कमी होत गेली. हें सर्व बायकोच्या पायगुणामुळें घडत आहे असा विचार करून राजा आपल्या राणीचा फार आदर करी. राजा आपला आदर करीत आहे हें पाहून राणी त्याला प्रत्येक बाबतींत सल्ला देऊं लागली. राजा देखील राणीच्या सल्ल्याप्रमाणें वागे आणि विशेष असें कीं राणीच्या सल्ल्याप्रमाणें तो जें करी त्यांत त्याला यश मिळत गेलें. पुढेंतर राणीच्या सल्ल्याबाहेर कांहीं एक करावयाचें नाहीं असें राजानें ठरवून टाकलें.

एकदां दरबारांत राजाच्या शिपायांनीं तिघां चोरांना कैद करून राजासमोर हजर केलें. चोरीचा माल चोरांच्या जवळ सांपडला होता. म्हणून साक्षीपुरावा कांहीं एक पाहाल्याशिवाय राजानें त्यांना शिक्षा सांगितली. चोरांना पकडणाराला बक्षीस देण्याच्या हेतूनें राजानें विचारलें—"या चोराला कोणी धरलें ?"

एका कुत्र्यानें चोरांना धरण्याच्या कामीं मदत केली ही गोष्ट राजाला कळली. राजा तें ऐकून चकित झाला. ती आश्चर्याची गोष्ट राणीला कळविण्यासाठीं राजा अंतःपुरांत गेला व कुत्र्याच्या कामगिरीचें वर्णन करून कुत्र्याची स्तुति केली.

कांहीं दिवसांनीं मंत्र्यानें खजिन्याचा हिशोब राजाला दाखविला आणि म्हणाला—"सैन्याचे पगार वांटावयाचे आहेत. पगाराची वांटणी झाल्यावर खजिना रिकामा होण्याची शक्यता आहे. तरी राजाज्ञा होईल तसें पुढें करूं."

राजानें मंत्र्यालाच सल्ला विचारायला हवा होता. पण लग्न झाल्यानंतर त्यानें मंत्र्याचा सल्ला घेणें सोडलें होतें. कारण राणी सर्व बाबतींत त्याला अचूक सल्ला देत असे. निदान राजाला



तरी तसें वाटत होतें. म्हणून राजा एवढेंच म्हणाला—"सांगेन काय करावयाचें तें !"

राजानें अंतःपुरांत जाऊन राणीचा सल्ला घेतला. म्हणाला—"खजिना रिकामा होत चालला आहे. सैन्याचा पगार दिला पाहिजे. पगार देऊन टाकला तर खजिना रिकामा होणार. अशा परिस्थितींत काय करावें असें तुझें मत आहे ?"

"सैन्याची जरूरच काय ? त्यांना फुकट पोसण्याची माझ्या मतें आवश्यकताच नाहीं. एका कुत्र्यानें तीन तीन चोरांना पकडलें होतें हें आठवत असेल आपल्याला. सैन्य कमी करून त्यांच्या जागीं कुत्रीं पाळावीं. तीन सैनिकांच्या ऐवजीं एक कुत्रें या प्रमाणें कुत्रीं पाळावीं. पगार, शस्त्रास्त्रें, गाड्या, घोडे यांवर होणारा व्यर्थ खर्च वांचेल. कुत्र्यांना खायला घातलें तर तीं जितक्या स्वामीभक्तपणानें कामें करतील तितकीं सैनिकांकडून होतील का ?" राणीनें सल्ला दिला.

दुसऱ्या दिवशीं राजानें मंत्र्याला बोलवून राणीनें शिकविलेला धडा तोंडपाठ म्हणून दाखविला आणि म्हणाला—"सैन्यांतल्या अर्ध्या अधिक सैनिकांना कमी करून त्यांच्या जागीं कुत्रीं पाळा."



मंत्र्याला तें ऐकून आश्चर्य वाटलें. सेनापतीला तो निव्वळ मूर्खपणा वाटला. पण राजासमोर बोलण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती.

मंत्र्यानें धीर करून विचारलें—"विचार-करून पाऊल टाकावें, असें नाहीं का वाटत महाराजांना ?"

"जास्त विचार करण्याची गरज नाहीं. मी आज्ञा केली आहे. त्याप्रमाणें सर्व कांहीं झालें पाहिजे. त्यांत दिरंगाई झाली तर जबाबदार अधिकाऱ्यांना जाब विचारला जाईल." राजा म्हणाला.

"सैन्य कमी करावयाचें असेल तर माझ्या सारख्या सेनापतीची तरी काय गरज आहे? कुत्रीं सैन्याचें काम करूं शकतील असें मला वाटत नाहीं. निदान तें काम कुत्र्यांना शिकविण्याची शक्ति तरी माझ्या अंगांत नाहीं." सेनापति म्हणाला.

सेनापती स्वतःच निघून जात आहे तर आणखी पैसे वांचतील असा विचार करून राजानें सेनापतीचा राजीनामा मंजूर केला.

सैनिकांच्या जागीं कुत्रीं पाळली गेलीं. कुत्रीं भुंकत व आपसांत भांडत. सैनिक व शिपाई त्यांना आवरण्याचा प्रयत्न करीत.

इतक्यांत शत्रू राज्यावर चालून येत आहे ही बातमी राजाला मिळाली. मंत्र्यानें राजाला जाऊन विचारलें "आतां पुढें?"

"पुढें काय? सैन्याबरोबर कुत्रीं देखील रणांगणावर पाठविण्यांत यावीत." राजानें हुकूम सोडला.

कुत्रीं समोर येत असलेलीं पाहून शत्रूनें भाकरीचे तुकडे त्यांच्यासमोर फेंकायला सुरवात केली. कुत्रीं तीं खायला धांवलीं व त्यासाठीं आपसांत भांडूं लागलीं.

युद्ध संपलें. मंत्र्यानें राजाला येऊन सांगितलें कीं स्वामीभक्त कुत्रीं भाकरीच्या तुकड्यांवर भुलून जाऊन फितूर झालीं आहेत.

राजाच्या अंगाला दरदरून घाम सुटला. शत्रुसैन्यानें राजधानी काबीज केली. परंतु ते शत्रु नसून राजानें ज्या सेनापतीला व सैनिकांना नोकरीवरून काढून टाकलें होतें, तेच राजाची कानउघाडणी करण्यासाठीं राजधानीवर चालून आले होते.

राजाला जेव्हां हें कळलें तेव्हां त्यानें पुन्हां सर्व सैन्याला कामावर नेमलें व पुढें राणीच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याऐवजीं मंत्री व सेनापति यांच्या सल्ल्याप्रमाणें वागायचें ठरविलें."



# "तेरा"

[स्वामी रामतीर्थ कथा]

गुरु नानक हे लहानपणा पासूनच देवाचे एक मोठे भक्त होते. तरुणपणीं त्यांना दुकानांत धान्य मोजण्याचें काम करावें लागलें. अर्थातच लाभ दोन, तीन, अशीं मापें मोजून द्यावीं लागत.

एकदां दुकानाच्या मालकानें चौघां जणांना धान्य मोजून द्यायला नानकाला सांगितलें. प्रत्येकाला तेरा तेरा शेर कणीक मोजून द्यायची होती. नानक लाभ, दोन, तीन असें मोजीत तेरा पर्यंत पोंचले. बारावा शेर मोजल्याबरोबर 'तेरा' शब्द त्यांच्या तोंडावाटे बाहेर पडला. 'तेरा' शब्दाबरोबर त्याला "तुझा" म्हणजे देवाचा असें मनांतून वाटलें. एकाएकीं त्याचें ध्यान देवाकडे गेलें.

"तेरा" शब्दाचा अर्थ तेराचा आंकडा व तुझा असा दोन्ही प्रकारें होतो. नानकाला तेरा म्हटल्याबरोबर देवाची आठवण झाली व त्याच्या चरणीं मन लीन झालें. तो "तेरा, तेरा, तेरा!" असें म्हणत जागच्या जागीं बेशुद्ध होऊन पडला.







# भीमूचे पराक्रम

भीमूच्या सासऱ्याच्या घरीं त्यांचा गणपतराव नांवाचा एक स्नेही येत असे. तो नेहमीं भीमूच्या जमीनदार सासऱ्याची मर्जी संभाळून गोडगोड बोले. मोठेपणाचा आव आणून देखील कधीं कधीं बोले. अडी अडचणीच्या वेळीं जमीनदाराकडून चार पैसे मागून नेई.

गणपतरावावर जमीनदाराची मर्जी होती म्हणून कर्ज म्हणून दिलेले पैसे जमीनदार लिहून ठेवीत नसे व कधीं मागत पण नसे. दर खेपेस पैसे मागायला यायच्यावेळीं गणपतराव पैसे परत देण्याचें वचन देई व पैसे घेऊन जाई. जमीनदारानें कधीं तिकडे लक्ष दिलें नाहीं.

जमीनदाराची मर्जी संपादन करून गणपतरावानें स्वतःच्या व आपल्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाचा प्रश्न सोडवला होता खरा, परंतु गणपतराव स्वभावानें तसा सरळ नव्हता व आपल्या कावेबाजपणाचीं फळें त्याला चाखावीं लागलीं.

एकदां गांवांत कोणाजवळ तरी तो म्हणाला—"जमीनदाराचा जांवई बावळट आहे. त्याच्याशीं आपल्या एकुलत्या मुलीचें लग्न करून देण्यांत त्यांनीं थोडी घाईच केली. मन लावून काम करतो खरा, पण अकलेच्या नांवानें शून्य आहे."

गांवकरी जमीनदाराचा आदर करीत. लाळघोट्या गणपतरावांचें बोलणें त्यांना कसें आवडणार? गणपतराव जें कांहीं म्हणाला तें त्या गृहस्थानें जमीनदाराला जाऊन सांगितलें. परंतु जमीनदाराचा गणपतरावांवर इतका विश्वास होता कीं त्यानें त्या गृहस्थाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. पण आणखी दोघां तिघांनीं येऊन तीच गोष्ट सांगितल्यावर मात्र गणपतरावावरचा विश्वास कमी होऊं लागला. जमीनदार स्वतः कोणावर अविश्वास करीत नसे. कधीं कोणाचें वाईट इच्छित नसे. परंतु कोणी त्याच्याशीं वांकडा वागला तर मात्र त्याला माफ करणें त्याला माहीत नव्हतें. म्हणून गणपतरावावर राग आला तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तरी त्यानें आपला राग मनांतल्या मनांत ठेवला.

गणपतरावाला या गोष्टीची कल्पना देखील नव्हती. एकदां तो नित्याप्रमाणें जमीनदाराकडे भेटायला गेला. नोकरानें आंत जाऊन निरोप सांगितला.

"मला भेटायला आला आहे! निघून जा म्हणावें व असेंहि सांग कधीं माझ्या घरची पायरी चढलास तर तंगड्याच मोडून टाकीन." जमीनदाराला अतिशय राग आला होता. नोकर परत जाऊन म्हणाला—"धनी भेटायला तयार नाहींत व पुन्हां येण्याची गरज नाहीं म्हणून तुम्हांला सांगायला सांगितलें आहे."

गणपतराव चकितच झाला. त्याला स्वतःच्या कानांवर विश्वासच बसेना. तो म्हणाला—"तूं कांहीं तरी चुकत आहेस. तो निरोप



माझ्यासाठीं नसणार, आणखी कोणासाठीं तरी असेल. पुन्हां जाऊन सांग कीं गणपतराव आले आहेत व फक्त एक मिनिटभर भेटायला वेळ मागितला आहे." त्यानें नोकराला पुन्हां घरांत सांगून पाठविलें.

आतां जमीनदाराला नोकराचा राग आला. म्हणाला—"मी तुला जो निरोप सांगायला सांगितला होता तो सांगून तूं परत यायला हवें होतेंस. हा निरोप घेऊन येण्याची काय गरज होती?"

नोकरानें परत येऊन गणपतरावाला जमीनदारानें जसें सांगायला सांगितलें होतें

तसेंच सांगितलें. गणपतराव हुशार होता. कोणीतरी आपल्या विरुद्ध नक्की कान भरले आहेत हें ओळखून त्यानें विचार केला कीं वेळींच जमीनदाराचा राग कमी झाला नाहीं तर पुढें जास्तच त्रास होईल. म्हणून तो घराबाहेर ओसरींत बसून राहाला. म्हणाला—"जमीनदार साहेबांची मर्जी. ते बाहेर येतील तेव्हां त्यांना भेटूनच मी जाईन.

नोकरानें घरांत जाऊन धन्याला गणपतराव बाहेर धरणें धरून बसला असल्याचें सांगितलें. जमीनदाराला राग आला. त्याला कसें हाकलून लावावें या विचारांत जमीनदार असतां समोर भीमराव दिसले.

जमीनदार म्हणाला—"भीमराव, गणपतरावाला ओळखतां ना? तो मला भेटायला म्हणून आला आहे. मी त्याचें तोंड पाहायचें नाहीं असें ठरविलें आहे. मी नोकराकरवीं सांगून पाठविलें. पण तो तेथून निघून जायला तयार नाहीं. तूं जाऊन त्याला निघून जायला सांग. त्याला कळलें पाहिजे कीं मी सांगितलें तें खरें आहे. छान ठोकून बजावून सांग."

"त्यांत काय मी आत्तां सांगतों." असें सांगून भीमराव बाहेर आले. जातांना एक काठी घेऊन गेले. दोन काठ्या लगावून म्हणाले—"पुन्हां आपलें तोंड दाखवूं नकोस!" समजलें. ठोकून बजावून सांगायला जमीनदारानें सांगितलें होतें. भीमरावांनीं गणपतरावाला ठोकून काढलें आणि निरोप सांगितला.

गणपतरावानें तेव्हां तेथून पाय काढला. भीमरावांनीं अशी दुर्गत केल्यावर तेथें पुन्हां पाऊल टाकण्याची त्याची हिंमत झाली नाहीं.

[पुढील महिन्यांत आणखी एक पराक्रम]





# त्यांना भुतें पण भीत

जगांत भुतांना भिणारे, भुतांना पाहून न भिणारे व ज्यांना पाहून भुतें देखील भितात असे तिन्ही प्रकारचे लोक आहेत.

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. तो पहाटे उठून शेजारच्या गांवीं आठवड्याचा बाजार होता म्हणून निघाला. अर्थातच पहाटेचा अंधुक प्रकाश होता. गांवाबाहेर पोंचल्यावर तो एका झाडींतून जाऊं लागला तेव्हां त्याला माणसासारखी एक विचित्र आकृति दिसली.

"कोण तूं?" त्या शेतकऱ्यानें निर्भीकपणें त्याला विचारलें.

"मी भूत आहें." ती आकृति म्हणाली.

पण शेतकरी भ्याला नाहीं. "असें होय बरें झालें. कोणी भूत भेटतें का पहात होतों. मी देखील भूतच आहें." शेतकरी उत्तरला.

"कोठें निघालास?" भुतानें त्याला विचारलें.

"बाजारांत!" शेतकरी म्हणाला.

"मी पण बाजारांतच जात आहें. चल आपण दोघे मिळून जाऊं!" भूत म्हणालें.

कांहीं अंतर चालून गेल्यावर भूत म्हणालें—"दोघांनीं चालण्याचा कष्ट करण्यापेक्षां कांहीं अंतर तूं माझ्या खांद्यावर बस व कांहीं अंतर मी तुझ्या खांद्यावर बसेन."

"तर मग प्रथम तूंच माझ्या खांद्यावर बस!" शेतकरी म्हणाला. भूत शेतकऱ्याच्या खांद्यावर बसलें. त्याचें ओझें शेतकऱ्याला थोडें देखील भासलें नाहीं. कांहीं अंतर चालून गेल्यावर भूत म्हणालें—"आतां तूं बस माझ्या खांद्यावर!"

पण शेतकरी खांद्यावर बसल्यानंतर भूत म्हणालें—"काय रे तुझें वजन तर फारच जास्त आहे. भुताला तर वजन नसतें!"

"मी तुला भेटलों तेवढा वेळ पर्यंतच भूत होतों." शेतकरी म्हणाला. भुताला तें उत्तर ऐकून आश्चर्य तर वाटलेंच पण त्यानें स्वतःच्या मनाचें समाधान करून घेतलें. शेतकऱ्यानें विचारलें—"मी नुकताच भूत झालों आहें. भुताला कसली भीति असते हें नाहीं मला माहीत! सांगशील का?"

"भुताच्या अंगावर जिवंत माणूस थुंकला तर तें भुताला वाईट!" भूत म्हणालें.

दोघांना एक कालवा ओलांडून जावयाचें होतें. दोघांनीं निरनिराळे पलीकडे जायचें ठरविलें. भूत सहज पलीकडे निघून गेलें. कांहीं आवाज वगैरे ऐकूं आला नाहीं. पण शेतकरी उडी मारून पलीकडे आला तेव्हां मात्र श्वासोच्छ्वासाचा व उडी मारल्याचा आवाज झाला.

भुतानें रागावून विचारलें—"कालवा पार करतांना इतकी धांवपळ कां केलीस?"

"अरे सांगितलें नाहीं का तुला कीं मी नवें भूत आहे म्हणून?" शेतकरी भ्याल्या शिवाय उत्तरला.



कालव्या पलीकडे थोड्या अंतरावरच आठवड्याचा बाजार होत असे. "येथून मी तुला खांद्यावर घेऊन जातों." असें सांगून शेतकऱ्यानें भुताला आपल्या खांद्यावर बसायला सांगितलें. तोंपर्यंत छान उजाडलें होतें. भूत खांद्यावरून उतरूं लागलेलें पाहून शेतकऱ्यानें त्याचे दोन्ही पाय घट्ट धरून ठेवले. भूत मोठ्यानें ओरडूं लागलें. पण शेतकऱ्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. शेतकऱ्यानें त्याच्या दोन्ही तंगड्या धरून त्याला खालीं उतरलें. जवळच मेंढरें विकायला ठेवलेलीं दिसलीं. तीं पाहून भुतानें मेंढराचें रूप घेतलें. शेतकऱ्याच्या हातांतून निसटून मेंढरांत जाऊन मिसळून राहालें कीं शेतकरी ओळखूं शकणार नाहीं असा विचार करून त्यानें मेंढराचें रूप धारण केलें होतें. पण शेतकऱ्याला त्याचें गुपित कळलें होतें. तो त्याच्या अंगावर थुंकला.

त्यामुळें भुताला मेंढराचें रूप बदलून पुन्हां स्वतःचें रूप मिळणें अशक्य झालें होतें. शेतकऱ्यानें त्या भुताला मेंढरूं म्हणून एका खाटिकाच्या हातीं विकून टाकलें.

* * *





एका गांवीं एक मनुष्य रहात असे. त्याच्या अंगांतलें बळ व त्याचा पराक्रम पाहून त्याच्या वाटेला कोणी जात नसे. परंतु तो फार गरीब होता. फेरीवाल्याचें काम करून तो स्वतःचा उदरनिर्वाह करी. त्याच्या सारख्या गरिबाला आपली मुलगी कोण देणार ?

जगांत आपल्यासारखे बळकट शरिराचे लोक जन्माला येऊन काय उपयोग ? गरिबी-मुळें पोट तर भरत नाहीं व गरीब आहे म्हणून लग्न पण होत नाहीं. ही गोष्ट तो ज्याच्या ज्याच्या घरीं जाई, सांगत असे.

एकदां एका श्रीमंत माणसाला त्याचें हें रोजचें रडगाणें ऐकून कंटाळा आला. तो रागानें म्हणाला—"तुला आपल्या शक्तीचा इतका गर्व आहे तर मग तूं आमच्या गांवच्या सुब्बुसेट्टीच्या नव्या घरांत शिरून बसलेल्या भुताला कां नाहीं बाहेर हुसकावून लावीत ? तो तुला चार पैसे तरी देईल."

त्या गांवांत सुब्बुसेट्टी नांवाचा एक श्रीमंत वाणी रहात असे. त्यानें एक मोठें घर विकत घेऊन एका सुमुहूर्तावर घरांत प्रवेश केला. पण त्या दिवशीं रात्रीं त्याच्या दोन स्वामीभक्त नोकरांना एकाएकीं मरण आलें. खरें कारण कोणाला कळलें नाहीं. सुब्बुसेट्टी घाबरला आणि सकाळीं घर रिकामें करून पुन्हां आपल्या जुन्या घरीं जाऊन राहूं लागला. त्यानंतर कोणी त्या घरांत बिन भाड्यानें रहायला सुद्धां तयार झाला नाहीं.

ही गोष्ट फेरीवाल्याला माहीत नव्हती असें नाहीं. पण भुताला हाकलून लावलें तर सुब्बुसेट्टी बक्षिस देईल ही गोष्ट कळल्यावर तो त्यांच्या घरीं गेला आणि म्हणाला—"शेटजी ! मी आपल्या घरांतलें भूत हाकलून लावतो. आपण काय बक्षिस द्याल ?"

"तूं भुताला हाकलून लावलेंस तर मी तुला दहा हजार रुपये बक्षिस देईन व तुला एक घर बांधून देईन." सुब्बुसेट्टी म्हणाला. फेरीवाल्याला परमानंद झाला. पण शेटजींच्या शब्दावर त्याचा विश्वास बसत नव्हता. म्हणून त्यानें शेटजींना कागदावर लिहायला सांगून त्यांची सही घेतली. नंतर तो भुताटकीच्या घरांत गेला.

त्याला ज्या ज्या वस्तूची गरज होती, शेटजींनीं त्या सर्व त्याला आणून दिल्या. शेटजींनीं त्या सर्व वस्तु घेऊन जायला आपल्या नोकराला बरोबर पाठविलें. तो गरीब मनुष्य घरांत गेल्यावर शेटजींनीं घराला बाहेरून कुलूप लावून घेतलें व काळोख व्हायच्या आंत तेथून निघून गेले.

फेरीवाल्यानें घरांत जाऊन एक खोली झाडून स्वच्छ केली. दिवा लावून खायला बसला. बरोबर आणलेली पावशेर लसूण त्यानें खाऊन टाकली व नंतर दिवा विझवून एक चादर अंथरून बसला.

मध्य रात्रीच्या सुमारास कोणीतरी येत असल्याचा भास झाला. तें भूत होतें. भूत जवळ येईपर्यंत फेरीवाला गुपचुप बसून राहाला. पण भूत जवळ आल्यावर चटकन



उभा राहून त्यानें भुताचे दोन्ही हात धरले. भुतानें स्वतःला सोडवून घेण्याची पुष्कळ खटपट केली. पण फेरीवाल्याच्या बळकट मुठींतून निसटून जातां येईना. तेव्हां भूत त्याच्या अंगावर व तोंडावर थुंकूं लागलें. त्या भुताचा श्वासोच्छ्वास फेरीवाल्याला बर्फासारखा गार वाटला. म्हणून फेरीवाल्यानें आपलें तोंड एका बाजूला फिरविलें. आतां त्याची मान गारठून गेली.

तरी फेरीवाला घाबरला नाहीं. त्यानें भुताच्या तोंडावर आपला श्वास सोडला. लसणीच्या वासानें भुतानें तोंड फिरविलें.



तरी मधून मधून ते फेरीवाल्यावर थुंके व फेरीवाला त्याच्या तोंडावर आपला श्वास सोडी. त्यानें त्याचे हात मात्र सोडले नाहींत. उजाडेपर्यंत दोघांची झोंबाझोंब चालू होती.

सकाळीं भूत पळून जाण्याचा प्रयत्न करील असा विचार करून फेरीवाल्यानें त्याचे हात जास्तच घट्ट धरून ठेवले. भूत अदृश्य झालें नाहीं. पण हळू हळू ल्हान होत गेलेलें मात्र फेरीवाल्याला दिसलें.

उजाडल्यावर सुब्बुसेट्टी आपल्या एका मित्राबरोबर त्या घरीं आला व दार उघडून आंत गेला. फेरीवाला मेला असणार अशी दोघांची समजूत होती. परंतु जिवंत असलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्याहून जास्त आश्चर्य त्याच्या हातांतलें एक लाकूड पाहून त्यांना वाटलें.

"हें घ्या भूत!" फेरीवाला तें लाकूड दाखवून म्हणाला. नंतर सुब्बुसेट्टीनें बाहेर जाऊन विस्तव पेटविला. फेरीवाल्यानें त्या भूताला त्यांत टाकलें. मढें जळतांना जसा घाण वास येतो तसा वास आला.

त्यानंतर त्या वाड्यांत कोणाला भूत आढळलें नाहीं. सुब्बसेट्टीनें घर साफसूफ करविलें व येऊन त्यांत राहूं लागला.

सुब्बुसेट्टीनें कागद लिहून दिला होता त्या प्रमाणें फेरीवाल्याला दहा हजार रुपये बक्षिस दिले व एक घर देखील बांधून दिले. फेरीवाला लग्न करून त्या घरांत आनंदानें राहूं लागला.

* * *

आणखी एक गोष्ट. एका गांवांत एक विद्वान शास्त्रीबुवा रहात असत. एकदां त्यांच्याकडे त्यांच्या मित्राचा तरुण मुलगा त्यांना भेटायला म्हणून आला. शास्त्रीबुवांनीं त्याला आग्रह करून चार दिवस राहून जायला सांगितलें.



उन्हाळ्याचे दिवस होते. पण शास्त्रीबुवांच्या घरांतली एक खोली थंडगार असे. त्या खोलींत कोणी कधीं रहात नसे. त्या तरुणानें ती खोली पाहाली व म्हणाला— आज रात्रीं या खोलींतच झोंपेन मी."

"या खोलींत! नको रे बाबा! या खोलींत एक भूत आहे. रात्रीं कोणी या खोलींत पाऊल देखील टाकीत नाहीं." शास्त्रीबुवा म्हणाले.

"भूत! कसलें आलें आहे भूत?" त्या तरुणानें शंका केली. त्याचा भुतावर विश्वास नव्हता.

शास्त्रीबुवा म्हणाले—"कांहीं दिवसांपूर्वी आमच्या मोलकरणीनें आढ्याला दोरी बांधून गळ्याला फांस लावून घेतला होता. ती या खोलींत भूत होऊन बसली आहे."

तें ऐकून तो तरुण म्हणाला—"तर मग मी याच खोलींत आज रात्रीं झोंपणार." शास्त्रीबुवांनीं त्याच्या आग्रहानें त्याच्या झोंपण्याची व्यवस्था त्या खोलींत करून दिली. तो तरुण अंथरुणावर आडवा झाला.

अंथरुणावर अंग टाकल्याबरोबर त्याला समोर भूत दिसलें. भूत आंत कोठून व



कसें आलें हें त्याला दिसलें. दाराच्या फटींतून प्रथम कागदासारखें कांहीं तरी आलें व नंतर तें धुरासारखें पसरलें आणि त्याला स्त्रीरूप मिळालें.

ती स्त्री खोलींत लांब जीभ काढून व मागें वांकून उभी राहाली. गळ्याला फांस लावून घेणारे असेंच करतात म्हणे.

परंतु त्या तरुणाला थोडी देखील भीति वाटली नाहीं. तो म्हणाला—"छान! खूप नृत्य चालू आहे. चालू दे!"

त्या भुताला कळलें कीं स्वारी आपल्याला भिणारी दिसत नाहीं. भुतानें आपलें डोकें आपल्या धडावरून काढून हळूच त्या तरुणाच्या अंथरुणावर ठेवलें.

"तुझें डोकें तुझ्या धडावर असतांना तूं मला भेडावूं शकली नाहींस आतां तुझ्या या डोक्याला पाहून मी भिऊन जाईन असें वाटलें होय तुला?" तें ऐकून भूत निघून गेलें.

दुसऱ्यादिवशीं सकाळीं तरुणानें रात्रीं घडलेलें वृत्त शास्त्रीबुवांना सांगितलें. तेव्हां ते म्हणाले-"हें पहा, मी तुला रात्रींच सांगितलें होतें कीं या खोलींत तूं झोंपूं नकोस. पण तूं ऐकलें नाहींस. आज रात्रीं झोंपूं नकोस म्हणजे झालें."

पण तरुणानें तिकडे दुर्लक्ष केलें. त्या दिवशीं रात्रीं देखील त्याच खोलींत झोंपण्याचा त्यानें हट्ट धरला व त्याच खोलींत झोंपला.

त्या दिवशीं रात्रीं पुन्हां भूत आलें आणि म्हणालें—"हा अडाणी मेला कायमचा येथेंच राहणार वाटतें! नको ग बाई ही खोली आपल्याला" असें सांगून तें भूत अदृश्य झालें.





# किष्किंधाकांड

वसंत ऋतु होता. पंपा सरोवराचें स्वच्छ निर्मळ पाणी व त्यांत सुंदर रंगबिरंगी कमळें, सर्व दृश्यच मनोहर होतें. फुलांचा सुगंध सर्वत्र दरवळत होता. कोकिळा आंब्याच्या झाडावर बसून गात होती व मोर नाचत होते.

निसर्गाची ती शोभा पाहून रामाला आनंद व्हायला पाहिजे होता. पण त्या ऐवजीं विरहदुःखानें तो जास्तच दुःखी झाला. प्रत्येक सुंदर वस्तु, प्राणी व दृश्य पाहून त्याला सीतेची आठवण होई. तो लक्ष्मणाला म्हणाला—"येथें सीता असती तर! पण तेवढें माझें भाग्य कोठें आहे? तिच्या शिवाय आतां जिणें व्यर्थ ओझें वाटूं लागलें आहे. मी येथेंच प्राणत्याग करतों. तूं भरताकडे निघून जा."

लक्ष्मणानें रामाला धीर दिला. म्हणाला—"सीतेवर तुझें जें प्रेम आहे त्यामुळें तुझ्या मनाची अशी स्थिति झाली आहे. रावणाच्या हातांतून तिला सोडवून आणणें हें तुझें व माझें प्रथम कर्तव्य आहे. तूं प्राणत्याग केलास तर तिची सुटका न झाल्याचें दुःख तुझ्या मनांत राहून जाईल. म्हणून तिला सोडवून आणण्यासाठीं प्रयत्न केला पाहिजे."

लक्ष्मणानें धीर दिल्यावर रामाच्या मनाचें थोडें समाधान झालें.



रामलक्ष्मण पंपा सरोवरावर पोंचले तेव्हां पासून सुग्रीव व त्याचे अनुयायी ऋष्यमूक पर्वतावर बसून दोघांना पहात होते. तो आपल्या अनुयायी वानरांना बरोबर घेऊन मातंग ऋषींच्या आश्रमांत जाऊन लपून बसला. कारण आश्रमांत वालीला प्रवेश वर्ज्य होता.

सुग्रीव आपल्या मंत्र्यांना म्हणाला—"कोणी तरी दोघे वेष पालटून वल्कलवस्त्र धारण करून या रानांत हिंडत आहेत. वालीनेंच त्यांना पाठविलें असणार!"

तें ऐकून सुग्रीवाचा एक मंत्री हनुमान म्हणाला—"या ऋष्यमूक पर्वतावर वालीला पाऊल देखील टाकतां येणार नाहीं. कारण त्याला तसाच शाप आहे. मग घाबरण्याचें कारण काय?"

तें ऐकून सुग्रीव म्हणाला—"वाली येणार नाहीं. पण हे दोघे मनुष्य पहा! हत्तीच्या सोंडेसारखे ह्यांचे लांब लांब हात व हातांतील धनुष्यबाण पाहून कोणालाहि भीति वाटल्याशिवाय राहणार नाहीं. वालीनें ह्यांना पाठविलें नसेल कशावरून? तो स्वतः येऊं शकला नाहीं म्हणून माझा कांटा दूर करण्यासाठीं त्यानें ह्यांना पाठविलें असेल असें मला वाटतें. म्हणून आपण सावध राहिलें पाहिजे. हे कोण आहेत व कशासाठीं इकडे आले आहेत ह्या गोष्टीची माहिती काढून घे. तूं वेष पालटून जा."

आपल्या राजाच्या सूचनेप्रमाणें हनुमानानें वानररूप सोडून ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचें रूप धारण केलें आणि रामलक्ष्मणांना भेटायला निघाला.

विनयपूर्वक रामलक्ष्मणांना नमस्कार करून तो म्हणाला—"आपण तपस्वी ऋषी दिसतां. आपण राजर्षी आहां का? आपण राज्य करायचें सोडून हीं वल्कल-वस्त्रें कशासाठीं धारण केलीं? आणि या पंपासरोवराच्या निर्जन काठीं येण्याचें कारण काय? माझ्या-कडून आपली कांहीं मदत होण्यासारखी असल्यास अवश्य आज्ञा करावी."

कांहीं वेळ थांबून हनुमान पुढें म्हणाला—"आमचा राजा सुग्रीव आहे. त्याला त्याचा भाऊ वाली यानें गादीवरून हुसकावून त्याचें राज्य बळकावलें आहे. मी त्याचा मंत्री आहें. माझें नांव हनुमान आहे. माझ्या वडिलांचें नांव वायुदेव. सुग्रीव राजाच्या आज्ञेप्रमाणें मी हा वेष धारण करून ऋष्यमूक पर्वतावरून आलों आहें."



हनुमान रामाचें निष्कपट रूप पाहून चकित झाला होता. ज्या कामासाठीं सुग्रीवानें त्याला पाठविलें होतें तें देखील तो विसरून गेला.

राम हनुमानाचा तो निष्कपटपणा पाहून लक्ष्मणाकडे पहात कौतुक करीत म्हणाला—"लक्ष्मणा! तूं याला सर्व कांहीं सांग! हा हुशार दिसतो आहे. याच्या सारखा मंत्री राजाकडे असल्यावर राजाला भीति असण्याचें कारणच काय?"

लक्ष्मण हनुमानाला म्हणाला—"हनुमाना! आम्ही तुझा राजा सुग्रीव याच्या विषयीं पूर्वीच ऐकलें आहे. त्याला भेटण्यासाठींच आम्ही दोघे आलों आहों. हे माझे वडील बंधु रामचंद्र. ह्यांना तुझा राजा सुग्रीव याच्या मदतीची फार जरूर आहे. ज्यानें जें मागितलें, रामानें त्याला तें दिलें. पण आतां राम स्वत इतरांचें सहाय्य मागण्यासाठीं आला आहे. तें मिळेल यांत शंका नाहीं." हें बोलत असतां लक्ष्मणचे डोळे ओले झाले.

हनुमान म्हणाला—"आपण थोर पुरुष! आपल्या शोधार्थ आमच्या राजानें येथवर यायला पाहिजे होतें. त्यांचें हें अहोभाग्यच म्हणावयाचें कीं आपण स्वतः त्यांच्या



शोधार्थ येत आहां. सीता मातेच्या शोधार्थ आमचा राजा सुग्रीव आपलें सर्वस्व खर्ची घालील. यावें, आपण सुग्रीव राजाकडे जाऊं या.'' हनुमानाचा प्रेमळ व विनम्र स्वभाव पाहून रामाच्या मनांत त्याच्या विषयीं प्रेम व विश्वास उत्पन्न झाला व तो लक्ष्मणाबरोबर सुग्रीव राजाकडे निघाला. हनुमानानें पुन्हां वानररूप धारण केलें व राम-लक्ष्मणांना आपल्या खांद्यावर बसवून तो ऋष्यमूक पर्वतावर गेला.

सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर नव्हता. तो मलय पर्वतावर गेला होता. त्यानें त्याला जाऊन सांगितलें कीं राम व लक्ष्मण पराक्रमी योद्धा आहेत. त्यांच्याशीं सख्य केल्यानें त्यांची मदत मिळूं शकेल. राम स्वतः सीतेच्या शोधार्थ निघाला आहे व त्याला मदतीची जरूर आहे.

रामाविषयीं सुग्रीवाच्या मनांत होती नव्हती ती भीति पार नाहींशी झाली व तो रामाला भेटण्यासाठीं वानररूप सोडून मनुष्य-रूपानें आला. तो रामाला म्हणाला—"हनुमानानें आपल्याविषयीं सर्व कांहीं मला सांगितलें आहे. आपण महाराज दशरथाचे जेष्ठपुत्र व आपण आमच्या सारख्या वानरांकडे सहायता मागण्यास यावें हें आमचें भाग्य." असें सांगून त्यानें मैत्रीचा हात पुढें केला.

रामानें प्रेमपूर्वक त्याचा हात आपल्या हातांत घेऊन त्याचें आलिंगन केलें आणि त्याचें सख्य स्वीकारलें.

नंतर हनुमानानें अग्नि पेटवून राम व सुग्रीव यांना त्याच्या दोन्ही बाजूला उभें रहावयास सांगितलें. दोघांनीं अग्नीला साक्ष ठेवून परस्परांचें सख्य कायम ठेवण्याची शपथ घेतली. त्यावेळेपासून राम व सुग्रीव यांचें सख्य झालें. दोघांनीं परस्परांच्या सुखदुःखांत सहाय्य करण्याचें वचन दिलें. सुग्रीव झाडाची एक फांदी तोडून घेऊन आला. त्यावर दोघे राम व सुग्रीव बसले. पुढें परस्पर सख्याचें तें एक चिन्ह समजलें जाऊं लागलें.

त्याच प्रमाणें हनुमान देखील एक फांदी तोडून घेऊन आला. तीवर लक्ष्मण व हनुमान बसले. तेव्हां सुग्रीव रामाला म्हणाला—"रामा, माझा थोरला भाऊ वाली आहे. त्यानें माझें राज्य अन्यायानें बळकावलें आहे. माझ्या बायकोला देखील तो धरून घेऊन गेला आहे. त्याच्या भीतीनें मी रानोमाळ फिरत आहें. मला अभयदान द्यावें!"

"सुग्रीवा! तूं सहाय्य करायचें कबूल केलें आहेस. त्या मदतीचा मोबदला म्हणून मी वालीचा वध करीन. एकाच बाणानें मी त्याला ठार करीन."

"आपल्या अनुग्रहानें मला माझें राज्य व पत्नी परत मिळेल. आपण ज्या हेतूनें या रानांत हिंडत आहां त्याचें कारण हनुमानाकडून मला कळलें आहे. तूं व तुझा भाऊ लक्ष्मण कुटींत नसतां रावण सीतेला तिच्या इच्छेविरुद्ध उचलून घेऊन गेला आहे.



त्याला याचीं फळें चाखावीं लागतील. त्यानें जटायूचा वध केला. त्याचा शाप रावणाच्या डोक्यावर आहेच. सीता त्रिलोकांत कोठेंहि असो तिला हुडकून तुझ्या स्वाधीन करण्याची जबाबदारी मी घेतों. तुला सीतेचा विरह फार दिवस सहन करावा लागणार नाहीं."

नंतर आठवल्यासारखें करून म्हणाला—"आतां माझ्या लक्षांत आलें. एक राक्षस आकाश मार्गानें जात होता. एका स्त्रीचा आक्रोश ऐकून आम्ही वर पाहूं लागलों. तिनें आपला पदर फाडून त्यांत आपले












दागिने बांधले व आमच्याकडे फेंकले. ही बातमी तुझ्याकडे कशी तरी पोंचती होईल हाच हेतु तिचा असावा." असें सांगून त्यानें हनुमानाला तीं रत्नाभूषणें घेऊन यायला सांगितलें.

रामाची छाती विरहदु:खानें धड धड कांपत होती. सीतेचे दागिने पाहून व सीतेच्या पदराचा तो तुकडा ओळखून राम स्वत:चें दु:ख आवरूं शकला नाहीं. तो लहान मुलासारखा रडूं लागला. रामाचें तें दु:ख पाहून तेथें हजर असलेल्या सर्व नर-वानरांचे डोळे ओलावले. राम म्हणाला—

"लक्ष्मणा! पहा, ह्या रूपें सीताच माझ्यासमोर उभी राहून केविलवाण्या मुद्रेनें पहात आहे. त्या असहाय स्थितींत मला कळावें म्हणून तिनें हे दागिने टाकले आहेत."

लक्ष्मण दागिने पाहून म्हणाला—वहिनींच्या पायांतली ही जोडवीं माझ्या ओळखीचीं आहेत, हीं त्यांचीच आहेत. त्यांचे इतर दागिने मी कधीं पाहिलेच नाहींत तर तें मी कसे ओळखणार?"

"सुग्रीवा! तो राक्षस तुझ्या देखत सीतेला घेऊन आकाशमार्गानें गेला. तो कोणत्या दिशेनें गेला हें तुला आठवतें का? तो कोठें राहतो हें मला सांग! मी जाऊन आतांच्या आतां त्याच्या या दुष्कृत्याबद्दल त्याला दंड देतों."

सुग्रीव म्हणाला—"तो राक्षस कोठें राहातो, हें मला माहीत नाहीं. पण रामा, तूं निश्चिंत रहा! सीतेचा शोध लावण्याची जबाबदारी मी स्वत:वर घेतली आहे व ती मी पुरी करीन. मी वानर असून पत्नीविरह सहन करीत आलों. दमादमानें सर्व गोष्टी होतील असें समजूनच पुढें पाऊल टाकलें पाहिजे."










तें ऐकून रामाच्या मनाचें समाधान झालें. त्यानें डोळे पुसून सुग्रीवाचे आभार मानले व म्हणाला—"मित्रानें मित्राला जो सल्ला द्यावयास हवा तसाच तूं दिला आहेस. गोड बोलून गळा कापणारा शत्रु जितका भयंकर असतो तितकाच सत्य व कटुवचन सांगणारा मित्र हितैषी असतो. या कष्टकाळांत मला तुझ्यासारखा सखा लाभला हें माझें भाग्य. तूं सीतेचा शोध लाव. ती जबाबदारी मी तुझ्यावर टाकतों. आता मी तुला कशाप्रकारें मदत करूं, सांग. मी मदत द्यायचें वचन दिलें आहे. तें पाळलें जावें या साठीं मी कोण कोणत्या गोष्टींची सावधगिरी बाळगली, पाहिजे हें देखील तूं सांगून ठेव. वालीचा वध करीन हें दिलेलें वचन मी पाळीन. तूं अगदीं निश्चिंत रहा."

नंतर राम सुग्रीवाला बरोबर घेऊन एकांत स्थानीं मंत्रणा करण्यासाठीं बसला. सुग्रीव म्हणाला—"रामा! माझा भाऊ वाली फार पराक्रमी आहे. त्यानें मला आपल्या राज्यांतून बाहेर काढलें व माझ्या पत्नीला हरण करून घेऊन गेला. माझ्या स्नेही मित्रांना त्यानें तुरुंगांत टाकलें आहे. त्यानें माझा वध करण्याचा पुष्कळ यत्न केला. अनेक वानरांना त्यानें या कामावर नेमलें. मी सर्वांचा वध केला. आपल्या भावाच्या भीतीनें मी तुला देखील त्याचा हेर समजत होतों. तुझ्यासमोर म्हणूनच मी आलों नाहीं. आतां माझे मित्र व सखा हनुमान आदि मोजके वानर आहेत. यांच्या प्रेमामुळें मी आजवर जिवंत आहें. माझा हाडवैरी वाली जिवंत असेपर्यंत सुखानें आयुष्य घालविणें मला शक्य नाहीं."





# १७. पार्तिनान

ग्रीस देशांत ॲथेन्स नगराजवळ अथेनी देवालय इ. स. ४३७-४३८ च्या सुमारास बांधण्यांत आलें. प्राचीन शिल्पकलेचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. सर्व देऊळ संगमरवरी दगडाचें आहे. या देवळाला १८ खांब आहेत व ॲथेनीची ४२ फूट उंचीची हस्तीदंती मूर्त देवळांत बसविलेली आहे.

बॅजेन्टाईनने ह्या ग्रीक देवळाचें चर्च केलें व पुढें मुसलमानांनी याची मशीद केली. आग्र्याचा ताजमहाल चांदण्या रात्रीं पाहण्यानें जसा सुंदर दिसतो तसेंच हें देऊळ पण चांदण्या रात्रीं फार सुंदर दिसतें.

१६८७ मध्यें व्हेनेशियनांनी पार्तिनानवर गोळीबार केला. त्यामुळें तीन खांब पडले. सन् १८३० मध्यें अमेरिकनांच्या मदतीनें या देवळाची डागडुजी करण्यांत आली.





# भारताचा इतिहास



नासिरुद्दिनाला मूलबाळ कांहीं नव्हतें. गादीला वारस म्हणून त्यानें ग्यासुद्दीन बल्बन याला नेमलें. बल्बन तुर्कस्थानांतील इल्बरी नांवाच्या जातीचा होता. तो लहान असतांच मंगोल त्याला पकडून घेऊन गेले. ख्वाजा जमालुद्दीन यानें त्याला गुलाम म्हणून विकत घेतलें. सन् १२३२ मध्यें तो सकुटुंब दिल्लीला येऊन राहूं लागला तेव्हां बल्बनला आपल्या इतर गुलामांबरोबर सुल्तान अल्तमश याच्या हातीं विकून टाकलें. गुलाम बल्बन यानें आपल्या कर्तबगारीनें चांगला नांवलौकिक मिळविला. सुल्तान अल्तमश यानें सन् १२४७ मध्यें स्वत:च्या मुलीशीं त्याचें लग्न करून दिलें.

अल्तमश वारल्यानंतर तीस वर्षांनीं बल्बन सुल्तान झाला. या अवधींत राज्यांत पुष्कळ फेरबदल झाले. खजिना रिकामा झाला होता. प्रजेंत बंडाळी माजली होती. मंगोल लोकांच्या स्वाऱ्या वाढत होत्या. पण बल्बननें या सर्व परिस्थितींत राज्य कारभार उत्तम तऱ्हेनें चालविला. त्यानें सैन्य व्यवस्थेसाठीं 'मल्कि' नेमलें. त्यानें लुटेरे व डाकू यांच्या अत्याचारांना आळा घातला. गोपाळगिरी व जलाली नामक स्थानीं मजबूत किल्ले बांधले. सर्वत्र शांतता नांदूं लागली.

पश्चिमी सरहद्दीवर मंगोल जातीच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. त्यांनीं स्वत: खलीफाचा वध करून बगदाद काबीज केलें. गजनीचें राज्य स्वाधीन करून घेतलें. पंजाब व सिंध प्रांतावर देखील स्वाऱ्या केल्या. मंगोल जातीचा नेता अलमुतसित हा होता. बल्बननें लाहोरच्या किल्ल्याची डागडुजी करवली. तो किल्ला मंगोल जातीच्या हल्ल्यामुळें नष्ट झाला होता.

बल्बनचा भाई शेरखान सुंकर याच्या पंजाबांत कांहीं जहागिरी होत्या. त्यानें मंगोल जातीला थोपवून धरलें होतें. बल्बननें ईर्ष्येला बळी पडून त्याला विष देऊन त्याचा वध करविला. शेरखानाच्या वधानंतर मंगोल जातीच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. त्यांना थोपवून ठेवण्यासाठीं बल्बननें आपला मुलगा मुहम्मद याला मुल्तानचा सुभेदार म्हणून नेमलें. आपला दुसरा मुलगा बुग्राखान याला जहागिरी दिल्या. सन् १२७९ मध्यें मंगोल जातीनें सतलज नदी ओलांडून सुलतानाच्या राज्यावर स्वारी केली त्या वेळीं सुलतानाच्या दोघां मुलांनीं व सैन्यानें त्यांची पीछेहाट केली.

त्याच वेळीं बंगालचा सुभेदार तुघ्रिल खान यानें दिल्ली सुल्तानाविरुद्ध बंड पुकारलें. सुलतान वृद्ध आहे, मंगोल जातीच्या स्वाऱ्या सुरू झाल्यामुळें चांगली संधी मिळाली आहे. दिल्लीपासून बंगाल पुष्कळ दूर आहे असा विचार करून तुघ्रिल खानानें बंड केलें असावें, त्याच्या सल्लागारांनीं तोच सल्ला त्याला दिला असावा.

बल्बन या बंडाची वार्ता ऐकून भ्याला. त्यानें अमीरखानाला एक मोठें सैन्य देऊन



बंगालकडे पाठविलें. पण अमीरखान या युद्धांत हारला. त्याच्या सैन्यांत फितुरी झाली. शत्रूनें लांच देऊन सैन्यांतल्या मुख्य मुख्य लोकांना आपल्याकडे वळवून घेतलें होतें.

सुलतानानें अमीरखान परत आल्यावर त्याला मृत्युदंड दिला. सन् १२८० मध्यें दुसरें सैन्य पाठविण्यांत आलें. पण त्या सैन्याचा देखील पराभव झाला.

शेवटीं तुघ्रिल खानाला शिक्षा देण्यासाठीं बल्बन स्वत: एक मोठें सैन्य घेऊन व आपला मुलगा बुघ्राखान याला बरोबर










घेऊन लखनौती येथें येऊन पोंचला. ही बातमी ऐकून तुघ्रिलखान जाजनगराच्या रानांत पळून गेला. बंडखोरांचा विमोड करीत बल्बन पूर्व बंगालांत येऊन पोंचला. शेवटीं तुघ्रिलखानाचा वध झाला. त्याचें डोकें उडवून नदींत फेंकून देण्यांत आलें.

सन १२८५ मध्यें मंगोल जातीनें पुन्हां पंजाब प्रांतावर स्वारी केली. बल्बनच्या मोठ्या मुलानें त्यांना तोंड देण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु तो स्वतःच त्यांत मारला गेला. ८० वर्षांच्या वृद्ध बल्बनला पुत्रशोक आवरला नाहीं. त्याचा दुसरा मुलगा बुघ्राखान याला आपला वारस नेमण्याचें ठरविलें. पण त्याला तें कबूल नव्हतें. म्हणून त्यानें आपला नातू कैखुस्रो याला गादीचा वारस म्हणून नेमलें. बल्बन सन् १२८७ च्या शेवटीं मरण पावला.

बल्बन वारल्यानंतर त्याच्या अधिकाऱ्यांनीं त्याच्या इच्छेविरुद्ध कैखुस्रो याला गादीवर बसविलें नाहीं व त्याच्या ऐवजीं बुघ्राखानाचा मुलगा कैकुबाद याला गादीवर बसविलें. त्याचें वय अवघें १७–१८चें होतें. गादीवर बसल्याबरोबर तो भोगविलासांत गुरफटून गेला. दिल्लीच्या कोतवालाचा निजामुद्दीन नांवाचा एक जांवई होता. त्यानें दिल्ली स्वतःच्या स्वाधीन करून घेतली. राज्याकरितां तुर्की व खिल्जी यांच्यांत आपसांत चढाओढ सुरू झाली. मलिक जलालुद्दीन फिरोज याच्या नायकत्वाखालीं खिल्जी लोकांनाच या चढाओढींत यश आलें. कैकुबाद याचा वध झाला. त्याचें प्रेत यमुना नदींत फेंकून देण्यांत आलें. त्याच्या मुलाचा वध करून जलालुद्दीन फिरोज १३ जून इ. स. १२७० या रोजीं स्वतः गादीवर बसला





# दास्य-मुक्ति

गरुड येउनी आइस वदला—
"नव्हतें मजला हें माहीत!
म्हणुन आजवर मातें होतिल
कष्ट किती तूं सहन करीत ॥

"कारण सगळें तव दुःखाचें
कळलें मुनि नारदांकडून।
कधीं ऐकलें नव्हतें पण तें
आजवरी गे तुझ्याकडून ॥

"मौनपणें तूं सोसलीस गे!
सर्व संकटें अन् कष्ट।
नाहिं कसें तें कळलें मजला
बुद्धि जाहली होती भ्रष्ट ॥

"आज उघडले परंतु डोळे
नाहिं मनाला आतां चैन।
दुःखी तुजला करून पडतें
कद्रूला तरि कसलें चैन?

"विचारलें तिज मागुन घेण्या
काय हवें तें याबद्दल।
वदली ती मज—'अवघें अमृत!'
पाहिजे तिला याबद्दल ॥

आणण्यास तें जातों आतां
निरोप दे अन् आशीर्वाद।
कष्ट साध्य हें तरी यशस्वी
होइन असेल तव आशीर्वाद ॥"

पुसून डोळे वदली विनता—
"बाळा, पाहुनि वदन तुझें,
विसरत होतें दुःख आपलें
कौतुक करुनी सदा तुझें!

"धीर धरुनि मी होतें येतिल
दिवस चांगले कधीं तरी।
तुला दुखविणें मला न रुचलें
होतें दुःखी कष्टि जरी ॥

श्री. भालचंद्र आपटे, नवी दिल्ली ]

[ पंचम अध्याय



पंज्यांनीं तो कांसव हत्ती
धरुनि उडाला आकाशांत।
उग्र रूप तें पाहुनि भरली
धडकी इंद्राच्या हृदयांत ॥

दिसलें थांडे मध्यें त्याला
एक वडाचें मोठें झाड।
शृंग एक जणुं हिमालयाचें
खोड तयाचें बलिष्ठ जाड ॥

बसतां एका फांदीवर ती
तुटली तत्क्षण फांदी ती।
उडूं लागला विनता सुत पण
चोंची मध्यें धरुनी ती ॥

हत्ती कच्छप पंज्या मध्यें
चोंची मध्यें अन् फांदी।
विचित्र म्हणजे वालखिल्य मुनि
होते धरुनी ती फांदी ॥

अशा तऱ्हेनें घेउनि सर्वां
गरुड परतला पित्येकडे
वालखिल्य मुनि पाहुं लागले
घाबरून कश्यपाकडे ॥

कश्यप वदले-"वालखिल्य मुनि
ओळखतों मी करुण स्थिति
नव्हतें गरुड माहीत हें कीं
आहे कुणि फांदी वरती ॥

"नका देउं त्या शाप म्हणुनिया
विनंति माझी तुम्हांस ही !"
वालखिल्य मुनि हंसून वदले-
"सर्व प्रभूची माया ही।

"होतों आम्ही झुलत मजनें
गरुडा वरती नाहीं राग !"
गरुड पोंचला ठिकाणावरी
मिळवित सर्वांचा अनुराग ॥






[ १५ ]

[लखू व त्याचे साथी मित्र गुहेंत कांहीं वेळ फिरल्यानंतर बाहेर आले. त्यांना हरणें व त्यांचा पाठलाग करणारे लांडगे दिसले. लांडगे या तिघांना पाहून यांना खायला धांवले. त्यांच्यापैकीं दोघांना लखूनें व गोमांगनें ठार केल्यावर बाकी लांडगे रानांत पळून गेले. पुढें तिथे रानांतून वाट काढीत निघाले असतां त्यांच्यावर दगडांचा वर्षाव झाला. पुढें वाचा.]

लखू ज्या दगडाआड बसला होता तेथून तो गोमांग व जयमल जेथें उभे होते तेथें आला. त्यानें विचारलें—"जयमल! आपण पुन्हां नरभक्षकांच्या जाळ्यांत तर नाहीं सांपडलों?"

जयमल नकारार्थी मान हलवून म्हणाला—"हे नरभक्षक मंडुकेश्वराचे अनुयायी असतीलसें वाटत नाहीं. लपून छपून ह्यांनीं हल्ला केला होता. दुसऱ्या कोणत्या तरी रानटी जातीचे लोक असतील कदाचित. नरभक्षक असते तर ओरडाओरड करून आले असते."

लखू पुढें कांहीं बोलला नाहीं. दगडांचा वर्षाव बंद झाल्यासारखाच होता. क्षणभर थांबून जयमल गुहेच्यावर उभा राहून पाहूं लागला. गोमांग व लखू देखील गुहेच्यावर




उभे राहण्याच्या हेतूनें उठले मात्र त्यांना आवाज ऐकूं आला—"त्या तिघांना जिवंत पकडून आणा. पंखवाल्या जातीच्या लोकांना देऊन टाकूं."

"पंखवाले लोक," वगैरे ऐकून जयमल चटकन उभा राहिला म्हणाला—"चला रानांत पळून जाण्याशिवाय आतां दुसरा मार्ग नाहीं." असें म्हणत तो मागें वळला व एका झाडींत शिरला. गोमांग व लखू देखील त्याच्या पाठोपाठ धांवणार इतक्यांत एक आडदांड रानटी माणूस एक काठी घेऊन आडवा उभा राहिला. पण गोमांगनें त्याच्याच हातांतली काठी हिसकावून घेऊन त्या आडदांड माणसाच्या टाळक्यांत लगावली व तेथून पाय काढला. लखू देखील त्याच्या पाठों-पाठ पळाला.

रानांत पुष्कळ अंतर पळून गेल्यावर तिघे दम घ्यायला एका झाडाखालीं बसले. आतां शत्रु पाठलाग करीत येत नसावेत अशी त्यांच्या मनाची खातरी झाली होती. पंखवाल्या जातीचें नांव ऐकलें तेव्हां-पासूनच गोमांगला धास्ती बसली होती. तो म्हणाला—"लखू त्या पंखवाल्या जातीचें नांव ऐकलें होतेंस ना? त्यांची व नरभक्ष-कांची ओळख तर नसेल?"

"ही पंखवाली जात कोठली हें कांहीं मला उमगलें नाहीं." केशव म्हणाला.

"अशी एक जात आहे हें तुम्ही पूर्वी कधीं ऐकलें नाहीं का?" गोमांगनें विचारलें. लखू व जयमल नकारांथी मान हलवून म्हणाले—"आम्ही नाहीं बुवा ऐकलें!"

"पंखवाल्या जातीविषयीं मी ऐकलें होतें. पण ते राहतात कोठें हें नव्हतें ऐकलें. त्या जातीचे लोक अत्यंत क्रूर आहेत हें मी ऐकलें आहे." गोमांग म्हणाला.

"पक्ष्यांसारखे माणसाला उडतां येतें या गोष्टीवर माझा विश्वास बसत नाहीं." जयमल म्हणाला.

"तरमग, ते रानटी जातीचे लोक असे कां ओरडले?" लखूनें विचारलें.

"तें मी नाहीं सांगूं शकणार. पण मला आपलें वाटतें कीं असे लोक असणेंच अशक्य!" जयमल म्हणाला! तो बोलत बोलत उठून उभा राहिला. त्याचवेळीं त्याला कोणाचा तरी आवाज ऐकूं आला—"मेलों!....वांचवा!....पंखवाला!"

तें ऐकून तिघे त्या बाजूला धांवले. एक रानटी मनुष्य धांवत पळत येत होता. त्याच्या पुढें आणखी एक जण धांवत होता. त्याच वेळीं पक्ष्यासारखें कोणीतरी झाडावरून खालीं आलें व पुढें धांवणाऱ्या माणसाला धरून दूर फेंकून दिलें.

"भयंकर पक्षी!" गोमांग ओरडला. तिघे धांवत धांवत दुसरा रानटी मनुष्य धांवत येत होता त्याच्याजवळ गेले आणि म्हणाले—"बिलकुल घाबरूं नकोस. आम्ही आहों तुझ्या रक्षणाला येथें."

त्यानें वळून पाहिलें. त्याला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. तो म्हणाला—













“त्या पंखवाल्यांच्या हातांत सांपडल्यानंतर प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी रक्षण होणें अशक्य. गुहेंत राहणाऱ्या आमच्या जातीचा ते सूड घेत आहेत. आपल्या देवाला बळी द्यायला म्हणून आमच्या जातीच्या दोघां माणसांना पाठवायला त्यांनीं कळविलें. आम्ही तें ऐकलें नाहीं. म्हणून सुडाच्या भावनेनें ते आमच्या जातीच्या लोकांना ठार करीत आहेत.”

पंखवाल्यानें उचलून ज्याला दूर फेकलें होते त्याच्याजवळ जयमल धांवत गेला. तो मरून पडला होता. “मला असें वाटतें कीं भीतीनेंच मेला असावा.” जयमल म्हणाला.

“पण तो पंखवाला मनुष्य कोठें आहे? जवळपास तर कोठें दिसत नाहीं!” असें म्हणत लखूनें एकदां दृष्टि फिरवली.

जयमल विचार करीत होता. या रानटी माणसाला मारणारा तो पंखवालाच आहे यांत शंका नाहीं. त्याला पक्ष्यासारखे पंख होते. पण त्याचे हात पाय मात्र माणसा-सारखेच होते. तर मग त्याला पक्ष्यासारखें आकाशांत उडतां येत असावें का? कीं तो कोणी मांत्रिक आहे?

“हे पंखवाले किती लोक असतील? कोठें असतील?” जयमलनें त्या नव्या रानटी माणसाला विचारलें. तो म्हणाला—“ते किती आहेत हें आतां मी काय सांगूं. पण पुष्कळ आहेत अशी माझी खातरी आहे.” नंतर पश्चिमेकडे बोट दाखवीत तो म्हणाला—“ते मावळतीकडे दूर डोंगरांत कोठें तरी राहतात असें आम्हांला वाटतें. तिकडे जो जातो तो पुन्हां परत येत नाहीं.”

तें ऐकून जयमल लखूला म्हणाला—“लखू! कांहीं तरी धोका आहे एवढें खास. कोणी तरी मंत्र शक्तीनें उडणारा मनुष्य असावा व तोच सर्वांना त्रास देत असावा. या लोकांची जात असेल असें नाहीं मला वाटत. याच्या मुळाशीं काय आहे याची माहिती करून घेतल्याशिवाय भागणार नाहीं.”

“बरें तर! आपण जास्त माहिती काढूं या. मंत्रबळानें उडतां आलें तर काय पाहिजे? त्या भयानक दरींत पोचायचें कसें हा प्रश्नच सुटेल.” लखू आनंदानें म्हणाला.

त्यांना एकदम कोणीतरी ओरडत येत असल्याचा गलका ऐकूं आला व थोड्याच वेळांत चाळीस पन्नास रानटी लोक आपले भाले घेऊन समोर दाखल झाले. “शस्त्र खालीं ठेवून निमूटपणें शरण आलांत तर प्राण वांचेल!” त्यांचा नायक ओरडून म्हणाला.

त्यांच्याच जातीच्या ज्या माणसाला त्यांनीं वांचविलें होतें त्याच्या आड उभा राहून लखूनें धनुष्यवर बाण ठेवून नेम धरला. जयमल व गोमांग दोघांनीं पण नेम धरला. जयमल ओरडून म्हणाला—“खबर-दार! पुढें पाऊल टाकाल तर! आम्हांला जिवंत पकडणें तुम्हांला शक्यच नाहीं आणि



मरणापूर्वी आम्ही तुमच्यापैकीं अर्ध्या अधिक लोकांना लोळवूं! तुमच्याशीं आमचें वैर नाहीं.”

लखूच्या समोर उभा असलेला तो रानटी माणूस ओरडून म्हणाला—“या लोकांनींच मला वांचविलें. यांच्या जिवाला उपाय होता कामा नये!”

“आमच्यावर तुमचा भरवंसा असेल तर आम्ही तुमच्या जातीचें रक्षण करूं व त्या पंखवाल्या जातीचा नायनाट करूं. आमच्या बाणांसमोर त्यांना टिकाव धरून राहणें अशक्य.” लखू म्हणाला.



त्या रानटी जातीच्या लोकांनीं परस्परांकडे एकदां पाहिलें व आपले भाले उभे करून सरकले. नायक पुढें येऊन विचारूं लागला— "तुम्ही पंखवाल्यांच्या हातून रक्षण करूं शकाल काय? ते आमच्यापैकीं दोघां जणांना रोज बळी देण्यासाठीं मागत आहेत."

"तुमचें रक्षण तर करूंच, त्या पंख-वाल्यांचा संहार देखील करूं. तुम्ही अगदीं निर्धास्त व्हा." जयमल म्हणाला.

त्या नायकानें आपला भाला दूर फेंकून दिला. त्याच्या अनुयायांनीं आपापले भाले जमिनींत रोवून ठेवले. लखू व त्याच्या साथी मित्रांनीं पण आपापले धनुष्यबाण बाजूला सारले.

रानटी लोकांच्या नायकानें पुढें येऊन धनुष्य बाण पाहिले व चकित झाला. म्हणाला—"आमच्याकडे नाहींत हीं अस्त्रें! ही वापरतां आलीं तर शत्रूचा नाश करायला किती उशीर? पण त्या पंखवाल्यांकडे देखील असलीं अस्त्रें असल्याचें आमच्यापैकीं कांहीं लोकानीं पाहिलें आहे. तुम्ही आमच्या जातीच्या रक्षणासाठीं मदत केलीत तर आमची जात पिढ्याम् पिढ्या तुमची गुलाम म्हणून काम करील."

"भयानक दरीची वाट तुला माहीत आहे का?" गोमांगनें त्यांना विचारलें.

जयमलला तें आवडलें नाहीं. "त्या गोष्टी आतांच नकोत!" असें सांगून त्यानें त्याला गप्प केलें. नंतर नायकाला विचारलें— "तुम्ही आपल्या जातीच्या दोघां जणांना रोज कोठें नेऊन सोडतां?"

रानटी लोकांच्या सरदारानें झाडीच्या पलीकडे दिसणाऱ्या एका डोंगराकडे बोट दाखवीत म्हटलें—"ती जागा येथून सुमारें अर्धा कोस असेल. काळोख पडायच्या सुमारास आमच्यापैकीं दोघे जण तेथें जाऊन उभे राहतात. त्यांना पंखवाले येऊन उचलून घेऊन जातात.

"सामान्यपणें किती जण त्यांना धरून घेऊन जायला येतात?" जयमलनें विचारलें.

"किती जण येतात व कसे उचलून जातात, हें आमच्यापैकीं कोणीच आजपर्यंत पाहिलेलें नाहीं. पण आमच्यापैकीं सर्वांना असें वाटतें कीं ते आमच्या माणसाचे पाय पकडून आकाशांत उडूं लागतात व आपल्या देशांत निघून जातात. पण प्रत्यक्ष डोळ्यांनीं कोणीच कांहीं पाहिलेलें नाहीं." त्या रानटी लोकांचा नायक म्हणाला.

"तरमग तुम्ही बळी देण्यासाठीं दोघां जणांना पाठवा. आम्हांला जें करावयाचें तें आम्ही करतों. उद्या सकाळपर्यंत त्यांना आम्ही घेऊन येऊंच त्याबरोबर ते कोठून येतात कसे येतात वगैरे गोष्टींची माहिती काढून घेऊन येऊं. बरें पण तुमची वस्ती कोणत्या भागांत आहे?" जयमलनें विचारलें.

"आम्ही डोंगराळ प्रदेशांत राहातों. अनादि काळापासून आम्ही गुहेंत वास करीत आलों आहों. म्हणून आम्हांला गुहावासी म्हणतात. तुम्ही सांगितल्याप्रमाणें



आम्ही याच जागीं तुम्हांला येऊन भेटूं." असें सांगून गुहावासियांचा सरदार आपल्या अनुयायांबरोबर निघून गेला.

लखू, जयमल वगैरे तो पश्चिमेकडील डोंगर चढूं लागले. वाटेंत गोमांगनें एक ससा मारला. सर्वांनीं मिळून तो भाजून त्या दिवशींची आपली भूक भागवली.

डोंगराच्या मध्य भागीं पोंचेपर्यंत चांगला काळोख पडूं लागला होता. पण सुदैवानें चांदणें पडूं लागलें व तिघे हळूहळू डोंगर चढून जाऊं लागले. एका जागीं त्यांना कोणी तरी येत असल्याची चाहूल लागली.









तिथे झाडाभाड लपून उमे राहाले. थोड्या अंतरावर त्यांना दोन जण झाडाखालीं उभे असलेले दिसले. एकानें दुसऱ्याला सावध केले व दोघे चटकन झाडावर चढूं लागले.

लखू हळूच जयमलला म्हणाला—" त्यांचे ते पंख पाहिलेस ना !" जयमलनें होकारार्थी मान हालविली. इतक्यांत आणखी दोघे त्या झाडाजवळ आले. जंगली गोमांगनें दोघांना ओळखलें व लखूला म्हणाला— " हे तर गुहावासीच दिसत आहेत. पंख-वाल्यांच्या देवाला बळी जाण्यासाठीं स्वतः आलेले दिसत आहेत."

" आपण यांचें रक्षण करण्याचें वचन दिलें आहे." लखू म्हणाला. जयमलनें धनुष्यावर बाण ठेवून नेम धरला. त्याच्या पाठोपाठ दोघे आपापले धनुष्यबाण घेऊन पुढें गेले.

" या लोकांची युक्ति मला कळली आहे. या दोघांपैकीं एक जण देखील परत जातां कामा नये. लक्षांत ठेवा जयमल म्हणाला.

" हे लोक गुहावासियांना आकाशांत उचलून घेऊन जाण्यापूर्वी त्यांचा मुडदा पडला पाहिजे. ही संधी चुकली तर आप-ल्या बाणांनीं ...." गोमांग बोलतच होता कीं इतक्यांत " पक्षीमातेचा जय असो ! " असा घोष झाडींत दुमदुमूं लागला.

इतक्यांत दोन काळ्या आकृति पंख फडफडवीत झाडावरून खालीं आल्या. गुहावासी उभे होते तिकडे त्या दोन्ही आकृति उडत जात होत्या. त्याच वेळीं इकडून तिघांनीं बाण सोडले.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# कृतघ्न

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला— " राजा, तुझी ही आस्था पाहून माझ्या मनांत तुझ्या- विषयीं आदर वाढला आहे. परंतु माझा सल्ला ऐक. कोणावर उपकार करूं नये. कारण मनुष्य स्वभावानें कृतघ्न आहे. मदत करायला निघालेला मनुष्यच नेमका तोंडघशी पडतो. या गोष्टीचें उदा-हरण म्हणून मी प्रवाक नांवाच्या एका शेतकऱ्याची गोष्ट सांगतो. ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सुरू केली.

एका सुंदर सरोवराच्या काठीं एक गांव होतें. त्या गांवांत सुमारें शंभर शेतकरी रहात असत; प्रवाक त्यांच्या पैकींच एक होता. त्याच्याजवळ शेतजमीन बेताचीच होती. पण













तो इतकी मेहनत करी कीं इतर शेतकऱ्यांच्या मानानें त्याच्या शेतांत पीक उत्तम येत असे.

एकदां पिकें तयार झाली असतां प्रवाकला कोठेंतरी परगांवीं जावें लागलें. सुदैवानें त्याचीं कामें पुरी व्हायला वेळ लागला नाहीं. तो घरीं परत यायला निघाला तोंपर्यंत संध्याकाळची वेळ झाली होती. थंडी पडूं लागली होती. तरी तो चालूं लागला. त्याला वाटेंत एक जुनाट देऊळ दिसलें. त्यानें ती रात्र त्या देवळांत काढण्याचें ठरविलें. बाहेरून जरी तें देऊळ वाटत होतें तरी आंत देवाची मूर्ति वगैरे त्याला कांहींच दिसलें नाहीं. लोक तें वरुणाचें देऊळ आहे असें सांगत.

देवळांत जमिनीवर अंग टाकल्यावरोबर प्रवाकचा डोळा लागला व तो छान झोंपी गेला. थोड्या वेळानें त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला बाहेरून "ओहो!" "ओ हो!" असा कोणाचा तरी आवाज ऐकूं आला. देवळांतून कोणीतरी विचारलें—"कोण बोलतें आहे!"

"गर्जन याचा रथ पाहिजे आहे, लवकर घेऊन ये." बाहेरून कोणाचा तरी आवाज ऐकूं आला.

"कोणाला पाहिजे?" आंतून कोणीतरी विचारलें.

"मालक सरोवराच्या कांठीं उजाडतांच जाणार आहेत." उत्तरादाखल बाहेरचा आवाज कानीं पडला.

"बरें तर थांब!" आंतून आवाज म्हणाला.

तें संभाषण प्रथम प्रवाकला कांहींच कळलें नाहीं. त्यानें बाहेर येऊन डोकावून पाहिलें तेव्हां त्याला कोणी दिसलें नाहीं. थोड्या वेळानें त्याला रथ निघून जावा असा कांहीं आवाज ऐकूं आला. परंतु तो ढग गडगडल्यासारखा त्याला वाटला. त्यानें त्या आवाजाच्या अनुरोधानें पाहिलें तेव्हां त्याला वीज चमकलेली दिसली.



इतक्यांत त्याला एक गोष्ट आठवली. त्यानें लोकांच्या तोंडीं तें वरुणाचें देऊळ असल्याचें ऐकलें होतें. हें खरें असेल तर आपल्या गांवीं उजाडण्याच्या सुमारास पाऊस पडणार. पाऊस पडला तर पिकांचीं नासाडी होणार. त्याच्या मनांत गांवकऱ्यांच्या पिकांच्या रक्षणाचा विचार आला. तो क्षणभर देखील थांबला नाहीं. तो त्या काळोख्या रात्रीं आपल्या गांवाला निघाला. त्यानें गांवकऱ्यांना जागें केलें व म्हणाला—"उजाडण्याच्या सुमारास सोसाट्याचा वारा व पाऊस येणार आहे. पीक कापून घरीं घेऊन चला."

त्याचें बोलणें कोणालाच खरें वाटेना. सर्वांनीं आकाशाकडे एकदां पाहिलें आणि म्हणाले—"पाऊस बिऊस येईल सें कांहीं वाटत नाहीं." एकदोघे असे देखील म्हणाले—"प्रवाकच्या मनांत कांहीं तरी हेतू साधून घ्यावयाचा असेल." म्हणून प्रवाक एकटाच शेतावर गेला व उजाडण्यापूर्वी पीक कापून गाडींत घालून घरीं घेऊन आला.



दुसऱ्या दिवशीं उजाडण्याची वेळ झाली तरी सूर्योदय झाल्यासारखें वाटत नव्हतें. सोसाट्याचा वारा सुटला आणि त्या पाठोपाठ मुसळधार वृष्टि सुरू झाली. सर्व शेतें पाण्याखालीं बुडून गेलीं व पिकें कुजून गेलीं. प्रवाकनें त्यांना सावध केलें असून देखील त्यांनीं त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें होतें. त्याबद्दल त्यांना पश्चात्ताप वाटण्याऐवजीं प्रवाक वरच उलट राग आला. त्याच्यामुळेंच त्यांचीं पिकें कुजून गेलीं असा आरोप त्यांनीं त्याच्यावर लावला. गांवांतले सर्वच लोक, त्याच्या विरुद्ध उलटले. तो गांव सोडून निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें– “राजा! मनुष्य इतका कृतघ्न कां होतो? प्रवाकरनें त्यांना वेळींच सावध केलें असून लोक त्याच्याच विरुद्ध कां उलटले? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील, हें विसरूं नकोस.”

विक्रमार्क म्हणाला–“सामान्य मनुष्य उपकारकर्त्याचे आभार मानतो. पण उपकार करण्याचा कोणी नुसता प्रयत्न केला म्हणजे उपकार होत नाहीं. त्याबद्दल कृतज्ञता किंवा आभार मानण्याचा प्रश्नच उठत नाहीं. त्यानें उपकार करण्याचा प्रयत्न केला. पण येणाऱ्या संकटाबद्दल गांवकऱ्यांच्या मनाची खातरी करून दिली नव्हती. साऱ्या गांवाचें नुकसान होणार आहे हें माहीत असून त्यानें फक्त स्वतःच्या शेताचें रक्षण केलें. गांवकऱ्यांना तो त्याचा स्वार्थ वाटला. आपलें सुख किंवा दुःख चार चौघां-बरोबर वांटून घेतलें तरच समाजांत आपला आदर होतो. फक्त स्वतःचाच स्वार्थ पाहून स्वस्थ बसणाऱ्यांचा आदर जग करीत नाहीं. गांवकऱ्यांचें नुकसान झालें होतें. आतां त्याबद्दल त्यांनीं राग काढायचा तर तो कोणावर? वरुणावर राग काढल्यानें काय मिळणार? म्हणून प्रवाकर त्यांच्या रागाला बळी पडला.” निर्दोषी असूनहि बिचारा दोषी ठरला.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाबरोबर अदृश्य झाला आणि नेहमींप्रमाणें झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला. [कल्पित]





# गंधर्व राजकन्या

[ ४ ]

हसन निघून गेल्यावर त्याची बायको दोन दिवस आपल्या सासूबरोबर होती. कांहीं विशेष घडलें नाहीं. तिसऱ्या दिवशीं ती आपल्या सासूला म्हणाली–“सार्वजनिक स्नानागारांत आंघोळीला जावें, म्हणतें. आंघोळ करून किती तरी दिवस झाले.”

बगदादला प्रजेसाठीं आंघोळीकरितां सार्वजनिक स्थानीं व्यवस्था केलेली असे. तिथें तिला जावयाचें होतें. तें हसनच्या आईला नको होतें. म्हणून ती म्हणाली–

“मुली! हें गांव आपल्याला नवें आहे. स्नानागार कोठें आहे हें देखील मला माहीत नाहीं. मी म्हातारी, तुझ्या बरोबर, तरी कशी येणार? घरींच आंघोळ कां नाहीं करून घेत?” “सार्वजनिक स्नानागारांत आंघोळीला जायला देखील परवानगी नाहीं हा काय जुलूम माझ्यावर. असल्या जिण्यापेक्षां मरण बरें!” हसनची बायको म्हणाली.

सुनेचें हें बोलणें सासूला आवडलें नाहीं. म्हणाली–“जगाची रीत म्हणून मला जें योग्य वाटलें तें मी म्हणालें.” ती सुनेला घेऊन सार्वजनिक स्नानाच्या जागीं गेली. ती जागा खास स्त्रियांची म्हणून होती.

हसनच्या बायकोनें स्नानागारांत पाऊल टाकल्याबरोबर तेथें आलेल्या सर्व बायका तिच्या सौंदर्याकडे टक लावून पाहूं लागल्या. त्याच दिवशीं खलीफांची बायको जुबेदा बेगमची तुफान नांवाची दासी आंघोळीला आली होती. हसनच्या बायकोचें सौंदर्य




पाहून ती चकित झाली. एवढेंच नव्हें तर, ती घरीं गेली तेव्हां तिच्या पाठोमाठ जाऊन घर देखील पाहून आली. घरीं येऊन तिनें जुबेदा राणीजवळ हसनच्या बायकोच्या सौंदर्याची वाखाणणी केली.

जुबेदानें पूर्वी कधीं कोणा स्त्रीचें असें वर्णन ऐकलें नव्हतें. तिच्या मनांत तें सुंदर रूप पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली.

जुबेदा राणीनें खलीफाचा अंगरक्षक मंसूर याला बोलावलें आणि म्हणाली—"तुफान सांगते आहे त्या घरीं जाऊन त्या स्त्रीला बोलावून घेऊन ये. कोरा परत आलास तर पहा, तुझें डोकेंच उडवीन."

मंसूर हसनच्या घरीं गेला व हसनच्या आईला म्हणाला—"माझें नांव मंसूर. मी खलीफांचा खास अंगरक्षक आहे. जुबेदा बेगमनें तुमच्या सुनेला बोलाविलें आहे."

हसनच्या आईला तें बरोबर वाटलें नाहीं. ती म्हणाली—"माझा मुलगा बाहेर गांवीं गेला आहे. त्याला विचारल्याशिवाय मी त्याच्या बायकोला कशी काय पाठवूं?"

"स्वत: जुबेदा बेगमनें बोलविलें असतां भिण्याचें काय कारण? तिच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर. मी तिला सुखरूप घरीं पोंचता करीन" मंसूर म्हणाला.

हसनची आई निरुत्तर झाली. तिनें घरांत जाऊन सुनेला सुंदर कपडे घालत मंसूर बरोबर जायला तयार हो म्हणून सांगितलें. नंतर ती स्वत: आपल्या दोघां नातवांना बरोबर घेऊन निघाली.

जुबेदा बेगमच्या महालांत हसनची बायको पोंचली तेव्हां जुबेदा बेगम सिंहासनावर बसलेली होती. तिच्या चारी बाजूला दासींचा घोळका होता. तुफान पण होती. जुबेदा हसनच्या बायकोला म्हणाली—"ये पुढें ये. येथें कोणी पुरुष नाहीं. तोंडावरचा बुरखा काढलास तरी चालेल." असें सांगून तिनें तुफानकडे पाहिलें. तुफान पुढें गेली व हसनच्या बायकोच्या तोंडावरला बुरखा बाजूला सारून म्हणाली—"चल पुढें!" हसनच्या बायकोचें सौंदर्य पाहून जुबेदा बेगम व तिच्या दासी आश्चर्य चकित झाल्या.

जुबेदा स्वत:ला विसरून सिंहासनावरून उतरून खालीं आली व हसनच्या बायकोला सिंहासनावर जवळ बसायला सांगितलें. तिनें आपल्या गळ्यांतला मोत्यांचा हार काढून हसनच्या बायकोच्या गळ्यांत घातला. खलीफांशीं लग्न झालें त्यावेळीं तिनें तो हार गळ्यांत घातला, तो आज गळ्यांतून काढला होता. एवढेंच काय, पण तो तिनें हसनच्या बायकोला प्रेमाची भेट म्हणून देऊन टाकला.

नंतर जुबेदानें तिला विचारलें—"नृत्य, गायन वगैरे तूं शिकलीच असशील?"

"तसें जास्त नाहीं. थोडें फार शिकलें आहे. एक तऱ्हेचें नृत्य मला येतें. पक्ष्यांसारखें मला उडतां येतें." हसनची बायको म्हणाली.



"आश्चर्य! आश्चर्य! तरमग तें पाहिलेंच पाहिजे!" दासी म्हणाल्या.

"आश्चर्य आहे बाई! तरमग तें पहायची इच्छा आहे माझ्या मनांत. पंख लावून उडतेस कीं पंखाशिवाय?"

"पंखाशिवाय कशी उडेन? माझ्याकडे पक्ष्यांचा पोशाख आहे तो घातला म्हणजे मला उडतां येतें." हसनची बायको म्हणाली.

जुबेदा बेगमनें तिला तो पोशाख घालून यायला सांगितलें. पण हसनची बायको म्हणाली—"तो पोशाख तर घरीं



आहे. सासूबाईंना पाठवून मागवून घ्या पाहिजे तर!"

जुबेदानें हसनच्या आईला विचारलें— "आजी, घेऊन याल का तो पोशाख?"

हसनची आई अगदीं निराश झाली. अल्लावर भरंवसा ठेवून ती म्हणाली— "बेगम साहेब पक्ष्यांचा पोशाख माणसें का घालतात? माझ्या सुनेला वेड लागलें आहे. पक्ष्यांचा पोशाख मी कोठून आणूं?"

पण हसनची बायको मध्येंच म्हणाली— "मी म्हणालें तो पोशाख आमच्याच घरांत कोठें तरी लपवून ठेवलेला आहे. हुडकून काढला तर मिळणार नाहीं असें नाहीं."

जुबेदानें आपल्या हातांतलीं सोन्याचीं व हिऱ्यांचीं काकणें काढून म्हातारीला देत विनंति केली—"तो पोशाख घेऊन या! आम्ही थोडी गंमत पाहूं, तुम्ही देखील पहा!"

पण हसनची आई म्हणाली—"मी तो स्वतः पाहिलाच नाहीं तर कोठें आहे हें तरी मी काय सांगूं?"

म्हातारीचा हट्ट ओळखून जुबेदाला पण थोडा राग आला. तिनें मंसूरला बोलावून हसनच्या घराची झडती घ्यायला सांगितलें. घराच्या किल्या वगैरे म्हातारी कडून घेऊन त्याला दिल्या.

मंसूरनें हसनचें घर हुडकून पाहिलें तेव्हां त्याला एका जागीं तो पक्ष्यांचा पोशाख सांपडला. तो घेऊन जाऊन त्यानें हसनच्या बायकोला दिला.

जुबेदानें तो पोशाख पाहिला. त्याची कारीगरी पाहून ती चकित झाली. पण तो घालून कसें उडतां येईल हें तिला खरें वाटेना. तिनें हसनच्या बायकोला तो पोशाख घालून यायला सांगितलें.

हसनची बायको तो पोशाख घालून आली. तिनें आपल्या दोघां मुलांना खांद्यावर उचलून घेतलें आणि त्या मोठ्या दालनांत उडूं लागली. प्रथम झुंबरापर्यंत उडाली व वर जात जात छपराजवळ वारा येण्यासाठीं लावलेल्या तावदानाजवळ जाऊन म्हणाली—"बरें, मी येतें आतां मला निरोप द्या!"

हसनची म्हातारी आई भोंवळ येऊन जमिनीवर पडली. तिची सून म्हणाली— "आजी! मी तुम्हांला व तुमच्या मुलाला कायमची सोडून जात आहें. मला वाईट वाटतें, पण मी काय करूं? पोशाख मिळाल्यानंतर मी आपल्या वडिलांकडे जाण्याचा मोह आवरूं शकलें नाहीं. तुमच्या मुलाला मला भेटावेंसें वाटलें तर त्यांना म्हणावें मी "वाक वाक" नांवाच्या द्वीपांत आहें. तेथें येऊन भेटावें. बरें येतें!" असें सांगून ती खिडकीबाहेर गेली आणि आकाशांत उडूं लागली.

हसनची आई बेशुद्ध पडली होती. जुबेदानें तिला शुद्धीवर आणण्यासाठीं औषधोपचार करविले. ती शुद्धीवर आल्यावर म्हणाली—"आजी, तुम्ही सर्व सांगून





टाकलें असतें तर येथवर प्रसंग आला नसता. माझ्या हातून चूक घडली. माफ करा.”

“चूक तुमची नाहीं, माझी आहे. मी काय माफ करणार ? आमचें नशीबच मुळीं आमच्या विरुद्ध उलटलें आहे, त्याला तुम्ही तरी काय करणार ?”

बिचारी आपलें सर्वस्व घालवून हताश मनानें घरीं परत आली. तिचीं नातवंडें घरांत नाहींत ह्या गोष्टीवर जणुंकाहीं तिचा विश्वासच बसेना. ती घरभर त्यांना शोधूं लागली. अमिष्टासारखी कांहीं वेळ फिरल्यानंतर अगदीं निराश होऊन ती एका जागीं बसून खूप रडली. दुसऱ्या दिवशीं आपल्या नातवंडांची आठवण म्हणून त्यांच्या मूर्ती करून तिनें मुलांच्या खोलींत ठेवल्या व तेथेंच रात्रंदिवस पडून राहूं लागली.

हसन आपल्या बहिणींकडे तीन महिने राहून घरीं बायको व मुलें वाट पहात असतील असा विचार करून बहिणींजवळ निरोप मागितला. राजकन्यांनीं त्याला सोनें व चांदी दिली. ती घेऊन तो निघाला. त्यानें बहरामनें दिलेली तबकडी वाजवल्याबरोबर खेंचरें व उंट हजर झाले. त्यांच्यावर बसून तो बगदादला परत आला.

पण घरांत कोणाचाच आवाज ऐकूं न आल्यानें त्याला आश्चर्य वाटलें. आईला तर तो ओळखूंच शकला नाहीं, दुःखामुळें इतकी वाळून गेली होती ती.

“माझी बायको कोठें आहे ? मुलें कोठें आहेत ?” त्यानें आईला विचारलें. आई काय उत्तर देणार ? ती रडूं लागली. त्यानें देखील अमिष्टासारखें सारें घर हुडकून पाहिलें. ज्या जागीं त्यानें पक्ष्याचा पोशाख लपवून ठेवला होता, त्या जागीं तो नव्हता. मुलांच्या मूर्ती





पाहून तो धाडदिशीं जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला.

त्याला उजाडल्यानंतरच शुद्ध आली. शुद्ध आल्यावर तो वेड्यासारखा स्वतःचे कपडे फाडून फेंकून देऊं लागला. सुरी घेऊन स्वतःचा गळा कापणार इतक्यांत त्याची आई त्याचा हात धरून म्हणाली— “हा काय वेडेपणा करतोस ? इतकें निराश होण्याचें कारण नाहीं. तूं ‘वाक वाक’ द्वीपांत गेलास तर तुझी बायको तुला भेटेल.”

तें ऐकून हसनच्या जिवांत जीव आला. त्यानें विचारलें—“पण तें द्वीप आहे कोठें ? मी नाहीं ऐकलें हें नांव कधीं पूर्वी.”

तो सरळ खलीफांच्या दरबारांत गेला. तेथें मोठ मोठे मौलवी बसले होते. त्यांना त्यानें विचारलें. पण त्यांनीं देखील तें नांव ऐकलें नव्हतें. म्हणून आतां आत्महत्या करून घेण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें मनाशीं ठरवून तो एका जागीं पडून राहिला.

पण त्याला एक गोष्ट आठवली. बहिणींना विचारून पाहूं या. असा विचार करून तो आपल्या आईचा निरोप घेऊन आपल्या बहिणींना भेटण्यासाठीं निघाला.

भाऊ इतक्या लवकर परत आलेला पाहून बहिणींना आश्चर्यच वाटलें. त्यानें घडलेलें वृत्त सांगितलें आणि म्हणाला— “तुम्ही मदत केलीत तर त्या वाक वाक द्वीपाचा पत्ता लागेल. नाहींतर आत्महत्या करून घेऊन मी मोकळा होईन.”

पण बहिणी म्हणाल्या, “इतकें घाबरण्याचें कारण नाहीं. ह्या निराशेच्या स्थितींतून देव कांहीं तरी मार्ग दाखवीलच.”



तें ऐकून हसन म्हणाला—“माझी बायको जातांना आईला म्हणाली कीं ती वाक वाक द्वीपांत राहील. तेव्हां तुम्हीच त्या द्वीपांत जायची वाट सांगा!”

सातहि बहिणी परस्परांकडे कांहीं वेळ पहात उभ्या राहाल्या. सर्वांत धाकटी बहीण म्हणाली—“हसन, तूं स्वर्गांत जायचें म्हटलेंस तर तें एक वेळ शक्य आहे. पण त्या वाकवाक द्वीपांत पोंचणें अशक्य.” तें ऐकून हसन हताश होऊन मटकन खालीं बसला. तें पाहून त्याची धाकटी बहीण म्हणाली—“हसन, तुझी तुझ्या बायकोशीं व मुलांची भेट होणारच असेल तर कांहीं तरी मार्गपण खात्रीनें निघेल. आमच्या कडून होईल ती मदत आम्ही करूंच. आम्ही देखील हातावर हात ठेवून स्वस्थ बसूं असें का तुला वाटतें? तूं असा निराश होऊं नकोस!”

राजकुमारींचा एक मामा होता. त्याचें नांव खुद्दूस असें होतें. तो वर्षांतून एकदां आपल्या भाच्यांना भेटायला येत असे. त्याला कधीं बोलवायचें झालें तर त्याला पण एक उपाय त्यानें सांगून ठेवला होता. त्यानें एक पूड त्यांना देऊन ठेवली होती. चिमूटभर पूड विस्तवांत टाकली कीं मोठा जाळ होई व त्या जाळांतून तो बाहेर येऊन राजकुमारींना भेटे. राजकुमारीनें त्याप्रमाणें ती पूड विस्तवांत टाकली त्या बरोबर मोठा जाळ झाला व त्यांतून त्यांचा मामा बाहेर येऊन म्हणाला—“एक वर्ष होत आलें होतें. मी येणारच होतों तुम्हांला भेटायला. पण मला आधींच कां बोलवलेंत तुम्ही?”

राजकुमारी म्हणाली—“मामा, तुमची आम्हांला मदत हवी आहे एका कामा-साठीं!” राजकुमारींनीं त्यांचा मानलेला भाऊ हसन याच्यावर ओढवलेल्या प्रसंगाचें



वर्णन करून वाकवाक द्वीपांत जायला काय उपाय आहे हें विचारलें.

त्यानें थोडा वेळ तोंडावर हात ठेवला, नंतर वांकून उभा राहिला व विचार करून व कांहीं गुणगुणल्या सारखें करून म्हणाला—" कांहीं उपाय मला तरी दिसत नाहीं. अशक्य गोष्ट शक्य करून दाखविण्याचा प्रयत्न माझ्या मतें फुकट आहे. तो वाकवाक द्वीपांत पोंचणें अशक्य!"

"पण ही गोष्ट तुम्हीच जाऊन समजाऊन सांगा त्याला." वहिणी म्हणाल्या. अब्दुल खुद्दूस हसनला एका खोलींत बोलावून घेऊन गेला व म्हणाला—" बाळ! धूमकेतु व इतर ग्रहांवर एक वेळ पोंचणें शक्य आहे पण त्या वाक वाक द्वीपांत पोंचणें शक्य नाहीं. कारण त्या द्वीपांत स्वतः गंधर्वांचा राजा राहतो. त्या द्वीपाच्या रक्षणाचा भार स्त्रियांच्या एका सैन्यावर टाकलेला आहे. सप्त पर्वत, सप्त नदनदी व सप्त सागर ओलांडून जावें लागतें त्या द्वीपावर. अशक्य आहे तेथवर पोंचणें. तो विचार तूं मनांतून काढून टाक. व्यर्थ जीव धोक्यांत कां घालतोस?"

तें ऐकून हसन जोरानें ओरडला आणि बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. तें पाहून अब्दुल खुद्दूसला पण दया आली. त्याला शुद्ध आल्यावर प्रेमानें त्याच्या पाठीवर हात फिरवून तो त्याला म्हणाला—" तुला असा हताश व निराश झालेला पाहून मला देखील वाईट वाटतें. तुला एकट्याला सोडून जाणें देखील मला किंवा तुझ्या बहिणींना आवडणार नाहीं. विचार करून पाहूं या कांहीं मार्ग निघतो का? तूं माझ्याबरोबर येतोस का जरा?"

पुन्हां हसनला जिवंत जीव आल्यासारखें वाटलें. तो उठून उभा राहिला व म्हाताऱ्याबरोबर निघाला. दोघे एका पांढऱ्या हत्तीवर बसले. खुद्दूसनें हत्तीच्या कानांत कांहींतरी सांगितलें. त्याबरोबर हत्ती आकाशांत उडूं लागला. उडत उडत तो नीलगिरीवर पोंचला. नीलगिरींत एक मोठी गुहा होती. गुहेला निळें लोखंडी दार होतें. म्हाताऱ्यानें दार ठोठावतांच एक काळा कभिन्न नीग्रो एक निळी तलवार हातांत घेऊन बाहेर आला. म्हाताऱ्यानें त्याच्या हातांतली तलवार चटकन हिसकावून घेऊन दूर फेंकून दिली. नीग्रोनें त्यांना आंत जायला वाट दाखविली. दोघे गुहेंत शिरल्यावर त्यानें आंतून दार बंद करून घेतलें. गुहेंत सुमारें एक मैल अंतर चालत गेल्यावर त्यांना एका जागीं दोन दरवाजे दिसले. दोन्हीं दरवाजे सोन्याचे होते. अब्दुल खुद्दूस एक दार उघडून आंत गेला. त्यानें सांगितल्याप्रमाणें हसन दाराबाहेरच उभा राहिला.

एका तासानें तो म्हातारा एक घोडा घेऊन बाहेर आला. घोडा देखील निळ्या रंगाचा होता. त्यावरचें खोगीर देखील निळेंच होतें. त्यानें हसनला घोड्यावर बसायला सांगितलें. दुसरें दार उघडलें. दारापलीकडे



निळ्या आकाशाव्यतिरिक्त त्यांना कांहीं दिसलें नाहीं.

"वाळ! विचार करून तूं आतां शेवटचा निर्णय घे! तुझ्यावर अनेक संकटें ओढवतील, प्राणांतिक संकटें ओढवतील. त्या संकटांना तोंड देण्याची तुझी तयारी आहे का? कीं तूं आपल्या वहिणींकडे जाऊन उरलेलें आयुष्य सुखानें घालवणार आहेस? हें तुझें तूं ठरव."

"सहस्रावधि संकटें ओढवलीं तरी मी माघार घेणार नाहीं." हसन म्हणाला.

"आईला भेटायला देखील परत जाण्याची इच्छा नाहीं?" म्हाताऱ्यानें विचारलें.

"बायकोला व मुलांना बरोबर घेऊन आल्याशिवाय आईकडे जाण्याची माझी इच्छा नाहीं. हसन म्हणाला.

"ठीक, तर मग हें पत्र घे! या घोड्याला हांकण्याची किंवा चालविण्याची गरज नाहीं. त्याला वाट माहीत आहे. तो तुला एका काळ्या पर्वतावर सोडील. काळ्या गुहेशेजारीं घोड्याला सोडून तूं त्याला गुहेंत जाऊं दे! एक म्हातारा बाहेर येईल. रंगानें तो काळाकुट्ट आहे. त्याला गुडघ्यापर्यंत लांब पांढरी दाढी आहे. त्याला नमस्कार करून हें पत्र दे. तो पक्ष्यांचा राजा आहे. तो माझ्याहून मोठा आहे. माझ्याहून मोठा अधिकारी पण आहे. त्याच्या मदतीशिवाय तुझें काम होणार नाहीं. म्हणून तूं त्याची मर्जी संपादन केली पाहिजेस." असें सांगून अब्दुल खुदूदूस निळ्या गुहेंत शिरला. निळा घोडा खेंकाळूं लागला व आकाशांत उडूं लागला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# भुतांचें बेट

मुलांच्या आपसांत भुतांच्या गोष्टी चालल्या होत्या. "सपशेल खोटें. अरे भुतें आहेतच कुठें?" एकजण म्हणाला. "असली तर असूं देत भुतें. मला नाहीं भीति वाटत." भाऊनें फुशारकी मारली.

एवढ्यांत आजोबा तेथें आले आणि खुर्चीवर बसतां बसतां म्हणाले—"असली तर असोत बापडी. आपल्याला त्यांच्याशीं काय करायचें आहे?" "भुतांनीं जर कुणाला झपाटलेंच तर त्यांना पकडून बंद करून ठेवतां येतें आपल्याला."

"खरेंच? माणसें पकडतात भुतांना?" ताईनें आश्चर्य दर्शवीत विचारलें.

"आजोबा, आपल्याला पाहून भुतांना सुद्धां भीति वाटते का हो?" भाऊनें विचारलें.

"होऽऽ, पण कधीं कधींच" नाकांत तपकिरिची चिमटी कोंबीत आजोबा म्हणाले.

"हं! हं!! समजलं. गोष्ट!! सांगा. आजोबा गोष्ट सांगा." मुलें एकदम घोळका करून ओरडलीं. आजोबानीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका गांवांत रत्नशेट म्हणून एक व्यापारी रहात होता. त्यानें स्वर्णद्वीप, रत्नद्वीप पांचूद्वीप अशा निरनिराळ्या बेटांवरून सफरी केल्या होत्या. त्याला समुद्रावरच्या सफरींची फार हौस होती. त्यानें द्रव्यहि पुष्कळ मिळवलें.

पण मनुष्याची द्रव्याची हाव कधीं मिटते का? रत्नशेटला आतां साठ वर्षें पूर्ण झालीं होतीं. तरी तो म्हणाला—



"बस, आतां फक्त एकदांच समुद्र प्रवास करणार."

रत्नशेटाच्या आज्ञेचीच खोटी कीं सर्व साज तयार झाला. फडफलीं शिडें आणि चाललें जहाज मुक्ता द्वीपाच्या दिशेनें. सुमारें पंधरा दिवस सुखरूप प्रवास झाला आणि सोळाव्या दिवशीं एकाएकीं हवेंत बदल झाला. समुद्रांत चक्री वादळ सुरू झालें. समुद्र खवळला अन् जहाज रवी-प्रमाणें गरगर फिरूं लागलें. जहाज कोठें जात आहे. आपला देश कोठें राहिला, जहाज किती दूर ओढलें गेलें आहे वगैरे कशाचा देखील पत्ता लागत नव्हता. जहाज हेलकावे खात चाललें पाहून सर्व अगदीं घावरून गेले.

पण त्या जहाजावरील सर्वांचें दैवच शिकंदर. वादळ शमलें. समुद्र शांत झाला आकाश निरभ्र झालें आणि उगवतीला किनारा दिसूं लागला. शेटजी म्हणाले— "माझ्या माहितींतला कांहीं हा भाग नाहीं. कोण जाणें असेल एकादें भूतपिशाच्चांचें बेट."

हळूं हळूं जहाज बेटाकडे हांकारलें. बेट जवळ येऊं लागलें तसतशी त्याच्यावर वस्ती असल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. डोंगर, झाडी, चरत असलेल्या शेळ्यामेंढ्या, शेतें, मळे, एवढेंच नव्हे, तर एका बाजूला एक शहर व राजवाडाहि असल्याचें दिसलें.

"हें काय भुतांचें बेट असेल ? शक्यच नाहीं" जहाजावरील लोक म्हणाले.

"काहीं जरी असलें तरी आपल्याला येथें उतरलें हें पाहिजेच. येथल्या लोकांच्या मदतीशिवाय आपण परत कसे जाणार ?" शेटजी म्हणाले.

खरेंच होतें तें, त्यांना तेथें उतरणें भाग होतें. रत्नशेट, कप्तान आणि जहाजावरील



लोकां पैकीं कांहीं लोक खालीं उतरले व बाकीचे सर्व जहाजावरच राहाले.



रत्नशेट आपल्या दोस्तांच्या बरोबर एका पाऊल वाटेनें जाऊं लागले. थोडें अंतर गेल्यावर त्यांना एक मळा लागला. त्यांत एक म्हातारा रोपट्यांच्या बुंधाशीं तळी करीत असलेला त्यांना दिसला. रत्नशेटनें त्याला विचारलें कीं ही वाट कोणच्या गांवाला जाऊन मिळते ? परंतु त्या म्हाताऱ्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. कीं डोकें वर करून देखील पाहिलें नाहीं.

'बहिरा असेल' असें वाटून ते सर्व पुढें चालूं लागले. एवढ्यांत एक तरुण माणूस खांद्यावर कुदळ फावडें टाकून समोरून येतांना दिसला. नवीन माणसांना पाहून हा कांहीं विचारील असें त्यांना वाटलें. पण तो मनुष्य समोरून येऊन आपल्या वाटेनें निघून गेला. कांहींएक बोलला नाहीं कीं त्यांच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं. एवढ्यांत पाठीमागून पाहतां पाहतां चार-पांच मुलें धांवत आलीं आणि त्यांच्या मधून पुढें निघून गेलीं. एवढी चिकटून गेल्याप्रमाणें वाटली पण त्यांचा स्पर्श झाल्याचें भासलें नाहीं. हें पाहून त्या लोकांना मात्र खरी भीति वाटली. रत्नशेटानें म्हटल्याप्रमाणें खरोखरच तें भुतांचें बेट होतें आणि ती अबोल माणसें सर्व भुतें होतीं.

"शेटजी, तुम्हीं म्हटल्याप्रमाणें खरो-खरच येथें भुतें आहेत. चला उलट पावलीं जहाजावर. आपण निघून जाऊं. येथें आतां क्षणभर सुद्धां थांबतां उपयोगी नाहीं" कप्तान म्हणाला.

"अरे भितां काय असे. हा भुतांचा देश आहे ना ! येथें ती आपल्याला पाहूं शकत नाहींत. आपण कांहीं मुद्दाम आलों नाहीं. पण आलोंच आहोंत तर सर्व कांहीं



पाहून जाऊं या. परत गेल्यावर कुणीं विचारलें कीं काय पाहिलेंत तर काय सांगाल? मग फजीती होईल ना? चला पुढें, भिऊं नका." रत्नशेट सर्वांना प्रोत्साहन देत म्हणाले.

मुकाट्यानें सर्व शेटजींच्या पाठोपाठ निघाले. थोडें अंतर गेल्यावर त्यांना प्रवेशद्वार दिसलें. तेथें पाहरेदार उभे होते. पण शेटजी म्हणाले कीं ह्यांना आपण दिसत नाहीं आणि आपलें बोलणें देखील ऐकूं येत नाहीं. मग कसली भीति? शेटजी निर्भयपणें आंत शिरले व जीव मुठींत धरून तीं सर्व माणसें देखील शेटजींच्या मागोमाग चालूं लागली. पाहरेदारांना कोणी दिसलेंच नाहीं मग ते अडवणार तरी कसे अन् कोणाला? सर्व तसेच पुढें निघाले. थोड्याच वेळांत राजमार्गानें जाऊन सर्व मंडळी राजवाड्याजवळ आलीं.

पाहारेदार तेथें देखील उभे होते. पण कोणी कांहीं हूं का चूं करीत नव्हतें. ही सर्व मंडळी त्या पाहारेदारांच्या घोळक्यांत घुसूनच आंत गेली. आंत एक मोठा भव्य वाडा होता. विस्तीर्ण आंगण होतें. भोंवतालीं बगीचा होता. मोठ मोठे लता वृक्ष फळाफुलांनीं ओथंबल्यानें वाकलेले होते. सर्व आपापलीं कामें करीत होते गुपचुपपणें. आंत एका बाजूनें नृत्यगानाचा ध्वनि येत होता. रत्नशेट सर्वांना घेऊन तिकडेच गेले आणि आंत शिरले. तेथील वैभव पाहून सर्वांचे डोळे दिपूनच गेले. तेथें एका बाजूला मेजवानी चालली होती, एका बाजूला वाद्य वादन सुरू होतें, एका बाजूला नृत्यगायन चालूं होतें. एका बाजूला राजाराणी आणि राज परिवार बसला होता. दुसऱ्या बाजूस सरदार मानकरी बसले होते. थोडी पलीकडे प्रजा बसली होती.



जरा गंमत करूंया म्हणून शेटजी राजाच्या अगदीं जवळ गेले. त्याच्या कानाला तोंड चिकटविलें तरी देखील राजाला दिसले नाहीं कीं समजलें नाहीं. परंतु राजा एकदम मूर्च्छित होऊन खालीं पडला.

हें असें कां झालें? तेथील सर्व घाबरून एकमेकाकडे पाहूं लागले. क्षणांत तेथें रंगाचा बेरंग झाला. अन्नांतून विषबाधा तर नाहीं ना झाली म्हणून राजवैद्याला बोलाविलें. त्यानें राजाच्या समोरचें अन्न वास घेऊन पाहिलें, खाऊन पाहिलें पण त्यांत कांहीं सांपडलें नाहीं. मग मंत्र्यानें मांत्रिकाला बोलावून आणलें.

मांत्रिकानें एकवेळ राजाकडे निरखून पाहिलें व म्हणाला—"कांहीं नाहीं. ह्याच्यावरून वारें गेलें आहे."

"म्हणजे काय?" मंत्र्यानें विचारलें.

"म्हणजे राजाला मनुष्याची हवा लागली आहे. आणि त्यामुळें तो मूर्छित होऊन पडला आहे. ह्यावरून असें वाटतें कीं आपल्या मध्यें मनुष्य मोकळेपणानें वावरत आहेत. जोपर्यंत आलेली सर्व माणसें परतून जाणार नाहींत तोंपर्यंत राजा असाच



पडून राहणार. ह्यावर कांहीं उपाय काढला पाहिजे."

मांत्रिकाचें म्हणणें ऐकून मंत्री राजाच्या शेजारीं उभा राहिला. हात जोडून डोळे मिटून वर पाहून त्यानें प्रार्थना केली. म्हणाला—"आमच्या देशांत आलेल्या मानवांनो! आम्हांला विनाकारण त्रास देऊं नका. येथें खाण्यापिण्याचें मुबलग सामान आहे. पोटभर खा, प्या, पाहिजे असेल तेवढें बांधून घ्या आणि येथून लवकर निघून जा."

"हें मंत्र्याचें म्हणणें ह्या माणसांना समजलें व ते सर्व मानव तेथें मांडलेल्या

पानांवर बसून पोटभर जेवले. जेवढें बांधून घेणें शक्य होतें तेवढें बांधून घेतलें आणि जहाजाकडे निघाले.

हें सर्व होईपर्यंत मांत्रिक राजाजवळ उभा राहून कांहीं तरी पुटपुटत मंत्रोच्चार करीत होता.

रवशेट आपल्या अनुचरासह जहाजावर आला व तेथील लोकांना अन्न देण्यासाठीं त्यांनीं आणलेली गाठोडीं सोडलीं. पण काय! त्या सर्व अन्नाचे 'पिंड' झालेले होते. हें पाहून मात्र सर्वांची खातरी पटली कीं तें बेट भुतांचें आहे. मग काय त्यांना श्वास घ्यायला देखील फुरसत नव्हती. कसे तरी सर्वांनीं जहाज गाठलें व घाई घाईनें शिडें लावून नांगर उचलून जहाज समुद्रांत हांकारलें. दूर गेल्यावर त्यांच्या जिवांत जीव आला. मग शांतपणें विचार करून आपल्या देशाच्या दिशेला जहाज वळवून थोड्याच दिवसांत ते स्वदेशी सुखरूप परत आले."

इतकी गोष्ट सांगितल्यावर आजोबा म्हणाले—"ज्या प्रमाणें आपल्या वस्तींत आपल्याला भुतें दिसत नाहींत. त्यांचे बोलणें ऐकूं येत नाहीं, त्याच प्रमाणें भुतांच्या देशांत भुतांना आपली हालचाल आणि बोलणें समजत नाहीं आणि आपण जवळ असल्यानें त्यांना देखील त्रासच होतो. म्हणूनच तीं आपल्याला भितात. असं जर आपण एकमेकांना भितों तर मग आपण एकमेकांच्या वाटेस तरी कां जावें? ज्यानें त्यानें आपापल्या ठिकाणीं असावें. म्हणूनच यदा कदाचित भुतें आपल्याला त्रास देऊं लागलीं तरी त्यांना चांगूलपणानें त्यांच्या जाति-बांधवांत पाठवून द्यावें."



# चंद्रावरची म्हातारी

एका गांवांत एक गरीब माणूस राहात असे. तो तांदूळ सडण्याचा धंदा करी. तो तांदूळ कांडूं लागला म्हणजे एक ससा रोज नेमानें येऊन कोंडा खात असे. पुढें त्या दोघांची फार मैत्री जमली. तांदूळ कांडून झाल्यावर पाखडायच्याच्या वेळीं त्याला वाटे कीं मदत करावयास कोणी तरी बाई असावी.

तो नेहमीं चांदण्या रात्रींच तांदूळ कांडीत असे. चांदणें नसलें कीं त्याचें काम देखील बंद असे. नित्याप्रमाणें चांदण्यांत तो तांदूळ कांडीत असतां एक दिवस खरोखरच एक म्हातारी आली व त्याला मदत करून गेली. तेव्हांपासून ती रोज येऊं लागली. कांहीं दिवसांनीं त्यानें म्हातारीला विचारलें कीं तूं कोण?

ती म्हणाली—"मी चंद्रलोकांतली आहे. तुला कष्ट करतांना पाहून तुझ्या मदतीसाठीं म्हणून मी रोज येतें. बघ बाबा! तुला जर यायचें असेल चंद्रावर तर चल."

गरीब माणूस चंद्रावर जाण्यास तयार झाला आणि दुसऱ्या दिवशीं आपल्या सशाला बरोबर घेऊन तो म्हातारी बरोबर चंद्रावर गेला सुद्धां.

तेव्हां पासून ती तिघेजण आपल्याला चंद्रावर दृष्टीस पडतात. तुम्ही चंद्राला नीट न्याहाळून पाहा, म्हणजे दिसतील तुम्हांला तीं.





# भीमूचे पराक्रम

लग्न ही आयुष्यांतील अवघड चढणीची पहिली पायरी आहे. लग्न समारंभ उरकला कीं शेजारी पाजारी नातेवाईक मित्र मंडळी संततीच्या चाहुलीकडे डोळे आणि कान लावून बसतात. महालक्ष्मीच्या लग्नाला दोन वर्षे झालीं तरी अजून कांहीं चिन्हें दिसेनात आणि ही गोष्ट शेजारणींनीं तिच्या आई जवळ बोलून देखील दाखविली.

"बाई, महालक्ष्मीकडून कांहीं व्रतें वैकल्यें नाहीं का करविलीत ? दोन वर्षें झालीं कीं लग्नीन होऊन." एक जण म्हणाली.

"खरंच हो, मुलाबाळांतच संसाराची गोडी आहे. तीं हंसू लागली कीं देव सुद्धां धावून येतात ती गंमत पाहायला. आणि त्यांचं रडणें ऐकून भुतं जातात पळून." काकूबाई म्हणाल्या.

काकूंचे हें वाक्य भीमरावांच्या विचारी डोक्याला पुरलें. तो विचार करूं लागला कीं भुतांना घालविण्याचा एवढा सोपा आणि सरळ मार्ग असतां लोक तो उपाय करून कां पाहात नाहींत ?

एकदां तो आपल्या बायकोला म्हणालाच—"भुतांना घालविण्यास बळी देण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं का ?"

"अहो भुतंखेतांबद्दल असं कांहीं तरी बोलूं नये" लक्ष्मीनें त्याला बजावलें. तेव्हां पासून तो ह्या विषयीं कधीं कांहीं बोलला नाहीं. पण त्याच्या मनांत मात्र सारखें हेच विचार येत. त्यांतून त्यानें ऐकलें होतें कीं जमीनदाराच्या बागेंतील वाड्यांत भुतें आहेत. मग काय विचारायलाच नको. त्यानें त्या भुतांना घालविण्याचा निश्चयच केला. पण त्यासाठीं मूल कोठून आणावयाचें ? त्याला आठवलें कीं मोलकरणीचें मूल लहान आहे व ती ओसरीवर त्याला कुशींत घेऊन निजते.

त्या दिवशीं रात्रीं मोलकरीण नित्याप्रमाणें आपल्या मुलाला घेऊन ओसरीवर निजली होती. सर्वकडे सामसूम झाल्यावर भीमराव उठले व हळूंच मुलाला उचलून आणलें व त्याला त्या भुतांच्या वाड्यांत मधल्या खोलींत नेऊन ठेविलें आणि त्याच्या रडण्याची तो वाट पाहूं लागला. बराच वेळ झाला. शेवटीं कंटाळून भीमरावांनीं त्याला एक चिमटा काढला आणि त्याची किंचाळी ऐकतांच भूत बघण्यासाठीं बाहेर पळत आला आणि दाराआड लपून राहिला.



इकडे मूल किंचाळून किंचाळून रडूं लागलें. त्याचें रडणें ऐकून मोलकरणीला जाग आली. मूल कुशींत नव्हतें. ती घाबरली. नवऱ्याला उठविलें. सर्व घरदार जागें झालें. जिकडून मुलाचा आवाज येत होता त्या बाजूला ती माउली धांवली. तिच्या मागें सर्व जण गेलीं. तेवढ्यांत भीमूच्या समोरून एक मोठी घूस पळत गेली. तिला पाहून भीमू "भूत ! भूत !! धरा ! पकडा !!" म्हणून आरोळ्या ठोकीत तिच्या पाठोपाठ धांवला. घूस केव्हांच झाडाच्या बुंधांतील बिळांत गडप झाली होती.

भुताच्या वाड्यांतून मुलाच्या रडण्याचा आवाज आला म्हणून ती बाई घाईघाईनें आंत गेली व मुलाला पटकन उचलून घेतलें. तें सुखरूप असल्याचें पाहून त्या माउलीचा जीव खालीं पडला. त्याला घेऊन ती घरीं आली आणि त्याला कुशींत पदराखालीं घेऊन स्वस्थ झोपीं गेली. थोड्या गडबडी नंतर बाकी सर्व लोक आपापल्या घरीं गेले.

जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर भीमू घरीं परतला व अंथरुणावर आडवा झाला.

त्याला पाहतांच महालक्ष्मीनें सर्व प्रकार ताडला. हा सर्व प्रताप नवऱ्याचाच आहे ही गोष्ट तिला कळून चुकली. ती म्हणाली– "अशानें का कुठें भुतें पळून जातात ? मला तरी विचारावयाचें होतें अगोदर."

"हें बरें आहे. तूंच ना मला सांगितलें होतेंस कीं भुताबितांच्या गोष्टी बोलत जाऊं नका म्हणून ? आणि असं पहा, मोठीं माणसें सांगतात तें काय खोटं म्हणून ? शेजारच्या त्या काकूच नाहीं का म्हणाल्या, मुलांचें रडणें ऐकून भुतं चार कोस दूर जातात म्हणून ?"

त्याचें तें उत्तर ऐकून लक्ष्मी थक्क होऊन पहात राहिली. थोड्या वेळानें विचार करून ती म्हणाली–"होय पण मूल आपणहून रडलें तर. मुद्दाम रडविल्यानें नाहीं हीं भुतं पळत."

"छे ! छे !! असं कसं होईल. मी पाहिलें ना त्याला पळून जातांना. अगदीं माझ्या समोरूनच गेलें तें." भीम निक्षून म्हणाला.

"मूत कसलं. उंदीर बिंदीर असेल एकादा. गेला असेल पुढून पळून." महालक्ष्मी म्हणाली.

तसेंहि असेल असा मनाशीं विचार करून भीमू गप्प बसला.

रात्र संपून उजाडलें तोंच भीमरावांच्या पराक्रमाच्या गोष्टी ज्याच्या त्याच्या तोंडून ऐकूं येऊं लागल्या. भीमरावांनीं भुताच्या हातांतून मुलाला सोडवून आणल्यामुळें सर्व लोक त्यांची प्रशंसा करीत होते.

[ पुढील अंकीं नवा पराक्रम ]



# चपला चमके धन वर्षे

[ स्वामी रामतीर्थ कथा ]

साक्रेटीस हा ग्रीक तत्ववेत्ता होता. त्याची बायको महा कजाग बाई होती. एकदां तो गहन विचारांत मग्न असतां त्याची बायको आली आणि कांहीं तरी काम सांगून त्याच्यावर कडाडली. तो चिंतनांत इतका मग्न होता कीं तिच्या बोलण्याकडे त्याचें लक्षच गेलें नाहीं. त्याला शांत बसलेला पाहून ती जास्तच चिडली. तरी देखील तो शांतच होता. त्याची विचार तंद्री तुटली नाहीं. त्याची ही समाधी असह्य वाटून तिनें एक तांब्याभर पाणी आणिलें व त्याच्या डोक्यावर ओतलें.

तेव्हां जरासें डोकें वर करून तो म्हणाला–"विजा चमकून मेघ गर्जना झाली म्हणजे पाऊस पडतो. हें विधान सत्य असल्याचें आज पुरेपूर माझ्या प्रत्ययास आलें."





# भाग्य देवता

आफ्रिका खंडांतील समुद्रकिनाऱ्यावरील एका खेड्यांत एक कोळी राहात असे. तो एका मोठ्या तळ्यांतून मासे पकडून आणीत असे. मासे पकडण्यासाठीं तो गोल टोपल्यांचा उपयोग करी. योग्य अशी जागा पाहून दोऱ्या बांधून त्या पाण्यांत टाकून ठेवी. त्या दोऱ्यांच्या टोकांना तो एक लाकडी तुकडा बांधून ठेवी म्हणजे टोपलीची जागा त्याला नेमकी सांपडे.

एक दिवस त्यानें एका मागून एक दोन टोपल्या ओढल्या. पण त्या दोन्ही रिकाम्या निघाल्या. तिसऱ्या टोपलींत एक खेकडाच फक्त होता. निराश होऊन त्यानें चौथ्या टोपलीची दोरी ओढली. ही टोपली बरीच भरलेली असल्यासारखी त्याला वाटली. नक्की आज चार पैसे आपण आपल्या गांठीला बांधणार असें त्याला वाटलें. त्यानें तें टोपलीचें जाळें ओढून पाहिलें तर काय त्यांत एक अगदीं वाळकुडी अशक्त म्हातारी बसलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच एकदम त्याच्या चेहरा फिका पडला. तसेच त्या म्हातारीला पाण्यांत फेंकण्याचा त्यानें विचार केला. परंतु म्हातारी गयावया करूं लागली.

"नको रे मला पुन्हां पाण्यांत लोटूं. घरीं घेऊन चल. माझा तुला कांहीं त्रास होणार नाहीं." म्हातारीनें विनवणी केली.

"खरं आहे आजीबाई. मलाच माझ्या पोटापुरतें मिळत नाहीं तर तुला कोठून घालूं? आत्तां येथें पाण्यांत पडलीस तरी मरणार, व घरीं गेलीस तरी मरणार!" कोळी म्हणाला.

सौ. विमला माने

पण म्हातारी तशीच त्याच्यावरोबर त्याच्या घरीं गेली. तेवढी वेळ कोळ्यानें आपल्याबरोबर तिला देखील जेऊं घातलें आणि तिला म्हणाला—"आजीबाई तुझा मला त्रास होणार नाहीं म्हणालीस, पण आतां संध्याकाळीं तुला काय वाढूं!"

"आतां जसे दोन घास वाढलेस तसेच तेव्हांहि वाढ. उद्यां संध्याकाळपर्यंत तुझ्याकडे गोठाभर गाई येतील बघ. तूं त्यांच्यासाठीं गोठा तयार करून ठेव." म्हातारी म्हणाली.

कोळ्यानें तिला निरनिराळे प्रश्न केले. पण तिनें कशाचेंहि उत्तर दिलें नाहीं. गाईसाठीं वाडा करून ठेव एवढेंच म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळ पासून तो त्याच कामाला लागला संध्याकाळपर्यंत त्यानें चांगला ऐसपैस गोठा तयार केला. त्याला कांटेरी कुंपण घातलें. वर छप्पर बसविलें. संध्याकाळपर्यंत त्याला हें काम पुरलें. काम संपवून तो परत येत असतां त्याला तळ्याच्या बाजूनें गायी येत असल्याचा आवाज ऐकूं आला. क्षणभर थांबून त्यानें पाहिलें तर खरोखरच एका मोठ्या बैलाच्या मागोमाग गाईवासरें त्याच्या गोठ्यांत जाऊन उभीं राहालीं.



त्या दिवसापासून कोळी गवळी झाला. त्याचे दिवस पालटले. दिवसे दिवस त्याचा धंदा चांगला चालूं लागला आणि तो चांगला श्रीमंत झाला. त्यानें लग्न केलें आणि संसार थाटला.

आतां गांवांत त्याचा भाव वाढला होता. लोक त्याच्याकडे सल्ला घ्यायला येऊं लागले. परंतु त्याचा स्वभाव पालटला होता. गर्वाचा पारा तर अगदीं वरच्या टोंकाला जाऊन भिडला होता.

वर्ष सहा महीने गेले. एक दिवस कोणा एका धनिकाकडे त्याला जेवणाचें

निमंत्रण होतें. जेवण रात्रीचें होतें अर्थातच परत येण्यास त्याला उशीर झाला. म्हातारी दारें खिडक्या बंद करून झोपी गेली होती.

कोळी खूप खाऊन पिऊन घरीं आला. आंतून कोणाचाहि आवाज न आल्यानें तो चिडला आणि जोरजोरानें दार खडखडवून म्हातारीला हाका मारूं लागला. "कोणीच कसें दार उघडीत नाहीं? म्हातारी कुठें मेली? तळ्यांत बुडत होती, तिला वाचवलें त्याची हीच फेड. ए म्हातारे! दार उघड! पडली आहेस घोरत."

म्हातारीनें दार उघडलें आणि दारांतच उभी राहिली. कोळ्याकडे पाहून ती म्हणाली—"उगीच कां मला बोलतोस? ज्याला उपकाराची जाणीव नाहीं. अशा लोकांजवळ राहायची माझी इच्छा नाहीं. आतां मला येथून गेलेंच पाहिजे."

"बरं होईल मी तीच वाट पाहात आहें. एकदांची तुझी ब्याद जाईल." कोळी म्हणाला.

दुसरें दिवशीं पाहाट होतांच म्हातारी उठली. घराचा केरवारा, सडासारवण केलें. भांडीं घासून पुसून ठेविलीं. गोठ्यांत गेली. गोठ्याचीं दारें उघडली आणि स्वतः तळ्याच्या दिशेनें चालूं लागली. तिच्या पाठोपाठ सर्व जनावरें देखील निघालीं.

कोळी सकाळीं उठून पाहतो तों गोठा रिकामा. म्हातारी दिसली नाहीं. आजू-बाजूला त्यानें पाहिलें. पण कोठें कशाचाच मागमूस लागला नाहीं. काय करतो आतां, येरे माझ्या मागल्या. पुन्हां त्याला मासे पकडून कोळ्याचा धंदा करावा लागला. त्यानें स्वतःच आपल्या भाग्याला हाकलून लावलें होतें.





# बहिरे आम्ही सारे

एका गांवांत एक मठ होता. तेथें एक साधू राहात असे. एक दिवस साधूनें आपल्या शिष्याला गांवांत जाऊन थोडी तंबाखू आणायला सांगितलें.

तो शिष्य बहिरा होता. त्याला वाटलें गुरूनें लोणचें आणावयास सांगितलें आहे. म्हणून तो गांवांत गेला. एका घरांत एक मुलगी मागावर कापड विणीत बसली होती.

"आमच्या गुरुजींच्या साठीं थोडें लोणचें देता का?" शिष्यानें विचारलें.

ती मुलगी देखील बहिरी होती. ती म्हणाली. "ह्या मागावर सध्या जें कापड आहे तें विकाऊच आहे."

"तुला वेळ नसेल तर मीच जाऊन घेऊन येतों लोणचें." असें म्हणत तो आंत गेला. मुलीनें शिष्याला लोणचें नेतांना पाहिलें. तिला राग आला. तिची आई कपडे धुण्यासाठीं तळ्याच्या कांठीं गेली होती. ही मुलगी घाईघाईनें तेथें गेली. आणि सर्व आईला सांगितलें.

आई बहिरीच. आश्चर्यानें तोंडावर बोट ठेवून म्हणाली—"अगऽऽ बाई. आत्ता पासूनच लग्नाला तयार झालीस कीं काय? अगोदर. तुझ्या ताई माईंची तरी होऊं देत लग्न आणि मग तुझं. कुणी ऐकलं तर हंसणार नाहींत का तुला? बाई, बाई, बाई, बाई. शर्थ झाली हो पोरी पुढें. जा आतां घरीं आणि आपलं काम पुरं कर." आई पण बहिरीच होती. ती एका दमांत एवढें सर्व बोलून गेली आणि मुलीला घरीं पाठविलें.

मुलगी घरीं जाऊन कापड विणूं लागली. पण इकडे आईच्या डोक्यांत विचारांचें

काहूर माजलें. धुणें धुतां धुतां विचार करूं लागली. एकदां मुलीच्या डोक्यांत लग्नाचा विचार आला म्हणजे मग उशीर करतां कामा नये. तिच्या साठीं आतां मुलगा शोधलाच पाहिजे. ह्या बाबतींत टाळाटाळ करून चालणार नाहीं. आत्तांच ह्यांच्या कानांवर घातली पाहिजे ही गोष्ट. लगबगीनें तिनें कपडे पिळले आणि घराकडे निघाली.

तिचा नवरा कधीं कपडे विणी, कधीं टोपल्या विणी. आज तो टोपल्या विणत बसला होता. त्याच्या मनांतून त्या आठव-ड्याच्या बाजाराला बऱ्याच टोपल्या, सुपें, दुरड्या विकण्यासाठीं न्यावयाच्या होत्या आणि त्याची बायको मागावरचें ठाण पुरं करा म्हणून पाठीस लागली होती.

बायको कपडे वाळत घालून नवऱ्याकडे आली, व आपल्या लेकी विषयीं बोलूं लागली. म्हणाली—"ऐकलंत का? आपली जाई आत्तांच लग्न करून द्या म्हणत्येय. अजून पदर सुद्धां अंगावर घेतला नाहीं तो काय चाळे हे? पण मुलींनीं एकदां लग्नाचा ध्यास घेतला म्हणजे तें लांबणीवर टाकणें बरें नाहीं. कांहीं तरी विचार केलाच पाहिजे. ऐकलत ना? तुम्हांला काय वाटतं?"

नवऱ्याला वाटलें बायको आपल्याला तें ठाण पुरं करण्यासाठीं सांगायला आली आहे. तो गरजला—"ठाण, ठाण, ठाण. तेंहि विकायचेंच आणि हेंही विकायचें. उद्यांच्या बाजारांत मी टोपल्या सुपं नेणार म्हणातोय. खर्चाला पैसे मिळाले म्हणजे झालें. मी आज टोपल्याच विणणार आहे." तो मनुष्य देखील बहिराच होता. मग त्याचें मन न बोलेल तर कसं होईल?





# किष्किंधाकांड

सुग्रीवाचें बोलणें ऐकून राम म्हणाला—"प्रथम तुम्हां दोघांच्या वैराचें कारण कळूं दे." सुग्रीव म्हणाला—"माझे वडील आणि मी आम्हीं दोघे वालीला फार मान देत होतों. पुढें वडील वारल्यावर तोच राजा झाला. तो माझा वडील भाऊ. मलाहि तें मान्य होतें.

दुन्दुभी नांवाच्या राक्षसाला मायावी नांवाचा फार पराक्रमी मुलगा होता. एकदां एका स्त्रीवरून मायावी व वाली दोघाचें भांडण झालें. तेव्हां एक दिवस मध्यरात्रीं मायावी वालीच्या किष्किंधा नगरीच्या द्वाराजवळ आला आणि वालीला युद्धाला आह्वान केलें. वाली मायावीची खोड मोडावी म्हणून बाहेर पडला. आम्ही सर्वांनीं, त्याच्या सर्व बायकांनीं त्याला अडविण्याचा प्रयत्न केला. परंतु आम्हांला बाजूला सारून तो तसाच पुढें निघाला. तो एकटाच जात असलेला पाहून मी त्याच्या मागोमाग गेलों. वाली येत आहे हें पाहून मायावीची भितीनें गाळण उडाली व तो जोरानें पळत सुटला. आम्हीं दोघेहि त्याचा पाठलाग करूं लागलों. वाली आपल्याला गांठणार हें ओळखून तो एका मोठ्या गुहेंत शिरला. त्या गुहेच्या तोंडाशीं इतकें गवत वाढलेलें होतें कीं सहज आंत जाणें कोणा-



लाहि साध्य झालें नसतें. मायावीला वाटलें कीं वाली आंत येणार नाहीं. वालीनें गुहेच्या तोंडाशीं त्याची थोडा वेळ वाट पाहिली. पण तो बाहेर येत नाहीं असें पाहून मला म्हणाला—"सुग्रीवा! मी आंत जातों आणि त्या मायावीचा समाचार घेतों. मी येईपर्यंत तूं येथेंच ह्या गुहेच्या तोंडाशीं थांब." निरुपाय होऊन मी तेथेंच त्याची वाट पहात राहिलों. एक वर्षपर्यंत त्याची वाट पाहिली. तो न आल्यामुळें भलत्याच शंका कुशंका मनांत येऊं लागल्या. मायावीनें त्याला मारलें तर नसेल ना?

तरी कांहीं दिवस मी गुहेच्या तोंडाशीं वाट पहात बसलों होतों. इतक्यांत आंतून रक्ताचा लोंढा बाहेर आला. त्यावरून वाली मेला असावा अशी शंका मनांत आली. मायावी बाहेर येईल या भीतीनें गुहेच्या तोंडाशीं एक चांगला मोठा दगड बसवला. वालीच्या नांवानें तर्पण केलें आणि मी किष्किंधा नगरीला परत आलों.

वालीच्या मृत्यूविषयीं मी कोणाशीं कांहीं बोललों नाहीं. तरी पण मंत्र्यांनीं तो अंदाज केला. शेवटीं बऱ्याच विचारानंतर त्यांनीं मला राज्याभिषेक केला.

कांहीं दिवसांनीं वालीनें मायावीला ठार केलें व परत आला. तेथें मी राज्य करीत असल्याचें ऐकून त्याला राग आला. त्यानें रागारागानें मंत्र्यांना कैद केलें आणि माझ्या अंगावर धांवून आला. मी नम्र होऊन त्याला नमस्कार केला. परंतु त्यानें मला आशीर्वाद दिला नाहीं. मी आपला मुकुट काढून त्याच्या पायाशीं ठेवला. तरी देखील त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. गुहेच्या तोंडाजवळ थांबल्यापासून तो माझ्या राज्याभिषेकापर्यंतची सर्व हकीकत मी त्याला सांगितली. पण त्याला सगळ्यांत जास्त राग आला तो गुहेचें तोंड बंद केल्याचा. त्याला वाटलें कीं मी मुद्दामच त्याला कोंडून ठेवण्यासाठींच गुहेचें दार बंद केलें होतें. मी तऱ्हेतऱ्हेनें त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. त्यानें सर्व मंत्र्यांसमोर माझा अपमान करण्यास कमी केलें नाहीं.

मी त्याला पुन्हां पुन्हां सांगितलें कीं त्या गुहेंतून आलेला रक्तप्रवाह पाहूनच मी परत आलों. मला वाटलें मायावीनें तुलाच ठार केलें.

तो म्हणाला—"तो रक्ताचा पाट मायावी व त्याचे बांधव ह्यांच्या रक्ताचा होता." त्यांना मारल्या नंतर तो गुहेच्या द्वाराजवळ आला व मला हाका मारूं लागला. तोंपर्यंत मी गुहेच्या तोंडावर दगड ठेवून निघून गेलों होतों. तो आपल्या मंत्र्यांना म्हणाला—"ह्यानें मुद्दामच तें द्वार बंद केलें होतें." अशाप्रकारें मला दोष देऊन मला किष्किंधा नगरांतून हांकलून दिलें आणि माझ्या बायकोचेंहि त्यानें अपहरण केलें. यामुळें मला असें भटकावें लागत आहे.

मी बरेच दिवस वणवण भटकत ह्या ऋष्यमूक पर्वतावर येऊन पोहोंचलों. शाप



असल्यामुळें तो येथें येऊं शकत नाहीं. म्हणून मी येथेंच राहिलों आहे. हे रामा, विनाकारण वालीनें मला कष्ट दिले. ह्यांतून तूंच माझी मुक्तता कर."

सुग्रीव पुढें सांगूं लागला—"हा झाला माझा इतिहास. आतां वालीचें सामर्थ्य समजून घे. अचाट शक्तिशाली आहे तो. तो रोज सूर्योदयापूर्वींच चार दिशांच्या चार समुद्रावर जाऊन संध्यावंदन करून येतो. पर्वतावर चढून मोठमोठे प्रचंड दगड चेंडू प्रमाणें वर उडवून सहज झेलतो. मोठमोठ्या वृक्षांना अगदीं लीलेनें तो तोडून मोडून



टाकतो. त्याच्या अचाट सामर्थ्याची एक गोष्ट तुला सांगतों—"मायावीचा बाप दुंदुभी हा सुद्धां वालीप्रमाणेंच बलवान होता. हजार हत्तींचें बळ होतें त्याच्या अंगांत. त्यानें सागराला युद्धाला बोलाविलें." परंतु सागर म्हणाला—"तुझ्याशीं युद्ध करण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. तूं हिमालयाकडे जा. तो तुझ्याशीं युद्ध करील."

दुन्दभि राक्षस रेड्याच्या रूपानें वावरत असे. तो हिमालयाकडे गेला आणि त्याला शिंगानें पोखरूं लागला. पण हिमालय म्हणाला—"मी कांहीं तुझ्याशीं युद्ध करणार नाहीं. किती तरी ऋषि मुनि येथें तप करीत आहेत. त्यांचे तपोभंग होईल. तुला युद्धच करावयाचें असेल तर तू किष्किंधाधिपति वालीकडे जा."

दुन्दभि किष्किंधेच्या जवळ आला आणि आपल्या खुरांनीं जमीन उकरूं लागला. वाली अंत:पुरांतून बाहेर येऊन रागारागानें त्याला म्हणाला—"जिवाला कंटाळलास वाटतें ?"

वालीनें, इंद्रानें दिलेली सोन्याची माळ गळ्यांत घातली व दुन्दुभीशीं युद्धाला गेला.

दोघांचें फार भयंकर द्वंद्व सुरू झालें. वालीनें दुन्दभीचीं शिंगें धरून गरागरा फिरविलें आणि जोरानें जमिनीवर आपटलें. त्यामुळें दुन्दभीला फार लागलें आणि कानांतून रक्त वाहूं लागलें. वालीची शक्ति वाढतच होती. शेवटीं त्यानें दुन्दभीला उचललें व जोरानें जमिनीवर आपटलें त्याबरोबर तो गतप्राण होऊन जमिनीवर पडला. त्याच्या मृत देहाला वालीनें लाथेनें उडविलें तेव्हां तो एक कोसभर दूर जाऊन पडला. त्याच्या रक्ताचे थेंब मातंग मुनींच्या आश्रमापर्यंत जाऊन पडले. रक्ताचे थेंब पाहून मुनींना क्रोध आला व त्यांनीं आश्रमाबाहेर येऊन तें प्रेत पाहून शाप वाणी केली. "ह्या राक्षसाला मारणारा व त्याचे अनुयायी ह्या ऋष्यमूक वनांत शिरतांच भस्म होऊन जातील.

"ती शापवाणी ऐकतांच वालीचे अनुचर वालीकडे धांवले. त्याला मुनींचा शाप सांगितला. तेव्हां वाली स्वत: शापमोचनासाठीं मुनींना शरण गेला. परंतु मातंग मुनींनीं आपले शब्द मागे घेतले नाहींत. तेव्हां पासून वाली ह्या बाजूला फिरकत नाहीं. आणि म्हणून तर मी माझ्या मंत्री अमात्यासह आणि मित्रांसह येथें राहात आ. हें तें पहा तिकडे टेकडी सारखे दिसते आहे ना तें दुन्दुभीचेंच शव आहे.

"एक का दोन किती सांगूं त्याच्या पराक्रमाच्या गोष्टी. ते पहा एकापुढें एक सात ताड आहेत. वालीचा एक बाण त्या सर्वांना भेदून आरपार जातो. अशा पराक्रमी वालीला तूं कसा मारूं शकशील ?"

सुग्रीवाचें म्हणणें ऐकून लक्ष्मणानें विचारलें कीं रामाच्या कशा तऱ्हेच्या पराक्रमाची तुला प्रचीति पाहिजे आहे ?

"मी वालीला चांगला ओळखतों. तो कधीं कोणाकडूनहि पराभूत झाला नाहीं





मी त्याला फार भितों. म्हणून तर येथें दडून राहातों. आतां रामाच्या पराक्रमाविषयीं म्हणशील तर मला कांहीं त्याची कल्पना नाहीं."

सुग्रीवाची शंका दूर करण्याकरितां राम दुन्दुभीच्या शवाजवळ गेला आणि पायाच्या बोटांनीं ते दहा कोस दूर भिरकावून दिलें.

"वालीनें कोसभर उडवलें तेव्हां वाली युद्ध करून थकलेला होता आणि हें शरीरहि फार जड झालेलें होतें. आतापर्यंत तें वाळून बरेंच हलकें झालेलें आहे. तेव्हां दुसरी कांहीं साक्ष पटव. हे पाहा, तूं देखील वालीप्रमाणें एका बाणांत त्या सात ताडांचा छेद केलास तर मला कांहीं तरी अंदाज लागेल."

क्षणार्धांत रामानें आपल्या भात्यांतून बाण काढला व धनुष्यावर चढवून कानापर्यंत ओढून वृक्षांच्या रोखानें सोडला. तो बाण त्या सात वृक्षांना भेदून डोंगराला भेदून पुन्हां भात्यांत येऊन बसला.

रामाचा पराक्रम पाहून सुग्रीवाला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला—"वालीचाच काय रामा, इंद्राचा सुद्धां तूं पराभव करशील. मला खात्री पटली. आतां तूं माझा खरा मित्र झालास." असें म्हणत सुग्रीवानें रामाला दंडवत केला, नि रामानेंहि त्याला प्रेमालिंगन दिलें.

तदनंतर त्या तिघांनीं मिळून वालीचा वध करण्याचा बेत केला आणि किष्किंधेला निघाले. तेथें गेल्यावर रामाच्या सांगण्यावरून सुग्रीवानें वालीला कुस्तीसाठीं आह्वान केलें. लंगोट कसून, दंड थोपटून सुग्रीवानें गर्जना केली आणि वालीची वाट पहात समोरच उभा राहिला.

भावाची गर्जना ऐकून वाली देखील दंड थोपटून हुंकार करीत पुढें सरसावला. दोघांचें

द्वंद्व सुरू झालें. दोघेहि आवेशानें पवित्रे बदलीत होते. दोघेहि आपापल्या चपळाईची कमाल करीत होते. रामलक्ष्मण झाडाआड उभे होते. त्यांची कुस्ती पाहून ते दोघे थक झाले. त्या दोघांत वाली कोण आणि सुग्रीव कोण हेंच मुळीं कळेनासें झालें. दोघेहि सारखेच दिसत होते.

वालीचा जोर जास्त होऊं लागला तेव्हां सुग्रीव राम कोठें दिसतो का म्हणून पाहूं लागला. झाडाआड उभा असलेला राम त्यानें हेरला. पण त्याची कांहीं हालचाल चालल्याचें सुग्रीवाला भासलें नाहीं. ह्याच अवधींत वालीनें त्याला बेदम बडविलें. वालीपुढें आपला निभाव लागत नाहीं असें पाहून सुग्रीव त्याच्या तडाख्यांतून सुटून ऋष्यमूक पर्वताकडे पळत सुटला. वालीनेंहि त्याचा पाठलाग केला. पण तो वालीच्या हातीं सांपडण्यापूर्वीच ऋष्यमूक वनांत पोहोंचला. "वांचलास वेड्या जा." म्हणून वाली परत फिरला.

सुग्रीव पळून गेलेला पाहून रामलक्ष्मण देखील त्याच्या पाठोपाठ ऋष्यमूक वनांत गेले.

रामाला पाहून सुग्रीव एकदम चवताळून ओरडला. "माझी फजीती करण्यासाठींच कीं काय वालीशीं कुस्ती खेळण्यास मला पाठविलेंस ? मी वालीच्या पराक्रमाची तुला प्रथमच कल्पना दिली होती. मग तेव्हांच कां नाहीं आपली असमर्थता प्रगट केलीस. आडूनच तर मारायचा होता बाण. पण तेवढेंहि सामर्थ्य तुझ्यांत नाहीं. जर तुझ्या मनांतून मला मदत करावयाची नव्हती तर पाठविलेंसच का द्वंद्वाला ? बरा होतों मी आपला येथें." ह्या प्रमाणें सुग्रीव रामाला बरेंच बोलला.





# १८. माटर हार्न

स्वित्झरलंड आणि इटालीच्या सरहद्दीवर आल्प्स पर्वताचें हें एक सर्वांत उंच असें शिखर आहे. याची उंची १४७८० फूट आहे. १४ जुलई १८६५ रोजीं सर्वांत प्रथम एडवर्ड व्हिम्पर व त्याचे साथी हे यांनीं शिखर जिंकण्याचा पराक्रम गाजविला.





# भारताचा इतिहास



दिल्लीच्या वरिष्ठ उमरावांना सुलतान जलालुद्दीन याची कारकीर्द आवडली नाहीं. तो गादीवर बसला तेव्हां त्याचें वय ७० वर्षें होतें. तो स्वभावानें शांत व सौम्य होता. त्याला युद्ध व रक्तपात आवडत नसे.

सन् १२९२ या वर्षीं मंगोल जातीच्या झुंडीच्या झुंडी भारतावर स्वाऱ्या करूं लागल्या तेव्हां जलालुद्दिनानें त्यांचा पराभव केला. हारलेल्या सैन्याला स्वदेशीं परत जाण्यास परवानगी दिली. कांहीं जणांनीं मुसलमान धर्म कबूल करून हिंदुस्थानांतच राहण्याचें ठरविलें तेव्हां सुलतानानें त्यांना परवानगी दिली.

जलालुद्दिनाला एक मुलगी होती. त्यानें आपल्या भावाचा मुलगा अल्लाउद्दीन खिलजी याला आपला पुत्र समजून त्याला सर्व शिक्षण दिलें. पुढें त्यालाच आपला जांवई करून घेतलें. त्याला कर म्हणजे अलाहाबादचें राज्य दिलें. अलाहाबादची नवाबी हातीं आल्यापासून अल्लाउद्दिनाची धनलोलुपता वाढत गेली. तो फार महत्वाकांक्षी व कर्तबगार तर होताच. त्यानें सन् १२९२ मध्यें माळव्यावर स्वारी केली. भिल्सा राज्य जिंकलें व त्याबद्दल बक्षिस म्हणून सुलतानाकडून अयोध्येचें राज्य मिळविलें.

भिल्सा येथें त्याला दक्षिणेकडील देवगिरीच्या यादवांची कीर्ति व वैभव यांची माहिती कळली. रामदेवराव यादव हा त्यावेळीं देवगिरीच्या गादीवर होता. देवगिरीचें राज्य लुटण्याची इच्छा खिलजीच्या मनांत उत्पन्न झाली. आपला चुलता सुलतान जलालुद्दीन याला कळविल्याशिवाय विंध्य पर्वत ओलांडून एक हजार घोडेस्वारानिशी तो देवगिरीवर चालून गेला.

रामदेवराव या अनपेक्षित हल्ल्यामुळें घाबरून गेला. तो युद्धाला तयार नव्हता. याशिवाय देवगिरीचें मुख्य सैन्य त्याचा मुलगा शंकरदेव याच्या हाताखालीं दक्षिणेकडे मोहिमेवर गेलेलें होतें. तरी रामदेवरावानें शौर्यानें युद्ध केलें. पण शेवटीं त्याला हार मानावी लागली. त्यानें शत्रूला नुकसानभरपाई करून देण्याचें कबूल करून संधी करून घेतली. अल्लाउद्दीन परत जात असतां शंकरदेवानें त्याला अडवलें. त्यानें आसपासच्या राजेराजवाड्यांना मदतीला बोलाविलें. पण कोणी तयार झाला नाहीं. म्हणून शत्रूला आणखी नुकसान भरपाई करून देण्याचें कबूल करून त्याला संधी करून घ्यावी लागली.

अल्लाउद्दिनाचें हें साहसिक कार्य मुसलमानांच्या पचनीं पडलें. दक्षिणेकडील वैभव संपत्तीकडे त्यांचा डोळा वळला. अल्लाउद्दिनानें दक्षिणेच्या स्वारींत जी लूट केली होती त्याची वार्ता त्यानें सुलतानाला दिली नाहींच, उलट त्याला मिळत गेलेल्या यशामुळें त्याचें साहस वाढत गेलें. स्वतःच सुलतान होण्याची महत्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. त्यानें एक कट करून



आपल्या चुलत्याला अलाहाबाद येथें बोलाविलें. एका राजद्रोही अंगरक्षकानें अल्लाउद्दिनाच्या फुसलावणीनें सुलतानाला अलाहाबादला जाण्यास प्रोत्साहन दिलें. जलालुद्दिनाच्या मनांत अल्लाउद्दिनाविषयीं वात्सल्यभाव होता. म्हणून त्याच्या हितचिंतकांनीं त्याला जाण्यास मनाई केली असून देखील बरोबर अंगरक्षक देखील न घेतां तो एका पडावांत बसून अल्लाउद्दिनाला भेटण्यास गेला आणि त्याच्या राज्याकांक्षेला बळी पडला. १७ जुलै १२७६ या दिवशीं अल्लाउद्दिनाच्या अनुयायांनीं तो सुलतान








Fullscreen 127 14 / 80

झाल्याची घोषणा केली. जलालुद्दिनाची बेगम मलिकाजहान ही फार हुशार होती. तिचा मोठा मुलगा अर्दलीखान याला आईचा स्वभाव आवडत नसे म्हणून तो दूर मुलतानला रहात असे. पति वारल्याचें ऐकून तिनें आपला धाकटा मुलगा रुक्नुद्दीन इब्राहीम याला सुलतान केलें. तें ऐकून अल्लाउद्दीन पावसाळा चालू होता तरी दिल्लीवर चालून गेला. इब्राहीम अल्लाउद्दिनासमोर टिकाव धरूं शकला नाहीं. तो आपल्या आईबरोबर मुलतानला पळून गेला. अल्लाउद्दीन दक्षिणेकडून जें धन लूटून घेऊन आला होता त्याच्या सहाय्यानें त्यानें दिल्लीच्या अमीर उमरावांची मनें आपल्याकडे वळवून घेतलीं व स्वतः ३ आक्टोबर १२९६ या रोजीं दिल्लीच्या गादीवर बसला.

पण अल्लाउद्दिनाला सुखानें राज्यसुख भोगायला मिळालें नाहीं. तुर्की लोकांनीं बंड केलें, माळवा गुजरातकडील सुबेदारांनीं त्याला सुलतान म्हणून मान्यता दिली नाहीं. मंगोल जातीच्या स्वाऱ्या चालूच होत्या. पण या सर्व संकटांना त्यानें खंबीरपणानें तोंड दिलें. तो गादीवर बसल्याबरोबर मंगोल लोकांनीं स्वारी केली. पण त्यांना माघार घ्यावी लागली. दुसऱ्या वर्षीं पुन्हां त्यांचा पराभव झाला व सहस्रावधि मंगोल कैद झाले. सन् १२९९ सालीं पुन्हां त्यांनीं स्वारी केली. या खेपेस ते लूट मार करण्यासाठीं आले नव्हते. देश जिंकण्यासाठीं आले होते. सरळ दिल्लीवर चालून आले. युद्ध झालें आणि या खेपेस देखील त्यांचा पूर्ण पराभव झाला. सन् १३०४ मध्यें एकदां व १३०७ मध्यें पुन्हां एकदां त्यांनीं स्वारी केली. पण पराभव झाल्यामुळें अल्लाउद्दिन गादीवर असेपर्यंत त्यांनीं तो नाद सोडला.





# दास्य-मुक्ति

धरून हत्ती आणि कांसवें  
गरुड उडाला आकाशांत ।  
बसला जाउनि शिखरावरती  
उडत खोल तो हिमालयांत ॥

भूक भागवुन अपुली त्यानें  
केलें पुनरपि नभि उड्डाण ।  
रक्तवर्ण त्या पाहुनि भासे  
अपर एक अग्नीचा बाण ॥

पृथ्वि राहिली खालीं न दिसे  
दगाआड झाले पर्वत ।  
चिरुनि ढगांना पार पोंचले  
अति वेगानें विद्युतवत् ॥

नक्षत्रांचा लोक दिव्य तो  
मिणमिणणारे जणूं दिवे ।  
पंख पसरुनी जातां मधुनी  
वाटे विझविल काय दिवे ॥

स्वर्गाच्या बाजूला वळतां  
धडकी भरली इंद्राला ।  
समजुन संकट नवें भयंकर  
वदला–"ठार करा त्याला !"

ऐरावत गज चढुनी त्यावर  
स्वतः निघाला युद्धाला ।  
वज्र घेउनी हातीं सुरपति  
समोर सैन्यासह आला ॥

युद्ध दुंदुभी वाजुं लागली  
करूं लागले सुर जयघोष ।  
अफाट सेना समोर पाहुनि  
आला गरुडाला पण रोष ॥

तुटून पडला सुर सैन्यावर  
वैनतेय जणुं प्रलयपवन ।  
असह्य वारा झाला सैन्या  
म्हणुनि पळाले मग सुरगण ॥

श्री. भालचंद्र आपटे, नवी दिल्ली ]

[ पुढ अध्याय





"दास्य-मुक्त मातेला करण्या
ही अट कद्रूची होती।
तिला देउनी अमृत हें भी
मिळविन मातेची मुक्ती ॥

"शांति मिळाली मातृमना जर
होइल जन्माचें साफल्य।
कितिसा कष्ट मला झाला हो,
असे तिच्या का त्यागा तुल्य ?"

इंद्र म्हणाला—"येतों मी पण
तुझिया संगे आज लपून।
काम संपवुन निघशिल तूं अन्
अमृत नेइन मी पळवून ॥"

गरुड पोंचला अमृत घाउन
झाला कद्रूला आनंद।
जाउन विनतेला ती वदली—
"मनास झाला मज आनंद !

मला मिळालें अमृत अन् बघ,
मुक्ति मिळाली तुजला गे।
कष्ट तुला जरि झाला थोडा,
झालें सर्व मनाजोगें !"

पुत्रासंगें स्वगृहीं गेली
विनता आनंदें तिकडे।
गंगेवरती पुत्रासंगें
कद्रु निघाली अन् इकडे ॥

पवित्र होऊन अमृत-प्राशन
इष्ट, असें वाटलें तिला।
अमृतघट काठावर ठेवुन
नदिंत उतरली स्नानाला ॥

इंद्र संधि ती पहात होता
घेउनि गेला घट पळवून।
खाउं लागले गवतावरचें
अमृत कद्रूसुत चाटून ॥

परंतु त्यांच्या जिभा कापल्या
कुश गवताच्या पात्यांनीं।
आणि देणगी वडिलोपार्जित
हीच मिळविली नागांनीं ॥

★ [ संपूर्ण ] ★






[ १६ ]

[लखू व त्याच्या साथी मित्रांनीं गुहावासियांना, पंखवाल्या जातीच्या लोकांपासून त्यांचें, रक्षण करण्याचें वचन दिलें. रात्रीं त्या पंखवाल्या जातीच्या दोघां जणांवर त्यांनीं बाण सोडले. हे दोघे गुहावासियांना धरून घेऊन जाण्यासाठीं आले होते. पुढें वाचा]

लखू वगैरेंनीं सोडलेले बाण झाडांच्या फांद्यांना जाऊन लागले. हें पाहून पंखवाल्या दोघांनीं जोरानें वर उड्डाण केलें ते वरच्या वर ओरडले—"दगा ! दगा ! विश्वासघात !" नंतर पुन्हां हलकेंच उडत झाडाआड होऊन अदृश्य झाले.

जयमल म्हणाला—"ते फार दूर जाणें शक्य नाहीं. चला त्यांना हुडकून काढूं या." तितक्यांत तेथें दोघे गुहावासी घाबरून पळत आले व म्हणाले—"पंखवाले लोक आकाशांत उडून गेले. पण त्यांच्या-हून भयंकर श्वानकर्णांचे अनुयायी येत आहेत. त्यांच्या हातांतून सुटका मिळणें अशक्य !"

"श्वानकर्णी ! या नांवाची देखील रानटी जात आहे वाटतें ? कोणत्या बाजूनें येत आहेत ते ?" जयमलनें चकित होऊन विचारलें.




गुहावासी कांहीं बोलले नाहींत. तितक्यांत गोमांगला दुरून मशाली दिसल्या. तो म्हणाला—"त्या पहा मशाली ! ते लोक इकडेच येत आहेत !" असें म्हणत त्यानें धनुष्यावर बाण चढविला. जयमल व लखू दोघांनीं पण धनुष्यावर बाण चढविला आणि त्या बाजूला पाहिलें. कांहीं लोक आपापले भाले रोखून व मशाली घेऊन त्या बाजूला पुढें येत होते.

जयमल धनुष्यावर बाण चढवून पुढें निघाला. नंतर जरा थांबून नम्रपणें पण करड्या आवाजांत म्हणाला—"तुम्ही कोण, आम्हांला माहीत नाहीं, तुमच्याशीं आमचें कांहीं वैर नाहीं. तुम्ही आपल्या मार्गानें जा, आम्ही आपल्या मार्गानें जाऊं. पण मध्यंतरी तुम्ही जर कांहीं गडबड केलीत तर मात्र आम्हांला आमच्या धनुष्यबाणाचा उपयोग करावा लागेल."

मशालींच्या उजेडांत पुढें पुढें चालणारा तरुण आपला भाला उभा वर उचलून म्हणाला—"तुमच्याशीं आमचें वैर नाहीं. तुम्ही तुमच्या व आम्ही आमच्या वाटेनें जावें हें बरोबर आहे. पण तुमच्या बरोबर मार्जार जातीचे जे लोक आहेत त्यांना तुम्ही आमच्या ताब्यांत द्या म्हणजे झालें."

"मार्जार जातीचे लोक !" जयमल व त्याच्या साथी मित्रांना जास्तच आश्चर्य वाटलें. प्रथम श्वानकर्णी नांव ऐकलें व हें दुसरें मार्जार जातीचें ! "ह्या दोन वेगवेगळ्या जाती कोठल्या व त्यांच्यांत हें वैर कसें काय ?" त्यानें विचारलें.

त्यांच्या बरोबरचा एक गुहावासी म्हणाला—"मार्जार आमचा पुढारी आहे ! त्याच्याशीं आज सकाळींच आपलें बोलणें झालें होतें. आम्ही गुहेंत राहातों तसे हे श्वानकर्णी पण गुहेंतच राहतात. त्यांच्याशीं आमचें हाडवैर आहे. ते आम्हांला ठार करतील."

"जयमल, आपण यांच्या रक्षणाची जबाबदारी आपल्यावर घेतली आहे." लखू म्हणाला. इकडे गोमांगनें धनुष्यावर बाण चढवून नेम धरला.

जयमलनें त्याला मध्येंच अडवलें व म्हणाला—"लखू आपलें वचन न पाळण्या इतके आपण भित्रे आहों का ? पण परिस्थिति ओळखून वागायला नको का ? आपले विरोधी चाळीस-पन्नास तरी असतील."

"मग, तुझें म्हणणें तरी काय ?" लखूनें शंका करीत विचारलें.

"सलोख्यानें बोलून काम निघालें तर पाहूं. नाहींतर युद्ध करायला आपण तयार आहोंच !" असें म्हणत जयमल दोन पावलें पुढें गेला व म्हणाला—"आमच्याशीं आतां जो कोणी बोलत होता तो श्वानकर्णीच आहे ना ? असेल तर त्यानें हातांतला भाला खालीं करून आमच्याशीं सलोख्यानें बोलण्यासाठीं पुढें यावें. हा पहा मी आपला बाण धनुष्यावरून काढून भात्यांत ठेवीत आहें."












“श्वानकर्णी आमचा नायक आहे. तो आमच्या गुहेंत आहे. मी त्यांचा अनुचर आहें. मार्जार जातीच्या त्या दोघांना मागें सोडून तुम्ही आपल्या वाटेनें निघून जा.'' श्वानकर्णींचा अनुयायी म्हणाला.

“तें शक्य नाहीं. तुम्ही त्यांना पकडणार असलांत तर तें युद्धाशिवाय शक्य नाहीं. तुम्ही युद्ध करण्याचेंच ठरविलेंत तर तुमच्यापैकीं एक देखील जिवंत राहणार नाही. थोड्या वेळा पूर्वी आमच्या बाणांचा वर्षाव होतांच पंखवाल्या जातीचे लोक पळून गेले ही गोष्ट कदाचित तुम्हांला माहीत नसेल.''

असें म्हणत त्यानें पुन्हां धनुष्यावर बाण चढवला व तयार रहावयास लखू व गोमांग दोघांना खूण केली.

तिघांनीं सज्ज होऊन चार पावलें पुढें टाकलेली पाहून श्वानकर्णी जातीच्या त्या तरूणानें मागें वळून पाहाल्याबरोबर त्याचे सर्व साथी त्याच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहाले व त्यांचें परस्परांशीं कांहीं तरी बोलणें सुरू झालें.

“लखू, पाहिलास त्यांचा उडालेला गोंधळ. आमच्यावर चालून यावें कीं नाहीं हें ते ठरवूं शकले नाहींत. आतांच संधी-साधून कार्यसिद्धी करून घेतली पाहिजे !'' असें सांगून जयमल त्या रानटी श्वानजातीच्या लोकांकडे वळून म्हणाला—“मरणाला तयार होऊन ज्याला पुढें यावयाचें असेल त्यानें खुशाल पाऊल पुढें टाकावें. बाकीच्यांनीं निमूटपणें मागें वळावें. तुमचा नायक येथें हजर असता तर त्यानें खात्रीनें आमच्याशीं मैत्रीचा हात पुढें केला असता.''

तें ऐकून त्या तरुण पुढाऱ्यानें आपल्या बरोबरच्या लोकांना दरडावून चुप केलें आणि पुढें येऊन जयमलला म्हणाला—“तुम्ही स्वतः येऊन आमच्या नायकाशीं जें



बोलावयाचें असेल तें बोलाव. तुम्हांला आमची भीति वाटत नसेल तर आमच्याबरोबर गुहेकडे चलावें. आम्ही वाट दाखवितों.''

भीतीचा उच्चार होतांच लखूला जोर चढला. त्यानें आपल्या धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला आणि म्हणाला—“तुमच्या नायकाकडेच काय, तुम्ही म्हणाल तर आम्ही त्याच्या बापाला किंवा त्याच्या आज्याला देखील भेटायला तयार आहों ! चला !''

जयमल थोडा चपापला. लखूनें आपल्या शौर्याचा वचक बसावा म्हणून जरी तें म्हटलें होतें तरी प्रत्यक्ष जावेंच लागलें तर धोका तर नाहीं ? पण आतां माघार घेण्यांत अर्थ नव्हता. कारण गेलों नाहीं तर त्या रानटी लोकांना वाटेल कीं आम्ही भ्यालों व ते हल्ला करतील.

जयमल जास्त वेळ विचार करायला थांबला नाहीं. त्यानें मागें वळून गुहावासियांपैकीं एकाला त्यांचा नायक मार्जार याच्याकडे जाऊन घडलेलें सर्व वृत्त कळवायला सांगितलें. इकडे श्वानकर्णीच्या अनुचरांनीं बरोबर यायला सांगितलें. एक जण म्हणाला—“त्या मार्जाराच्या अनुयायांसाठीं तुमच्याशीं युद्ध करणें मूर्खपणाचें ठरेल.''



“ठीक आहे, तर व्हा पुढें. आतां तुमच्यामध्यें व आमच्यामध्यें जेवढें अंतर आहे तेवढें गुहेपर्यंत पोहोंचें पावेतों कायम राखलें पाहिजे. ह्यांत दगा किंवा विश्वासघात कोणी केला तर मात्र त्याला आमच्या या बाणाला बळी पडावें लागेल.'' जयमल म्हणाला.

त्यानंतर सर्व निघाले. सुमारें अर्धा तास चालत गेल्यावर ते एका डोंगराळ प्रदेशांत पोंचले. त्याच वेळीं पूर्वेकडे दिशा फांकूं लागल्या होत्या. त्या उजेडांत जयमल व त्याच्या मित्रांना जागोजागीं उंच नाक्यांच्या

जागीं श्वानकर्णी जातीचे गुहावासी एकेक उभे असलेले दिसले. ते जवळ जवळ येऊं लागले तसतसे वरून मोठमोठे दगड ढकलून उतरणीवर सोडण्यांत आले.

दगड लखू जवळ येऊं लागले. श्वान-कर्णीचे अनुचर मोठ्यानें ओरडत पुढें धांवूं लागले.

जयमल थोडा थबकला व गोमांगला म्हणाला—“ उजव्या बाजूला पहा! एका दगडावर अस्वलाचें चामडें घालून उभा आहे तोच श्वानकर्णी असावा! त्याच्यावर नेम धरून उभा रहा! मात्र मी सांगेपर्यंत बाण सोडूं नकोस.” असें सांगून तो दोन पावलें पुढें गेला व म्हणाला—“ श्वानकर्णी! आमच्याशीं दगा करण्याचा तुझा विचार असेल तर तुझाच मुरदा प्रथम जमिनीवर लोळेल. तुझ्यावर नेम धरून आम्ही उभे आहों. तूं तेथून एक पाऊल देखील सरकलास तर पहा, आमचा बाण तुझ्या छातीच्या आरपार जाईल.”

जयमलच्या त्या बोलण्याचा वचक श्वानकर्णीच्या सर्व अनुयायांवर बसला. कारण दगड ढकलण्याचें त्यांनीं बंद केलें होतें. श्वानकर्णीचा जो अनुयायी जयमल



वगैरेंना बोलावून घेऊन आला होता, त्यानें जयमलकडे बोट दाखवून आपल्या नायकाला कांहीं तरी सांगितलें. तो नायक तें ऐकून जयमलकडे वळून जोरानें ओरडून म्हणाला— “ तुम्ही आमच्या शत्रूचे मित्र आहां! म्हणून आम्ही तुम्हांला देखील आपले शत्रु मानतों. आतां आमच्या तावडींतून जिवंत परत जाणें तुम्हांला शक्य नाहीं.”

तें ऐकून लखू म्हणाला—“ जयमल! जास्त वेळ गमावण्यांत अर्थ नाहीं. त्या श्वानकर्णीचा आणि त्याच्या दहापांच अनु-यायांचा मुर्दा पाडून चल आपण येथून पाय काढूं या!”

पण जयमलनें त्याला आवरलें व म्हणाला—“ पाण्यांत पाय ठेवून मगरीशीं वैर करण्यांत शहाण पण नाहीं. आपण स्वदेश सोडून निघालों तेव्हां पासून आपणांला वैरच करावें लागलें आहे. मैत्री कोणाशींच केली नाहीं. तिकडे तो ब्रह्मदंडी आपला पाठलाग करीतच आहे. या रानटी लोकांशीं मैत्री केली तर कदाचित भयंकर दरीची वाट आपल्याला मिळेल. समज, तुझा बाप या बाजूला आला तर यांच्या मैत्रीचा त्याला देखील उपयोग होईल ”



बापाची आठवण होतांच लखूच्या अंगाला घाम सुटला. बाण खालीं करून तो विचारूं लागला—“ पण या मनुष्यभक्षी रानटी लोकांशीं मैत्री कशी काय करणार?”

“ तें सर्व मी पाहून घेईन! पंखवाल्या जातीपासून स्वतःचें रक्षण करून घेण्यासाठीं मी श्वानकर्णी व मार्जारच्या अनुयायांत मैत्री स्थापन करीन. दोन्ही जातीचे लोक गुहावासी आहेत.” नंतर श्वानकर्णीकडे वळून म्हणाला—“ श्वानकर्णी! तुझ्या या धमक्यांनीं आम्ही भिऊन जाऊं असें तुला वाटलें असेल कदाचित! आम्ही मार्जारच्या

अनुयायांना वचन दिलें आहे कीं आम्ही पंखवाल्या जातीच्या लोकांच्या हातून त्यांचें रक्षण करूं. आम्ही दहा पांच पंखवाल्यांना ठार केलें आहे. तुम्ही दोघे आपसांत भांडत राहलांत तर ते प्रथम मार्जार जातीचा शेवट करून तुम्च्याकडे वळतील. पण तुमचें या लोकांशीं एवढें वैर कां?"

"वैराचें कारण? त्यांच्या सारखे लुच्चे व नीच आमच्या या प्रदेशांत कोणत्याहि जातीचे लोक नाहींत. आम्ही गुहेंत नसतां आमच्या पूर्वजांची गदा हे दुष्ट चोरून पळून गेले. त्या गदेचें महत्व आम्हांला कळतें. ती मंत्रबलेली गदा आहे. ती मिळेपर्यंत त्यांच्याशीं आमचें वैर राहणार." श्वानकर्णी रागानें म्हणाला.

ती दगडी गदा मार्जारनें आणून दिली तर हें वैर मिटेल का?" जयमलनें विचारलें.

तें ऐकून श्वानकर्णी चेष्टेनें हंसून म्हणाला—"तो मार्जार आणि ती गदा स्वतः होऊन आणून देणार? अशक्य! त्या गदेसाठीं तो आपल्या सर्वस्वाची राखरांगोळी करायला मागें पुढें पाहणार नाहीं."

"मार्जारची गोष्ट तूं माझ्यावर सोड! तुझ्या पूर्वजांची गदा मी त्याच्याकडून तुला आणून देतों मग तर झालें?" असें सांगून त्यानें मागें वळून मार्जार जातीचा जो अनुयायी त्याच्याबरोबर आला होता त्याला म्हणाला—"ऐकलेंस ना हें सगळें? जा, जाऊन आपल्या नायकाला सांग कीं मी ती गदा मागून घेऊन यायला सांगितलें आहे. त्याच्या केसाला देखील धक्का लागणार नाहीं, मी वचन देतों." मार्जारचा अनुयायी तावडतोब निघाला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# पुनर्जन्म

विक्रमार्क तसा गप्प बसणारा नव्हता. तो तडक झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर टाकिलें आणि पुन्हां स्मशानाकडे जाऊं लागला. नित्याप्रमाणें प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, तुझें साहस आणि चिकाटी खरोखर अगदीं थक्क करून सोडणारी आहेत. कैरभ नांवाच्या सैनिकावर असाच प्रसंग गुदरला असतां त्याच्या धैर्याचा परिणाम त्याला राजकुमारी मिळण्यांत झाला. असो तुला थकवा येऊं नये म्हणून मी तुला त्याची गोष्ट सांगतों, ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट आरंभ केली.

एका देशाचा एक राजा होता. फार चांगला होता. पण निस्संतानत्व त्याच्या वांटणीला आलें होतें. त्याचे सेवक लोक नेहमीं म्हणत कीं तुमच्या नंतर कोण राज्यकारभार पाहणार? अशा तऱ्हेचीं बोलणीं

वेताळाच्या गोष्टी

M—



ऐकलीं कीं त्याला दुःख होत असे. त्याला वाटे लुळापांगळा का होईना पण एकादा पुत्र होऊं दे.

राजाचें हें गाऱ्हाणें जणूं देवानें ऐकलें. राणीला दिवस राहिले आणि नऊ महीने पूर्ण होतांच तिला कन्यारत्न झालें. राजकन्याच ती, सुंदर होतीच. पण तिची रंगकांति मात्र अविट काळी होती. इतकी कीं त्यामुळें राजाराणी देखील विचारांत पडलीं. राजानें आपल्या मनाची समजूत घालून घेतली कीं दैवदोषानें असें घडलें असेल. त्याप्रमाणें राणीला सुद्धां समजावून सांगून मोठ्या प्रेमानें आपल्या मुलीचें लालन पालन केलें. तिच्यासाठीं एक वाडा बांधला. तिची सेवाचाकरी करण्यासाठीं दासदासी नेमल्या. तिच्या विद्याभ्यासाची व्यवस्था केली.

सर्व झालें तरी राजाच्या चित्ताचें समाधान होईना. त्यानें मांत्रिक, ज्योतिषी यांची सभा बोलावून मंत्र तंत्र, पूजापाठ करविले. पण त्यापासून कांहीं एक फायदा झाला नाहीं.

कांहीं दिवसांनीं एक म्हातारी राजाकडे येऊन म्हणाली—"मुलीच्या अठराव्या वर्षी तिच्यावर मोठीच आपत्ति येणार आहे. त्या संकटांतून ती वाचली म्हणजे तिची ग्रहदशा संपेल. तूं कांहीं काळजी करूं नकोस." एवढें सांगून म्हातारी निघून गेली.

दिवसामागून दिवस गेले. मुलीला सतरा वर्षें पूर्ण झालीं. राजानें मोठा समारंभ करून तिचा वाढदिवस साजरा केला. त्या दिवशीं दिवसभराची दमलेली राजकुमारी रात्रीं लवकर झोंपी गेली. दुसऱ्या दिवशीं ती उठली ती बावरल्यासारखीच दिसूं लागली. तिला काय होत आहे, काय



पाहिजे आहे कांहीं कळेना. ती देखील नीटपणें कांहीं सांगेना.

घटका दोन घटका गेल्यावर ती राजाजवळ आली आणि म्हणाली—"बाबा! मी आतां जाणार. संपलें माझें आयुष्य, पण बाबा मी मेल्यावर मला जाळून टाकूं नका, आणि पुरूनपण टाकूं नका. मला एका पेटींत बंद करून माझ्या आजोबा पंजोबांच्या समाधि आहेत ना? तेथें नेऊन ठेवा आणि रोज रात्रीं पाहारा देण्यासाठीं तेथें कोणाला तरी पाठवीत चला." एवढें बोलत असतांच ती धाडकन् जमिनीवर पडली आणि क्षणांत तिचा प्राण निघून गेला.

मुलीच्या इच्छेप्रमाणें राजानें तिचें शव एका पेटींत घालून तिच्या पंजोबांच्या समाधीजवळ नेऊन ठेविलें आणि पाहारा देण्यासाठीं एका शूर सैनिकाला नेमलें. तो पाहारा देत तेथेंच समाधीच्या पायरीवर बसून राहिला. मध्य रात्रींच्या सुमारास त्या पेटीचें दार खाडकन उघडलें गेलें. तो सैनिक आश्चर्यानें पाहूं लागला. इतक्यांत राजकुमारी पेटींतून बाहेर पडली आणि धांवत जाऊन तिनें त्या सैनिकाच्या नरड्याचा चावा घेऊन रक्तप्राशन केलें. नंतर



पुन्हां पेटींत जाऊन पेटी बंद करून आंत झोंपी गेली.

सकाळीं राजाच्या सैनिकांनीं स्मशानांत येऊन पाहिलें तो सैनिकाचें प्रेतच त्यांच्या नजरेस पडलें. त्यांनीं राजाला खबर दिली. राजाला ऐकून वाईट वाटलें पण त्याला इलाज नव्हता. दुसऱ्या दिवशीं दुसऱ्या एका सैनिकाला पाठविलें. त्याची तीच गत झाली. हें पाहून तर सर्वांचीच गाळण उडाली. राजानें मंत्र्यांचा विचार घेतला. ते म्हणाले—"असें वाटतें कीं राजकन्येला कोणीं ब्रह्मराक्षसानें पछाडलें असावें आणि

त्याचेंच हें सर्व कृत्य असावें. ह्या करतां तिथें प्रेत जाळून टाकणें बरें." परंतु राजाला तो विचार पटेना. त्याला आपल्या मुलीची अंतिम इच्छा पूर्ण करावयाची होती. म्हणून त्यानें कांहीं निवडक धाडशी शिपायांना बोलाविलें.

राजा त्यांना म्हणाला—"तुमच्या पैकीं आज रात्रीं स्मशानांत जाण्यास कोण तयार आहे? बोला! लक्षांत ठेवा, तेथें जाणें म्हणजे मृत्यूच्या जबड्यांत प्रवेश करणें आहे. हें जाणून जिवंत परत येईल त्याला मी अर्धे राज्य देईन."

राजाचें बोलणें ऐकून सर्व सैनिक एक-मेकांकडे टकमक पाहूं लागले. मृत्यूच्या पुढ्यांत जाण्यास आपण होऊन कोण तयार होणार? कोणीच पुढें होत नाहीं असें पाहून त्यांतील एक धाडसी वीर पुढें झाला आणि म्हणाला—"महाराज, मला पाठवा आपल्या कामगिरीवर."

कैरभ साहसी तरुण होता. मागें पुढें पाहिल्याशिवाय तो युद्धामध्यें बेधडक शत्रूवर तुटून पडे. त्याच्यावर कितीवेळां तरी मरणाचे प्रसंग गुदरले होते. परंतु केवळ त्याची आयुष्याची दोरी बळकट,



म्हणूनच तो आत्तापर्यंत जिवंत होता. तो जगांत एकटाच होता. धन संपत्ति देखील कांहीं मोह पाडण्याएवढी मोठी नव्हती. त्यामुळें तो वृत्तीचा विरक्त होता. त्याला जगण्या मरण्याचें सुखदु:ख कांहींच नव्हतें.

तिसऱ्या दिवशीं राजानें त्यालाच स्मशानांत पाठविलें. कैरभ धैर्यानें गेला खरा. पण जसजसा रात्रीचा शुकशुकाट वाढूं लागला कैरभाचें धैर्य थोडें थोडें खचूं लागलें. समोरासमोर कोणाशीं दोन हात करण्याची त्याची ताकत होती. पण ह्या अदृश्य ब्रह्मराक्षसाशीं कसें युद्ध करणार? त्याचा धीर खचतच चालला. त्याच्या मनांत प्रथमच भीतीनें प्रवेश केला. तो घरीं परत जाण्याचा विचार करूं लागला. कारण स्मशानांत राहिलें तर ब्रह्मराक्षस मारील. घरीं गेलों तर राजा डोकें उडवील. म्हणजे मृत्यु हा आहेच. मग घरींच गेलेलें काय वाईट. म्हणून तो जागेवरून उठला आणि घरची वाट चालूं लागला. तो स्मशाना-बाहेर पडला असेल नसेल तोंच त्याला वाटेंत एक पांढरी शुभ्र मनुष्याकृति येत असलेली दिसली. त्या ऋषीसारख्या आकृतीला पाहून तो घाबरला आणि पळून













जाण्याच्या अवसानांत असतां ती आकृति बोलूं लागली—" कां रे जातोस ? "

" मला उगीच मरावयाचें नाहीं म्हणून !" तो उत्तरला.

" माझ्या सांगण्याप्रमाणें वाग म्हणजे तूं मरणार नाहींस. ही विभूति ठेव आपल्या जवळ. मध्यरात्रीं राजकुमारी पेटी उघडील तेव्हां झांकणाच्या आड तूं लपून रहा. ती तुला शोधावयास बाहेर गेली म्हणजे तूं हळूंच ही विभूति पेटींत फेंक आणि राजकुमारीच्या जागीं निजून रहा. राजकुमारी परत येईल तेव्हां तुला पाहून तुला उठविण्याचा ती प्रयत्न करील. तुला शिव्याशाप देईल. परंतु तूं तिच्या बोलण्याकडे लक्ष देऊन ऊठूं नकोस. एवढेंच नव्हें तर कांहींहि हालचाल करूं नकोस. तिला झपाटणारा ब्रम्हराक्षस तिला सोडून निघून जाईपर्यंत तूं तसाच पडून रहा. सकाळ होईपर्यंत पेटीच्या बाहेरच येऊं नकोस. असें केल्यानें ब्रम्हराक्षस तुला कांहीं एक करूं शकणार नाहीं, जा. परत जाऊन पाहारा दे. इतकें सांगून कैरभच्या हातांत विभूति देऊन ती आकृति अदृश्य झाली.

ऋषीचें बोलणें ऐकून कैरभ परतला व पाहारा देऊं लागला. आतां त्याची भीति थोडी कमी झाली होती.

बराच वेळ स्मशानांत हिंडत, फिरत घालविल्यावर मध्यरात्रींच्या सुमारास तो शवपेटीजवळ आला आणि तेथेंच पडून राहिला.

मध्यरात्र झाल्याबरोबर राजकुमारी पेटी उघडून बाहेर आली. तिनें जवळपास दृष्टि फिरवून पाहिलें. तिला पाहारेकरी कोठेंच दिसला नाहीं. त्याला शोधण्यासाठीं ती स्मशानांत फिरूं लागली. ती दूर गेली असें पाहून कैरभ पेटीमध्यें विभूति फेंकून राजकुमारीच्या जागीं पडून राहिला.



राजकुमारी अकाळ विकाळ रूप धारण करून पाहाटेपर्यंत स्मशानांत नरभक्ष्याच्या शोधार्थ हिंडत राहिली. भयंकर किंकाळ्या फोडून पाहारेकऱ्याला बोलावूं लागली, भेडसावूं लागली. शेवटीं कंटाळून आणि वेळ संपत आल्याचें जाणून ती आपल्या पेटीजवळ आली. पेटींत पाहारेकऱ्याला निजलेला पाहून त्याला पेटीच्या बाहेर येण्यासाठीं धमकी देऊं लागली. म्हणाली— " येथें लपून बसलास काय ? चल नीघ, बाहेर. मला भूक लागली आहे. हें माझें घर आहे. हो बाहेर." अशा तऱ्हेनें त्याला हुसकावून बाहेर काढण्याचा प्रयत्न करूं लागली. तिच्या आवाजांत कठोरपणा होता. तिच्या प्रत्येक शब्दाबरोबर कैरभच्या अंगावर कांटा उभा राहात होता. त्याला भीति वाटत होती. परंतु तो मोठ्या निग्रहानें तें सारें सहन करीत होता.

थोड्या वेळानें राजकुमारीच्या आवाजांत कोमलपणा येऊं लागला. तेव्हां कैरभाला वाटलें कीं आतां भूत गेलें असेल. त्यानें हळूच डोळे किलकिले करून पाहिलें तों राजकुमारीचा रंग पालटलेला होता. तरी पण भूत तिच्या तोंडून कैरभाला बाहेर काढण्याचा प्रयत्न करीत होतें. साधूनें सांगितल्याप्रमाणें पूर्व दिशेस तांबडें फुटेपर्यंत तो निपचित पडून राहिला, आणि कोंबड्याची आरोळी ऐकल्यावर त्यानें डोळे उघडून पाहिलें.

राजकुमारी पेटीजवळ उभी असलेली त्याला दिसली. तिचा पूर्वीचा काळा रंग जाऊन आतां ती गोऱ्या रंगांत शोभून दिसत होती. तिचें अकाळ विकाळ रूप नाहींसें होऊन ती शांत सौम्य रूपांत उभी होती. कैरभाला जाग आलेली पाहून तिनें त्याच्याकडे पाहून स्मित केलें आणि प्रेमानें

      

त्याचा हात पकडून त्याला उठवीत म्हणाली—"ऊठ आतां. तूं माझें रक्षण केलेंस. माझ्यावर फार उपकार केलेस. ब्रह्मराक्षस माझ्या मानगुटीस बसला होता. तो आतांच मला सोडून जळफळत निघून गेला."

राजकुमारीनें कैरभाला हात देऊन बाहेर काढलें व तीं दोघें तेथेंच एका पायरीवर बोलत बसलीं.

सकाळीं सैनिक स्मशानांत आले आणि त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांचा समोर दिसत असलेल्या दृश्यावर विश्वासच बसेना. डोळे फाडफाडून पुन्हां पुन्हां चोळून ते तिकडे पाहूं लागले. आणि ते सर्व जागच्या जागीं खिळून राहिले. पुढें पाऊल टाकण्यास त्यांचें धैर्य होईना. शेवटीं राजाच्या आज्ञेची आठवण होऊन ते सर्व धैर्य एकवटून पुढें सरसावले.

जेथें कैरभ व राजकुमारी बोलत बसली होतीं तेथें ते सर्व गेले. त्यांनीं पाहिलें राजकुमारीचा असलेला काळा रंग जाऊन ती गोरीपान झाली होती आणि कैरभाचें प्रेतच दिसेल अशा कल्पनेनें आलेल्या सैनिकांना तो राजकुमारीशीं बोलत बसलेला दिसला. पण ह्या प्रकारानें सर्वांनाच आनंद झाला होता. ते मोठ्या त्वरेनें त्या दोघांना घेऊन राजवाड्यांत गेले.

त्याच दिवशीं राजानें दरबार भरवून कैरभाची स्तुति केली आणि त्याला चांगलेंसें बक्षीस देण्यासंबंधीं मंत्र्यांशीं परामर्श केला. मंत्र्यांनीं सुचविलें—"आपण पाहारा देण्या-बद्दलच त्याला अर्धें राज्य देण्याचें कबूल केलें आहे. पण आमच्या मतें तो एक साधारण शिपाई असल्यामुळें त्याला राज्य-वगैरे कांहीं न देतां थोडीशी जहागिरी किंवा थोडें द्रव्य दिलें तरी पुरें. राज्य दिलें तर तो काय तें संभाळूं शकणार आहे? त्याची शक्ति ती काय आणि बुद्धिपण काय?"

राजाला मंत्रांचा तो सल्ला आवडला नाहीं. तो थोडा विचार करूं लागला. इतक्यांत राजकुमारी आंतून बाहेर येऊन म्हणाली—"तुमचे विचार इतके कृतघ्नपणाचे असतील असें मला वाटलें नव्हतें. जो एवढें मोठें धैर्य करून रात्रभर स्मशानांत राहिला. ज्यानें ब्रह्मराक्षसाचा नेटानें पराभव केला, त्याच्या शक्तीची तुम्हांला काय कल्पना येणार? मला त्याच्या मनोधैर्याची












संपूर्ण कल्पना आहे. मी त्याच्याशीं लग्न करणार आहे. जरूर नाहीं तुमच्या सुतळीच्या तोड्याची सुद्धां."

राजकुमारीचें भाषण ऐकून सर्व मंत्रांनीं माना खालीं घातल्या. राजाला मात्र आनंद झाला. तो आपल्या कन्येसाठीं वाटेल तें करण्यास तयार होता. त्यानें राजकन्येचें लग्न कैरभाशीं लावून दिलें आणि त्याला आपला वारस म्हणून नेमलें.

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! राजकुमारीनें आपलें कुळगोत विसरून एका साध्या शिपायावर प्रेम कशासाठीं केलें? त्यानें भुतापासून तिचें रक्षण केलें म्हणून? कृतज्ञतेनें, कां त्याच्या साहसावर मोहित होऊन? तुला माहीत असल्यास उत्तर दिलेंच पाहिजे. नाहीं तर परिणाम ठाऊकच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर लोळूं लागतील.

विक्रमार्क म्हणाला—"राजकुमारीला कैरभाच्या साहसाबद्दल कृतज्ञता वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि आपलें रक्षण केलें ह्या गोष्टीची जाणीव ठेवून त्याच्यावर प्रेम करणें ह्यांत कांहीं वावगें नाहीं. पण खरी गोष्ट अशी आहे कीं राजकुमारी म्हणून ती मरून गेली होती. ब्रह्मराक्षसाच्या हातून सुटल्यानंतर तिचा पुनर्जन्मच झाला होता. ह्या जन्मांत कैरभ तिला प्रथम भेटला आणि तो सुद्धां उपकारकर्ता म्हणून तिला तो प्रिय वाटला. ह्या वेळीं ती चांगली मोठी झालेली असल्यानें त्यांच्या प्रेमाचें रूप लग्नांत दिसलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह पुन्हां झाडावर जाऊन बसला.





# भीमूचे पराक्रम

श्रीपुर जमीनदाराच्या गांवापासून सुमारें दहा मैलावर होतें. नवरात्रीमध्यें तेथील देवीच्या देवळांतील एका दिवसाची पूजा जमीनदाराकडे असे. ती पूजा करण्यासाठीं जमीनदार स्वतः कधींच जात नसे. तो पुजेचें सर्व सामान कारकुनाहातीं पाठवून देत असे. ह्या वर्षीं ही कामगिरी जमीनदारानें आपल्या जावयावर सोंपविली. तो म्हणाला—"भीमराव, आज तुम्हीं आमच्या वतीनें श्रीपुरीं जाऊन देवीची पूजा करून या. पुजेचें साहित्य सर्व गाडींत घालून घेऊन जा. गाडीवान राहीलच तुमच्याबरोबर वाट दाखवायला. संध्याकाळ पर्यंत परत या."

सासऱ्याची आज्ञा शिरसावंद्य मानून भीमराव जाण्याच्या तयारीला लागले. गंध, फुलें, अक्षता, फळें, नारळ प्रसादासाठीं कांहीं नैवेद्य, कापूर, उदबत्ती, वगैरे सर्व सामान जमवून भीमरावांनीं गाडीवानाला हांक मारली. तो तयारच होता. गाडींत सामान भरलें. दोघेहि गाडींत बसले आणि गाडी चालू झाली.

एक मैलभर गेल्यावर गाडीवान म्हणाला—"क्षणभर थांबा. मी माझ्या घरीं जाऊन नारळ उदबत्ती घेऊन येतों. येथें जवळच आहे माझें घर." असें सांगून गाडी थांबवून तो उतरून गेला.

'आत्तां येतों म्हणाला आहे. येईलच इतक्यांत. तों पर्यंत गाडी हळूं हळूं चालवावी' असा विचार करून भीमरावांनीं दोरी हातांत घेतली. त्यानें ह्या पूर्वीं कधीं सुद्धां गाडी चालविली नव्हती व त्याला

[पान ... नाका समोर] [श्री. मा. गो. मोरे



त्याची कांहीं माहिती पण नव्हती. त्यानें बैलांना चाबूक लगावला. पाठीवर चाबूक बसतांच बैल जोरजोरानें पळूं लागले. भीम त्यांना तोंडानें हळूं चाला हळूं चाला म्हणून सांगत होता, तरी बैल त्याचें ऐकेनात. म्हणून त्यानें त्यांना जोरानें मारलें. त्या बरोबर ते अधिकच जोरानें धांवूं लागले. जों जों ते जोरानें जात तों तों तो त्यांना जास्त मारी. शेवटीं ते पळत सुटले. जसजसे ते पळूं लागले तसतसा भीमूचा राग वाढत गेला.

भीमूला श्रीपुरचा रस्ता माहीत नव्हता. बैल आपले सरळ रस्त्यानें चालले होते. गाडी चालवितां चालवितां भीमूच्या हातांतील एक दोरी सैल सुटली त्या बरोबर बैल त्यांच्या संवयीच्या इशाऱ्याप्रमाणें वळले आणि गाडी एका कालव्यांत शिरली.

जरा वरच्या बाजूला एक धोबी कपडे धुवीत होता. गाडी मार्ग सोडून जात असलेली पाहून तो धांवत धांवत गाडी जवळ आला आणि भीमूला म्हणाला—"मुद्दाम कशाला गाडी कालव्यांत घातलीत?"

"मुद्दाम! म्हणजे दिसत नाहीं? बैल पाणी पिताहेत ते? त्यांना तहान लागली म्हणून आणले इकडे." तेवढ्यांत बैल पाणी प्याले व भीमू त्यांना हाकून कालव्याच्या बाहेर आणूं लागला. पण त्याला ते न जमल्यानें शेवटीं धोब्याच्या मदतीनेंच गाडी वर काढली. मग त्यालाच भीमूनें श्रीपुरचा रस्ता विचारला. तो म्हणाला "श्रीपुरचा रस्ता अगदीं उलट दिशेला आहे. असेच उलटे जाऊन मोठ्या रस्त्याला लागल्यावर उजव्या बाजूस वळा आणि मग नाकासमोर जा, म्हणजे थेट श्रीपुरला पोहोंचाल." "नाकासमोर? कोणाच्या नाकासमोर आणि कोणी नाहींच भेटेल वाटेंत तर?" "कोणाच्या म्हणजे बैलाच्या. बैलांच्या अगदीं नाका समोर जा श्रीपुर लागेल" धोबी म्हणाला.

भीमूनें चाबूक मारला आणि बैलांना हाकले. रस्त्याला लागल्यावर भीमूनें बैलांना ठीक नाकासमोर जाण्यास सांगितलें. पुढें गाडीच्या हेलकाव्या मुळेंत्याचा जरा डोळा लागला. बैल आपले कोणी हांकत नाहींत असे पाहिल्यावर सरळ घराच्या वाटेला लागले.

संध्याकाळीं महालक्ष्मी गांवांतील देवीच्या पुजेस चालली असतां गाडी येत असतांना तिनें पाहिलें. तिला वाटलें पूजा आटपून भीमू परत आला आहे. पण जवळ येऊन पाहाते तों भीमराव घोरत आहेत व सर्व पुजेचें सामान जसेंच्या तसेंच असलेलें दिसलें. तिनें बैलांना धरून गाडी थांबविली. भीमूला उठविलें आणि विचारलें कीं पूजा आटोपून गाडी परत आली आहे का नुसतीच? खडबडून जागा होत भीमू म्हणाला—"काय आलें का श्रीपुर?"

पण आपल्या बायकोला समोर पाहून त्याला थोडें आश्चर्य वाटलें. स्वप्न तरी



आहे किंवा भुताटकी तरी आहे. त्यानें घडलेला सर्व प्रकार तिला सांगितला. तें सर्व ऐकून घेऊन महालक्ष्मी म्हणाली—"ठीक आहे. आज आपण इथल्याच देवीच्या देवळांत जाऊन येऊं. उद्यां मी सुद्धां येईन श्रीपुरला.

तीं दोघं पूजा करून प्रसाद घेऊन परत आलीं. जमीनदार संध्याकाळीं गांवाहून परत आल्यावर लक्ष्मीनें आणलेला प्रसाद त्याला दिला व आपल्या पित्याला म्हणाली—"सकाळीं गाडीवान अर्ध्या वाटेंतच गाडी सोडून निघून गेला."

"मग काय जांवई स्वतःच गाडी हाकून गेले श्रीपुरला आणि पूजा करून आले." जमीनदारानें चकित होऊन विचारलें.

तेथें फार मोठा उत्सव होत आहे यंदा. उद्यां आम्हीं दोघें पुन्हां जाणार आहोंत.

इतक्यांत गाडीवान तेथें आला व घाबऱ्या घाबऱ्या कांहीं सांगणार तोंच लक्ष्मीनें गर्जना केली. म्हणाली—"कायरे, ह्यांना गाडींत एकटाच सोडून कोठें निघून गेला होतास ? किती वाट पाहिली तुझी ह्यांनीं. शेवटीं स्वतःच गाडी घेऊन जावें लागलें ह्यांना. अशींच कामें असतात झालं तुमचीं."

"असं कां म्हणतां ताईसाहेब. मी उलट पावलींच परत आलों. पण तेवढ्यांतच गाडी कुठें गेली न कळे. तेथें गाडी दिसली नाहीं म्हणून मी चालतच श्रीपुरपर्यंत गेलों. पण तेथें सुद्धां मालक दिसले नाहींत आणि गाडीपण नव्हती." गाडीवान म्हणाला.

"पाठोपाठच गेला असतास तर कां नसती दिसली गाडी. अगोदर उशीर केलास आणि त्यांतून चालत गेलास. मग कशी गांठ पडणार ? तूं चालत जाई-पर्यंत हे आले सुद्धां पूजा करून." लक्ष्मी म्हणाली—"आज झालें तें झालें. उद्यां आम्ही दोघेंहि श्रीपूरला जाणार आहोंत. म्हणून सकाळींच गाडी जोडून आण."

एवढ्यावरच मिटलें असें मानून गाडीवान मुकाट्यानें निघून गेला.

दुसरे दिवशीं भीमराव व महालक्ष्मी दोघें श्रीपूरला गेलीं. देवीची पूजा केली आणि आनंदानें घरीं परतलीं.

[ पुढील महीन्यांत नवा पराक्रम ]



# मत भेद

दोघे भाऊ धनुष्यबाण घेऊन गांवाच्या बाहेर एका खुल्या जागीं हिंडत असतां त्यांना एक पाणकोंबडा दिसला. दोघांनींहि बाण धनुष्यावर चढवले आणि कोंबड्यावर नेम धरला. तेव्हां मोठा भाऊ म्हणाला—"आपण उकडून खाऊं या का रे."

"छे बोवा ! उकडून नको भाजून खाऊं या." धाकट्या भावानें आपलें मत सांगितलें. ह्याच गोष्टीवरून दोघांचा वादविवाद झाला. ते आपलें भांडण घेऊन आजोबांच्याकडे गेले. ते म्हणाले—"अरे अगोदर उकडावी आणि मग भाजावी म्हणजे फार छान लागते."

आजोबांचा सल्ला घेऊन दोघे पुन्हां गांवाबाहेर आले. पण तोंपर्यंत पाणकोंबडी पळून गेली होती.



## श्रम

[स्वामी रामतीर्थ कथा]

एकदां अकबर बिरबलाला म्हणाला— "कायरे जगांत आंधळे जास्त आहेत कीं डोळस?"

"असा अंदाज कशाला प्रत्यक्षच दाखवितों." असें म्हणत बिरबलानें एक कापड घेतलें आणि तें डोक्याला गुंडाळलें. नंतर दहावीस सैनिकांना रांगेंत उभे राहायला सांगितलें. जवळच असलेल्या माणसाला विचारलें—"माझ्या डोक्यावर काय आहे?"

तो म्हणाला—"मुंडासें." बिरबलानें मुंडासें सोडून खांद्यावर टाकलें व आणखी एकाजवळ जाऊन त्याला विचारलें.

तो म्हणाला—"उपरणें."

नंतर बिरबलानें तेंच कापड आपल्या कमरेभोंवतीं गुंडाळून तिसऱ्या माणसाला विचारलें. तो म्हणाला—"धोतर."

"सर्व आंधळे. अगदीं आंधळे. हें कापड आहे. पण त्यालाच एकानें मुंडासें म्हटलें, एकानें उपरणें आणि एकानें धोतर." बिरबल अकबराला म्हणाला. बिरबलाचें चातुर्य पूर्ण उत्तर ऐकून अकबर खूश झाला.





# गंधर्व राजकन्या

[५]

अब्दुल खुद्दूसनें दिलेल्या निळ्या घोड्यावर बसून हसननें लगाम सोडल्याबरोबर घोडा वायुवेगानें उडूं लागला. लागोपाठ दहा दिवस उडत राहिल्यावर घोडा एका काळ्या पर्वताच्या रांगेंत उतरला.

त्या निळ्या घोड्याचें खेंकाळणें ऐकून चारी बाजूंनीं शेंकडों निळे घोडे धांवत आले व हसन बसून आला होता त्या निळ्या घोड्याच्या चोहोंबाजूंनीं घोळका करून उभे राहिले. निळा घोडा त्यांच्यामधून चालत एका गुहेसमोर जाऊन उभा राहिला. हसन घोड्यावरून उतरल्यावर घोडा आंत शिरला.

गुहेच्या बाहेर हसन सुमारें एक तासभर वाट पहात उभा राहिला. एक वृद्ध गुहेंतून बाहेर आला. त्याचा रंग कोळशाहून काळा होता व त्यानें अंगांत काळे कपडे घातले होते. पण त्याची दाढी मात्र स्वच्छ पांढरी होती व कमरेच्या खालपर्यंत लोंबत होती. तोच सुलेमानचा मुलगा अली. खुद्दूसनें सांगितल्याप्रमाणें हसननें अभिवादन केलें आणि अब्दुल खुद्दूसनें दिलेलें पत्र दिलें. अली तें पत्र घेऊन गुहेंत गेला.

बराच वेळ झाला तरी तो म्हातारा बाहेर आला नाहीं. हसन निराश होऊन काय करावें या विचारांत असतां सुदैवानें तो म्हातारा बाहेर आला आणि त्यानें हसनला आंत येण्यास इंगित केलें. तो हसनला आपल्या बरोबर आंत घेऊन गेला. तें एक मोठें दालन होतें. आंत जमिनीवर










गालिचे अंथरलेले होते. एका कोपऱ्यांत चार विद्वान ग्रंथ-वाचनांत गर्क होते. त्यांच्या शेजारीं पुस्तकांचे ढीग पडले होते. दालनाच्या मध्यभागीं गालिच्यावर कांहीं शिष्य बसले होते. हसन बरोबर अलीनें आंत पाऊल टाकल्याबरोबर सर्व उभे राहाले. अली गादीवर बसल्यानंतर सर्व आपापल्या जागीं बसले. हसननें आपली करुणकथा वर्णन करून सांगितली. ती ऐकून त्याला शक्य होईल तितकी मदत करावी असेंच सर्वांचें मत पडलें. तें ऐकून म्हातारा अली म्हणाला—"तें सर्व ठीक आहे. परंतु "वाक वाक" द्वीपांत जाणें म्हणजे थट्टा नव्हे. वाक वाक द्वीपाच्या रक्षणार्थ शूर तरुणींचें एक मोठें सैन्य आहे. त्यांची नजर चुकवून बेटांत प्रवेश मिळणें अशक्य आहे. मग हा बेटांत जाऊन आपल्या बायकोला कसा ओळखणार आणि तिला व आपल्या मुलांना घेऊन कसा काय परत येणार?"

तें ऐकून हसननें म्हाताऱ्याचे पाय धरले आणि म्हणाला—"पुत्रदान आणि पत्नी-दान मागायला मी तुमच्याकडे आलों आहे. होकार मिळेपर्यंत पाय सोडणार नाहीं."

म्हातारा म्हणाला—"वेड्या! जिवावर उदार होऊन स्वतः मृत्यूचें आव्हान करणारा तुझ्यासारखा वेडा मी पाहिला नाहीं. तरी मी माझ्याकडून होईल तेवढी मदत करायला तयार आहें." असें सांगून म्हाताऱ्यानें आपल्या दाढींतले चार केस उपटून हसनला दिले आणि म्हणाला—"संकटांतून स्वतःची सुटका करून घेणें हें सर्वांत अधिक महत्वाचें आहे. तुझ्यावर कधीं प्राणांतिक संकट ओढवलें तर तूं यांतील एक केस पेटव. मी तुझ्या मदतीला धांवून येईन." नंतर त्यानें वर पाहून एकदां टाळी वाजवली. लगेच एक भूत



समोर उभें राहालें. तो म्हातारा हसनला म्हणाला—"याच्या खांद्यावर बसून हा नेईल तिकडे जा. हा तुला कर्पूर द्वीपांत सोडून देईल. पुढली वाट तूं स्वतःच शोधून काढ. कर्पूर द्वीपाच्या पुढें तुला वाक वाक द्वीपाचा किनारा दिसेल. पुढें अल्ला मालक आहे."

हसननें त्या उदार म्हाताऱ्याला व त्याच्या शिष्यांना आदर पूर्वक नमस्कार केला व त्यांचा निरोप घेऊन भुताच्या खांद्यावर बसून कर्पूर द्वीपाला निघाला. भुतानें त्याला कर्पूर द्वीपावर पोंचविलें आणि तें निघून गेलें.

चकचकणाऱ्या त्या कर्पूर द्वीपांत हसन चालूं लागला. कापुराचा वास सुटला होता. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला दूर तंबूसारखें कांहीं तरी दिसलें. गवत उगवलेलें होतें. तो गवतांतून वाट काढीत जात असतां ठेंच लागून खालीं पडला.

हसनला ठेंच लागली तें एका महाकाय राक्षसाचें बोट होतें. त्याला तंबू वाटला तो त्या राक्षसाचा कान होता. तो राक्षस गवतांत घोरत पडला होता. पण हसनच्या पायाचा धक्का लागतांच तो ताडकन उभा



राहाला. हसनला त्यानें कबूतराला किंवा पोपटाला पकडावें असें धरलें.

हसन मोठमोठ्यानें ओरडूं लागला—"मेलों! मेलों! वांचवा!"

त्या राक्षसाला हसनचें ओरडणें कोकिळेच्या गोड आवाजासारखें वाटलें. हा एक विचित्र पक्षी आपल्या राजाला नजर करावा असा विचार करून तो हसनला घेऊन राजाकडे गेला. राजानें आपल्या मुलीला पाळायला म्हणून तो पक्षी दिला. तिनें त्याला एका पिंजऱ्यांत ठेवून दिलें आणि त्याला पक्ष्या-सारखें खायला प्यायला घालूं लागली.









हसनला या संकटांतून कशी सुटका मिळणार हें कळेना. त्याच वेळीं त्याला म्हाताऱ्यानें दिलेल्या केसांची आठवण झाली. राजकुमारी त्याला रोज बाहेर वऱ्हांड्यांत नेऊन ठेवी व त्याला बोलायला शिकविण्याचा प्रयत्न करी. तो पिंजऱ्याचें दार उघडें पाहून बाहेर निसटला व म्हाताऱ्यानें दिलेला केस त्यानें पेटवला.

लगेच हजर होऊन म्हाताऱ्यानें विचारलें—"कां आठवण काढलीस?"

"मला या बेटावरून आणखी कोठें-तरी पोंचतें करा. आणखी एक दिवस या बेटावर रहावें लागलें तर मला मरण येईल." हसन म्हणाला.

"अरे, हें तर कांहींच नाहीं. येथें तूं मला मदतीला बोलवूं तरी शकलास. पण वाक वाक द्वीपावर मला प्रवेश देखील नाहीं. म्हातारा म्हणाला.

"मरण नशिबीं लिहिलें असेल तर तें चुकणार आहे का? प्रयत्न करणें माझें काम आहे. बायको व मुलें यांना भेटल्या-शिवाय मला विश्रांति नाहीं. मला आतां-पर्यंत मदत केलीत तशी पुढें पण करा." हसन म्हणाला.

तें ऐकून म्हाताऱ्यानें हसनचा हात आपल्या हातांत घेऊन त्याला एकदां डोळे मिटायला सांगितलें. हसननें डोळे मिटल्या-बरोबर म्हाताऱ्यानें हात सोडला.

हसननें डोळे उघडून पाहिलें तेव्हां तो समुद्रकिनाऱ्यावर उभा होता. म्हातारा अदृश्य झाला होता. तो ज्या वाळूंत उभा होता ती वाळू हिऱ्या माणकांचा चुरा होती. त्याला दुरून समुद्राकाठच्या डोंगरावरून कांहीं पक्षी "वाक वाक" असे, ओरडत येत असलेले दिसले. त्यावरून आपण 'वाक वाक' द्वीपांत येऊन पोहोचलों आहों याची त्याला खात्री पटली. हे पक्षी आप-ल्याला उचलून समुद्रांत तर नाहीं टाकणार? तितक्यांत त्याला एक झोंपडी दिसली. तो आंत शिरून बसला.

पण धरणीकंप झाल्यासारखें त्याला वाटलें. धुळीचे लोट आकाशांत उठतात तसे वाफेचे लोट आकाशांत उठले. ते ढग होते. त्या ढगांतून वीज चमकावी तसे भाले व तलवारी चमकत असलेल्या त्याला दिसल्या. त्यानें ऐकल्याप्रमाणें शूर तरुणींचें सैन्य तें हेंच कीं काय अशी एक शंका त्याच्या मनांत येऊन गेली.







खरोखरच तें तरुणींचें सैन्य होतें व घोड्यावर बसून तो ज्या झोंपडींत बसला होता तिकडे येत होतें. त्यांच्या हातांतून निसटून जाणें हसनला शक्यच नव्हतें. तो निमूटपणें डोळे मिटून उभा राहिला.

सैन्याची प्रमुख नेत्री घोड्यावरून उतरून हसन उभा होता तेथें आली. हसननें डोळे उघडून पाहिलें. पण तिचें तोंड हनुवटीजवळ कपड्याखालीं झांकलेलें असल्या कारणानें त्याला तिच्या मुखाकृतीची पुरी पुरी कल्पना होऊं शकली नाहीं. ती कांहीं बोलणार त्या पूर्वीच हसननें नमस्कार केला आणि म्हणाला— “देवी! तूं कोण आहेस हें मला माहीत नाहीं. माझ्या भाग्यानें माझ्या विरुद्ध पाठ फिरवली व मी या द्वीपावर येऊन पोंचलों. मी आपल्या पत्नीच्या व मुलांच्या शोधार्थ आलों आहें. मला अभयदान दे.”

तिनें आपल्या तोंडावरचें आवरण बाजूला सारलें. तिचें भयंकर रूप पाहून हसन बेशुद्धच पडणार होता. पण घट्ट डोळे मिटून त्यानें स्वतःला कसें बसें सावरून घेतलें. त्या बेटावर एकाहून एक सुंदर तरुणींचें सैन्य आहे हें त्यानें ऐकलें होतें. त्यांची नेत्री म्हणून जी पुढें आली ती भयंकर कुरूप होती व त्यांत म्हातारी होती.

तिला वाटलें की हसननें नम्रपणानें डोळे मिटले असावेत. ती जवळ येऊन त्याला धीर देत म्हणाली—“तुला भिण्याचें कारण नाहीं. मी तुझें रक्षण करीन व माझ्याकडून होईल तितकी मदत पण करीन. पण तुला या बेटावर कोणी पाहिलें तर अनर्थ होईल. म्हणून मी तुला तरुण स्त्री-सैनिकेचा वेष देतें. तो घालून तूं फिरलास म्हणजे तुला भीति राहणार नाहीं.”



तिनें वस्त्रें कवच, शिरस्त्राण वगैरे आणून दिल्यावर हसननें ते कपडे अंगांत घातले. तो खरोखरच स्त्री-सैनिकेसारखा दिसूं लागला. नंतर हसननें आपली सर्व करुण कथा तिला सांगितली. तिनें त्याला त्याच्या बायकोचें व मुलांचीं नांवें विचारलीं. त्याला बायकोचें नांव माहीत नव्हतें. त्यानें ठेवलेलीं मुलांचीं नांवें त्यानें सांगितलीं. पण वाकवाक द्वीपावर त्यांचीं नांवें काय होतीं हें त्याला माहीत नव्हतें.

हसनचा तो निष्कपट व्यवहार पाहून त्या म्हातारीच्या मनांत जणुंकांहीं मातृप्रेम जागृत झालें. ती हसनला म्हणाली—“मी तुला आपल्या मुलांप्रमाणें समजून तुझ्या-साठीं जें कांहीं करणें आवश्यक वाटेल तें सर्व करीन. तुझी बायको या तरुणींच्या सैन्यांतच एखादी असेल. उद्यां त्या सर्व समुद्रस्नानाला येतील त्या वेळीं तूं त्यांच्या पैकीं तुझी बायको कोण हें ओळख!”

हसननें वेष पालटलाच होता. तो म्हातारीच्या बरोबर किनाऱ्यावर उभा राहून स्नानाला येणाऱ्या प्रत्येक स्त्री-सैनिकेला पहात होता. पण त्यांपैकीं एक देखील त्याची बायको नव्हती. हसननें ती गोष्ट म्हातारीला सांगितल्यावर ती चकित होऊन म्हणाली—“तरमग आतां उरल्या गंधर्व राजाच्या सात कन्या! त्यांच्या पैकीं कोणी असेल आणि तें खरें असेल तर मात्र तुला व मला दोघांनाहि निराश व्हावें लागेल. कारण तो पयत्न बायकोला शोधण्याऐवजी स्वतःच्या मृत्यूला हुडकून काढण्या सारखा होणार आहे.”

“मला आपला पुत्र मानून आतां असें निराश करणार का? हीं सात बेटें रक्षण करण्याची जबाबदारी तुझ्यावर असतां तुला अशक्य काय आहे?” हसन म्हणाला.





“या सात बेटांचें रक्षण करणाऱ्या स्त्रियांच्या सैन्यावर माझा अधिकार आहे. त्यांच्यापैकीं तूं पाहिजे तिची निवड कर. मी तिच्याशीं तुझें लग्न करून देईन. पण तें न करतां आणखी कांहीं करावें असा तुझा विचार असेल तर तुझ्या व माझ्या दोघां-च्या जिवाला धोका आहे, एवढें लक्षांत ठेव!” म्हातारी म्हणाली.

हसन हताश होऊन लहान मुलासारखा रडूं लागला. तें पाहून म्हातारीचें हृदय कळवळून आलें व ती म्हणाली—“तुझें म्हणणें तरी काय? तुला या बेटावर मी मोकळेपणें वावरूं दिलें या एका अपराधा बद्दल माझी मान उडवली जाईल. मी तुला पाहिजे तेवढें धन देतें. तुला पाहिजे त्या तरुणीशीं तुझें लग्न करून देतें. तूं स्वदेशीं जाऊन सुखानें रहा.”

“तूं मला आपला पुत्र मानून स्वतःकडे मातृत्व घेतलें आहेस. तेव्हां थोडें साहस करून मी बोलतों आहें याबद्दल क्षमा कर. मी तळहातावर स्वतःचा जीव घेऊन सर्व संकटांना तोंड देण्याचें ठरवून येथवर आलों. आतांपर्यंत माझ्या नशिबानें मला हात दिला. पुढें देखील मला निश्चित-पणें यश मिळेल असा माझा विश्वास आहे.”

म्हातारी जास्त वाद वाढण्यांत अर्थ नाहीं असें ठरवून म्हणाली—“गंधर्व राजा-च्या सात राजकन्यांचीं हीं सात बेटें आहेत एकेक बेटावर एकेक राहाते. सर्वांत मोठी ज्या बेटावर राहाते त्याच बेटावर आपण आतां उभे आहों. तिचें नांव नूरुलऊदा असें आहे. तिच्याजवळ मी सर्व कांहीं प्रथम निवेदन करून तिची मर्जी संपादन करून येतें.” असें सांगून म्हातारी निघून गेली.

नूरुल्लऊदानें म्हातारीला पाहतांच विचारलें—"आजी! कांहीं आनंदाची बातमी आणली आहेत का?"

म्हातारी म्हणाली—"युवराणी, बेटा! आज आपल्या बेटावर एक विचित्र गोष्ट घडली आहे. ऐकून तुला इतकें हंसूं येईल कीं काय सांगूं? आपल्या बेटावर एक तरुण आला आहे. तो रडत होता. मी त्याला विचारलें तेव्हां तो म्हणाला त्याच्या दुर्दैवानें त्याला अपरिचित बेटावर आणून सोडलें आहे. म्हणे, त्याची बायको व दोन मुलें वाकवाक द्वीपांत कोठें तरी आहेत. त्यानें आपल्या बायकोचें जें वर्णन केलें तें ऐकून मला आश्चर्य वाटलें. तें तुझें वर्णन आहे कीं तुझ्या बहिणींपैकीं एकीचें हें नाहीं मला माहीत. तो आहे मनुष्य, पण त्याचें सौंदर्य देव व गंधर्व दोघांना लजाविणारें आहे यांत शंका नाहीं."

तें ऐकून नूरुल्लऊदाला भयंकर राग आला. म्हणाली—"आपल्या या द्वीपावर माणसाला पाऊल ठेवायला तूं परवानगी कशी दिलीस? तुझी चामडी लोळवितें पहा. पण त्यापूर्वी मी त्या तरुणाला एकदां पाहणार आहें. जा घेऊन ये त्याला."

म्हातारी येऊन हसनला म्हणाली—"चल बाबा! मृत्यूचें बोलावणें तुला व मला दोघांना आलें आहे! युवराणी तुला एकदां पाहणार आहे!"

हसन चकित होऊन म्हातारीबरोबर निघाला. दोघे युवराणीच्या महालांत पोंचले त्यावेळीं युवराणीनें तोंडावर हलकेंसें आवरण घेतलें होतें. हसननें तिला नमस्कार केला व तिच्या प्रशंसेखातर दोन एक कविता म्हणून दाखविल्या. युवराणीनें म्हातारीकडे सार्थक वळून पाहिलें. तें इंगित समजून म्हातारी हसनला म्हणाली—"तुझ्या बायकोचें व मुलांचें नांव काय? युवराणी विचारीत आहेत!"

हसन युवराणीकडे वळून म्हणाला—"महाराणी! मी एक दुर्दैवी तरुण आहें. माझें नांव हसन. मी इराक देशांतील बसरा शहराचा रहिवाशी आहें. बायकोचें नांव मला माहीत नाहीं. मुलांचीं नांवें नासिर व मन्सूर अशीं आम्ही ठेवली होतीं."

बायको कां सोडून निघून गेली हें विचारतां तो म्हणाला—"ती स्वच्छेनें गेली नाहीं. खलीफांच्या महालांत पक्ष्यांचा पोशाख घालून ती उडून गेली. पण जातांना










माझ्या आईला ती एवढें सांगून गेली कीं मी तिला भेटावयाचें झाल्यास वाक वाक बेटावर भेट होईल. या वरून मी येऊन भेटावें अशी तिची इच्छा होती."

तें ऐकून नूरुलऊदा म्हणाली—"तिनें मी कोठें जात आहे हें सांगितलें यावरून तिचें तुझ्यावर प्रेम नव्हतें असें वाटत नाहीं. पण प्रेम होतें तर ती तुला सोडून तरी कशी काय गेली?"

हसन म्हणाला—"तें आतां मी काय सांगूं? तिचें माझ्यावर किती प्रेम होतें याचीं प्रमाणें अनेक आहेत. पण खरी गोष्ट अशी कीं पक्ष्यांचा तो पोशाख घालून उडण्याचा मोह ती आवरूं शकली नाहीं. तें कांहीं असो, तुमच्या मदतीशिवाय माझी व माझ्या बायकोची भेट होणें शक्य नाहीं."

म्हातारी थोडें साहस करून म्हणाली—"युवराणी, मी तुला अंगाखांद्यावर खेळवून लहानाचें मोठें केलें आहे. मी सांगतें तेवढें ऐक! या गरीब तरुणाला क्षमा कर. हा आपला एक पाहुणा आहे. आणखी एक गोष्ट. ह्यानें थोड्या वेळापूर्वी जी कविता म्हणून दाखविली त्यावरून तो आशुकवि पण दिसतो. तूं तोंडावरून आवरण बाजूला सारलेंस तर हा उत्तम कविता म्हणून दाखवील."

नूरुलऊदाच्या मनांत उत्सुकता उत्पन्न झाली. तिनें तोंडावरील आवरण बाजूला सारलें. हसन तिचें तें अप्रतिम सौंदर्य पाहून कीं आणखी कांहीं कारण झालें म्हणून जोरानें ओरडला आणि जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला.

[पुढल्या अंकांत संपूर्ण]





# चहाडखोर नारळ

शेजारीं एक खट्याळ मुलगा रहात असे. तो शेजारच्या मुलांच्या कागाळ्या त्यांच्या आईवडिलांना सांगून मुलांना मार बसला कीं खदखदां हंसे. ही गोष्ट आजोबांना नातवंडांनीं येऊन सांगितली. ती ऐकून आजोबांना राग आला. म्हणाले—

"मुलांनीं किती दंगामस्ती केली तरी मी एक चकार शब्द बोलणार नाहीं. पण त्यांनीं चहाडी केलेली मला नाहीं खपणार."

"आजोबा तुम्हांला सुद्धां राग येतो का हो?" मुलांनीं थट्टेंत विचारलें.

"राग कां नाहीं येणार? मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात? ही चहाडखोरपणाची संवय एकदां लागली कीं मनुष्य मेला तरी ती संवय जात नाहीं. मी मागें तुम्हांला चहाडखोर नारळाची गोष्ट सांगितली होती. ती आठवते ना?" आजोबांनीं विचारलें.

"नारळाची गोष्ट! कधीं नाहीं सांगितलीत आजोबा! चहाडखोर आणि त्याचा नारळाशीं काय संबंध?" मुलांनीं "गोष्ट, गोष्ट!" म्हणून एकच गलका केला.

आजोबांचा राग थोडा उतरल्यासारखें वाटलें. दोन्ही नाकपुड्यांत तपकीर कोंबीत ते आरामखुर्चीवर बसले व म्हणाले—"ऐका हं!" आणि गोष्ट सांगायला सुरवात केली.

फार प्राचीन काळीं एक होडकें येऊन ब्रह्मदेशाच्या किनाऱ्याला लागलें. त्या होडक्यांत दोन पुरुष व एक बाई होती. त्यांना धरून शिपायांनीं आपल्या राजासमोर हजर केलें. राजानें त्यांना विचारलें—

सौ. रमाबाई सोमण



“कोण तुम्ही? आणि माझ्या देशांत कां आलांत?”

ते म्हणाले—“आम्ही गुन्हा केला म्हणून आमच्या राजानें आम्हांला शिक्षा म्हणून एका होडक्यांत बसवून समुद्रांत सोडून दिलें.”

काय गुन्हा केलात म्हणून विचारतां त्यांतला एकजण म्हणाला—“मी चोरी केली होती.” स्त्री म्हणाली—“मी मंत्रतंत्र करून लोकांना त्रास देत असें.” तिसरा म्हणाला—“मी चहाडी सांगून लोकांत भांडणें लावीत असें.”

तें ऐकून ब्रह्मदेशाच्या राजानें चोरी करणाऱ्याला एक घर रहायला दिलें व एक हजार रुपये कामधंदा करायला देत म्हणाला—“तूं गरिबीमुळें चोरी केली होतीस. तुझी गरीबी दूर करण्यासाठीं मी तुला एक घर व एक हजार रुपये देत आहें. पुन्हां चोरी करूं नकोस.”

राजानें मंत्रतंत्र करणाऱ्या त्या स्त्रीला पण एक घर व हजार रुपये दिले व म्हणाला—“तूं देखील गरीबीमुळें हा धंदा करीत आलीस. पण आतां मी तुझी गरीबी दूर केली आहे. उगाच कोणाला त्रास देऊं नकोस.”

नंतर राजानें चहाडखोराला बोलावून शिक्षा सांगितली कीं याचा शिरच्छेद करावा. म्हणाला—“चहाडखोरी ही त्याला जन्मापासून लागलेली वाईट संवय आहे. श्रीमंत असो कीं गरीब ही संवय मोडणें शक्य नाहीं. म्हणून मुळांतच याचा कांटा दूर केला पाहिजे.” शिपायांनीं त्याला वध्यस्थानीं घेऊन जाऊन त्याचा शिरच्छेद केला.

परंतु दुसऱ्या दिवशीं राज्याचा एक अधिकारी त्या वाटेनें जात असतां त्या चहाडखोराचें डोकें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तें डोकें जमिनीवर गणंगळत जात होतें. तें अधिकाऱ्याला म्हणालें—“आपल्या राजाला एकदां बोलावून घेऊन ये. त्यानें येऊन साष्टांग नमस्कार करून माझी माफी मागितली नाहीं तर मी येऊन त्याचें डोकें उडवीन.”

अधिकारी भिऊन घाबरून राजाकडे धांवत गेला व त्यानें जें पाहिलें व ऐकलें, राजाला जाऊन सांगितलें. पण राजाला तें सर्व खोटें वाटलें. याशिवाय त्या अधिकाऱ्याचा त्याला राग पण आला.

अधिकारी म्हणाला—“महाराज, माझ्या बोलण्यावर आपला विश्वास बसत नसेल तर आपण पाहिजे त्याला पाठवून शहानिशा करून घ्यावी.”

राजानें त्याप्रमाणें आपल्या त्या अधिकाऱ्याबरोबर आणखी एका अधिकाऱ्याला पाठविलें. दोघे अधिकारी आले तेव्हां तें डोकें म्हणालें—“तुझें कारस्थान मला कळलें आहे. राजा स्वतः आला तर मी तें त्याला सांगेन.” ती गोष्ट दुसऱ्या अधिकाऱ्यानें जाऊन राजाला सांगितली. राजाला इतका राग आला कीं राजानें त्या अधिकाऱ्याच्या अपराधाबद्दल त्याचा शिरच्छेद करण्यास हुकूम सोडला. त्या निरपराध अधिकाऱ्याचा



चहाडखोराच्या खोटें बोलण्यामुळें विनाकरण शिरच्छेद झाला.

चहाडखोर मेला तरी त्याची संवय मेली नव्हती. पुढें कांहीं दिवसांनीं वस्तुस्थिति कळल्यावर राजाला फार वाईट वाटलें. म्हणून राजानें त्या चहाडखोराचें डोकें पुरून टाकायला सांगितलें. म्हणाला—"मेला तरी त्याची संवय मेली नाहीं ! पुढें आणखी काय अनर्थ घडेल, कोणास ठाऊक ?"

चहाडखोराचें डोकें त्याप्रमाणें पुरून टाकण्यांत आलें. दुसऱ्या दिवशीं तेथें एक विचित्र झाड उगवलें. तें नारळाचें झाड होतें. तोपर्यंत ब्रह्मदेशांत नारळाचें झाड नव्हतें. म्हणून तें झाड कसें असतें हें त्या देशांतील लोकांना माहीत नव्हतें. म्हणून त्यांनीं त्या झाडाचें नांव "गोवबिन" असें ठेवलें. "गोवबिन" याचा अर्थ चहाडखोर झाड असा होतो. हळूहळू बदलत जाऊन पुढें त्याला गोनबिन म्हणूं लागले.

येथवर गोष्ट सांगून आजोबा म्हणाले—नारळ फोडतांना आपण फोडण्यापूर्वी त्याची शेंडी कां काढीत नाहीं तें माहीत आहे का ? कारण शेंडीच्या आंत दोन डोळे व एक तोंड असतें. शेंडी काढून फेंकून दिली तर नारळ आपसांत भांडण लावील. म्हणून फोडण्यापूर्वी शेंडी काढूं नये !"

लगेच छोटू ओरडला—"खोटें, खोटें ! शेंडी धरून नारळ फोडायला सोपें जातें. म्हणून शेंडी नाहीं काढीत."

"मोठा आला आहे शहाणा, सांगायला !" असें म्हणत आजोबा मिस्किल पणानें हंसूं लागले. "चहाडखोर नारळ !" "चहाडखोर नारळ !" असें ओरडत मुलें तेथून निघून गेली.





# किष्किंधाकांड

"सुग्रीवा, तुला माझा राग येणें अगदीं साहजिक आहे. पण तुम्हीं दोघे अगदीं सारखे दिसत होतां. तुमच्या हालचाली इतक्या सारख्या होत्या कीं त्यांतील तूं कोण व वाली कोण हें मला कळलेंच नाहीं. तूं जर कांहीं खूण ठेवून द्वंद्व युद्धाला गेलास तर मी ओळखूं शकेन. मग वालीला बाण मारणें सोपें जाईल. तूं पुन्हां जा. मी तुला वचन दिल्याप्रमाणें खात्रीनें त्याचा वध करीन." रामानें सुग्रीवाची समजूत घातली.

रामाचा संकेत होतांच लक्ष्मण उठला व 'गजपुष्पी' नांवाच्या वेलीचीं फुलें घेऊन आला. त्यांची एक सुंदर माळ करून ती त्यानें सुग्रीवाच्या गळ्यांत घातली आणि पुन्हां ते सर्व जण किष्किंधानगरीकडे निघाले.

या वेळीं त्यांच्या बरोबर नल व नील सुद्धां होते. मार्ग चालत असतां श्रीरामाला एके ठिकाणीं दाट झाडी दिसली. सुग्रीव म्हणाला—"सप्त जन म्हणून प्रसिद्ध असलेल्या सात ऋषींनीं घोर तपश्चर्या केली, त्यांचा हा आश्रम. त्यांनीं पाण्यांत शीर्षासन करून आणि वायु सेवन करून योगसाधना केली आणि शेवटीं सशरीर स्वर्गास गेले. अहो ! या आश्रमांत माणूस तर राहूं द्याच पशुपक्षी



सुद्धां जाऊं शकत नाहींत. कोणी गेलाच तर तो परत येत नाहीं.

रामलक्ष्मणांनीं मनांमध्यें सप्तजनांचें स्मरण करून वंदन केलें व आपला मार्ग चालूं लागले. पुढें ती सर्व मंडळी किष्किंधेला येऊन पोहोंचली. "वालीला मारण्याचें तूं कबूल केलें होतेंस. तेव्हां आपला शब्द तुला खरा केला पाहिजे." सुग्रीवानें रामाला बजाविलें.

"खुशाल तूं त्याला कुस्तीला आव्हान कर. मी तुझ्या पाठीशीं उभा आहें." रामानें सुग्रीवाला प्रोत्साहन देत म्हटलें.

सुग्रीवानें गर्जना करून वालीला युद्धास बोलाविलें.

सुग्रीवाचें आव्हान वालीनें स्वीकारलें आणि त्याचा पुन्हां एकदां चांगलाच पराभव करून कायमचें प्रायश्चित द्यावें असा विचार करून तो लगबगीनें निघाला. परंतु त्याची बायको तारा पुढें आली व त्याला अडवून म्हणाली—"अशा अपरात्रीं कशाला जातां. उद्यां गेलांत तर नाहीं का चालणार? ह्या एका रात्रींतल्या रात्रींत कांहीं कोणाच्या सामर्थ्यांत फरक पडणार नाहीं. मला वाटतें, परवांच एवढा मार खाऊन गेला आणि पुन्हां आज आला आहे तो कांहीं स्वतःच्या एकट्याच्या बळावर नाहीं. कोणाची तरी शक्ति त्याच्या पाठीशीं आहे. ते अयोध्येचे राजकुमार राम लक्ष्मण तर नसतील? त्यांच्याशीं त्यानें मैत्री केलेली आहे. ह्या पूर्वींच त्यांनीं खर, दूषण, विराध, कबंध वगैरेंना नाहीं का मारलें. फार पराक्रमी आहेत दोघे जण. सुग्रीव उगीचच त्यांच्याशीं दोस्ती करणार नाहीं. अशा वेळीं त्यांच्याशीं मित्रता वाढविणेंच बरें. म्हणून मी म्हणतें सुग्रीवाला प्रेमानें बोलावून आणून त्याला युवराज करा. तो आपल्या नजरेसमोर किष्किंधेमध्येंच राहील. मग त्याचे मित्र ते आपले देखील मित्र होतील. रामासारख्याची दोस्ती असणें खरोखर फार फायद्याचें आहे."

"तें सर्व खरें आहे तारा! पण सुग्रीवाचा हा शिरजोरपणा मी कसा सहन करूं? आज पर्यंत मी कोणा पुढें मान वांकवली नाहीं ती सुग्रीवाच्या पुढें वांकवू? तें शक्य नाहीं. तुला रामाची भीति वाटतेसें दिसतें. पण जर मी त्याची कांहीं खोडी काढली नाहीं तर तो उगाच माझ्या विरुद्ध कां शस्त्र धारण करील? आणि सुग्रीव किती झालें तरी, माझा भाऊच आहे. तूं कांहीं काळजी करूं नकोस. आपलें कार्य संपवून मी लवकरच परत येईन." अशा तऱ्हेनें आपल्या स्त्रियांची समजूत घालून वालीनें त्यांना अंतःपुरांत परतवून लावलें.

त्यांची पाठ फिरतांच वालीचा दबलेला क्रोध बाहेर पडला. त्यानें उग्र रूप धारण केलें. दंड थोपटले आणि मोठी गर्जना करून सुग्रीवाकडे पाहिलें. तो देखील तयारच होता. "तुला आतां बरचीच वाट दाखवितों." म्हणत वाली एकदम सुग्रिवावर तुटून पडला. दोघांची फार भयंकर कुस्ती झाली. दोघे दमलेलेच होते. हळूं हळूं



कुस्ती सोडून ते झाडें उपटून एकमेकांवर फेंकून मारामारी करूं लागले.

सुग्रीव फार थकल्याचें पाहून रामानें आपल्या भात्यांतून नागबाण बाहेर काढला आणि धनुष्यावर चढवून, वालीवर नेम धरून सटकन सोडला. रामाचा बाण तो, सुटतांच वालीच्या छातींत जाऊन रुतला व वाली धरणीवर कोसळला. त्याला खालीं पडलेला पाहून राम-लक्ष्मण त्याच्या जवळ गेले.

त्यांना पाहून वाली क्षीण आवाजांत म्हणाला—"तुम्ही महाराज दशरथाचे पुत्र. धर्मानें, न्यायानें वागणारे अशी तुमची

ख्याति. असें असून मी दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां माझ्यावर बाण सोडणें तुम्हांला शोभतें का? तारानें ही शंका मनांत आणून त्यावेळींच मला 'जाऊं नका' म्हणून अडविलें होतें. पण तुझ्या वंशाची कीर्ति ऐकून मी त्यावर विश्वास केला. मी कांहीं तुझ्या राज्यांत आलों नव्हतों, किंवा मी तुझी कांहीं खोडी काढली नव्हती. तरी सुद्धां तूं मला मारलेंस म्हणजे तुला धर्माचें ज्ञान नाहीं असेंच मी म्हणेन. मला शिकार समजून जरी तूं मारलें असतेंस तरी माझें मांस खाण्यालायक नाहीं. हाडें चघळण्याच्या लायकीचीं नाहींत किंवा चामडी ही वापरण्याजोगी नाहीं. तूं खरोखर पराक्रमी असतास तर रावणाला आव्हान देऊन त्याच्याशीं युद्ध केलें असतेंस. मला जरी बोलावलें असतेंस तरी मी तुझ्याशीं लढलों असतों. इतकेंच नव्हे तर आत्तां पर्यंत तुला यमाकडे पाठवून दिलें असतें. जर तुझ्या सीतेच्या शोधाचीच गोष्ट होती तर मला सांगावयाचें होतेंस. हां हां म्हणतां शोधूनच काय पण तुझ्यासमोर आणून उभी केली असती. त्यासाठीं एवढें कपट कशाला? आम्ही तर



नांवाचीं वानरेंच पण आम्ही सुद्धां असले कपटी विचार मनांत येऊं येत नाहीं."

"न्यायाची, धर्माची व कर्तव्य कर्माची तुला माहिती नाहीं असें दिसतें. न्यायाची व दंडाची जबाबदारी नेहमीं पृथ्वीपतीवर असते. सध्यां समग्र भूमंडळाचा अधिपति ईक्ष्वाकु वंशज नरश्रेष्ठ दशरथ पुत्र भरत असून आम्ही सर्व क्षत्रिय त्याच्या आज्ञेनें अधर्माचें दमन करीत असतों. तूं वानर, तुला ह्या गोष्टी काय समजणार? तूं आपल्या भावाच्या बायकोला पळवून घेऊन आलास. हें फार मोठें पाप आहे व त्याचें












प्रायःश्चित्त म्हणजे मरण. आणि तुझ्या ह्या पापाचें प्रायःश्चित्त जर तुला मी दिलें नाहीं तर मी कर्तव्यच्युत होईन. ह्या करितां तुला मारण्यांत मी कोणत्याहि तऱ्हेचा अन्याय केलेला नाहीं. बरें, सुग्रीवाशीं जी मी मैत्री केली आहे ती परस्परावलंबी आहे. म्हणजे त्यानें मला माझी बायको शोधण्यास मदत करावी आणि मी त्याला राज्य मिळवून देण्यास मदत करावी. त्यांसाठीं सर्व वान-रांच्या समोर मी तुझ्या वधाची प्रतिज्ञा केली आहे. मग तुला मारण्यांत अधर्म तो काय झाला. तूं वानर व वन्य पशु म्हणून तुझी शिकार कशीहि आणि केव्हांहि करण्यास मुळीच हरकत नाहीं. शिकार म्हटली म्हणजे शिकार बेसावध असतांना सुद्धां बाण सोडला तरी चालतो. एकंदर [illegible] कोणत्याहि कारणान तुला मारण्या[illegible] अन्याय केलेला नाहीं. [illegible] अशा प्रकारें रामानें आपली बाजू स्पष्ट करून वालीला सांगितली.

"मी तर आतां मरणारच आहें. तुझ्या हातून मला मरण येत आहे ही सुद्धां गोष्ट बरी आहे त्यासाठीं मला आतां खेद करावयाचा नाहीं. आतां माझें एवढेंच सांगणें आहे कीं माझा मुलगा अंगद आणि पत्नी तारा ह्यांना सुग्रीवाकडून त्रास होणार नाहीं, त्यांचा अपमान होणार नाहीं, ह्याची काळजी घे." अशा प्रकारें तो रामाला विनंति करीत असता त्याला मूर्छा आली व तो भूमीवर निपचित पडून राहिला.

वालीला रामाचा बाण लागल्याचें सम-जतांच तारा आपला मुलगा अंगद ह्याला बरोबर घेऊन वालीकडे निघाली. वाटें-तच तिला वालीच्या वधाचें वृत्त कळलें. वालीचे जे अनुयायी ही बातमी घेऊन आले होते, ते ताराला म्हणाले—"रामानें वालीला मारलेंच आहे आतां तो अंगदाकडे वळेल. जर त्याचें हित व्हावें असें तुला वाटत असेल तर उलट पावलीं परत जा आणि त्याला राज्याभिषेक करण्याची व्यवस्था कर. आणि हें सर्व तुला नको असेल तर तूं किष्किंधा सोडून दूर पळून जा."

"अरे! पतीच जर चालला आहे तर बाकीच्या सर्व वस्तूंची गोष्टच कशाला? माझें हें शरीर, हा पुत्र हें सर्व काय माझ्या-बरोबर येणार आहे? मी आपल्या पतीच्या चरणापाशीं जात आहें." असें सांगून ती रडत रडत वालीजवळ गेली.

वालीला निश्चेष्ट पडलेला पाहून टाहो फोडून ती त्याच्या अंगावर पडली व तिलाहि मूर्छा आली. थोड्याच वेळांत तिची मूर्छा दूर होऊन ती सावध झाली व पुन्हां शोक करूं लागली.



मारुती तिची समजूत घालूं लागला. तेवढ्यांत वालीनें डोळे उघडले. त्या उदास चेहेऱ्यावर निस्तेज डोळे पाहून तेथें असलेल्या सर्वांची मनें द्रवलीं आणि त्यांना हुंदके येऊं लागले. क्षीण स्वरानें वाली समोरच उभ्या असलेल्या सुग्रीवाकडे पाहून म्हणाला—"बंधुप्रेमाचा आनंद लुटत लुटत राज्याचा उपभोग घेणें आपल्या नशिबींच नव्हतें. मी आपल्या पराक्रमाच्या गर्वानें अगदीं आंधळा झालों होतों. मी तुला राज्याबाहेर हाकलून लावलें. तुझ्या बायकोला पळवून नेलें, तुला उगीच त्रास दिला. त्याबद्दल मला फार पश्चात्ताप होत आहे. मला क्षमा कर. मी तर आतां चाललोंच आहें. ह्या पुढें तूं माझ्या लाडक्या अंगदाचा पितृवात्सल्यानें सांभाळ कर. हें सर्व वानरराज्य तुझें आहे. तूं त्याचें चांगलें रक्षण कर. आणि माझे प्राण जाण्यापूर्वीच माझ्या गळ्यांतील ही सुवर्ण-

    

माला काढून घेऊन आपल्या गळ्यांत घाल." नंतर तो अंगदाकडे वळून म्हणाला—" आतां सुग्रीवच तुला माझ्या जागीं आहे. तूं त्याच्या शब्दाला मान देऊन वाग." इतकें बोलून वालीनें डोळे मिटले. सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. ताराच्या दुःखाला तर पारावारच नव्हता.

अशा त्या दुःखद प्रसंगीं प्रसंगावधान राखून नीलनें वालीच्या छातींत रुतलेला रामाचा बाण हळूच दूर केला. अंगदानें पित्याच्या चरणाचें वंदन केलें. सुग्रीव डोळ्यांत आंसवें आणून रामाला म्हणाला— " तूं आपल्या वचनाप्रमाणें वालीला मारिलेंस. वालीनें मला फारच त्रास दिला होता. मला कोठेंहि सुखानें राहूं दिलें नाहीं, म्हणूनच केवळ सुडाच्या भावनेनें मी त्याच्या मृत्यूची इच्छा केली होती. पण आतां मला फार पश्चात्ताप होत आहे. मला आतां राज्य भोगाची इच्छा राहिली नाहीं. तारा, अंगद, सर्व वानर प्रजा दुःखसागरांत बुडलेली असतां मला ह्या राज्यप्राप्तीनें कसा आनंद होईल. हाय दैवा ! मी फार वाईट केलें. वाली बुद्धिमान होता, शहाणा होता, चतुर होता. त्यानें मला छळलें तरी माझा वध करण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं. म्या दुष्टानें त्याला मृत्यू चिंतिला. धिःकार असो माझ्या जिण्याला. मीहि त्याच्या मागोमाग जातो. अंगद आपल्या पित्या-प्रमाणें योग्य राजपुत्र आहे. त्याच्या आणि इतर सर्व वानरांच्या मदतीनें तूं सीतेचा शोध कर." असें म्हणून सुग्रीव देखील शोक करूं लागला.



## काबा

मुसलमान धर्मावलंबियांचें सर्वांत मोठें तीर्थस्थान म्हणजे मक्का. मुसलमान धर्माचे संस्थापक महंमद पैगंबर यांचा जन्म येथेंच झाला.

मक्केच्या मशिदीच्या अंगणांत काबा (चित्रांतील काळा भाग) आहे. महंमदाच्या पूर्वीपासून हें पवित्र स्थान चालू येत आहे. मुसलमानांची फार जुनी अशी ही मशीद आहे. ह्या मशिदींत एक देखील खिडकी नाहीं. जमिनीपासून ७ फूट उंचीवर एकच एक दार आहे. दारावर नेहमीं काळा पडदा असतो. हा जरीचा आहे व त्याला 'किस्वा' असें म्हणतात. दर वर्षी हा 'किस्वा' बदलण्यांत येतो. इजिप्त देशांतून तीर्थदर्शनास जाणाऱ्या यात्रेकरूंबरोबर तेथील सरकार नवीन " किस्वा " दर वर्षी पाठवतें.

काब्याच्या एका कोपऱ्यांत सुप्रसिद्ध 'काळा दगड' भक्तांना सहज स्पर्श करतां येईल अशा तऱ्हेनें बसविलेला आहे. हा दगड गेब्रियल नांवाच्या देवदूतानें अब्राहम याला दिला होता.






अल्लाउद्दिनानें मंगोल जातीच्या स्वाऱ्यांना फक्त थोपविलेंच नाहीं तर त्यांना कायमचा आळा बसावा यासाठीं हिन्दुस्तानाच्या पश्चिमोत्तर सीमा प्रांताच्या संरक्षणाची उत्तम व्यवस्थापण केली. ज्या मार्गानें मंगोल हिन्दुस्तानांत प्रवेश करीत त्या मार्गावरील सर्व किल्ल्यांची त्यानें डागडुजी केली व कित्येक नवीन किल्ले बांधले. गाजी मलिक (ग्यासुद्दीन तुघलक) याला सरहद्दीच्या रक्षणासाठीं मुख्य अधिकारी नेमलें. त्यानें मंगोल जातीला पंचवीस वर्षें एक पाऊल देखील पुढें टाकू दिलें नाहीं.

दिल्लीजवळ ज्या मंगोल लोकांनीं वसाहती केल्या होत्या, त्यांनीं बंड केलें, पण त्यांना त्यांत यश मिळालें नाहीं. सुलतानानें त्यांच्यापैकीं कित्येकांना उच्च अधिकाराच्या पदावरून काढून टाकलें. सुलतानाच्या वधाचा कट केल्याचें कळल्यावर तर २० ते ३० हजार मंगोल मुसलमानांची सुलतानानें कत्तल करविली.

अल्लाउद्दीन गादीवर असतां त्याच्या राज्याचा इतका विस्तार झाला कीं तें एक साम्राज्य झालें. हें साम्राज्य पन्नास वर्षें चालू होतें.

अल्लाउद्दिनाचा भाऊ उलुघखान आणि वजीर नुसरतखान दोघांनीं एका मोठ्या सैन्यानिशी स. १२९७ मध्यें गुजराथवर स्वारी केली. त्यापूर्वी देखील मुसलमानांनीं गुजराथवर स्वाऱ्या करून लूट केली होती. परंतु तेथें राज्य स्थापन करण्याचा विचार त्यांच्या मनांत आला नव्हता. या खेपेस गुजराथ मुसलमानांनीं काबीज केला. तेथला राजा कर्णदेव द्वितीय हा राजकन्या देवला हिला बरोबर घेऊन पळून गेला. राणी कमलादेवी ही अत्यंत रूपवती होती. ती शत्रूच्या हातीं कैद झाली व ती अल्लाउद्दिनाची प्रिय बेगम झाली.

ज्यांनी मुसलमान धर्म स्वीकारला होता असे कांहीं मुसलमान रणथंभोर येथील राजा हमीरदेव याच्याकडे आश्रय मागायला गेले. अल्लाउद्दिनाला याचा अत्यंत राग आला. १२९९ मध्यें त्यानें आपला भाऊ व वजीर दोघांना त्यांचें पारिपत्य करण्यास पाठविलें. पण या युद्धांत अल्लाउद्दिनाच्या सैन्याचा पराभव झाला व त्याचा वजीर युद्धांत मारला गेला. तेव्हां स्वत: सुलतानानें स्वारी केली व १४०१ च्या जुलै महिन्यांत रणथंभोरचें राज्य जिंकलें. पण हा जय एक वर्ष भर किल्ल्याला वेढा दिल्यानंतर मोठ्या कष्टानें मिळाला. हमीरचा मंत्री रणमल यानें विश्वासघात केला व शत्रूला सामील झाला. पण अल्लाउद्दिनानें त्याच्यावर विश्वास न करून त्याला बक्षिस देण्याऐवजीं त्याचा वध करविला. हमीर व त्याच्या आश्रयाला आलेल्या मुसल्मानांचा पण त्यानें वध करविला. अंत:पुरांतील स्त्रिया सती गेल्या.

अल्लाउद्दिनानें मेवाडवर जी स्वारी केली होती ती प्रसिद्धच आहे. असें सांगतात



कीं या स्वारीचें मुख्य कारण चित्तोडची राणी पद्मिनी हिचें सौंदर्य होतें. पद्मिनीचा पति राणा रत्नसिंह अल्लाउद्दिनाच्या हातीं कैद झाला. सुलतानाच्या खास तंबूत त्याला घेऊन जात असतां रजपुतांनीं त्याला सोडविलें व आपल्या राजाचें रक्षण केलें. चित्तोडच्या किल्ल्याच्या फाटकावर गोरा व बादल हे दोघे शूर भाऊ शत्रूला तोंड देण्यासाठीं ससैन्य उभे होते. त्यांनीं मुसलमान सैन्याला थोपवून धरलें. चित्तोडच्या किल्ल्याचें रक्षण होणें अशक्य आहे हें ओळखून राणी पद्मिनी व इतर हजारों

स्त्रियांनीं जोहार करून आपल्या पातिव्रत्याचें रक्षण केलें. अल्लाउद्दिनानें २६ ऑगस्ट १३०३ या रोजीं चितोड किल्ला जिंकला व आपला मुलगा खिज्रखान याला त्याचा अधिपति नेमलें. त्याच्या नांवावरून त्या शहराचें नांव खिज्राबाद असें पडलें.

स. १३०५ च्या शेवटीं माळवा देखील सुल्तानानें काबीज केला. उज्जैन, मंडू, धार व चंदेरी राज्यें देखील हळूहळू मुसलमानांच्या हातीं आलीं. आतां सर्व उत्तर हिंदुस्तानावर १३०५ पर्यंत खिलजी साम्राज्य कायम झालें.

अल्लाउद्दिनाची दृष्टि त्यानंतर दक्षिण हिंदुस्तानाकडे वळली. दक्षिणेंत त्या वेळीं चार मुख्य राज्यें होतीं व चारच मुख्य राजे होते. एक देवगिरीचें राज्य. तेथील रामदेवराव यादव हा एक धर्मभीरू पण पराक्रमी राजा होता. दुसरा प्रसिद्ध राजा म्हणजे काकतीय वंशी प्रतापरुद्र. त्याचें राज्य तेलंगणांत वरंगळ येथें होतें. तिसरा राजा होयसल वीरबल्लाळ तृतीय. त्याची राजधानी हळेबीड येथें होती व त्याचें राज्य हल्लींच्या म्हैसूर प्रदेशांत पसरलें होतें. चवथा राजा मारवर्मा कुलशेखर हा पांड्य राजा होता. मदुरा, रामनाद व तिनेवेली प्रदेश त्याच्या राज्यांत होते. याशिवाय आणखी अनेक लहान मोठीं राज्यें पण होतीं. नेल्लूर येथें तेलुगु चोळ वंशी मनमसिद्धी तृतीय याचें राज्य होतें. ओरिसांत कलिंग गंगराज भामदेव राज्य करीत असे. केरळमध्यें रविवर्मा व मंगलोर येथें वंकिदेव अलुपेतु यांचीं राज्यें होतीं. परंतु यांच्यांत आपसांत परस्पर वैर होतें. अल्लाउद्दिनाच्या साम्राज्यविस्ताराला हेंच मुख्य कारण पुरे होतें.





# विलक्षण औषध

एक राजा होता. त्याला कोणत्याहि प्रकारची काळजी नव्हती. त्याचे मंत्री राज्यकार्यकुशल होते व म्हणून राज्यांत सर्वत्र शांतता नांदत असे. प्रजा सुखी होती व अन्नाचा सुकाळ होता. राजाचें काम काय तें खाणें पिणें व मौज करणें एवढेंच होतें. वर्षानुवर्षें सुखांत व विलासांत घालविल्यावर राजाचें शरीर सुटूं लागलें. पोट मडक्यासारखें मोठें झालें आणि उठून उभें राहणें किंवा दोन पावलें टाकणें देखील राजाला जड वाटूं लागलें.

पण स्वतःची ही स्थिति पाहून राजाला फार वाईट वाटलें. कोणाला तो झटपट काम करतांना किंवा धांवतांना पाही तेव्हां त्याला त्याच्याबद्दल मत्सर वाटे. आपला लठ्ठपणा कसा कमी होणार हें त्याला कळेना.

त्यानें आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. म्हणाला—"राज्याचीं हजार कामें सोडून तुम्ही प्रथम याचा विचार करा. माझा लठ्ठपणा कमी झाला पाहिजे."

मंत्र्यांनीं वैद्यांचा सल्ला घेतला. त्यांनीं औषधें दिलीं. राजा औषधें घेई. पण पथ्यपाण्याची काळजी घेत नसे. म्हणून शरीर सुटायचें कमी होण्याऐवजीं जास्तच वाढूं लागलें. हा असाध्य रोग आहे असा विचार करून वैद्यांनीं तो नाद सोडून दिला. लठ्ठपणा जितका वाढत जाई तितका तो कमी करण्यासाठीं राजाच्या मनांत चिंता वाढूं लागली. शेवटीं राजानें आपल्या मंत्र्यांना सांगितलें कीं जो कोणी माझा लठ्ठपणा कमी करून दाखवील त्याला मी आपलें अर्धें राज्य












द्यायला तयार आहें. राज्यांत अशी घोषणा काढावी.

मंत्र्यांनीं आपसांत सल्ला करून घोषणा काढली. पण थोडी निराळ्या तऱ्हेनें. त्यांनीं असें जाहीर केलें कीं जो कोणी महाराजांचा लठ्ठपणा कमी करण्यासाठीं औषध पाणी करून त्यांत यश मिळवील त्याला अर्धें राज्य दिलें जाईल. पण जर का कोणी त्या प्रयत्नांत अयशस्वी झाला तर त्याला फाशी देण्यांत येईल. ही घोषणा ऐकून एकहि वैद्य किंवा मांत्रिक ती जबाबदारी घ्यायला धजला नाहीं

घोषणा केल्यावर देखील कोणी वैद्य हकीम पुढें येत नाहीं असें पाहून राजा हताश झाला. पण सुदैवानें एक साधु आला आणि म्हणाला—"मी राजाच्या आजाराचें निदान करून औषध द्यायला तयार आहें."

"आपण कोणतें औषध पाणी करणार ?" मंत्र्यांनीं विचारलें.

"मी जें औषध पाणी करणार आहें तें राजाची जन्मकुंडली पाहून त्याप्रमाणें सुमुहूर्तावर करणार आहे. तेव्हांच मी काय औषध पाणी करणार तें सांगेन. तेव्हां प्रथम राजाची जन्मकुंडली मला दाखवावी." साधु म्हणाला.

मंत्र्यांनीं राजाची जन्मकुंडली आणून दिली. साधूनें ती पाहून विचारलें—"पूर्वीं कधीं कोणाला दाखविली नाहीं तसें वाटतें ?"

"कां दाखविली होती!" प्रधान म्हणाला.

"तरी देखील राजाला वीस दिवसांच्या आंत मरण येणार आहे ही गोष्ट कोणी सांगितली नाहीं ?" आश्चर्य करीत साधूनें विचारलें.

मंत्र्यांनीं ज्योतिष्यांना बोलावून पुन्हां जन्मकुंडली दाखविली तेव्हां त्यांत राजाला दीर्घायुष्य असल्याचें त्यांनीं सांगितलें. म्हणून मंत्र्यांनीं रागानें साधूला तुरुंगांत बंद करून ठेवलें.

परंतु राजाच्या मनाला मात्र चटका लागला. लवकर मरण येणार! त्या काळजीनें राजा खंगूं लागला. त्याला अन्न जाईनासें झालें. शेवटीं पंधरा दिवसांनीं तो अर्धा झाला. साधूच्या बोलण्यावर त्याचा विश्वास जास्त जास्त वाढत गेला. मंत्र्यांनीं अनेक प्रकारें राजाची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला कीं साधूच्या बोलण्यावर विश्वास करूं नये. ज्योतिष्यांनीं जन्मकुंडली पाहून साधूचें म्हणणें खोटें असल्याचें सप्रमाण सिद्ध केलें असतां त्याच्या बोलण्या-वर विश्वास करून शेवटीं त्याचें बोलणेंच खरें करण्याचा प्रयत्न आहे कीं काय अशी आम्हांला भीति वाटत आहे.

पण राजानें त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. शेवटीं राजानें अंथरूण धरलें आणि कोणाशीं बोलणें सुद्धां सोडून दिलें.

वीस दिवस झाले. एकविसावा दिवस उजाडला. तरी मरण न आलेलें पाहून



स्वत: राजालाच आश्चर्य वाटलें. तरी एक दिवस त्यानें वाट पाहिली. बाविसाव्या दिवशीं तो स्वत:च अंथरुणावरून उठला आणि मंत्र्यांना बोलावून त्यानें साधूला हजर करण्यास सांगितलें.

शिपाई साधूला घेऊन आला. त्याला पाहतांच राजा रागानें म्हणाला—"तूं स्वत: राजालाच असें फसवूं लागलास तर गरीब प्रजेला किती फसवीत असशील!"

साधु स्मित करून म्हणाला—"महाराज! तुमची तब्येत सुधारल्याबद्दल मला बक्षीस देणार की शिक्षा याचा तुम्हीच विचार करा."

"तूं वीस दिवसांच्या आंत मरणार असें खोटें ज्योतिष सांगितलें होतेंस!" राजा प्रश्नार्थी म्हणाला.

"म्हणूनच तर त्या काळजीनें तुम्ही अन्नपाणी कमी केलें! त्या काळजींतच तुमचा लठ्ठपणा कमी झाला. मी ही युक्ति करून तुमचा इलाज केला. त्याचा महाराजांना फायदाच झाला. आतां मला शिक्षा देणार कीं बक्षीस तें महाराजांनींच ठरवावें."

तेव्हां कोठें राजाच्या व त्याच्या मंत्र्यांच्या डोक्यांत प्रकाश पडला. ज्योतिषी पण खूष झाले. त्यांचें म्हणणें खरें ठरलें होतें. परंतु वैद्यांच्या माना खालीं झाल्या. आजाराचें औषध त्यांना माहीत होतें. पण विलक्षण आजाराला विलक्षणच चिकित्सा लागते हें त्यांना कोठें ठाऊक होतें? असो.

या विलक्षण चिकित्सेमुळें राजाचा आजार बरा झाला होता खरा! त्यानें वचन दिल्याप्रमाणें आपलें अर्धें राज्य साधूला देऊन टाकलें. साधूनें त्याचा सांभाळ करण्याचें काम राजाकडेच दिलें. राजानें आनंदानें तें स्वीकारलें.






[१७]

[पंखवाल्या जातीचे लोक लबू वगैरेंच्या हातून निसटून निघून गेले. त्याच वेळीं श्वानकर्णाच्या अनुयायांनीं लबू व त्याच्या अनुयायांना घेरलें. पण जयमलनें श्वानकर्णी व मार्जार यांची मैत्री घडवून आणण्यासाठीं चातुर्यानें प्रयत्न करण्याचें ठरविलें. दोघांनीं मान्य केल्यावर त्यानें मार्जारच्या अनुयायाला मार्जारला बोलावून आणण्यास पाठविलें—पुढें वाचा.]

मार्जारचा अनुयायी अर्धी वाटच चालून गेला असेल, त्याला त्याचा सरदार आठ दहा अनुचरांसह येतांना भेटला. सर्व झाडींतून लपत छपतच येत होते. मार्जारनें आपल्या अनुयायाला पाहतांच विचारलें—"कां रे? कां पळतो आहेस? कोठें निघालास? तुम्हीं पंखवाल्यांच्या हातून सुटल्यावर श्वानकर्णाच्या अनुयायांनीं तुम्हांला घेरलें होतें ना? मग पुढें काय झालें?"

मार्जारच्या अनुयायानें श्वानकर्णाबरोबर जयमल वगैरेंचें जें बोलणें झालें तें सर्व सांगितलें व म्हणाला—"श्वानकर्णानें त्याच्या पूर्वजांची ती दगडी गदा मागितली आहे. ती मिळाली तर तो आपल्याशीं वैर सोडून मैत्री करायला तयार आहे. जयमलनें हें



सांगण्यासाठीं व ती गदा घेऊन येण्यासाठींच मला इकडे पाठविलें आहे."

दगडी गदेचें नांव ऐकताच मार्जार दचकला व क्रुद्ध होऊन आपल्या अनुयायां-कडे पहात म्हणाला—"मी पहिल्यानेंच तुम्हांला बजावलें होतें. पण एकाची तरी अक्कल ठिकाणावर असेल तर ना? आतां ती गदा कोठें आहे हें मी कोणत्या तोंडानें जाऊन सांगूं?"

"त्या श्वानकर्णीलाच सांगा सरदार आपल्या पूर्वजांची गदा घेऊन आयला. आम्हांला त्याची गदा घेऊन काय करायचें आहे? त्या गदेखातर एकाचा बळी गेला आहे तेवढा पुरे आहे आम्हांला." मार्जारच्या अनुयायांपैकीं एक जण म्हणाला.

आतां मात्र मार्जारला मनस्वी राग आला. आपल्या हातांतला भाला दोनदां जमिनीवर आपटीत म्हणाला—"तो बलवान होता. कबूल, तरी आग ओकणाऱ्या त्या सिंहासमोर जाण्याची हिंमत कां केली त्यानें? गदा गेली आणि स्वतःचा जीव पण घालवून बसला कीं नाहीं?"

थोडा थांबून पुढें म्हणाला—"झालें तें झालें, सर्व श्वानकर्णीला जाऊन सांगूं या म्हणजे झालें."

"आपण फक्त दहाच जण आहों आणि शत्रूच्या गुहेंत कसा प्रवेश करावयाचा? ते शेकडों आहेत. त्यांनीं अचानक छापा मारलाच तर आपल्या चिंधड्या उडवून नाहीं का टाकणार ते?" एकानें शंका केली.

"तुमचें सर्वांचें शौर्य काय तें हेंच का? इतके भित्रे आहां तर ती गदा चोरून आणायला कोणी सांगितलें होतें तुम्हांला? आतां त्या सर्व गोष्टी बोलत बसल्याचा काय फायदा म्हणा! जयमल, लखू व तो रानटी गोमांग आपल्या धनुष्यबाणांचा उपयोग करून आपलें रक्षण करूं शकतील. त्यांच्या हातांतलीं हीं नवीन शस्त्रें आपल्याला माहीत नाहींत व त्यांना पण माहीत नाहींत." मार्जार म्हणाला.

मार्जार आपल्या अनुचरांसह लखू व त्याच्या अनुयायांना जाऊन भेटला. त्या वेळीं श्वानकर्णी क्रुद्ध दृष्टीनें पहात होता कीं मार्जारच्या हातांत किंवा त्याच्या अनुचराच्या हातांत ती गदा आहे कीं नाहीं. नसलेली पाहून तो जयमलला म्हणाला—"पाहिलेंस? कोठें आणली आहे त्यांनीं गदा? आतां त्यांच्याशीं मैत्री कसली?"

जयमलनें मार्जारच्या जवळ जाऊन विचारलें—"मार्जार! मी तुझ्या अनुयायाला हेंच तर सांगून पाठविलें होतें कीं ती गदा घेऊन ये! मग तूं कां नाहीं आणलीस ती? श्वानकर्णीशीं असेंच कायमचें वैर ठेवण्याचें तूं ठरविलें आहेस कीं काय?"

"मला कोणाशीं वैर ठेवण्याची इच्छा नाहीं. माझें कोणाशीं या रानांत वैर पण नाहीं. श्वानकर्णीनें माझ्याशीं शत्रुता करण्याचें ठरविल्यावर मी तरी काय करूं? मी तसल्या



दहा गदा आणून द्यायला तयार आहें. माझ्या अनुचरांनीं ती चोरली होती हें खरें आहे, मी कबूल करतों. पण त्यांनीं तें माझ्या सल्ल्यानें केलें नाहीं. मला विचारल्या शिवाय त्यांनीं तो मूर्खपणा केला." मार्जार म्हणाला.

"मला आमच्या पूर्वजांची गदा पाहिजे. त्याचें महत्व तुला काय कळणार? तूं हजार नकली गदा दिल्यास तरी त्या मला नकोत." श्वानकर्णी संतापून म्हणाला.

"ती मंत्रवलेली गदा आहे असें समजूनच माझ्या एका अनुचरानें ती नेली होती



तलावा काठच्या आग ओकणाऱ्या वाघाला ठार करण्यासाठीं. पण स्वतःचा जीव गमावून बसला." मार्जार म्हणाला.

"बरें तें सर्व राहूं दे! प्रथम ती गदा कोठें आहे सांग आम्हांला!" जयमलनें विचारलें.

"तो गदा घेऊन त्या सिंहाच्या गुहेंत शिरला तो परत कोठें आला? आतां ती गदा कोठें आहे, व तो जिवंत आहे कीं मेला हें मी आतां काय सांगूं!" मार्जार म्हणाला.

"खोटें! सर्व खोटें! माझा नाहीं या लबाडांच्या बोलण्यावर विश्वास!" श्वानकर्णी म्हणाला.

जयमल मार्जाराला जरा एका बाजूला बोलावून घेऊन गेला आणि त्याला विचारलें—"काय तें खरें सांग!"

मार्जार शपथ घेऊन म्हणाला—"तो चोरी करणारा आमच्या जातीचा होता. पण त्या चोरीविषयीं मला बिलकुल माहिती नव्हती. कोणाच्या तरी सांगण्यावरून त्यानें ही चूक केली."

श्वानकर्णी जवळ येऊन जयमल म्हणाला—"श्वानकर्णी! मार्जारच्या बोलण्यावर मला वाटतें कीं तूं विश्वास करावा. तो म्हणाला तें खरें आहे. तुला तीच गदा पाहिजे असेल तर ती आणून देण्याची जबाबदारी आम्ही घेतों. तुम्ही दोघे वैर सोडून परस्परांशीं मैत्रीनें रहा."

"मार्जारच्या बोलण्यावर विश्वास करण्याचा अर्थ झाला ती गदा सिंहाच्या गुहेंत राहिली. त्या सिंहानें गदा घेऊन जाणाऱ्याला खाऊन टाकलें असेल, पण तो गदासुद्धां खाऊन टाकील असें नाहीं वाटत मला. पण त्या सिंहाच्या गुहेंत शिरून गदा कशी बाहेर आणावयाची?" श्वानकर्णीनें चकित होऊन जयमलला विचारलें.



"अजून तुला आमच्या शक्तीची खरी कल्पना आलेली दिसत नाहीं. चला, दाखवा आम्हांला ती गुहा!" असें म्हणत जयमल निघाला. लखू व गोमांग पण त्याच्या पाठोपाठ निघाले. मर्जार व श्वानकर्णी आपल्या अनुचरांबरोबर त्यांच्या पाठोपाठ निघाले. सर्व एका सरोवरच्या-काठीं येऊन पोंचले. त्या सरोवराला लागूनच एक डोंगर होता. त्या डोंगरांत पुष्कळ गुहा होत्या. एक ओढा सरोवरामधून निघून डोंगराला वळसा देऊन जात असलेला जयमलनें लखूला दाखवला.

"ती पहा गुहा! तीच त्या सिंहाची गुहा आहे. त्या गुहेंत गेल्यावर जिवंत परत येण्याचें नांव नको काढायला." मार्जारनें गुहा दाखवीत म्हटलें. श्वानकर्णीनें जयमलकडे पाहून मार्जारनें जें म्हटलें तें खरें आहे अशा अर्थानें जयमलकडे पाहिलें.

जयमल, लखू व गोमांग तिघे जरा एका बाजूला गेले आणि त्या सिंहाला ठार करावयाचें कीं नाहीं, आंत शिरायचें कसें वगैरे गोष्टींवर विचार केला. "आतां माघार घेणें शहाणपणाचें नाहीं. पण



त्या आग ओकणाऱ्या सिंहाला या बाणानें कसें मारावयाचें?

"आतां स्वतःचा प्राण गमावून बसावें लागलें तरी हरकत नाहीं. पण माघार घ्यायला मी तयार नाहीं" जयमल म्हणाला.

"माझें देखील तेंच मत आहे." लखूनें दुजोरा दिला.

"कितीं मोठें व शक्तिशाली सावज असलें तरी त्याला ठार करण्यास माझ्याकडे जालिम विष आहे. त्या विषांत बुडवून बाण मारला तर तो सिंह आपल्या केसाला देखील धक्का पोंचवूं शकणार नाहीं. पण



जर का नेम चुकला तर मात्र काय होईल हें कांहीं सांगतां येत नाहीं." गोमांग म्हणाला.

"आपण सर्वांनीं सावध राहालें पाहिजे एवढें खरें ।" जयमल म्हणाला.

सिंह गुहेंत आहे कीं नाहीं हें कळावें म्हणून गोमांगच्या सांगण्यावरून प्रथम बकऱ्या, रेडे व म्हशींना त्या बाजूला पाठविण्याचें ठरलें." त्यांना पाहून सिंह त्यांना खायला त्यांच्यावर झडप तरी मारील किंवा त्याचा वास आल्याबरोबर जनावरें तरी परत फिरतील.

जयमलनें श्वानकर्णीला तें सुचवलें. त्या प्रमाणें त्यानें आपल्या अनुचरांना आठ दहा बकऱ्या व रेडे आणावयास पाठविलें. सर्वांनीं मिळून गुरां-बकऱ्यांना एका दोरीला बांधून त्या गुहेच्या बाजूला हांकलें. सर्व जनावरें पाण्यांत शिरून पोहोत त्या डोंगराकडे निघालीं. पण अर्ध्या वाटेंतच थांबून भिऊन ओरडत परतलीं.

"सिंह गुहेंत आहे ह्यांत आतां शंका उरली नाहीं. पण सिंह जनावरांना खायला बाहेर कसा काय आला नाहीं?" मार्जार चकित होऊन म्हणाला.

तें ऐकून श्वानकर्णी जोरानें हंसला व म्हणाला—"तुझ्या त्या अनुयायानें सिंहाला माणसाच्या मांसाची चव कशी असते हें कळवून दिल्यावर तो जनावरांचें मांस कां बरें खाईल? मी म्हणतो तें खरें आहे कीं नाहीं याची खातरी पटवून घ्यायची असेल तर आपल्यापैकीं एकाला पाठवून गंमत पहा. सिंहानें बाहेर उडी मारली नाहीं तर मी नांव बदलून देईन."

श्वानकर्णीला रागानें उत्तर देण्यासाठीं मार्जार कांहीं बोलणार तेवढ्यांत जयमल

मध्येंच म्हणाला—" आतां तुम्ही परस्परांतलें भांडण थोडा वेळ विसरा. त्या सिंहाला ठार करून ती मंत्रवलेली गदा आणण्याची जबाबदारी आम्ही घेतों आपल्यावर. एक होडकें द्या आम्हांला."

श्वानकर्णींच्या आज्ञेनें त्याच्या अनुयायांनीं झाडाच्या फांद्या तोडून त्या एकाला एक जोडून जुजुबी होडकें तयार केलें व जयमल वगैरे त्यावर जाऊन बसले. इकडे गोमांगनें तिघांचे बाण विषांत बुडवून तयार ठेवले होते. निघण्यापूर्वी जयमल मार्जारला व श्वानकर्णीला म्हणाला—" आतां तुम्ही येथें वाट पहात बसा किंवा परत जा. आम्ही एका तासानें ती गदा घेऊन परत येतों पहा!" दोघांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. दोघांच्या अंगाला सिंहाच्या भीतीनें दरदरून घाम सुटला होता. त्यांना वाटलें कीं आतां हे काय परत येणार? त्यांच्या मनांतला विचार ओळखूनच कीं काय जयमल म्हणाला—" एका तासाची काय गरज! आम्ही पंधराच मिनिटांत परत येतों पहा. तुम्ही येथेंच थांबा गदा श्वानकर्णीला व सिंहाचें कातडें मार्जारला देऊं!"

होडकें निघालें व वाघाच्या गुहेजवळ जाऊन पोंचलें. "आंत चाहूल ऐकूं येत आहे मला." गोमांग म्हणाला.

" शंका कशाला? आपण प्रत्यक्ष आंत जाऊन पाहूं याच सुळीं!" लखू म्हणाला. होडकें कांठाला लागतांच लखूनें खालीं उडी मारली.

तिघे गुहेजवळ गेले. तिघांनीं आंत वांकून पाहिलें. [ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# मंत्र्याचें चातुर्य

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमींप्रमाणें पुन्हां स्मशानाच्या दिशेनें जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—" राजा, हें मला माहीत नाहीं कीं तुझ्यासारख्या राजाला देखील कधीं तशा परीक्षेंत उत्तीर्ण होण्याचा प्रसंग आला होता कीं नाहीं. जो मनुष्य आवडत नसेल किंवा नकोसा वाटत असेल त्याला नोकरीवरून कमी करण्यासाठीं त्याची कठीण परीक्षा घेतली जाते. सुबुद्धि नांवाच्या मंत्र्याला तशा परीक्षेंत उत्तीर्ण व्हावें लागलें होतें. त्याची गोष्ट मी सांगतों. ऐक. वेताळ गोष्ट सांगूं लागला.

एकदां दक्षिणेकडे रत्नगडच्या गादीवर सत्यजित नांवाचा राजा राज्य करीत असे. तो एक धर्मपरायण व प्रजावत्सल राजा



होता. त्याचा मंत्री सुबुद्धि पण आपल्या नांवाप्रमाणें खरोखरच सद्बुद्धि व स्वामि-भक्त होता.

राजाला मृत्युंजय नांवाचा एकुलता एक मुलगा होता. त्याचा स्वभाव बापाच्या अगदीं विरुद्ध होता. वाईट संगतींत पडून त्याला वाईट संवयीपण लागल्या होत्या. युवराजाला पोरवयांत वाईट संवयी लागल्या तर राज्याचें अहित होईल याचा विचार करून सुबुद्धि त्याला नीट वळण लावण्याची खटपट करी. पण त्यामुळें मृत्युंजयाच्या मनांत मंत्र्यावर राग होता. राजा झाल्यावर त्यानें मंत्र्याचा सूड घ्यायचें मनाशीं ठरवून ठेवलें होतें.

ती वेळ पण जवळच आली. सत्यजित महाराजांना वार्द्धक्य येऊं लागलें तसतशी आपल्या एकुलत्या एका मुलाचें वर्तन पाहून, त्यांची काळजी वाढूं लागली. वेळींच आळा घातला नाहीं तर मुलगा अंगाबाहेर जाईल असा विचार करून महाराजांनीं मंत्र्याला जास्त अधिकार दिले. त्यानंतर कांहीं दिवसांनीं महाराज मरण पावले.

वडील वारले तरी मंत्रीच अधिकार गाजवीत आहे हें पाहून युवराजाला जास्त राग आला. मयत महाराजांनीं मंत्र्याला किती अधिकार देऊन ठेवले होते हें सर्व दरबाऱ्यांना माहीत होतें. तरी राज्याभिषेक होईपर्यंत त्यानें वाट पाहण्याचें मनांत ठरविलें.

महाराजांचें श्राद्ध वगैरे आटोपल्यावर युवराजाचा राज्याभिषेक झाला. त्यानंतर मृत्युंजयनें खास दरबार भरविला व आपल्या मंत्र्याला बोलावून म्हणाला—"बाबांनीं तुमच्या बुद्धिमत्तेची वाखाणणी करून तुम्हांला जादा अधिकार दिले आहेत. मी देखील ते सर्व अधिकार तुमच्याकडेच ठेवूं इच्छितों. परंतु त्यापूर्वी सहज कुतूहल म्हणून तुमच्या बुद्धीची परीक्षा घेणार आहे. तुम्ही परीक्षेत उत्तीर्ण झालांत तर मी आपले सर्व अधिकार देखील तुम्हांला देऊन टाकीन."

एवढें सांगून तो पुढें म्हणाला—"या करंडकांत मी दोन चिठ्ठ्या ठेवल्या आहेत. एकीवर 'होय' असें लिहिलें आहे व दुसरीवर 'नाहीं'." असें लिहिलें आहे. 'होय' म्हणून लिहिलेली चिठ्ठी तुम्ही उचलली तर तुम्ही खरोखरच बुद्धिमान आहांत हें सिद्ध होईल व जर 'नाहीं' म्हणून लिहिलेली चिठ्ठी उचलली तर बुद्धिमान नाहीं हें सिद्ध होईल. त्यावरून हें देखील सिद्ध होईल कीं तुम्ही आजपर्यंत आमच्या बाबांना फसवीत आलांत. पण जर का बरोबर चिठ्ठी उचललीत तर मात्र मी कबूल केल्याप्रमाणें आपले सर्व अधिकार तुम्हांला देईन."

सर्व दरबारी तें ऐकून स्तब्ध उभे राहाले. मंत्र्याचा पाणउतारा करून त्यांना कामा-वरून कमी करण्याच्या हेतूनें, व सुडाच्या भावनेनें नव्या महाराजांनीं हा घाट घातला असावा असें प्रत्येकाला वाटलें.



मंत्र्याची मुद्रा गंभीर होती. तो कांहींच बोलला नाहीं. करंडकावरचें झांकण उचलून त्यानें आंतली एक चिठ्ठी उचलली व फाडून फेंकून दिली व हात जोडून महाराजांना म्हणाला—"दुसऱ्या चिठ्ठींत जें कांहीं लिहिलें आहे तें चिठ्ठी उघडून महाराजांनीं स्वतःच वाचून दाखवावें."

सर्व चकित होऊन मंत्र्याकडे व महा-राजांकडे पाहूं लागले. मंत्र्यानें चिठ्ठी फाडून टाकल्याबद्दल महाराजांना राग येईल. पण मंत्र्यानें चिठ्ठी कां फाडावी? परंतु महाराजांनीं चिठ्ठी उघडून वाचून दाखविली.



तीवर 'नाहीं' असें लिहिलें होतें. नंतर महाराज म्हणाले—"आपले मंत्री परीक्षेंत उत्तीर्ण झाले आहेत. मी वचन दिल्याप्रमाणें त्यांना आपल्या मंत्र्याच्या पदावर कायम करीत आहें व आपले सर्व अधिकार त्यांच्या हातांत देत आहें."

मंत्र्याच्या बुद्धिमत्तेंबद्दल दरबारी लोकांना मुळींच शंका नव्हती. महाराजांनीं दोन चिठ्ठ्या दिल्यावर मंत्र्याची मुद्रा थोडा-वेळ का होईना गंभीर झालेली पाहून दरबारी लोकांना आश्चर्य व भीति वाटली. त्यानंतर मंत्र्यानें एक चिठ्ठी उचलून ती स्वत: वाचली नाहीं कीं महाराजांना वाचायला दिली नाहीं. ती त्यानें फाडून टाकली. महाराज याबद्दल मंत्र्यावर रागाव-णार व कदाचित त्याला सुळावर चढव-तील किंवा निदान हद्दपार तरी करतील असें प्रत्येकाला वाटलें. परंतु महाराजांनीं दंड किंवा शिक्षा तर केलीच नाहीं, उलट मंत्रीपदावर त्याची कायमची नेम-णूक केली. त्यांतलें खरें रहस्य कोणालाच कळलें नाहीं.

सर्वांना आनंद झाला. तेव्हांपासून सुबुद्धीच्या सल्ल्याप्रमाणें मृत्युंजयवागूं लागला. त्याच्या राज्यांत देखील प्रजा सुखी झाली.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"पण माझ्या मनांत एक दोन शंका आहेत. सुबुद्धिसारखा शहाणा मंत्री त्या मूर्ख राजाला सोडून कां नाहीं गेला? तशा त्या निरर्थक परीक्षेला त्यानें मान्यता कां दिली? आपलें मंत्रीपद कायम रहावें म्हणून? कीं त्याला एवढा आत्मविश्वास वाटत होता कीं या परीक्षेंत आपण नक्की उत्तीर्ण होऊं म्हणून? आणखी एक शंका आहे. मृत्युंजयाचा मंत्र्यावरील राग कमी कां झाला? सुबुद्धीनें त्याच्यावर वशीकरण मंत्र किंत्र टाकला होता

की काय? तूं या सर्व शंकांचें समाधान केलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

"नवा राजा सुडाच्या भावनेनें ही परीक्षा घेत आहे हें मंत्र्याला माहीत होतें. पण नोकरी सोडून निघून गेला असतां तर आपल्या जुन्या धन्याला वचनाचें पालन न केल्याचें दुःख त्याच्या मनाला वाटलें असतें. आपण बरोबर चिठ्ठीच उचलूं असा खोटा आत्मविश्वास पण त्याच्या मनांत नव्हता. पण आपला पाणउतारा करण्यासाठीच तरुण राजानें ही परीक्षा ठेवली आहे. अर्थातच दोन्ही चिठ्ठ्यांवर "नाहीं" असेंच लिहिलेलें असणार हें मंत्र्याला चांगलें ठाऊक होतें. चिठ्ठी वाचल्याशिवाय फाडून टाकण्यांत त्याचा हेतु एवढाच कीं दोन्हीं चिठ्ठ्यावर "नाहीं" असें लिहिलेलें आहे हें दाखविल्यास महाराजाचा आदर प्रजेच्या मनांत कमी होईल. तरुण राजाच्या कीर्तीला तो कलंक लागूं नये ही त्याची इच्छा होती. अशा तऱ्हेनें त्यानें आपल्या राजाच्या गौरवाचें रक्षण केलें. हें सर्व ओळखून मृत्युंजयानें आपल्या मंत्र्याला सर्व अधिकार दिले.

सुबुद्धिसारखें मंत्री मिळाल्यावर राजाला आपल्या राज्याच्या रक्षणाची व प्रजेच्या सुखाची काळजी करण्याचें कारणच काय?"

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

[श्री एन. लक्ष्मीनारायण यांच्या लेखनाच्या आधारें.]



# मजनूचें प्रेम

[स्वामी रामतीर्थ कथा]

मजनूचें प्रेम खरोखरच अलौकिक प्रेमाचा एक नमुना आहे. आपल्या प्रेमिकेच्या प्रेमांत त्याला वेड लागलें होतें. तो तिच्या शोधार्थ रानोमाळीं हिंडला. त्याला जडचेतन सर्व पदार्थांत त्याची प्रेमिकाच दिसे.

मजनू एका रानांत जात असतां बेशुद्ध होऊन एका जागीं पडला होता. त्याचा बाप त्याला शोधत तेथें आला व प्रेमानें कुरवाळून म्हणाला—"बाळ! मी तुझा बाबा! ओळखलें नाहींस का मला?" पण मजनू त्याला ओळखूं शकला नाहीं. बापाला पण प्रेमिकेच्या नावानेंच तो हांक मारून बोलवूं लागला. "अरे मी तुझा बाबा आहें!" बाप म्हणाला. "बाबा!" मजनूनें चकित होऊन विचारलें.

मेल्यावर स्वर्गांत देवानें त्याला विचारलें—"वेड्या, तुझ्या प्रेमिकेवर तुझें जें एवढें प्रेम आहे त्यांतला एक शतांश जरी तूं माझ्यावर केलें असतेंस तर मी तुला देवदूत केलें असतें."

मजनू म्हणाला—"तूं जें म्हणालास त्याबद्दल मी तुला माफ करतो. पण जर तुला मी हवा असेन तर तूं माझ्या प्रेमिकेचें रूप घेऊन ये!"





# उमजलें नाहीं

मुलांच्या गप्पा चालू होत्या. आजोबा आंत आले. एक म्हणत होता "जीवात्मा!" दुसरा म्हणाला—"परमात्मा!" तिसरा—"मन, बुद्धि, अहंकार कांहीं तरी पोपटपंजीसारखें बोलत होता.

"काय रे चाललें आहे, मुलांनो?" आजोबांनीं विचारलें.

"कांहीं नाहीं बाबा! काल आजींच्या बरोबर आम्ही गेलों होतों कथेला. तेथें बुवा कांहीं कांहीं बोलत होते व आम्ही ऐकत होतों. तेंच आम्ही घोकीत होतों." मुलें म्हणाली.

"अरे पण. ते काय म्हणाले हें तुम्हांला कळलें का?" आजोबांनीं विचारलें.

"हो आम्हांला सर्व समजलें!" मुलें म्हणालीं.

"अरे समजलें खरें, पण उमजलें का?"

सर्व मुलें गप्प होतीं. "म्हणजे विद्वाण्याच्या मुलाचीच गोष्ट झाली म्हणावयाची!" आजोबांच्या तोंडून तेवढें वाक्य निघाल्याबरोबर सर्व मुलें "गोष्ट गोष्ट म्हणून ओरडूं लागलीं."

"सांगतों सांगतों. सर्व गप्प बसा!" असें सांगून आजोबांनीं खुर्चीवर बसत दोन्ही नाकपुड्यांत तपकीर कोंबली व गोष्ट सांगायला सुरवात केली.

एका गांवांत भिकूशेट नांवाचा एक श्रीमंत वाणी रहात असे. तो व्यापार तर करीतच असे. त्याबरोबर व्याकरण, न्याय इत्यादि विषयांचा त्याला नाद होता. तो जें कांहीं बोले त्याचा सरळ अर्थ वेगळा व गूढार्थ वेगळा असे. म्हणून त्याच्या संगतींत गमतीखातर कांहीं दिवस घालविण्यासाठीं मोठमोठे विद्वान व पंडित येत असत.

श्री. का. रा. मुजुमदार



भिकूशेटला एकुलता एक मुलगा होता. त्याचें नांव दगडू शेट असें होतें. पित्रार्जित व्यवहार कौशल्य किंवा विद्वत्ता दुर्दैवानें त्याला लाभल्या नाहींत. विद्याभ्यासपण बेताचाच. पण बाप जें कांहीं सांगे तें तो डोळे मिटून करीत असे.

पुढें कांहीं दिवसांनीं भिकूशेट आजारी पडला व आपला मरणकाळ जवळ येऊन ठेपलेला पाहून त्याला आपल्या मुलाची फार काळजी वाटूं लागली. औषध पाणी सर्व चालू होतें. पण त्या आजारांतून सुटका नाहीं हें ओळखून त्यानें आपल्या मुलाला जवळ बोलावून उपदेश केला. म्हणाला—"बाळ, तुला मी हिताच्या चार गोष्टी सांगत आहें. त्याप्रमाणें वागलास तर तुला व्यापारांत कधीं खोट येणार नाहीं. खरेदी कशी करावी व विक्री कशी करावी हें मी तुला कधीं सांगितलें नाहीं. तें नीट ऐकून घे जास्त किमतीवर माल विकत घेऊन कमी किमतीवर विकावें. असें केलेंस तर तुझ्या व्यापारांत नेहमीं बरकतच होईल." असें सांगून कांहीं दिवसांनीं भिकूशेट मरण पावला.

बाप वारल्यावर सर्व व्यापाराची जबाबदारी लखूशेट वर येऊन पडली. त्यानें बापाच्या उपदेशाप्रमाणें वागायचें ठरविलें. त्याला त्याचा खरा मतितार्थ कळलाच नव्हता. जास्त किमतीवर विकत घेऊन कमी किमतीवर विकावें असाच अर्थ समजून त्यानें व्यापार करायला सुरवात केली. मूर्खांत मूर्ख व्यापारी देखील असली चूक करणार नाहीं. पण लखूशेटचा बापाच्या बोलण्यावर अंधविश्वास होता व बापाच्या



उपदेशाचा अर्थ त्याच्या समजुतीप्रमाणें त्याला जो कळला त्याप्रमाणें तो वागूं लागला. मग काय गांवभराचें गिऱ्हाईक त्याच्याच दुकानावर. दोन तीन महिन्यांत जवळ होता नव्हता तो पैसा लखूशेट घालवून बसला.

पुढें काय करावें हें लखूशेटला सुचेना. घर रिकामें व तिजोरी पण रिकामी. उरले काय ते कांहीं कागदपत्र व चिठोऱ्या. त्या वाचीत असतां त्याला एका चिठ्ठींत हें वाक्य वाचायला मिळालें–"लक्ष्मी व कालवाहन यांच्या मध्य मार्गीं खणल्यास खणणाराला धनाचा सांठा सांपडेल!" तें वाचून लखूशेटला कांहींच बोध झाला नाहीं. लक्ष्मी व कालवाहन ही काय भानगड आहे? कोठें खणलें म्हणजे धनाचा सांठा मिळणार? लखूशेट. गांवांतल्या कांहीं माहीतगार विद्वानांकडे गेला आणि त्या वाक्याचा अर्थ विचारूं लागला. परंतु कोणाला देखील त्या वाक्याचा अर्थ कळेना. सर्व मनांतल्या मनांत हंसून म्हणत "हा लखूशेट जवळ होतें नव्हतें तें घालवून बसलाच आहे आणि आतां आहे ती अक्कल देखील उरलेली दिसत नाहीं." जास्त दरानें विकत घेऊन कमी भावानें तो विकत असे तें पाहूनच सर्व हंसत असत व त्याचें दिवाळें निघणार हें ओळखून होते. या वेड्या पिराच्या कोण नादीं लागणार!

लखूशेट या मनःस्थितींत असतां त्याच्या घरीं दुरून त्याच्या वडिलांचा एक वृद्ध मित्र आला. तो भिकूशेटचा स्वभाव चांगला ओळखे. तो जें कांहीं सांगे किंवा लिही त्याचा कांहीं तरी खोल अर्थ असे हें त्याला माहीत होतें. भिकूशेट वारल्याचें ऐकून त्याला फार वाईट वाटलें. त्याहून जास्त वाईट वाटलें तें त्या घरची गरीबी पाहून. त्यानें लखूशेटला विचारलें–"एका एकी इतकी गरीबी कशी काय आली?"

तेव्हां लखूशेट म्हणाला–"माझ्या बाबांनीं मरतांना मला सांगितलें हो तें कीं जास्त किमतीवर माल विकत घेऊन कमी किमतीवर विकावें. मी त्याप्रमाणें केलें व आतां ही स्थिति आहे आमची."

तो वृद्ध गृहस्थ म्हणाला–"अरे त्याचा अर्थ तुला कळला नाहींतर! कोणी समजूतदार व शहाणा व्यापारी जास्त दरानें माल विकत घेऊन कमी दरानें विकेल का? तूं तरी वेडापीरच दिसतोस. असा विचित्र उपदेश तुझे वडील तुला कसा देतील? निदान चार चौघांना विचारून तरी पहायचें होतेंस!"

"मग त्यांच्या म्हणण्याचा काय अर्थ?" लखूशेटनें विचारलें.

"जास्त माल ज्या किमतीवर विकत घेतला तितक्याच किमतीवर तो विकणें, म्हणजे दहा रुपयाला जास्त माल विकत घेतला समज. त्यांतला कमी माल दहाच रुपयाला विकणें. असा अर्थ झाला." वृद्ध गृहस्थ म्हणाला. बापाच्या उपदेशाचा अर्थ लखूशेटच्या तेव्हां लक्षांत आला. तो घरांत



गेला व तें चिठोरें घेऊन आला. तें चिठोरें वडिलांच्या मित्राच्या हातांत देत म्हणाला—"हें चिठोरें वाचून पहा. ह्यांत देखील असाच कांहीं तरी गूढार्थ आहे. मला नाहीं कळला.

तो वृद्ध गृहस्थ म्हणाला—"तुझा गोठा कोठें आहे? गाई कोठें बांधतोस?"

लखूशेट म्हणाला—"मी सर्व गाई विकून टाकल्या."

तो वृद्ध म्हणाला—"तूं त्या कोठें बांधीत होतास ती जागा तरी दाखविशील कीं नाहीं?"

लखूशेटनें तो गाई बांधीत होता ती जागा दाखविली आणि म्हणाला—"आम्ही येथें म्हशी बांधीत होतों."

"बरें तर ही मधली जागा खणायला सांग! लक्ष्मीचा अर्थ आहे गाय व काल-भैरवाचा अर्थ होतो म्हसोबा! समजलें!" तो वृद्ध म्हणाला.

लखूशेटनें त्याप्रमाणें ती जागा खणून पाहिली तर खरोखरच एक पेटी त्याला आंत सांपडली. पेटींत सोन्या चांदीच्या विटा होत्या. त्यानें आपल्या वडिलांच्या मित्राला पुष्कळसें सोनें दिलें व त्यांचे आभार मानले.

नंतर त्यानें बापानें दिलेल्या उपदेशाप्रमाणें व्यापार केला. पुढें तो श्रीमंत झाला.

"तात्पर्य असें कीं कोणाच्याहि बोलण्याचा नुसता शब्दार्थ समजून घेऊन भागत नाहीं. स्वतःचें डोकें लढवून कांहीं गूढार्थ असेल तर तो समजून घ्यावयाचा असतो" आजोबा म्हणाले.

"समजलें पण उमजलें नाहीं." असें ओरडत मुलें निघून गेलीं.





# भीमूचे पराक्रम

भीमूमुळें गाडीवानाला मालकाच्या शिव्या खाव्या लागल्या. तो स्वभावानें होता दुष्ट. भीमूनें त्याची अद्दल घडावी म्हणून आपला मुलगा धोंडू याला बोलावून तो म्हणाला—"हें बघ, मी गांवाला जात आहें. मी परत यायच्या आंत जमीनदाराच्या जांवयाला कांहींतरी सांगून गांवाबाहेर काढ. त्याला गांवाबाहेर काढल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं."

"बाबा, तुम्ही सांगाल तसें करतों. सांगा काय करूं?" धोंडूनें विचारलें. बापानें जें सांगायचें तें सांगितलें व निघून गेला.

धोंडू व भीमू दोघांची परस्परांशीं ओळख होतीच. त्यानें त्याच्याशीं मैत्री वाढवली. एकदां तो भीमूला म्हणाला—"भीमराव, तुम्ही घर जांवई होऊन राहालांत म्हणून सर्व तुम्हांला हंसत आहेत!"

"हंसत आहेत? कां? मला कां तें नाहीं कळलें. मी असें काय केलें?" भीमूनें विचारलें.

"तूं कांहीं करीत नाहींस म्हणूनच तर लोक हंसत आहेत. कोणी शिकला सवरलेला धडधाकट मनुष्य स्वस्थ बसून बायकोनें वाढलेल्या अन्नावर जगतो काय? म्हणून हंसत आहेत सर्व!" धोंडू म्हणाला.

भीमरावांना तें सर्व खरें वाटलें. तो मनांत म्हणाला—"धोंडू म्हणतो तें खरें आहे. मला बायकोच इतके दिवस वाढीत आली आहे. मी तिला कधींच वाढलें नाहीं. ह्यांत आपला मोठेपणा नाहीं.



आजी सर्व कामें मला करायला सांगे तें कां हें आतां मला कळलें. आजीकडे जाऊन सैंपाक करायला शिकून येऊं या. स्वत: सैंपाक करून बायकोला वाढूं लागलों कीं मग जगहंसें होण्याचें कारण उरणार नाहीं." असा विचार करून भीमू बायकोला म्हणाला—"मी आजीकडे चाललों आहें. सैंपाक करायला शिकून मग कांहीं दिवसांनीं परत येईन."

"सैंपाक करायची हौस असेल तर मी नाहीं का इथें शिकवायला?" लक्ष्मीनें विचारलें.

"त्यांत मोठें पण तें काय मिळणार मला? मला सैंपाक करतां येईपर्यंत मी या गांवांत राहणार नाहीं. सर्व मला पाहून हंसत आहेत." भीमू म्हणाला.

कांहीं तरी नवीन वारें डोक्यांत शिरलें आहे या गोष्टीची लक्ष्मीची खातरी पटली. म्हणून लक्ष्मीनें आणखी खोलांत जाऊन विचारलें. पण भीमू म्हणाला—"तें कांहीं नाहीं. मी आपलें काम पुरें होईपर्यंत येणार नाहीं. या गांवांत पाऊल देखील टाकणार नाहीं."

लक्ष्मी कांहींच बोलली नाहीं. तिनें नवऱ्याला जाऊं दिलें. बापानें तिला विचारलें कीं जांवई कोठें गेले आहेत, तेव्हां ती एवढेंच म्हणाली कीं आजीला भेटून येतों म्हणून सांगून गांवीं गेले आहेत.

वाटेंत एका गांवीं दुपारची वेळ होती. त्या गांवाच्या पाटलानें भीमूला पाहतांच जमीनदाराचा जांवई म्हणून ओळखलें आणि जेवून जा म्हणून फार आग्रह केला. भीमू जेवायला बसला तेव्हां पाटलाची बायको वाढायला आलेली पाहून भीमूनें विचारलें—"कां हो! नेहमीं पाटलीण बाईच वाढतात का?"



"हो, मग नाहीं तर कोण वाढणार? दुसरें बाई माणूस घरांत कोणी नाहीं!" पाटील म्हणाले.

"तसें नव्हें, मी विचारतों, सैंपाक कोण करतें?" भीमूनें विचारलें.

"कां कांहीं कमी जास्त हवं आहे का?" पाटलानें विचारलें.

"नाहीं तसें नव्हें. म्हटलें सैंपाक नेहमीं पाटलीण बाईच का करतात? कधीं तुम्ही नाहीं का करीत?" भीमूनें विचारल्यावर पाटील हंसले व पाटलीण बाई पदराआड तोंड करून हळूच हंसली. भीमूला तें पाहून आश्चर्य वाटलें.

रात्रीं आणखी एका गांवीं भीमूला जेवावें लागलें. तेथें देखील घरच्या माल-कीण बाईच सैंपाक करून वाढायला आलेल्या पाहून भीमूला आश्चर्य वाटलें.

आतां मात्र भीमूला राग आला. त्या धोंडूनें मला असें खोटें कां सांगितलें? त्याची हजेरी घेतल्याशिवाय चालायचें नाहीं. असा विचार करून भीमूनें आजीकडे जाण्याचा आपल्या मनांतला विचार काढून टाकला व सासुरवाडच्या गांवीं परतला. तो घरीं गेला नाहीं. सरळ धोंडूच्या घरीं गेला.



धोंडू जेवायला बसला होता व बायको त्याला वाढीत होती.

"कायरे धोंड्या! माझ्या जवळ असें खोटें कां बोललास? बायकोला वाढणारा एक पुरूषदेखील मी पाहिला नाहीं. स्वत: मी डोळ्यांनीं पाहून आलों आहे. प्रत्येक घरीं बायकाच सैंपाक करतात व वाढतात. स्वत: तुझ्या घरीं सुद्धां तुझी बायकोच सैंपाक करून वाढते आहे हें मी डोळ्यांनीं पाहातों आहें." भीमूनें जरा रागानेंच धोंडूला विचारलें.

"मी तसें का सांगितलें होतें भीमराव!" धोंडू बोलूं लागला. मध्येंच भीमू त्याला म्हणाला—"आतां आणखी एक खोटें बोलूं नकोस! तूं नव्हता का म्हणालास कीं बायकोनें वाढलेल्या अन्नावर कोणी जगतो का? पुरुषाचा त्यांत कमीपणा आहे! आणि आतां स्वत: काय करतो आहेस रे?" असें विचारीत त्यानें धोंडूचे केस धरले आणि त्याला उभें केलें. नंतर त्याला दोन लगावल्या. धोंडूची. बायको घाबरूनच गेली. ती मोठ्यानें ओरडली. तिचा आवाज ऐकून शेजार पाजारचे लोक धांवले. सर्व प्रकार ऐकून ते म्हणाले—"भीमराव धोंडूच्या म्हणण्याचा अर्थ तुम्हांला कळला नाहीं. त्याचा अर्थ असा कीं नवऱ्यानें काम धंदा करून कांहीं तरी मिळकत करून आणली म्हणजे त्यांत त्याचा मान आहे. बायकोच्या श्रीमंतीवर त्याचा देह पोसला गेला तर त्यांत काय मान?"

"मग धोंडूनें तसें कां नाहीं सांगितलें?" भीमूनें विचारलें आणि घरीं आला.

लक्ष्मीनें विचारलें—"आजींना भेटून आलां का?"

"छे ग! त्या धोंड्यानें कांहींतरी खोटें सांगून उगीच मला त्रास दिला. मला सैंपाक करायची जरूरच नाहीं मुळीं. कांहींतरी काम केलें पाहिजे एवढेंच." भीमू म्हणाला.

"जमीनदारीचीं कामें पहात जा म्हणजे झालें. चला उठा जेवायला. पान वाढतें." असें सांगून लक्ष्मीनें पान वाढलें व भीमराव जेवायला बसले.

[पुढल्या अंकांत आणखी एक पराक्रम]





# गंधर्व राजकन्या

[६]

गंधर्व राजाच्या कन्येला पाहाल्याबरोबर हसन बेशुद्ध होऊन पडला. तरुणींच्या वृद्ध सैन्य-नायिकेनें त्याला शुद्धीवर आणण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केला व तो शुद्धीवर आल्यावर त्याला बेशुद्ध होण्याचें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला—"ही दिसायला हुबेहूब माझ्या बायको सारखीच दिसते. पण ही ती नव्हे."

तें ऐकून गंधर्व राजाची कन्या हंसूं लागली व म्हणाली—"खरोखरच हा कोणी वेडा पीर दिसतो आहे. त्याच्या बोलण्यावरून माझ्या व त्याच्या बायकोच्या रूपांत तसा जास्त फरक नाहीं. पण थोडा फरक आहे. पण तो फरक कळल्याशिवाय त्याची बायको कशी सांपडणार?"

"राजकन्या! तुमच्या व माझ्या बायकोच्या रूपांत थोडा देखील फरक नाहीं. पण मी माझ्या बायकोला खात्रीनें ओळखूं शकेन. तुम्ही दोघी समोरासमोर उभ्या राहालांत तर मी बायकोला खात्रीनें ओळखूं शकेन. परंतु दोघींत काय फरक आहे हें मला सांगतां मात्र येणार नाहीं." हसन म्हणाला.

यावरून राजकन्येला दोन गोष्टी स्पष्टपणें कळल्या. त्या तरुणाचें प्रेम आपल्याला मिळणें अशक्य व त्याची प्रेमिका आपल्या सहा बहिणींपैकीं कोणीतरी एक खास आहे. म्हणून तिला हसनचा राग आला व आपल्या त्या अज्ञात बहिणी विषयीं मत्सर वाटूं लागला. आतां ती बहीण कोण हें कळल्यावर तिला व तिचा प्रियकर हा तरुण

श्री. शामराव माने



दोघांना कडक शिक्षा देण्याचें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें.

ती म्हातारीला म्हणाली—"तूं सहाही बेटांवर जाऊन एकेकीला बोलावून घेऊन ये. त्यांना भेटून दोन वर्षें होऊन गेलीं. त्यांना सांग कीं मी त्यांना भेटायला बोलाविलें आहे आणि हें पहा, या तरुणाविषयीं एक चकार शब्द देखील त्यांच्याजवळ बोलूं नकोस."

म्हातारीला आपल्या मालकिणीच्या मनांतला खरा हेतु कळला नाहीं. असें नाहीं. ती सुज्ञ होती व तिनें सर्व राजकन्यांना लहानपणीं स्वतःच्या मुलीसारखें वाढविलें होतें. राजकन्येच्या मनांत कांहीं-तरी दुष्ट हेतू आहे हें तिनें ओळखलें. ती एका मागून एक सर्व बेटांवर गेली. पांचही बहिणींना मोठ्या बहिणीकडे पोंचती करून शेवटीं सर्वांत धाकट्या बहिणीकडे गेली. गंधर्व राजाची ती सर्वांत लाडकी मुलगी होती. म्हणून तो तिच्याकडेच रहात असे. तो मुलीला पाठवायला तयार झाला नाहीं. तो असें देखील म्हणाला कीं सकाळपासून अपशकुन होत आहेत. मी तिला पाठवायला तयार नाहीं. पण मुलगी म्हणाली—"मला अक्कानें बोलाविलें आहे. दोन वर्षें झालीं भेटून. मी भेटायला गेल्यें नाहीं तर तिला राग येणार नाहीं का? मागें मी बरेच दिवस भेटल्यें नाहीं तेव्हां तुम्हांला किती काळजी वाटत होती? मला मागच्या खेपेस यायला थोडा उशीर झाला होता. पण या खेपेस मी लवकर परत येईन."

दोन दिवसांत परत येण्याची अट लावून बापानें तिला जाऊं दिलें. म्हातारी तिला घेऊन नूरुलअदाकडे गेली. त्या दोघी येण्यापूर्वी नूरुलअदा राजवस्त्रें व आभूषणें परिधान करून सिंहासनावर येऊन बसली.



तिच्यासमोर हसन उभा होता. हातांत तलवारी घेऊन तरुणी त्याच्या दोन्ही बाजूला उभ्या होत्या. म्हातारीनें सर्व बहिणी आल्याचें कळविल्यावर तिनें एकेकीला घेऊन यायला सांगितलें. पाठच्या बहिणीला जवळ बसायला सांगून तिनें हसनला विचारलें—"हीच का तुझी बायको?"

त्या बहिणीला मोठ्या बहिणीनें एका पर पुरुषाला विचारलेला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटलें. पण मोठ्या बहिणीसमोर बोलण्याची तिची छाती नव्हती.

"ह्यांचें सौन्दर्य व रूप जगांत कोठें मी पाहिलें नाहीं. यांच्या रूपांत व माझ्या बायकोच्या रूपांत फरक आहे ही व नाहीं ही. फरक काय आहे हें मात्र मला सांगतां येत नाहीं." हसन म्हणाला.

नूरुलअदानें एका मागून एक सर्व बहिणींना बोलावून हसनला तोच प्रश्न विचारला व हसननें तेंच उत्तर दिलें. शेवटीं सर्वांत धाकट्या बहिणीला म्हातारी घेऊन आली. तिला पाहतांच हसन मोठ्यानें ओरडला आणि बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. ती देखील बेशुद्ध होऊन बहिणीच्या सिंहासनवर पडली.



आणखी जास्त प्रमाण तें काय पाहिजे? म्हातारीनें आपल्या मालकाला वचन दिलें होतें कीं दोन दिवसांत परत आणीन. पण....

मत्सराग्नीनें नूरुलअदाच्या सर्व अंगांचा भडका उडून गेला. ती ओरडली—"उचला याला गांवाबाहेर फेंकून द्या." स्त्री सैनिका हसनला उचलून घेऊन गेल्या व त्यांनीं त्याला समुद्रकांठीं फेंकून दिलें.

हसनची बायको शुद्धीवर येतांच नूरुल अदा तिला म्हणाली—"निर्लज्ज! गंधर्वकुळांत तूं कशाला जन्माला आलीस. एक मर्त्य














मानवावर तुझें प्रेम? आणि तें देखील बाबांना कळविल्याशिवाय? इतकें करून शेवटीं तूं त्याला सोडून निघून आलीस आणि हें सर्व पाप तूं इतके दिवस लपवून ठेवलें होतेंस काय? चालती हो आमच्या घरांतून." पण एवढ्यानें तुला तुझ्या पापाचें पुरें प्रायश्चित्त मिळणार नाहीं. तुझी चामडी लोळवून तुला उभी जाळल्याशिवाय माझ्या-मनाचें समाधान होणार नाहीं. नंतर तिनें तिला एका खांबाला बांधायला सांगितलें आपल्या दासींना. एक छडी आणायला सांगून तिनें तिला स्वतःच्या हातानें झोडपून काढलें. ती बेशुद्ध झाल्यावर तिला एका अंधार कोठडींत नेऊन टाकलें. तिनें आपल्या वडिलांच्या नांवीं एक पत्रपण पाठविलें. त्यांत तिनें आपल्या बहिणीच्या अपराधाचा उल्लेख करून तिला काय शिक्षा देण्याचें तिनें ठरविलें आहे हें देखील कळविलें. तिनें तें पत्र एका दूताच्या हातीं वडिलां-कडे पाठविलें.

पत्र वाचून म्हाताऱ्याच्या डोळ्यासमोर काळोखीच आली. पण त्यानें लिहून कळविलें कीं तुझ्या बहिणीनें जो अपराध केला आहे त्या अपराधाबद्दल जी शिक्षा द्यावी ती थोडीच ठरेल. तरी तुला योग्य वाटेल ती शिक्षा द्यावी.

हसनला शुद्ध आली त्यावेळीं आपण समुद्रकाठीं असल्याचें त्याला कळलें. प्रेमिकेला भेटण्याची होती नव्हती ती आशा देखील नाहींशी झाली. स्वतःचा जीव वांचवून परत स्वदेशीं जाण्याचा विचार त्याच्या मनांत आलाच नाहीं. श्रमिष्ठा सारखा उठून तो पाय नेतील तिकडे जाऊं लागला. चालत असतां त्याच्या मनांत निरनिराळ्या प्रकारचे विचार येऊं लागले. मला समु-द्राच्या काठीं कोणी आणून टाकलें? बायकोला मी पाहिलें खरें, पण ती आतां कोठें बरें असेल? तिची भेट पुन्हां होईल का?

कांहीं अंतरावर त्याला दोन मुली एका टोपीसाठीं भांडत असलेल्या दिसल्या. त्या टोपीवर कांहीं तरी लिहिलेलें होतें. त्यानें त्यांना विचारलें—"कां भांडतां कां?" प्रत्येकीनें ती टोपी तिला मिळाल्याचें सांगितलें.

हसन म्हणाला—"मी एक दगड फेंकतो. जी पहिल्यानें दगड आणून देईल तिला मी ही टोपी देईन." दोघींनीं तें कबूल केलें.

हसननें एक दगड दूर फेंकला. दोघी तो आणायला धांवल्या. एक जणीला तो दगड मिळाला. ती धांवत परत आली. पण तिला तेथें हसन दिसला नाहीं. दुसरी पण परत आली. तिला देखील हसन दिसला नाहीं. दोघी चकित होऊन हसन कोठें आहे हें पाहूं लागल्या. हसनला त्याचें आश्चर्य वाटलें व टोपी घातल्या मुळें आपण त्यांना दिसत नाहीं हें देखील त्याला कळलें. तो ओरडून म्हणाला—"इकडे तिकडे काय बघतां, हा पहा मी येथें आहें."





ज्या बाजूनें आवाज आला त्या बाजूला दोघी पाहूं लागल्या. पण तिकडे तर कोणीच दिसेना. त्या घाबरल्या.

हसननें जवळ जाऊन त्यांना विचारलें—"या इकडे या! अशा रडतां काय?" हें ऐकून पण त्या जास्तच घाबरल्या व तेथून पळून गेल्या.

ती जादूची टोपी असल्याचें हसनला कळलें. त्याला फार आनंद झाला. आतां लपून गांवांत जातां येईल. आपल्याला कोणी ओळखणार नाहीं. असा विचार करून तो गांवांत गेला आणि ती म्हातारी कोठें दिसते का पाहूं लागला. एका जागीं खोलींत म्हातारीला कोणी तरी बांधून ठेवलें होतें. तें त्यानें पाहिलें. तो कोणाला दिसत नाहीं ह्याची खातरी करून घेण्यासाठीं त्यानें त्या खोलींतली दोन तीन भांडीं उचलून जमिनीवर पाडली. जवळ कोणी मनुष्य नाहीं. पण भांडीमात्र पडत असलेली पाहून म्हातारीला भीति वाटली. ती 'भूत भूत' म्हणून ओरडूं लागली.

"मी हसन आहें. तुला सोडवायला आलों आहें!" असें म्हणत हसननें डोक्यावरची टोपी काढली.

"अरे हसन! तूं कशाला आलास इकडे? तुला धरून आणण्यासाठीं थोरल्या राजकन्येनें शिपाई पाठविले आहेत. निघून जा कोठें तरी!" असें सांगून त्याच्या बायकोला तुरुंगांत टाकल्याचें देखील तिनें सांगितलें.

"आतां भिण्याचें कांहीं कारण नाहीं. मी तुला व माझ्या बायकोला सोडविण्यासाठीं आलों आहें. पहा ही टोपी." असें सांगून हसननें ती जादूची टोपी दाखविली.

टोपी पाहून म्हातारीला आश्चर्य वाटलें व आनंद पण झाला. म्हणाली—"तर मग लवकर ये. मला सोडव. मी तुझी बायको कोठें आहे हें दाखवितें."

त्याप्रमाणें हसननें तिला सोडविलें. डोक्यावर टोपी ठेवून हसननें म्हातारीचा हात धरला. त्याबरोबर ती देखील अदृश्य झाली. नंतर दोघें हसनच्या बायकोला कोंडून ठेवलें होतें त्या खोलीजवळ गेलीं.

वाटेंत म्हातारीनें थोरल्या राजकन्येनें हसनच्या बायकोवर मारहाण करून तिला कसें तुरुंगांत टाकलें व स्वतः म्हातारीला पण कसें बांधून ठेवलें, हें सांगितलें.

हसनची बायको ज्या खोलींत होती त्या खोली बाहेरचे पाहरेकरी हसनचा आवाज ऐकून घाबरून गेले. हसननें दरडावून त्यांच्याकडून किल्ल्या काढून घेतल्या. अदृश्य माणसाला बोलतांना ऐकून व त्याला भूत समजून पाहारेकऱ्यांनीं किल्ल्या काढून दिल्या व 'भूत' 'भूत' म्हणून ओरडत पळून गेले.

हसन म्हातारीबरोबर खोलींत गेला व बायकोला भेटला. दोघांना अपार आनंद झाला. गंधर्व राजकन्येला आश्चर्य वाटलें. तिनें विचारलें—"तूं आलास कसा?



जमिनींतून कीं आकाशांतून? तूं निघून जा लवकर. माझ्या वहिणीनें तुला हुडकून काढण्यासाठीं आपल्या सैनिकांना पाठविलें आहे. मला ती जिवंत सोडणार नाहीं. निदान तूं तरी निसटून निघून गेलास तर वांचशील!"

"अग वेडे! मी तुला सुद्धां सोडवून बगदादला घेऊन जाण्यासाठीं आलों आहें. ही पहा टोपी!" असें सांगून त्यानें टोपी डोक्याला घातली. त्याबरोबर तो अदृश्य झाला. टोपी काढल्याबरोबर तो दिसूं लागला. तें पाहून राजकन्या चकितच

झाली. म्हणाली—"माझ्या चुकीमुळें तुला व सर्वांना किती त्रास झाला!"

"मी तुला सोडून आपल्या बहिणींना भेटायला गेलों ही माझीच चूक!" हसन म्हणाला.

नंतर हसननें टोपी घातली व बायकोचा हात धरला. तिनें म्हातारीचा हात धरला. तिघें अदृश्यपणें थोरल्या राजकन्येच्या महालाबाहेर निघून आलीं. हसनच्या बायकोनें आपल्या दोघां मुलांना एका जागीं लपवून ठेवलें होतें. तेथें पोचल्यावर आपल्या त्या दोघां मुलांना पाहून हसनला आनंद झाला.

म्हातारीनें दोघां मुलांना खांद्यावर बसवून घेतलें. हसनची बायको अदृश्यपणें पक्ष्यांचीं तीन वस्त्रें घेऊन आली. तिघांनीं तीं वस्त्रें घातलीं व आकाशमार्गें सर्व बगदादला येऊन पोचलीं. हसनबरोबर त्याची बायको व नातेवाईक आलेली पाहून आनंदातिरेकानें हसनची म्हातारी आई बेशुद्ध होऊन पडली.

हसननें व त्याच्या बायकोनें दोघांची सेवाशुश्रूषा केली. ती शुद्धी वर आल्यावर राजकन्येनें आपल्या चुकीबद्दल तिची माफी मागितली. पुढें गंधर्व राजकन्येच्या सहवासांत हसनचा संसार सुखाचा झाला.

हसनच्या दोघां मुलांना खेळविण्यांत म्हाताऱ्या सेनानायिकेचा काळ आनंदानें जाऊं लागला. ती आपल्या मालकिणीला सुखी पाहून स्वतःला सुखी मानूं लागली. म्हाताऱ्या गंधर्वराजाला या सर्वांची कल्पना काय असणार? पण तो आपल्या लाडक्या लेकीच्या विरहानें आजारी पडला व त्यांतच त्याचा मृत्यु पण झाला. [संपूर्ण]





# चाणक्याची गोष्ट

चणक गांवांत चणक नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याच्या बायकोचें नांव चणकेश्वरी होतें. त्यांच्या मुलाचें नांव चाणक्य हाच तो प्रसिद्ध चाणक्य.

चाणक्याला जन्मतःच सर्व दांत होते. असें म्हणतात कीं जन्मतः दांत असलेला राजा होतो. त्याच्या पित्याचा मानसिक कल इहलौकिकापेक्षां पारलौकिकाकडे जास्त होता. आपला मुलगा ऐहिक सुखांत राहिला तर पारलौकिकाकडे दुर्लक्ष करील, म्हणून त्यानें मुलाचे सर्व दांत काढून टाकले. हें ऐकून कांहीं वृद्ध मुनि म्हणूं लागले कीं हा मुलगा अप्रत्यक्षपणें राज्य चालवील.

चाणक्य फार प्रखर बुद्धीचा होता. तो सर्व शास्त्रांत पारंगत झाला. विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर त्याचें लग्न झालें.

एकदां त्याची आई माहेरी गेली होती. तिच्या भावाचें लग्न असल्यामुळें तिच्या इतर बहिणी व नातेवाईक मंडळी जमली होती. तेथें ही निर्धन ब्राह्मणाची बायको म्हणून सर्वांनीं तिची चेष्टा केली. तिचा अपमान केला. घरीं आल्यावर ही गोष्ट चाणक्याला कळली. म्हणून तो धन मिळवण्यासाठीं घराच्या बाहेर पडला.

चाणक्यानें ऐकलें होतें कीं पाटलीपुत्र येथें राजा नंद हा ब्राह्मणांचा योग्य आदर सत्कार करतो. म्हणून तो त्याच्या दरबारीं गेला. तेथें एक जागा रिकामी आहे असें पाहून तो त्या जागेवर जाऊन बसला. ती जागा म्हणजे सिंहासनच होतें. सेवकांनीं त्याला त्या जागेवरून उठावयास सांगितलें. पण त्यानें त्याकडे लक्ष न देतां

सौ. रमाबाई सोहनी



आपलें कमंडलू, सोटा, रुद्राक्षाची माळ अशा एक एक वस्तु काढून त्या आसनावर ठेविल्या. हें त्याचें वागणें सेवकांना न आवडून त्यांनीं त्याला धक्का मारून त्या आसनावरून खालीं ओढलें. ह्या गोष्टींचा अपमान वाटून तेथल्या तेथें त्यानें प्रतिज्ञा केली कीं 'मी नंदाचें राज्य नष्ट करीन' आणि तो राजधानी सोडून निघून गेला.

ज्योतिष्यानीं चाणक्याविषयीं सांगितलेंच होतें कीं तो अपरोक्ष राहून राज्य करील. आतां तो राज्य करण्यास योग्य अशा व्यक्तीच्या शोधार्थ निघाला. हिंडतां हिंडतां तो मोरांच्या राज्यांत गेला. तेथील मुख्य अधिकाऱ्याच्या मुलीला डोहाळे लागले होते आणि तिला चंद्राला पिऊन टाकावेंसें वाटूं लागलें होतें. ही गोष्ट चाणक्याला कळली. तेव्हां तो म्हणाला—"एका अटीवर मी तिची इच्छा पूर्ण करतो. हिला जो मुलगा होईल त्याच्या शिक्षणाची जबाबदारी माझ्यावर राहील." मुख्य अधिकाऱ्यानें व त्याच्या बायकोनें चाणक्याचें म्हणणें कबूल केलें.

चाणक्यानें एका बागेंत एक झोपडी बांधवली आणि तिच्या छपराला एक गोल चंद्राप्रमाणें भोंक ठेवलें. आणि तेथेंच एक दुधाची झारी भरून ठेविली. नंतर रात्रीं चांदणें पडल्यावर त्यानें त्या मुलीला बोलवून त्या भोंकांतून चंद्र दाखविला व म्हणाला—"पिऊन टाक त्याला."

ती मुलगी उंचावर उभी राहून त्या भोंकाशीं तोंड नेऊन पिऊं लागली तों खरोखरच तिच्या तोंडांत दूध पडलें आणि तो दिसत असलेला चंद्र नाहींसा झाला. म्हणजे वरून एका माणसानें बसून ते भोंक हळूं हळूं बंद केलें. त्या मुलीचें समाधान



झालें. पुढें त्या मुलीला जो मुलगा झाला त्याचें नांव चंद्रगुप्त ठेविलें.

त्या नंतर चाणक्य पैसे मिळविण्यासाठीं निघून गेला. व कांहीं वर्षांनीं तो पुन्हां त्या गांवांत परत आला. गांवाच्या वेशी-जवळ त्याला कांहीं मुलें खेळतांना दिसलीं. त्यांतील एक राजा झाला होता. तो खरोखरच राजबिंडा दिसत होता आणि त्याचें वागणें देखील राजसी थाटाचेंच होतें. चाणक्याला तो मुलगा फार आवडला. पण त्याची परीक्षा पाहावी म्हणून त्यानें त्या लुटुपुटीच्या राजाजवळ दान मागितलें.

"तो पहा समोर गाईंचा कळप दिसत आहे ना? तो तुम्हीं घेऊन जा. मी तो तुम्हांला दिला आहे, म्हणून सांगितलेंत तर तुम्हांला कोणी अडवणार नाहीं." तो बालक म्हणाला.

चाणक्य त्या मुलावर खूश झाला. चौकशी करतां तो चंद्रगुप्तच आहे असें त्याला समजलें. तो त्या बालकाला म्हणाला—"अरे, तूं एवढा मोठा राजा आहेस, मग तुला राज्य नको का? चल मी तुला खरोखरचें राज्य मिळवून देतो." आणि तो चंद्रगुप्ताला आपल्या बरोबर घेऊन गेला.



त्या नंतर थोड्याच दिवसांत चाणक्यानें थोडें सैन्य जमविलें आणि पाटलीपुत्रावर हल्ला चढविला. राजाच्या सैन्यानें हा हल्ला परतवून लाविला. चाणक्याचें सैन्य सैरावैरा पळूं लागलें. नंदाच्या सैन्यानें त्याचा पाठलाग केला. चाणक्याची, चंद्रगुप्ताची व सैन्याची तातातूट झाली. एक सैनिक ह्या दोघांच्या पाठीस लागला. बरेच दूर गेल्यावर त्यांना एक तळें दिसलें. त्या बरोबर चाणक्य संन्याशासारखा एका झाडाखालीं बसला व चंद्रगुप्ताला पाण्यांत जाण्यास सांगितलें. चाणक्याची आज्ञा होतांच तो

पाण्यांत उतरला. एवढ्यांत पाठलाग करणारा सैनिक तेथें आला व त्यानें चाणक्याला विचारलें कीं येथून कोणी शिपाई पळत गेला का ? चाणक्यानें चंद्रगुप्ताकडे बोट दाखविलें.

सैनिक घोड्यावरून उतरला. तलवार खालीं ठेविली आणि पाण्यांत उतरण्यासाठीं कपडे काढूं लागला. प्रथम त्यानें शिरस्त्राण काढलें. नंतर चिलखत काढलें. तेवढ्यांत चाणक्यानें त्याची तलवार उचलली व त्या शिपायाचें डोकें उडविलें. नंतर त्याच्याच घोड्यावर बसून ते दोघे पसार झाले.

"मी तुला पाण्यांत जाण्यास सांगितलें. तेव्हां तुला काय वाटलें रे ?" चाणक्यानें विचारलें.

"गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानून मी पाण्यांत उडी मारली." तें उत्तर ऐकून चाणक्याच्या मनाचें समाधान झालें. हा आज्ञाकारी सेवक आहे. ह्यालाच हाताशीं धरल्यास कार्यसिद्धि होईल.

घोड्यावरून पळून जात असतां आणखी एक स्वार त्यांचा पाठलाग करीत आला. ह्या वेळीं त्याला एक धोबी तळ्यांत कपडे धूत असलेला दिसला. चाणक्य त्याला म्हणाला—"राजानें रागावून सर्व धोब्यांना पकडण्यासाठीं सैनिकांना सोडलें आहे. जा पळ लवकर. त्याबरोबर धोबी कपडे जागच्या जागीं टाकून निघून गेला. चाणक्यानें चंद्रगुप्ताला पाण्यांत उतरण्यास सांगून स्वतः कपडे धुण्यास सुरवात केली व पहिल्या सैनिकाप्रमाणेंच ह्या सैनिकाचा देखील समाचार घेतला.

दोघे पुन्हां घोड्यावर बसून पळून गेले. संध्याकाळीं ते एका गांवांत आले. तेथें कोठें जेवणखाणाची व्यवस्था होते का म्हणून पाहांत हिंडू लागले. एक घरापाशीं चाणक्यानें ऐकलें, "तुझी सुद्धां त्या चाणक्यासारखीच गत झाली आहे, बघ."

चाणक्याला ह्याचा उलगडा न झाल्यानें तो आंत शिरला व म्हातारीला त्याचा अर्थ विचारला. ती म्हणाली—"नाहींतर काय ! माझ्या नातवाला मधला कढत कढत भात खायची कशाला घाई ? बाजूबाजूनें निवत चाललेला नाहीं खाऊं ? त्या चाणक्यानें कशी घाई करून प्रथम राजधानीवरच स्वारी केली ? अगोदर सभोवारचे मुलख जिंकून मग राजधानीकडे वळला असता तर ? हें कसें समजलें नाहीं त्याला ?"







प्रखर बुद्धीच्या चाणक्याला उमज पडायला वेळ लागला नाहीं. तो डोंगराळ प्रदेशांत गेला. तेथील पर्वतक राजाशीं मैत्री केली. दोघांनीं मिळून नन्दाचा पराभव करून अर्धें अर्धें राज्य वांटून घेण्याचें ठरविलें. ह्याप्रमाणें दोघांनीं सैन्यें जमा करून नंदाच्या राज्यावर स्वारी केली. तरी एक गांव देखील त्यांच्या हातीं आलें नाहीं. ह्याचें कारण जाणण्यासाठीं चाणक्यानें त्रिदण्डी संन्याशाचा वेष घेतला व गांवांत गेला.

तेथें त्याला समजलें कीं त्या गांवांत सप्तमातृकालयांतील सात देवी त्या नगराचें रक्षण करीत असतात. तरी देखील सैन्याचा वेढा पडल्यामुळें लोक अगदीं कंटाळून गेले आहेत. एका संन्याशाला नगरांत आलेले पाहून प्रतिष्ठित लोकांनीं त्याला विचारलें— "महाराज, हा वेढा केव्हां उठेल ?" "जेव्हां सप्तमातृका देऊळ सोडून जातील तेव्हां." चाणक्यानें उत्तर दिलें. नागरिकांनीं त्याच्या सांगण्यावर विश्वास करून देवळांतून मूर्ती हालविल्या. चाणक्यानें आपल्या योजनेची पूर्व सूचना चंद्रगुप्ताला दिलेली होतीच. चाणक्याचा इशारा होतांच चंद्रगुप्तानें सैन्य माघारी घेण्यास सुरवात केली. वेढा उठल्याचें पाहून नागरिकांना बरें वाटलें. त्यांनीं आनंदोत्सव करण्यास सुरवत केली. अशा स्थितींत चाणक्यानें पुन्हां हल्ला चढवून तें नगर काबीज केलें.

नंतर त्यानें बाजूबाजूचे प्रदेश प्रथम काबीज करून मग पाटलीपुत्रावर हल्ला केला ह्या वेळीं मात्र नंदाचा पराभव झाला. चाणक्यानें नंदाला जिवंत पकडलें आणि सोडून देऊन राज्याच्या बाहेर निघून जाण्यास सांगितलें. जातांना एका रथांत जेवढी संपत्ति नेतां येईल तेवढी नेण्याची त्याला परवानगी दिली.

नंदानें थोडी धन संपत्ति रथांत घातली आणि आपल्या दोघी राण्या व एक कन्या यांसह बाहेर पडला.

वाटेंत त्याला चंद्रगुप्त भेटला. त्याला पाहातांच नंदाची मुलगी दुर्धरा त्याच्यावर मोहित झाली. तिची ती अवस्था पाहून नंदानें तिला चंद्रगुप्ताकडे जाण्याची परवानगी दिली. ती आपल्या रथांतून उतरून चंद्र-गुप्ताकडे गेली व रथांत बसूं लागली. तेवढ्यांत त्या रथाच्या चाकाचे नऊ तुकडे झाले. हा अपशकून समजून चंद्रगुप्त तिचा स्वीकार करण्यास तयार होईना. तेव्हां चाणक्य म्हणाला—"हा अपशकुन नव्हे, हें शुभसूचक आहे. ह्याचा अर्थ तुमचा वंश नऊ पिढ्या-पर्यंत राज्यावर राहील.

ह्यानंतर चंद्रगुप्तानें राजवाडा ताब्यांत घेतला. ठरलेल्या करारा प्रमाणें पर्वतक व चंद्रगुप्त यांनीं अर्धी अर्धी संपत्ति वांटून घेतली आणि राज्याचेंहि दोन भाग करून अर्धे अर्धे वाटून घेतले.

नंदाच्या दासी मध्यें एक दासी फार मोहक होती. पर्वतकची दृष्टि तिच्यावर गेली व त्यानें तिला मागून घेतलें. तिच्याशीं लग्न करण्याच्या इच्छेनें त्यानें अग्नि समक्ष तिचा हात धरला. पण दुर्दैव बिचाऱ्याचें. ती मुलगी विषकन्या होती. तिचा हात हातांत धरतांच तिच्या घामांतील विषामुळें तो तत्काळ मरण पावला.

अशा तऱ्हेनें पर्वतकाला दिलेलें अर्धें राज्य सुद्धां चंद्रगुप्ताला मिळालें.

चाणक्यानें स्वत: गादीवर बसल्या-शिवाय राज्यकार भार चालविला. चंद्रगुप्तानें गुरूच्या आज्ञेबाहेर कधीं कांहीं केलें नाहीं.

[पुढील अंकी समाप्त]





# किष्किंधाकांड

वालीच्या मरणाचें दु:ख असह्य होऊन तारा विलाप करूं लागली. रामाकडे पाहून ती म्हणाली—"रामा, ज्या बाणानें तूं वालीला परलोकीं पाठविलेंस त्या बाणानें मलाहि त्याच्याकडे पाठीव. तो माझी तेथें वाट पाहात असेल. रामा तूं ज्याप्रमाणें सीतेच्या विरहानें विव्हळ झाला आहेस त्याप्रमाणें वालीला देखील विरहदु:ख नाहीं का होणार? आतां मी केवळ प्रेत-वतच आहें म्हणून मला मारल्यानें तुला स्त्री-हत्येचें पाप लागणार नाहीं."

ह्याप्रमाणें विलाप करीत असलेल्या तारेचें रामानें सांत्वन केलें. नंतर सुग्रीवाला शांत करून वालीच्या उत्तरक्रियेची त्याला आठवण करून दिली, व क्रियाकर्म करण्याची सर्व जबाबदारी त्यानें लक्ष्मणावर टाकली.

लक्ष्मणानें वानरांच्या मदतीनें पालखी आणविली. नंतर अंगद व सुग्रीवानें मिळून त्याला पालखींत ठेविलें व नदीकिनाऱ्यावर नेलें. त्याच्या पाठोपाठ त्याच्या सर्व स्त्रिया पण चालल्या होत्या. नदीच्या काठावर चांगलीशी जागा पाहून चिता रचली. त्यांवर वालीला ठेविलें आणि अंगदानें विधिवत त्याला अग्नि दिला.

तदनंतर हनुमान रामाला म्हणाला—"आपण आतां किष्किंधानगरांत यावें



आणि सुग्रीवाचा राज्याभिषेक करावा."

"हनुमाना, वडिलांच्या आज्ञेमुळें मी शहरांत जाऊं शकत नाहीं. चौदा वर्षें मला हें व्रत पाळावयाचें आहे. ह्यासाठीं तुम्ही सर्व मिळून त्या सर्वांना किष्किधेंत घेऊन जा, तेथें यथाविधि सुग्रीवाचा राज्याभिषेक करा व अंगदालाहि युवराज पदाचा अभिषेक करा. होय, अंगदाच्या बापाची तशी इच्छा आहे. आतां पावसाळा सुरूं होत आहे. तोपर्यंत आम्ही ऋष्यमूक पर्वतावर एकाद्या गुहेंत राहातों. पावसाळा संपताच सीतेच्या शोधाच्या तयारीला लागण्याची सुग्रीवाला आठवण करून द्या."

रामाच्या आज्ञेप्रमाणें किष्किधा नगरांत मोठ्या थाटानें सुग्रीवाचा राज्याभिषेक झाला. त्यावेळीं हनुमान, जाम्बुवान, नलनील वगैरेंनीं सोन्याच्या कलशांतून सप्त नद्यांचें पाणी आणून त्याला अभिषेक केला. नंतर सुग्रीवानें अंगदाचाहि युवराज्याभिषेक मोठ्या आनंदोत्साहानें केला.

तदनंतर सुग्रीव रामलक्ष्मणाकडे गेला. त्यांना राज्याभिषेकाचा सोहाळा कसा आनंदानें व उत्साहानें पार पडला त्याचें वर्णन करून सांगितलें. प्रजेनें नव्या राजाचें कसें स्वागत केलें वगैर सर्व गोष्टी निवेदन केल्या. मग रामाचा आशीर्वाद घेऊन तो किष्किधा नगरीस गेला आणि आपली बायको रुमा हिच्या सह सुखानें राहूं लागला.

सुग्रीवाचा निरोप घेऊन राम लक्ष्मण प्रस्तुण पर्वतावर गेले. त्या पर्वतावर पुष्कळ गुहा होत्या. त्यांतील विशाल व सोईची अशी एक गुहा पाहून ते दोघे तेथें राहूं लागले. त्या गुहेजवळूनच एक नदी वाहात होती. पर्वताच्या उंचसखल प्रदेशावर नाना तऱ्हेचीं फळें फुलें असलेले वृक्ष पसरलेले होते. जिकडे तिकडे हिरवळ पसरली होती. चारी बाजूची वनश्री फार आल्हादकारक वाटत होती. रामानें पावसाळ्याचे चार महिने, ह्याच पर्वतावर घालविले.

वर्षाऋतु संपत आल्यावर राम सुग्रीवाची वाट पाहूं लागला. कारण ठरल्याप्रमाणें आतां सुग्रीव सीतेच्या शोधार्थ रामाला मदत करण्यासाठीं येणार होता. पण अजून कांहीं तशी चिन्हें दिसली नाहींत.

वर्षाकाल संपून शीतकालाला सुरवात झाली. तरी सुग्रीवाकडून कांहीं बातमी नाहीं, निरोप नाहीं, कांहीं नाहीं. दिवसे दिवस राम निराश होत चालला. लक्ष्मण त्याला धीर देई, परंतु रामाच्या मनाचें समाधान होत नसे.

इकडे सुग्रीव आपली बायको रुमा व वालीची बायको तारा ह्यांच्या सह आपले दिवस भोग विलासांत घालवीत होता. राज्यकारभाराचें काम सुद्धां त्यानें मंत्र्यावर सोपविलें होतें. मग रामाच्या कामाची त्याला कोठून आठवण राहाणार? तो ती गोष्ट पार विसरूनच गेला.

मारुतीला सुग्रीवाच्या जबाबदारीची कल्पना होती. तो सुग्रीवाला म्हणाला—



"सुग्रीवा, तुला राज्य मिळालें आहे. तुझ्या शत्रूचें दमन झालें आहे. तुझ्या राज्यांत सर्वत्र शांतता नांदत आहे. परंतु तुझ्यावर एक मोठी जबाबदारी आहे आणि ती तूं विसरला आहेस. रामाला मदत करण्याचें तूं वचन दिलें आहेस आणि त्या कर्तव्याला जागणें तुझें कर्तव्य आहे. राम तुझ्या मदतीची वाट पाहात आहे. त्यानें अजून सूचना दिली नाहीं. पण मला वाटतें त्याच्या कडून सूचना येण्याची वाट पाहाणें लज्जास्पद आहे. आपण आपल्या शब्दाला जागलें पाहिजे त्यांतच चांगूलपण आहे."



चांदोबा



हनुमानानें सुचविल्याबरोबर सुग्रीवानें नीलाला बोलावून सर्व सैन्य सज्ज करण्यास सांगितलें. नंतर अंगद व नलाला बोलावून जांबवान आदि बलाढ्य वानरांना आपापल्या सेनेसह बोलावून आणण्यास सांगितलें.

इकडे शरद ऋतु अर्धा होऊन गेला तरी सुग्रीवाचा पत्ता नाहीं म्हणून राम चिंतित होता. एक दिवस लक्ष्मण नित्याप्रमाणें सकाळीं उठून रानांतून फळें फुलें घेऊन आला तो राम अत्यंत दुःखी होऊन बसल्याचें त्यानें पाहिलें. त्यालाहि वाईट वाटलें तरी त्यानें रामाला धैर्य धरून कर्तव्य करण्याविषयीं चार गोष्टी सांगितल्या. त्यावर राम म्हणाला "लक्ष्मणा, इतके दिवस कसे तरी दुःखानें घालविले. परंतु आतां हें दुःख असह्य झालें आहे. चार महीने होऊन गेले तरी अजून सुग्रीवाचा पत्ता नाहीं. त्याचें काम झालें. तो निर्भय झाला. आतां त्याला आपल्या शब्दाची आठवण नाहीं. त्याला वाटत असेल राम काय बापानें हांकलून दिलेला राज्यभ्रष्ट राजकुमार आहे. रानोमाळ हिंडतो आहे. त्यांतून त्याच्या बायकोला रावण पळवून घेऊन गेला आहे. त्याची काय पर्वा करायची? पण मी ज्याप्रमाणें वालीला मारून टाकलें त्याप्रमाणें सुग्रीवाला सुद्धां मारून टाकीन. एवढेंच नव्हें तर त्याला निर्वंश करून टाकीन. लक्ष्मणा, तूं सुग्रीवाकडे जा आणि त्याला आपल्या वचनाची जाणीव करून दे. त्याला सांग कीं जो आपलें वचन पाळत नाहीं, जो प्रत्युपकार करीत नाहीं. अशा प्राण्यांच्या शवाला कावळे किंवा गिधाडें सुद्धां शिवत नाहींत. जा! लक्ष्मणा, तूं किष्किंधेला जाऊन तुला योग्य वाटेल त्याप्रमाणें सुग्रीवाला त्याच्या वचनाची आठवण करून दे."



"तूंच त्याला राज्य मिळवून दिलेंस, तूंच त्याची बायको त्याला परत मिळवून दिलीस, तरी सुद्धां तो तुला कसा विसरला? आतां अगदीं भोगविलासांत मग्न होऊन सर्व कांहीं विसरून गेला आहे. असल्या राजाला खरें पाहतां राज्यावरून हुसकावून लावलें पाहिजे. त्याची गय करून चालणार नाहीं. मी त्याला वालीच्या मार्गालाच लावतों. आपल्या कामाला अंगद व इतर सर्व थोर थोर वानरें आहेतच." असें म्हणत धनुष्यबाण उचलून लक्ष्मण तावातावानें बाहेर पडला.

"लक्ष्मणा! तुला क्रोध जरा जास्त आहे. तेव्हा रागांत जाऊन तूं एकादवेळेस मित्रवधसुद्धां करशील. पण तसें करूं नकोस. अरे, विलंब एवढाच त्याचा अपराध आहे. त्यासाठीं त्याला मृत्युदण्ड देणें ठीक नाहीं. तूं त्याला नीट समजावून सांग" रामानें लक्ष्मणाला शांत करीत म्हटलें.

रामानें लक्ष्मणाला शांत जरी केलें तरी त्याचा राग कमी झालेला नव्हता. तो रागारागानेंच किष्किंधानगरीस गेला. त्याचे लाल लाल डोळे पाहून तेथील



वानरांना वाटलें कीं शत्रूच आला आहे. म्हणून तीं त्याला मारण्यासाठीं मोठ मोठीं झाडें उपटूं लागलीं. पण लक्ष्मणानें त्यांच्याकडे रागारागानें पाहतांच तीं सर्व त्याला भिऊन पळून गेलीं. तेवढ्यांत कांहीं वानरांनीं जाऊन सुग्रीवाला सूचना दिली. पण ताराशीं विलास करण्यांत गर्क झालेल्या सुग्रीवानें त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें.

सुग्रीवाच्या मंत्र्यांनाहि लक्ष्मण येत असल्याची खबर मिळाली. म्हणून अंगदाला पुढें करून ते त्याला सामोरे जाण्यास निघाले. खरोखरच लक्ष्मण येत असलेला



त्यांना दिसला. तो क्रोधानें लाल झालेला होता. अंगदाला पाहून तो म्हणाला—
"अंगदा, सुग्रीवाला सांग कीं मी त्याची भेट घेण्यास आलो आहे."

अंगद भीतभीतच सुग्रीवाकडे गेला. प्रथम माता तारा व नंतर सुग्रीव दोघांना वंदन करून त्यांना लक्ष्मणाचा निरोप सांगितला. त्यावेळी सुद्धां सुग्रीव धुंदींतच होता. त्यामुळें त्यानें अंगदाच्या बोलण्या-कडे लक्ष दिलें नाहीं. परंतु थोड्याच वेळांत बाहेर आरडा ओरड सुरू झाली. ती ऐकून मात्र सुग्रीव खाडकन सावध झाला.



अंगद, प्लक्ष आणि प्रभाव नांवाच्या सुग्रीवाच्या मंत्र्यांबरोबर पुन्हां सुग्रीवाची भेट घेण्यासाठीं गेला. यावेळीं त्याची धुंदी थोडी कमी झालेली दिसली. अंगदानें जेव्हां सांगितलें कीं लक्ष्मण भेटावयास आला आहे तेव्हां त्याला वाटलें कीं तो कांहीं रिकाम्या हातानें आला नसणार आणि त्यांतून तो रागावलेला आहे. म्हणजे नक्कीच तो धनुष्यबाण घेऊन आला असणार. म्हणजे आतां कांहीं त्याची धडगत नाहीं. तेव्हां तो आपल्या मंत्र्यांना म्हणाला—
"माझ्या हातून कांहींहि अपराध झाला नसतांना हा लक्ष्मण माझ्यावर कां रागावला आहे? माझी चाहाडी तर कोणी त्याच्याशीं केली नसेल? कांहींहि करून त्याच्या रागाचें कारण ओळखून काढलें पाहिजे. मला रामलक्ष्मणांची भीति वाटते, असें नाहीं. पण मित्राच्या रागाचें कारण तर समजलें पाहिजे ना? रामाच्या उपकाराची परतफेड करणें मला तरी शक्य नाहीं."

सुग्रीवाचें हें बेफिकीर उत्तर मारुतीला मुळींच आवडलें नाहीं. तो म्हणाला—
"राजा, राम आपल्यावर रागावला असेल तर त्यांत काय चूक आहे? आपल्याला

आपल्या शब्दाची आठवण नाहीं. मग प्रायश्चित्त हें भोगलेंच पाहिजे. रामानें तुझ्यावर जे उपकार केले आहेत ते तूं विसरलास. आपल्या चांगुलपणामुळें रामानें आजवर गय केली. पण लक्षांत ठेव. जर का वेळेवर तूं आपल्या कर्तव्याला जागला नाहींस तर हें किष्किंधेचें राज्य, हें वैभव किंबहुना स्वतःचा प्राणदेखील गमावून बसशील. मला सांगावयाचें तें मी सांगितलें. पुढें तूं व तुझें नशीब."

एवढ्यांत लक्ष्मण सुग्रीवाच्या वाड्यांत येऊन पोहोंचला. सुग्रीवाला लक्ष्मण समोर येण्याची भीति वाटल्यानें त्यानें तारालाच पुढें पाठविलें.

"कोणाकडून अपराध घडला काय? क्षमा असावी." तारा म्हणाली.

"सुग्रीव सर्व कांहीं विसरून गेला आहेसें दिसतें." लक्ष्मण म्हणाला.

लक्ष्मणाचा क्रोध शांत करीत व त्याला आंतमध्यें बोलावून नेत तारा म्हणाली–"सुग्रीव आपलें कर्तव्य विसरला नाहीं. त्यानें निरनिराळ्या ठिकाणाहून आपापल्या सैन्या-सह मोठमोठ्या वानर राजांना बोलाविलें आहे. थोड्याच दिवसांत ते येतील."

आंत गेल्याबरोबर निशेंत चूर असलेला सुग्रीव त्याला दिसला. त्याबरोबर लक्ष्म-णाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. तो म्हणाला–"सुग्रीवा! तूं मित्राला फस-विलें आहेस. वालीची काय अवस्था झाली, माहीत आहे ना? तुला सुद्धां तोच रस्ता धरावा लागेल लक्षांत ठेव, नाहीं तर कामाला लाग."



# २०. इग्वाजचा धबधबा

इग्वाज नदी ब्राझीलच्या दक्षिण पठारावरून पश्चिमेकडून पूर्वेकडे वहात जाते व आठशें मैलांच्या प्रवासानंतर 'परना' नांवाच्या नदीला मिळते. ह्या नदीला अनेक धबधबे आहेत. त्यांत इग्वाज नांवाचा धबधबा सर्वांत मोठा असून अर्जेंटाईन ब्राझील प्रान्त सीमेपासून १२ मैलाच्या अंतरावर आहे.

ह्या पूर्वीच्या प्रवाहावर देखील नदीचे तीन चार धबधबे आहेत त्यामुळें आणखी एक प्रवाह होऊन तो पुन्हां मूळ प्रवाहास मिळतो. हा प्रवाह १८० फुटावरून खालीं पडतो. नदी एके ठिकाणीं ७६० फुटावरून खालीं उडी घेते.

पावसाळ्यांत ह्या धबधब्याची रुंदी १३००० फुटाहून देखील अधिक होते. तेव्हां जगांतील प्रसिद्ध नायगरा व व्हिक्टोरिया धबधबे ह्याच्या समोर अगदींच लहान वाटूं लागले तर त्यांत नवल काय?





# भारताचा इतिहास



देवगिरीच्या रामदेवराव यादव यानें लागोपाठ तीन वर्षें अल्लाउद्दिनाला खंडणी दिली नाहीं. एवढेंच नव्हें तर त्यानें अल्लाउद्दिनाच्या हातून पराभव झाल्यामुळें पळून आलेला गुजराथचा राजा रायकर्णदेव याला आश्रय दिला. म्हणून सन् १३०७च्या मार्च महिन्यांत सुल्तानानें देवगिरीवर स्वारी करण्यासाठीं मलिक काफूर याला पाठविलें. मलिक काफूर यानें देवगिरीच्या जवळपासचा प्रदेश लुटला व जाळपोळ केली. रामदेवराव यानें संधी करून घेण्याचें कबूल केलें. परंतु सुल्तानानें त्याला दिल्लीला बोलाविलें. तेथें त्याचा सर्व प्रकारें सत्कार केला आणि त्याच्याशीं संधी केली. या संधी प्रमाणें तो दिल्ली सुल्तानाचा एक मांडलिक झाला व त्यानें खंडणी द्यायचें कबूल केलें.

सन् १३०३ मध्यें अल्लाउद्दिनाचें काकतीय वंशी प्रतापरुद्र याच्याशीं युद्ध झालें व त्यांत त्याला अपयश मिळालें. म्हणून त्यानें १३०९ मध्यें मलिक काफूर याला स्वारी करण्यास पाठविलें. या स्वारीचा उद्देश्य काकतीयांचें राज्य जिंकून दिल्लीच्या साम्राज्याला जोडण्याचा नव्हता. तेथील धन व संपत्ति लुटण्याचा मुख्य हेतु होता. प्रतापरुद्रानें वरंगलच्या किल्ल्यांत राहून शत्रूला तोंड देण्याचा प्रयत्न केला. पण शेवटीं त्याला शत्रूसमोर हार मानावी लागली. १३१० मध्यें संधी करून तो मोकळा झाला. त्यानें सुल्तानाला १०० हत्ती १००० घोडे, अलोट संपत्ति व हिरे माणिक्यें वगैरे देऊन व खंडणी देण्याचें पण कबूल केलें.

हा विजय मिळाल्यानंतर सुल्तानाची नजर सुदूर दक्षिणेकडे वळली. तेथील प्राचीन देवालयांत असंख्य धनराशी होती. १८ नोव्हेंबर १३१० या रोजीं मलिक काफूर ख्वाजा हजील याच्या सह दिल्लीहून होयसळांच्या राज्यावर स्वारी करण्यासाठीं निघाला. त्यांचें सैन्य द्वारसमुद्र येथें येऊन पोंचलें. त्यावेळीं होयसळ राजा वीरवल्लाळ तृतीय हा युद्धाला तयार नव्हता. शत्रु दरवाज्यावर येऊन थडकलेला पाहून तो शत्रूनें मागितलें तेवढें धन देऊन त्यांच्याशीं संधी करण्यास तयार झाला. तरी शत्रूनें त्याला धरून नेलें व देवळें लुटलीं. होयसळ राजाच्या एका राजकुमाराला पण जामीन म्हणून ठेवून घेतलें.

द्वारसमुद्र येथें १२ दिवस वास करून मलिक काफूर आपलें सैन्य घेऊन पांड्य राज्याकडे वळला. पांड्य राज्यांत आपसांत फूट होती. त्याचा मलिक काफूर याला फायदा मिळाला. कुलशेखरपांड्य नांवाच्या राजाला सुंदरपांड्य व वीरपांड्य नांवाचे दोन मुलगे होते. सुंदरपांड्य हा गादीचा वारस होता. परंतु कुलशेखरपांड्य याचें वीरपांड्य याच्यावर जास्त प्रेम होतें म्हणून त्यानें त्यालाच आपल्या गादीचा वारस म्हणून नेमण्याचें ठरविलें. म्हणून सन् १३१०च्या



मे महिन्यांत सुंदरपांड्य यानें आपल्या बापाचा वध करून त्याची गादी बळकावण्याचा प्रयत्न केला. दोघां भावांचें युद्ध झालें. नोव्हेंबर महिन्यांत सुंदरपांड्य याचा पराभव झाला. म्हणून त्यानें मुसलमानांची मदत घेतली.

१४ एप्रिल १३११ रोजीं मलिक काफूरची सेना पांड्य राजांची राजधानी मदुरेवर चालून आली. मदुरा शहर सोडून वीरपांड्य पळून गेला. मुसलमानांनीं मदुरा शहर लुटलें. ५१२ हत्ती, ५००० घोडे, ५०० मण सोनें व हिरे माणिक्यें लुटलीं. तो दिल्ली

पोंचला त्यावेळीं त्याच्याबरोबर ६१२ हत्ती, २०,००० घोडे व ९६,००० मण सोनें व हिरेमाणिक्यें होतीं.

अशा तऱ्हेनें दक्षिणेकडचा एक मोठा भूभाग दिल्लीच्या साम्राज्यांत सामील झाला. दिल्ली साम्राज्याचा एवढा विस्तार करणाऱ्या अलाउद्दिनाच्या शासन व्यवस्थे-विषयीं कित्येक गोष्टी अभ्यास करण्या-सारख्या आहेत. त्याच्या राज्य व्यवस्थेंत मुल्ला व मौलवींना अधिकार नव्हता. त्यानें आपली राज्यव्यवस्था धर्मनिरपेक्ष ठेवली. त्याच्या कारकीर्दींत कित्येकांच्या श्रीमंतीला आळा बसला. त्यानें इनाम वगैरेंची जुनी व्यवस्था बंद करून टाकली. दारू, मादक द्रव्यें, जुगार, मेजवान्या वगैरे नियमविरूद्ध व निषिद्ध केल्या. त्यानें करवाढ केली. सोनें किंवा चांदी दोन्हींचा सांठा कायद्याविरुद्ध असल्याची घोषणा केली. त्यानें व्यापारवर निरनिराळ्या प्रकारचे प्रतिबंध लावले. वस्तुंच्या किमती व दर सरकार तर्फें ठरवले गेले. खरेदी विक्री लपून छपून करणाराला गुन्हेगार म्हणून कडक शिक्षा होई. खोटीं मापें किंवा वजनें वापरणाऱ्या व्यापाऱ्यांचें तेवढें मांस कापून घेतलें जावें अशी राजाज्ञा होती.

सन् १३१२ पर्यंत अलाउद्दिनाचा भाग्यसूर्य चढत होता. परंतु त्यानंतर त्याला उतरती कळा लागली. तो मलिक काफ़ूर याच्या हातचें बाहुलें होऊन बसला. तोच त्याचा सेनापति व मंत्री होता.

देशांत बंडाळी सुरू झाली. शेवटीं २ जानेवारी १३१६ रोजीं तो पैगंबरवासी झाला. दिल्ली येथें जुम्मा मशिदीसमोर त्याची कबर बनविण्यांत आली.





# हुशार खलाशी

ब्रह्मदेशांत मालाची वाहतूक करणाऱ्या जहाजांचा एक मालक होता. तो स्वतःला फार हुशार समजत असे. त्याचीं जहाजें ऐरावती नदींत मालाची नेआण करीत. तो प्रत्येक वेळीं नवीन खलाशी आपल्या जहाजावर नेमीत असे. जहाजावर असेपर्यंत त्यांची खाण्यापिण्याची तो व्यवस्था करी व खेप पुरी झाल्यावर मजूरी देतांना मजुरी कापून तरी देई किंवा मजुरांच्या कामांत कांहीं तरी दोष काढून त्यांना कामावरून कमी करी. त्यांना पगार मजूरी कांहीं देत नसे.

एकदां त्यानें एका जहाजावर कांहीं खलाशी नेमले. त्यांत एक डोंगराळ प्रदेशांत राहणारा खलाशी होता. तो दिसायला बावळट होता. तो इतर खलाशांमध्यें मिसळत देखील नसे. म्हणून मालक किती दुष्ट आहे हें त्याला माहीत नव्हतें.

जहाज दक्षिणेकडच्या एका बंदरांत उभें होतें. मालक नव्या खलाश्याला म्हणाला—“या दक्षिणेकडच्या प्रदेशांत कोंबड्या फार स्वस्त असतात. तूं दोन कोंबड्या विकत घेऊन चल. उत्तरेकडच्या प्रदेशांत त्यांची दुप्पट किंमत मिळेल. तुला खूप फायदा मिळेल.”

त्या बिचाऱ्यानें त्याच्या बोलण्यावर विश्वास करून दोन कोंबड्या विकत घेतल्या. तो रोज जहाजावरच्या सैंपाकघरांत जाऊन कण्या घेऊन येई व त्या कोंबड्यांना खायला घाली.

जहाज परत आल्यावर मालकानें त्याला बोलावलें व म्हणाला—“हें पहा, सफर



करीत असतां तुला खायला घालायची जबाबदारी माझी होती. पण तुझ्या कोंब-ड्यांना खायला घालायची जबाबदारी माझी नव्हती. म्हणून तुझ्या कोंबड्यांनीं जें कांहीं खाल्लें आहे त्याची किंमत मी लिहीत आलों आहे. तुला जितकी मजुरी मिळायला हवी, बरोबर तितकीच ती रकम आहे. म्हणून मी ती जमा करून घेतों. हिशोबाची फिट्टमफाट झाली. तो खलाशी कांहींच बोलला नाहीं.

इतर खलाशी मात्र म्हणाले–"जंगली तो जंगलीच!"

तो खलाशी घरीं गेला. त्यानें दोन खंजीर तयार करवले. पण ती गोष्ट कोणाला सांगितली नाहीं. मालकाजवळ जाऊन त्यानें विनंति केली कीं पुन्हां कामावर नेमा."

"बरा एक मूर्ख मिळाला आहे असा विचारकरून मालकानें त्याला कामावर नेमलें. जहाज निघालें. इतर खलाशी त्या रानटी खलाशाची थट्टा उडवीत होते–"कोंबडीचा नवीन जोडा विकत घ्यायला जाणार वाटतें."

"कोणास ठाऊक? पाहूं, या खेपेला झाला तर फायदाच होईल. माझ्या वडिलांनीं मला हा खंजीर मंत्रवून दिला आहे." असें सांगून खलाशानें दोन खंजीरांपैकीं फक्त एकच काढून दाखविला. दुसरा खंजीर त्यानें लपवून आपल्या कपड्यांत ठेवला होता.

दक्षिण प्रदेशांत पोंचेपर्यंत सर्व खलाशी त्याची थट्टा उडवीत होते. पण त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. एकानें विचारलें–"मंत्रवलेला खंजीर आहे म्हणतोस हा? काय आहे विशेष बात?"

"तें आतां मी काय सांगूं? पण खंजीर मंत्रवलेला आहे एवढें मला माहीत आहे!" खलाशी म्हणाला.



दक्षिणेकडचें काम संपल्यावर जहाज पुन्हां उत्तरेकडे निघालें. सर्व खलाशी त्या मंत्रवलेल्या खंजिराचा महिमा काय आहे सांग, म्हणून त्याला चिडवीत.

पण एका बंदरांत जहाज नांगर टाकून उभें असतां खलाश्यानें आपला खंजीर काढला आणि जहाजाच्या कठड्यावर तो पाजळवूं लागला. तें पाहून त्याचे साथी खलाशी पुन्हां वेडपट म्हणून त्याची थट्टा उडवूं लागले. तो उत्तर द्यायला म्हणून वळला आणि खंजीर हातांतून निसटून पाण्यांत पडला.

"मार उडी लवकर आणि खंजीर घेऊन ये आपला!" खलाशी मित्र म्हणाले.

"घाई कशाला? तो जातो कोठें पाहातों. तुमचा खंजीर द्या, मी खूण करून ठेवतों. जिथें पडला तेथेंच मिळेल." असें सांगून त्यानें एका खलाश्याच्या खंजिरानें कठड्या-वर खूण केली व म्हणाला–"या खुणेजवळ खालीं समुद्रांत तो सांपडेल."

"काय वेडचाळ लागलें आहे कीं काय? आपलें जहाज तर निघणार आहे आतां." खलाशी म्हणाले.



"त्यांत काय? जेथें जहाज जाईल तेथें खंजीर पण जाईल!" तो रानटी खलाशी म्हणाला.

वेडापीर आहे झालें! त्याच्याशीं काय बोलायचें असा विचार करून सर्व खलाशी आपापल्या कामावर निघून गेले.

मालकानें खंजिराची गोष्ट ऐकली व त्या रानटी खलाश्याला बोलावून म्हणाला–"चल तुझी व माझी पैज! उद्यां एका बंदरांत आपलें जहाज लागेल. तेथें जहाजा खालून तूं आपला खंजीर काढून दाखविलास तर मी आपलीं सर्व जहाजें तुला बक्षिस देईन.

नाहीं सांपडला तर तूं आयुष्यभर मजुरी-शिवाय माझ्याकडे काम केलें पाहिजेस.''

तो खलाशी म्हणाला—"मालक, तुम्ही उगाच पैज कशाला मारतां? फंसाल बघा! मी जेथें खूण करून ठेवली आहे तिच्या खालीं समुद्रांत खात्रीनें खंजीर मिळेल. म्हणून पैज मारण्याचा नाद सोडा!"

"हरकत नाहीं मी फंसलों तरी! जुगार खेळतांना पैज लावतोच कीं नाहीं मी, तशीच ही समज!" मालक म्हणाला. त्याला खलाश्यानें सावध केलें होतें तरी त्याला तो त्याचा मूर्खपणा वाटला.

"बरें तर आपली मर्जी!" असें सांगून तो गुपचुप आपलें काम करूं लागला.

दुसऱ्या दिवशीं एका बंदरांत जहाज लागलें. मालकानें खलाश्याला बोलावून खंजीर काढून आणायला सांगितलें.

त्या खलाश्यानें काठड्यावर जेथें खूण केली होती बरोबर तेथून पाण्यांत बुडी मारली. खोल पाण्यांत गेल्यावर त्यानें कपड्यांत लपवून ठेवलेला खंजीर काढला व तो घेऊन पाण्याबाहेर आला आणि म्हणाला—"हा पहा खंजीर!"

सर्व खलाशी मालक पैज हारल्याचें पाहून चकित झाले. मालकाला कांहींच सुचेना. वचन दिल्याप्रमाणें त्याला आपलीं सर्व जहाजें खंजीरवाल्या खलाश्याला द्यावी लागलीं. ह्यांत कांहींतरी लुच्चेगिरी आहे असा ओरडा केला. परंतु खंजीरवाला म्हणाला—"मी तुम्हांला प्रथमच सांगितलें होतें कीं माझा खंजीर मंत्रवलेला आहे."

मालक निरुत्तर झाला व त्यानें आपलीं सर्व जहाजें त्याला देऊन टाकलीं.

शेरास सवाशेर भेटला होता!






[ १८ ]

[जयमलनें मार्जार व श्वानकर्णी दोघांचें परस्परांशीं सख्य घडवून आणण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु श्वानकर्णीच्या पूर्वजांची गदा अग्नि ओकणाऱ्या सिंहाच्या गुहेंत गेल्यामुळें मिळाली नाहीं. ती मिळविण्यासाठीं जयमल, लखू व गोमांग धाडस करून गुहेपाशीं गेले. —पुढें वाचा.]

गुहेंत जास्त काळोख नव्हता. कोठून तरी आंत उजेड येत होता. सर्वांत प्रथम लखूनें आंत वांकून पाहिलें, कोठें निखारे किंवा विस्तव दिसतो का. पण त्याला सिंह कांहीं दिसला नाहीं. तो म्हणाला—

"हे गुहावासी म्हणत आहेत तसा वाघ किंवा सिंह खरोखरच या गुहेंत आहे तर तो खोल आंत कोठें तरी असावा. आपला बाण त्याला लागेलच असें नाहीं वाटत मला."

पण जयमल व गोमांगला निखारे दिसले. जयमल म्हणाला—"आंत शिरणें शहाण-पणाचें होणार नाहीं. सिंह गुहेच्या बाहेर आला पाहिजे. तरच त्याला ठार करणें शक्य होईल."



सिंहाला बाहेर कसें काढायचें या विचारांत दोघे असतां गोमांगनें गुहेजवळ पडलेला दगड उचलला व तो गुहेंत फेंकला. नंतर तो जोरानें ओरडला देखील. त्याची ती युक्ति उपयोगी पडली. कारण गुहेंत निखारे व ठिणग्या चमकूं लागल्या व थोडी हालचाल सुरू झाल्याचा आवाज बाहेर ऐकूं येऊं लागला.

लखू विचार करायला जास्त थांबला नाहीं. त्यानें गुहेंत बाण सोडला व म्हणाला—"सिंह आपल्याला खायला बाहेर येत आहे."

पण आश्चर्य पुन्हां हालचाल ऐकूं येईनाशीं झाली. निखारे व ठिणग्या अदृश्य झाल्या.

"सिंह घाबरून परत गेला आहे." गोमांग म्हणाला.

"आतां गुहेंत शिरून त्याला ठार केलें पाहिजे. दुसरा उपाय दिसत नाहीं. जयमल, तुला काय वाटतें?" लखूनें विचारलें.

जयमलनें गुहेंत दोन पावलें टाकून डोकावून पाहिलें व म्हणाला—"गुहावासियांनीं आपल्याला सांगितलें तितका भयंकर हा सिंह असेलसें नाहीं वाटत मला. पण इतर सिंहामध्यें व याच्यांत एवढा फरक आहे खरा कीं याच्या नाका-तोंडांतून निखारे व ठिणग्या बाहेर पडत आहेत. म्हणून सावध राहूनच आपण पुढें गेलेलें बरें. आपल्या तिघांच्यापैकीं एकाचा बाण लागला तरी त्याचा मुडदा पडेल. पण घाई करूं नकोस बरें का!"

"घाई मी करतो का? तें सर्व मला माहीत आहे. तूं बेफिकीर रहा!" गोमांग म्हणाला.

तिघे गुहेंत शिरले. चार पावलें आंत गेल्यावर गुहेला दोन तीन जागीं तडा पडलेल्या दिसल्या. आंत उजेड होता. पण सिंह मात्र दिसला नाहीं.

"पुन्हां आपण गुहांच्या जाळ्यांत सांपडणार कीं काय? कारण ही गुहा कोठें सुरू होते व कोठें संपते हें कळणेंच कठीण आहे. कोणत्या वाटेनें सिंह निघून गेला आहे हें तरी काय कळणार?" लखू म्हणाला.

गोमांगनें गुढघे टेकून जमिनीवर न्याहाळून पाहिलें व म्हणाला—"हा पहा सिंह या वाटेनें गेला आहे. पावलांच्या खुणा छान दिसत आहेत. चला, उठा. त्याचा पाठलाग केला पाहिजे."

जयमल म्हणाला—"गोमांग! थांब घाई करूं नकोस! तो या वाटेनें गेला असेल. दुसऱ्या वाटेनें येऊन आपल्यावर पाठीमागून त्यानें हल्ला केला तर?"

गोमांग म्हणाला—"बरोबर आहे तुझें म्हणणें. आपल्यापैकीं एकानें मागें पहात यावें व दोघांनीं पुढें नजर ठेवावी. सिंह दिसल्याबरोबर त्याच्यावर बाण सोडावा!"

त्याप्रमाणें समोर पहात जयमल व गोमांग निघाले आणि लखू मागें पहात पुढें चालूं लागला. थोडें अंतर चालून गेल्यावर गोमांग हळूच म्हणाला—"हा पहा, मनुष्याचा अस्थिपंजर! मार्जारच्या त्या अनुयायाचा असावा. तोच श्वानकर्णींच्या पूर्वजांची गदा चोरून घेऊन या गुहेंत शिरला होता.



जयमलनें अस्थिपंजर लक्षपूर्वक पाहिला व म्हणाला—"तूं म्हणतोस तसा हा अस्थिपंजर मार्जारच्या अनुयायाचा असूं शकेल. तर मग ती गदा देखील येथेंच कोठें तरी जवळ पास असली पाहिजे."

तिघे गदा शोधूं लागले. लखूला एका कोपऱ्यांत चार फूट लांबीचें एक दगडी दांडकें दिसलें. त्याचें एक टोक गोल व



कांटेदार होतें. तें उचलून सर्वांना दाखवीत तो मोठ्यानें ओरडून म्हणाला—"ही पहा, श्वानकर्णींच्या पूर्वजांची मंत्रवलेली गदा!" आणि जोरानें हंसला.

जयमलनें गदा हातांत घेऊन पाहिली व म्हणाला—"ही तीच गदा असावी असें मला वाटतें. पण ती मंत्रवलेली आहे कीं नाहीं हें त्या गुहावासियांनाच माहीत. बरें तर चला परत! आपण ज्या कामासाठीं आलों होतों तें पुरें झालें आहे."

"त्या सिंहाला तसेंच जिवंत सोडून जावयाचें म्हणतोस?" लखूनें विचारलें.

"त्याला ठार करून आम्ही परत येऊं असें नव्हतें का म्हटलें आपण? मग ठार केल्याशिवाय परत गेलों तर ते काय म्हणतील?" गोमांगनें शंका केली.

जयमलनें ती दगडी गदा गोमांगच्या हातांत दिली व म्हणाला—"आम्ही सिंहाला ठार करूं असें वचन आपण कोणाला दिलें नाहीं. आम्ही जें वचन दिलें होतें तें पुरें केलें आहे. सिंह जिवंत आहे कीं मेला त्याचें आपल्याला काय करायचें आहे? तो किती भयंकर आहे हें देखील आपल्याला माहीत नाहीं. उगाच त्याच्या वाटेला जाणें, मला नाहीं बरोबर वाटत." लखूचा दुजारा मिळेल या आशेनें त्यानें त्याच्याकडे वळून पाहिलें.

पण तेवढ्यांत गोमांग टुणकन उडी मारून म्हणाला—"तो पहा, आग ओकणारा सिंह! सोडा बाण!" त्यानें ती दगडी गदा उगारली.

सिंह एका वळणाआड जोरानें गरजला व उडी मारून पुढें आला. जयमल व लखू बाण धनुष्यावर ठेवून सोडणार त्या पूर्वींच गोमांगनें ती गदा सिंहाच्या मस्तकावर मारली. सिंहाला तिरमिरी आली व तो मागें परतून पळूं लागला. सर्व चकित होऊन पाहूं लागले.



"अरे! ह्या प्राण्याला का हे सिंह म्हणतात! हा सिंह नसून सिंहालीक आहे. आमच्या प्रदेशांत हे येतात मधून मधून! यांच्या नाकांतून निखारे व ठिणग्या बाहेर पडतात. पण त्यांत उष्णता नसते." गोमांगनें त्या विलक्षण जनावराचें वर्णन चांगलें माहीत असल्यासारखें केलें.

"त्याचें तोंड व मान पाहून तो सिंहाच्या जातीचा असेल सें वाटत नाहीं. या शिवाय तो भित्रा पण दिसतो आहे. पण आतां त्याची काळजी कशाला? आतां दिसलाच आहे तर त्याचा समाचार घेतल्याशिवाय परत जाणें बरोबर नाहीं." म्हणत जयमल त्या सिंहालीकच्या मागें धांवला. लखू व गोमांग पण त्याच्या पाठोपाठ जाऊं लागले.

सिंह थोडें अंतर पळत जाऊन मागें वळून पाहूं लागला. जयमलनें एका वळणावर उभें राहून त्याला नीट पाहून घेतलें व हंसत म्हणाला—"मला वाटलें होतें कीं हा आपली वाट पहात येथें बसून राहिला असेल. पण हा तर पळपुटा व भित्रा निघाला. आतां याचा नाद सोडलेला बरा!"

गोमांगनें दगडी गदा दोन तीनदां फिरवली व म्हणाला—"ही गदा मंत्रवलेली आहे कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. पण या गदेंत अत्यद्भुत शक्ति आहे खास! फक्त एकच तडाखा बसल्याबरोबर पाहिलेंत त्या सिंहाची कशी गाळण उडून गेली ती?"

"तो पळून गेला आहे, तर मग त्याचा पाठलाग कशाला करा उगीच?" जयमल पुन्हां म्हणाला.

"इतकी मेहनत आपण केलीच आहे तर ती उगाच वायां कां जाऊं द्यायची? त्याला ठार करून त्याचें चामडें कां नाहीं काढून घेऊन जाऊं?" लखूनें विचारलें.

तिथे गप्पा मारीत सिंहाच्या शोधांत चालू लागले. पण सिंह त्यांना कोठेंच दिसला नाहीं. त्यांना वाटलें कीं गुहेच्या आंतच कोठें तरी तो लपलेला असणार. पण गुहेच्या या जाळ्यांत त्याचा शोध काढून त्याला कसा काय मारायचा? तो एक प्रश्नच होता.

जयमल मध्येंच थांबून म्हणाला—"आपण कोठें चाललों आहों कोणाला माहीत आहे का? आपण परत सरोवराच्या कांठीं पोंचूं शकलों नाहीं तर श्वानकर्णी व मार्जारशीर्षी भेट देखील व्हायची शंकाच. आपण एकदां वाट चुकलों होतों तशीच पुन्हां वाट चुकलों तर?"

म्हणून सर्व जागच्या जागीं थांबले. सिंहाला ठार करण्याच्या नादांत परत जाण्याची गोष्ट ते पार विसरून गेले. कोठें खूण वगैरे कांहीं करून ठेवली नव्हती. परत कसें व कोठें जायचें हें त्यांना कळेना.

घाई घाईंत कोणत्या तरी वाटेनें जाऊन नंतर पश्चात्ताप करीत बसण्यांत काय अर्थ? आपण सरोवरापासून किती दूर आहों व कोठें आहों हें आधीं पाहूं या!" जयमल म्हणाला.



"पण हें कळायचें कसें?" लखूनें विचारलें.

दोघांचें परस्परांशीं इकडे हें बोलणें चालू असतां गोमांग गुहेच्या खडबडीत भिंतीवर चढून एका भोकांतून उजेड येत होता तेथपर्यंत वर गेला. डोकें वर करून त्यानें बाहेर पाहिलें व ओरडला—"बाप रे बाप!" आणि उडी मारून खालीं आला.

"काय झालें? काय पाहिलेंस तूं?" जयमलनें चकित होऊन विचारलें.

गोमांगनें नाकावर बोट ठेवून हळू बोलायला सांगितलें व म्हणाला—"आपण







पुन्हां संकटांत सांपडलों आहों. या गुहेतून आपण पंखवाल्या जातीचे लोक ज्या प्रदेशांत राहतात त्या प्रदेशांत येऊन पोंचलों आहों. तो ब्रह्मदंडी पण त्यांच्याबरोबर आहे !"

ब्रह्मदंडीचें नांव ऐकल्यावर लखू व जयमल दोघांना आश्चर्य वाटलें. दोघे थोडा वेळ स्तब्ध जागच्या जागीं उभे राहाले.

दोघे गुहेच्या त्या भोंकाजवळ जाऊन पहायला म्हणून वर चढूं लागल्यावर गोमांगनें त्याला सावध केलें व म्हणाला—"तुम्ही दिसलांत तर त्यांची टोळधाड इकडे वळेल. तुम्हीं घाईत कांहीं करून बसाल व नंतर पश्चात्ताप करीत बसावें लागेल. ते पंखवाले ब्रह्मदंडीच्या समोर आपल्या शक्तीचें प्रदर्शन करून दाखवीत आहेत असें वाटतें."

लखू व जयमल दोघांनीं हळूंच बाहेर डोकें काढून पाहिलें. समोर एक मोठें मैदान त्यांना दिसलें. मोठ मोठीं झाडें पण त्यांना दिसलीं. त्यांवरून पंखवाले लोक उड्या मारीत असलेले दिसले. ब्रह्मदंडी एका उंच जागेवर बसून हातांतला मंत्रदंड जोराजोरानें हलवून कांहीं तरी पुटपुटत होता.

"या खेपेस याला जिवंत सोडून भागणार नाहीं." लखू म्हणाला.

जयमल उत्तर देणार इतक्यांत पंखवाले लोक मोठमोठ्यानें ओरडत सैरावैरां पळूं लागले. कारण तो अग्नि ओकणारा सिंह त्यांचा पाठलाग करीत होता व ते घाबरून पळत होते.

तिकडे ब्रह्मदंडी एकटाच आपला मंत्र जाप करण्यांत गुंग होऊन गेला होता. त्याच्या तोंडांतून निघणारे शब्द दोघांना अस्पष्ट ऐकूं येत होते—"मी...! आहें...! घट घट...! कालभैरवा...!"

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# कुसंगति

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें चालू लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, अंगावर घेडलेलें कार्य पुरें करण्यासाठीं तूं दाखविलेली आस्था पाहून मी थक्क झालों आहें. तुझ्याचसारखी विश्वास यानें पण आस्था दाखविली होती व तो पुढें संकटांत सांपडला होता. परिणामी त्याला यश मिळालें. मी तुला त्याची गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कन्याकुमारी नजीक एका जमीनदाराला विश्वास नांवाचा मुलगा होता. एकदां कांहीं कारणावरून पितापुत्रांचें भांडण झालें. विश्वास अभिमानी होता. त्यानें घर सोडून निघून जाण्याचा विचार केला. समुद्रकांठीं



एका खडकावर बसून समुद्रांच्या लाटा पहात विचार करीत तो बराच वेळ बसून होता. रात्र झाली. चंद्राचें स्वच्छ चांदणें पडलें. समुद्राच्या पाण्याला रुपेरी रंग चढला. चंद्र दगाथाड धांवत पळत कोठें तरी जात आहे असें विश्वासला भासलें. आपण देखील समुद्रपार कोठेंतरी पळून जावें. पण कसें ?

तो विचारांत गर्क असतां कोणीतरी चालत येत असल्याची चाहूल ऐकूं आली. पण जवळपास कोणी त्याला दिसलें नाहीं. तीं भुतें होतीं. तीं कशी दिसणार ? त्यांच्या अंधुक पुसट आकृति मात्र दिसल्या. तो ज्या खडकावर बसला होता त्या खडका जवळून पलीकडच्या खडकावर तीं भुतें निघून गेलीं. विश्वासनें मागें पुढें पाहिलें नाहीं. तो त्या भुतांच्या मागोमाग त्या खडकावर जाऊन उभा राहिला.

भुतें ओरडूं लागलीं—"माझा घोडा ! अन् खोगीर !" अन् आश्चर्य म्हणजे प्रत्येक भुतासमोर एकेक घोडा व त्याच्या पाठीवर खोगीर त्याला दिसलें. तो सुद्धां ओरडला—"माझा घोडा ! अन् खोगीर !" त्याच्या समोर देखील एक घोडा व त्याच्या पाठीवर त्याला खोगीर दिसलें. भुतें आपापल्या घोड्यावर बसलीं. त्यांच्या पाठोपाठ विश्वास पण घोड्यावर बसला.

विश्वासच्या जवळ घोड्यावर बसलेल्या एका म्हाताऱ्या भुतानें त्याला विचारलें—"काय रे, विश्वास ! तूं देखील आमच्या-बरोबर येणार आहेस का ?"

"होय ! कां ?" विश्वासनें विचारलें.

"तर मग चल !" भूत म्हणालें. भुतें पाळी पाळीनें म्हणालीं—"समुद्रा पलीकडे !" आणि घोडे आकाशांत उडूं लागले. विश्वास देखील म्हणाला—"समुद्रापलीकडे !" आणि त्याचा घोडा देखील आकाशांत उडूं लागला.



क्षणार्धांत सर्व भुतें व विश्वास पली-कडच्या तीरावर जाऊन पोंचले.

"ह्या बेटाचें नांव माहीत आहे का विश्वास तुला ?" त्या म्हाताऱ्या भुतानें विचारलें.

विश्वास म्हणाला—"मला नाहीं माहीत !"

"ही आहे लंका ! लंकेच्या राजकन्येचा आज विवाह आहे. या राजकन्येचें सौंदर्य त्रिलोकांत कोठेंहि पहावयास मिळणार नाहीं. तिला पळवून घेऊन येण्यासाठीं आम्ही आलों आहों. तूं आमच्या बरोबर आलास हें देखील बरें झालें. कारण तिला पळवून आणल्यावर तुझ्याच घोड्यावर तुझ्या पाठीमागें आम्ही तिला बसवूं. आम्ही भुतें आहों. पकडून बसणें तिला शक्य होणार नाहीं. ती आमच्या घोड्यावर बसली तर खालीं पडेल. मग आम्ही सांगूं तसें तूं करशील का ?" म्हाताऱ्या भुतानें विचारलें.

विश्वासनें मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां होकार दिला.

सर्व घोड्यावरून उतरले. एका भुतानें कांहीं तरी मंत्र म्हटला. दुसऱ्या क्षणाला विश्वासबरोबर सर्व भुतें एका राजवाड्यांतल्या



अंतःपुरांत येऊन पोंचलीं. राजवाड्यांत दिव्यांचा झकझकाट होता. रेशमी व जरी-काठीं वस्त्रें नेसून राजघराण्यांतील स्त्रिया नटून उभ्या होत्या.

एका दिवाणखान्यांत राजकुमारांची गर्दी होती. नृत्य चालू होतें. अप्सरांना व गंधर्वांना लाजवील असें मनोहर व मधुर नृत्य-संगीत चालू होतें. विश्वासनें तें दृश्य पाहिलें व त्याचे डोळे दिपून गेले.

लंकेच्या राजघराण्यांतलें त्या पिढींतलें तें पहिलें कार्य होतें. म्हणून पाण्यासारखा पैसा खर्च करण्यांत आला होता. या शिवाय

राजाची ती एकुलती एक मुलगी होती. भुतें व विश्वास अदृश्य रूपें आंत शिरल्या-मुळें कोणाला कांहींच कळलें नाहीं. सर्व नाचरंगांत गुंग होऊन गेलीं होतीं.

"ह्यांत नवरी मुलगी कोठली?" विश्वासनें म्हाताऱ्या भुताला विचारलें.

"ती काय बसली आहे. आपल्या मैत्रिणींबरोबर!" म्हाताऱ्या भुतानें बोटानें दाखविलें.

तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून विश्वास थक्क झाला. त्यानें तें रूप स्वप्नांत देखील पाहिलें नव्हतें. विश्वासची नजर प्रथम तिच्या रूपावरच गेली. पण थोड्या वेळानें तिच्या डोळ्यांतून आंसवें गळत असलेलीं त्याला दिसलीं.

"सर्व आनंदानें गंमत पहायला येथें आलीं आहेत व हंसतमुख बसलीं आहेत. मग ही एकटीच कां रडते आहे?" विश्वासनें म्हाताऱ्या भुताला विचारलें.

"तिला तिचा होणारा पति पसंत नाहीं म्हणून! तीन वर्षांपूर्वींच राजानें हें लग्न ठरविलें. तेव्हां राजकन्येचें वय फक्त पंधरा वर्षांचें होतें. तेव्हां तिनें आपल्या बापाला एवढेंच सांगितलें होतें कीं लग्न इतक्या लवकर कशाला बाबा! तेव्हां तिला वाटलें होतें कीं आतां लग्न टळलें तर तो राजकुमार दुसरीकडे लग्न करील. पण तिचा अंदाज चुकला. त्या राजकुमाराला राजानें दोन वर्षें थांबायला सांगितलें. त्या प्रमाणें तो थांबला होता. आतां लग्न टळणें शक्य नाहीं. म्हणून ती दुःखी आहे!" आतां तिला या संकटांतून आपण वांचविलें पाहिजे. तिचें लग्न त्या राजकुमाराशीं होता कामा नये.

राजकन्येची ती स्थिति पाहून विश्वासचें मन द्रवलें. तिचें त्या राजकुमाराच्या हातांतून रक्षण होणार आहे खरें, पण ती भुतांच्या हातीं पडणार आहे. मी या भुतांबरोबर आलों नसतों तर किती बरें झालें. स्वतःच्या डोळ्या देखत हें घडलें नसतें. या शिवाय भुतांना सामील होऊन तिला भुतांच्या जाळ्यांत अडकविण्यास मीच कारण होणार आहें. या सर्व गोष्टींचा विचार करून त्याला फार वाईट वाटलें. आतां पाऊल मागें घेणें अशक्य आहे हें तो ओळखून होता. आतां जर का आपण या विरुद्ध कांहीं केलें तर आपला जीव धोक्यांत पडेल तो पडेलच राजकन्येचें तरी रक्षण होईल कीं नाहीं







शंकाच. म्हणून सूज्ञपणानें प्रसंगावधान राखून काम केलें पाहिजे. प्रथम तिचें रक्षण केलें पाहिजे पुढें काय करावयाचें तें मागून ठरवितां येईल.

लग्नाचा मुहूर्त जवळ येऊं लागला. वर-वधू बोहोल्याकडे जाऊं लागलीं. राजा राणी पण बरोबर होतींच. ज्या वाटेनें वर-वधूला राजाराणी घेऊन जात होते भुतें दोन्ही बाजूला उभीं होतीं. एका भुतानें मध्येंच पाय आडवा घातल्यामुळें राजकुमारी जमिनीवर पडली. दुसऱ्या भुतानें तिच्या अंगावर एक चादर टाकली. त्याबरोबर राजकन्या कोणाला दिसेनाशी झाली व त्यानंतर मुळींच दिसली नाहीं.

राजवाड्यांत गोंधळ उडून गेला. सर्व राजवाडाभर राजाचे शिपाई आणि आलेली पाहुणे मंडळी राजकन्येला शोधूं लागली. "नवरी मुलगी कोठें आहे ? कोणाला दिसलीका ? ती खाली पडली खरी, पण अदृश्य झाली." प्रत्येकाच्या तोंडीं हेंच ऐकूं येत होतें.

इकडे भुतांनी राजकन्येला उचलून नेलें. भुतें ओरडलीं "माझा घोडा अन् खोगीर !" त्याबरोबर त्यांचे त्यांचे घोडे प्रगट झाले. त्यांच्या पाठोपाठ विश्वास देखील ओरडला—"माझा घोडा अन् खोगीर !" तत्क्षण त्याचा घोडा प्रगट झाला. "आपल्या घोड्यावर राजकन्येला बसवून घे !" म्हातारें भूत म्हणालें.

विश्वासनें त्याप्रमाणें राजकुमारीला आपल्या बरोबर घोड्यावर बसवून घेतलें. घोडे समुद्र किनाऱ्यापर्यंत जमिनीवरच धांवत गेले. त्यानंतर भुतांनीं—'समुद्रावळीकडे' म्हटलें राजकुमारीला घेऊन जाणारा घोडापण विश्वासनें 'समुद्रापलीकडे' म्हटल्याबरोबर उडूं लागला. सर्व भुतें व विश्वास राज-



कन्येसह जेथून निघाले होते तिथें येऊन पोंचले. त्याचवेळीं विश्वासला एक गोष्ट आठवली. राजकन्येसह घोड्यावरून उत-रल्याबरोबर तो म्हणाला—"आमच्याजवळ येऊं नका. आम्हांला शिवूं नका. वायुसुता ! मारुती ! आमचें रक्षण कर !" तो मारुतीचें स्तोत्र म्हणूं लागला.

भुतें जागच्या जागीं थबकली. "बरोबर येऊं दिल्याचा प्रत्युपकार असाच केलास वाटतें. तुला मागाहून पश्चात्ताप करावा लागेल. विसरूं नकोस." भुतांनीं त्याला बजावलें आणि निघून गेलीं.

"या भुतांच्या हातून सुटका मिळाली. त्यांच्या बंधनांत राहण्यापेक्षां माझ्याबरोबर राहण्यांतच तुझें हित आहे !" विश्वास राजकन्येला म्हणाला.

पण तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

"या भुतांच्यामुळें किंवा माझ्या आई-वडिलांमुळें मला ज्या संकटांना तोंड द्यावें लागेल तें माझें मला माहीत ! पण तुला माझ्या घरींच रहावें लागणार आहे. तुझा नोकर म्हणून मी वागेन." विश्वास म्हणाला.

पण राजकन्या तरी देखील कांहीं बोलली नाहीं.



तिनें बोलण्याचा प्रयत्न केला. पण तोंडांतून शब्दच उमटेना. भुतांनीं हिला मुकी केली आहे कीं काय ? विश्वासला शंका आली. त्याला राजकन्येचीं ती करुण स्थिति पाहून दया आली. पण हें काय ? एकाएकीं त्याच्या डोळ्यांना काळोखी कशी काय आली ? तो एका जागीं बसला.

घरीं घेऊन गेलों तर काय फायदा ? ही लंकेची राजकन्या आहे या गोष्टीवर कोण विश्वास करणार ? आणि या गोष्टीवर तरी कोण विश्वास करणार कीं तो भुतांच्या-बरोबर रात्रीं लंकेला गेला होता ? त्यानें



तिला उचलून आणलें कीं भुतांनीं ? तो तरी काय बोलणार व कोण बोलण्यावर विश्वास करणार ?

म्हणून त्यानें ओळखीच्या एका पुजाऱ्याच्या घरीं जायचें ठरविलें. राजकन्येला त्याच्या घरीं गुप्तपणें रहायला सांगून नंतर पुढें काय करावयाचें तें ठरवूं असा त्यानें विचार केला.

राजकन्या त्या सूचनेला कबूल झाली. दोघं पुजाऱ्याच्या घरीं गेलीं. बराच वेळ दरवाजा ठोठावल्यावर पुजारी एक दिवा घेऊन बाहेर आला. विश्वासनें घडलेलें वृत्त थोडक्यांत सांगून राजकन्येला आपल्या घरीं कांहीं दिवस आश्रय द्यायला पुजाऱ्याजवळ विनंति केली व बजाऊन सांगितलें कीं ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये.

विश्वासनें पुजाऱ्याला अनेक वेळां अनेक प्रकारें मदत केली असल्यामुळें त्यानें आपल्या मित्राला त्या प्रसंगाला मदत देण्याचें कबूल केलें. म्हणाला—"राजकन्येला माझ्या घरीं पाहिजे तितके दिवस तूं ठेऊन दे. पण कधीं तरी तिला तिच्या आईवडिलांकडे पोंचती करणें आवश्यक आहे. माझ्या मतें यांतच सूज्ञपणा आहे. पुढें तूं व ती आणि तुमचें भाग्य !"

"मला तूर्त या पलीकडे कांहीं सुचत नाहीं व कांहीं करणें देखील शक्य वाटत नाहीं." विश्वास म्हणाला.

पुजाऱ्याच्या घरीं एका अपरिचित स्त्रीला पाहून शेजार पाजारच्या लोकांनीं तिच्या विषयीं चवकशी सुरू केली. तेव्हां पुजाऱ्यानें त्याची एक मुकी पुतणी आहे असें सांगून वेळ मारून नेली. त्यावर एकाचाहि विश्वास बसेना. पण त्यांना तरी खरी गोष्ट कोठें माहीत होती ? पण विश्वास दर रोज पुजाऱ्याच्या घरीं येऊन बराच वेळ राहूं लागलेला पाहून लोकांच्या मनांत निरनिराळ्या प्रकारच्या शंकाकुशंका येऊं लागल्या.



विश्वास व राजकन्या यांचें परस्परांवर प्रेम वाढूं लागलें. पण राजकन्येचें मुकेंपण जाईपर्यंत दोघांना कांहींच करतां येईना.

हळूं हळूं दिवसामागून महिने व महिन्यांमागून एक वर्ष लोटलें. एका वर्षापूर्वी लंकेला त्याच दिवशीं गेल्याचें विश्वासला आठवलें. कदाचित भुतें या वेळेला समुद्रकाठीं आलीं असावीं. राजकन्येचा मुकेपणा घालविण्यास त्यांना विनंति करून पहावी.

त्या प्रमाणें तो त्या रात्रीं त्या खडकाजवळ गेला. त्यानें तेथें भुतांच्या टोळीची वाट पाहिली. पण बराच वेळ वाट पाहाल्यावर देखील भुतें न आलेली पाहून तो निराश होऊन परत निघण्यासाठीं उभा राहिला. तेवढ्यांत भुतांची चाहूल लागली.

भुतें ओरडलीं—"माझा घोडा, माझें खोगीर !" विश्वास पण ओरडला—"माझा घोडा, माझें खोगीर !"

म्हातारें भूत म्हणालें—"विश्वास ! पुन्हां आला आहेस वाटतें आम्हांला फसवायला ? गेल्या वर्षीं आमचा घोडा मिळाला यावर्षीं
















देखील मिळेल असें वाटलें होय तुला? काय म्हणते तुझी प्रेयसी?"

"ती तर मुकी आहे! बिचारी काय करणार?" विश्वास म्हणाला. "तिचें सौंदर्य पाहूनच झालें ना तुझ्या मनाचें समाधान? ती बोलली काय किंवा नाहीं बोलली तरी काय?" दुसऱ्या भुतानें थट्टा केली.

"वेड्या! तिचा मुकेपणा घालवायला औषध तुझ्याच घरासमोर तर आहे. त्या झाडाचा पाला घेऊन त्याचा काढा प्यायला दिला असतास तर गेलें नसतें का मुकेपण!" आणखी एक भूत म्हणालें.

"अरे याच्या नादाला काय लागतां? राहूं दे याला रडत!" इतर भुतें म्हणालीं व निघून गेलीं. भुतें निघून गेल्यावर विश्वास घरीं परत आला. त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. त्यानें घरासमोर कसलेंच झाड पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. भुतांनीं कांहींतरी थाप मारून मला फंसविलें असेल. पण असाहि एक विचार त्याच्या मनांत आला कीं यांत कांहीं खरेंपणा नसेल तर नेमकी हीच गोष्ट तरी त्या भुताच्या तोंडांतून कशी निघाली?

उजाडल्यावर घरासमोर भिंतीजवळ त्याला एक रोपटें दिसलें. त्याला मोजकीं सातच पानें होतीं. त्यांच्या रसांत ती दिव्य शक्ति असेल असें त्याला वाटेना. तसलें रोपटें त्यानें त्या पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. असेल एखादी औषधी वनस्पति असें वाटलें त्याला.

तो घाई घाईनें त्या रोपट्याजवळ गेला व मुळांपासून तें रोपटें उपटून आणून त्यानें घरांत एका जागीं लपून त्याचीं पानें काढून घेतलीं. पानें तोडलीं तर त्यांच्या देठांतून दूध आलें. त्यानें तें दूध पाण्यांत टाकलें व पानेंपण पाण्यांत टाकलीं. नंतर



चांगली उकळी येई पर्यंत पाणी तापवलें. चव घेऊन त्यांत कांहीं विशेष आहे का हें पाहण्यासाठीं त्यानें दोन चमचे काढा पिऊन पाहिला. त्याला लगेच झोंप लागली. त्यानें तो काढा कोणाला कळल्याशिवाय तयार केला होता. कोणाची नजर पडणार नाहीं अशा तऱ्हेनें ठेवला पण होता.

दुसऱ्या दिवशीं त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला तजेला वाटला व मनाला नवीन स्फूर्तिपण वाटली. त्या काढ्यांत कांहीं विशेष आहे याची खातरी पटली. तो काढा घेऊन तो आपल्या पुजारी मित्राच्या घरीं गेला व त्यानें राजकन्येला तो काढा प्यायला दिला. काढा प्यायल्याबरोबर तिला गुंगी आली व ती झोंपली. दुसऱ्या दिवशीं तिची झोंप मोडली त्यावेळीं तिला पुनर्जन्मच झाला कीं काय असें वाटलें. कारण तिला वाचा फुटली होती. विश्वासला केव्हां भेटेन व त्याच्याशीं केव्हां बोलेन असें झालें तिला.

विश्वास नित्याप्रमाणें आपल्या मित्राच्या-घरीं दुसऱ्या दिवशीं आतुरतेनें आला व आपल्या प्रेमिकेला भेटला. ती बोलूं लागलेली पाहून विश्वासच्या मनाचें समाधान झालें.



विश्वास आपल्या घरीं गेला. त्यानें आई वडिलांना सर्व कांहीं कळविलें व म्हणाला—"मी तिच्याशींच लग्न करणार आहें." आईवडिलांना सर्व वृत्त ऐकून आश्चर्य वाटलें व आनंद पण झाला. त्यांनीं प्रेमानें आपल्या मुलाला व राजकन्येला घरीं बोलवून आणलें व त्यांचें लग्न लावून दिलें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला एक शंका वाटते. विश्वासनें मारुतीचें स्तोत्र करून भुतांपासून स्वतः बरोबर राजकुमारीचें रक्षण केलें. याबद्दल भुतांना राग येणें साहजिक होतें व अद्दल

घडावी म्हणून त्यांनीं राजकन्येला मुकी करून टाकलें यांत देखील आश्चर्य नाहीं. पण नंतर त्यांनींच तिचें मुकें पण दूर करण्यास औषध कां सांगावें हें नाहीं कळलें मला. आपली चूक त्यांच्या लक्षांत आली, म्हणून कीं लंकेच्या राजकन्येमध्यें त्यांना कांहीं दोष दिसला म्हणून त्यांनीं तिचा विचारच मनांतून काढून टाकला? या प्रश्नांचीं उत्तरें माहित असून तूं दिलीं नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील हें तूं विसरूं नकोस."

विक्रमार्क म्हणाला—"तुझ्या मनांत ही शंका यावीच कां? भुतांचें राजकन्येवर मन गेलेंच नव्हतें. विश्वासशीं तिचें लग्न करून द्यायचें ठरवून तीं राजकन्येला उचलून घेऊन आलीं होतीं. म्हाताऱ्या भुताला विश्वासविषयीं आपुलकी वाटली. भुतांनीं आपल्या घोड्या-वर त्याला उगीचच नेलें व आणलें असें नाहीं. राजकुमाराशीं राजकन्येचें लग्न होऊं द्यायचें नाहीं' एवढेंच तें म्हातारें भूत म्हणालें होतें. विश्वासच्या प्रेमाची परीक्षा व्हावी म्हणूनच त्यांनीं राजकन्येला मुकी केलें होतें. परस्परांच्या प्रेमाची खातरी पटल्यावर त्यांनीं औषध सांगितलें तर त्यांत नवल काय? राजकन्येचें एक सामान्य माणसावर प्रेम बसतें कीं नाहीं एवढीच शंका त्यांना वाटत होती. भुतांनीं जें केलें तें विश्वासला मदत करण्याच्या हेतूनेंच केलें. त्यांचा त्याच्याशीं पूर्व जन्मीचा संबंध होता असें देखील मला वाटतें."

अशाप्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाला धरून लोंबकळूं लागला. [कल्पित]





# भीमूचे पराक्रम

भीमूच्या सासऱ्याची जमीनदारी ज्या जहागिरींत होती त्या जहागीरदाराचा मुलगा फिरत फिरत भीमूच्या सासऱ्याच्या गांवीं आला. येण्यापूर्वी त्यानें जमीनदाराला कळविलें होतें.

जमीनदारानें त्याच्या आदरातिथ्याची जय्यत तयारी केली. मुख्य जबाबदारी मुलीवर, म्हणजे लक्ष्मीवर येऊन पडली. जमीनदार जांवयाला बोलावून म्हणाला— "भीमराव! जहागीरदार साहेबांचा मुलगा आज येणार आहे. त्याची बरदास्त ठेवण्याची जबाबदारी मी तुमच्यावर टाकीत आहें. दोघे एकाच वयाचे आहां, म्हणून त्याला तुमच्याबरोबर जास्त मोकळें वाटेल. त्याला कोणत्याहि गोष्टीची उणीव भासूं नये याची थोडी काळजी घ्या. मी तशी सर्व व्यवस्था करून ठेवली आहे. तुमच्यासाठीं खास पोशाख मागवून ठेवला आहे. तो घालून तयार रहा!" नंतर जमीनदारानें थोरा-मोठ्यांना कसें सामोरे जावयाचें, कसा नमस्कार करावयाचा वगैरे गोष्टी भीम-रावांना समजावून सांगितल्या. भीमरावांनीं सर्व समजल्या सारखी मुंडी हलवली.

भीमराव, सासऱ्यानें सांगितल्याप्रमाणें तो खास पोशाख घालून तयार झाले. रेशमी सदरा व मखमलीचा कोट घातला व जरीची गोल टोपी घातली. तो पोशाख केल्यावर भीमरावांना राजबिंडें रूप आलें. गळ्यांत मोत्यांची माळापण काय खुलून दिसत होती.

जहागीरदाराचा मुलगा केव्हां येतो या विचारांत आणि जमीनदारानें समजाऊन सांगितलेल्या गोष्टी मनांतल्या मनांत

घोकीत भीमराव खोलींतल्या खोलींत हिंडत होते. तेव्हां त्यांना एक विचित्र गोष्ट आढळून आली. खोलीला एक नवीन दरवाजा दिसला. त्या दरवाज्यानें बाहेर जाण्यासाठीं ते निघाले. तेव्हां कोणीतरी पुढें येत असलेले त्यांना दिसले. जहागीरदारांचा मुलगाच आला कीं काय म्हणून त्यांनीं घाईघाईनें लवून नमस्कार केला. तेवढ्यांत लक्ष्मी हंसत मागाहून आली आणि त्याच्याजवळ येऊन म्हणाली—"आतिथ्य-सत्काराची तालीम चालली आहे वाटतें ?" भीमरावांना त्या जहागीरदाराच्या खांद्यावर हात ठेवून उभी असलेल्या लक्ष्मीला पाहून वस्तुस्थितीची कल्पना आली. आरशांत त्यांना स्वतःचें प्रतिबिंबच दिसलें होतें. जो दरवाजा वाटला तो आरसा होता आणि युवराज येणार म्हणून तो त्या खोलींत मुद्दाम आणून ठेवला होता.

भीमरावांनीं बायकोचा प्रश्न ऐकला व भानावर येऊन प्रश्नाचें उत्तर देणार तेवढ्यांत कोणीतरी येत असल्याची चाहूल लागली. जहागीरदाराचा मुलगा येऊन पोंचल्याचें कळतांच भीमरावांना तिकडे पाठवून लक्ष्मी घरांत निघून गेली.



पाहुण्यांची स्वारी घोड्यावरून उतरल्या-बरोबर भीमरावांनीं पुढें होऊन त्यांचें स्वागत केलें—"यावें यावें !" इतर लोकांनीं देखील जमीनदाराच्या हुकुमाप्रमाणें आपापली कामगिरी बजावली.

जहागीरदाराचा मुलगा गपिष्ट होता. स्वतःला चतुर व बुद्धिमान समजत असे. भीमू व तो समवयस्क असल्या कारणानें दोघांची मैत्री जमली. भीमरावांच्या बुद्धीचा मासला अद्याप बघायला मिळाला नव्हता.

जेवणखाण आटोपल्यावर सर्व दिवाणखाण्यांत येऊन बसले. गांवांतली कांहीं लहान थोर मंडळी पण भेटायला आलीं. जहागीरदाराच्या मुलानें इकडच्या तिकडच्या गप्पा करून आपल्या बुद्धीचा चमत्कार दाखविला. केवळ शिष्टाचार म्हणून सर्व हंसत किंवा 'हो' ला 'हो' देत होते.

नंतर जहागीरदाराच्या मुलानें लोकांच्या अकलेची परीक्षा घेण्यासाठीं कोडीं सांगून त्यांचीं उत्तरें सांगायला हजर असलेल्या लोकांना सांगितलें. सर्व कोडीं जुनीं होतीं म्हणून त्यांचीं उत्तरें भराभर मिळालीं.

भीमराव इतका वेळ तीं कोडीं व त्यांचीं उत्तरें ऐकत होते. इकडे त्यांच्या डोक्यांत











एक दुसरेंच कोडें उपजलें व त्याविषयीं विचार घोळूं लागले. विचार करतां करतां त्यांच्या तोंडून अनपेक्षितपणें हे शब्द बाहेर पडले—"एकाला दोन अन् डाव्याला उजवे करी!"

जहागीरदाराच्या मुलाला वाटलें कीं भीमरावांनीं कांहीं तरी कोडें टाकलें आहे. म्हणून तो म्हणाला—"आम्हीं नाहीं हें कोडें ऐकलें पूर्वी कधीं!"

हजर असलेल्या लोकांनीं देखील अशा प्रकारचें कोडें कधीं ऐकलें नव्हतें. म्हणून कोणाला ह्याचें उत्तर सुचेना. ह्यामुळें चकित होऊन सर्व परस्परांचीं तोंडें पाहूं लागले.

भीमरावांना एवढें कळलें कीं त्यांच्या तोंडांतून सहज बाहेर पडलेलें वाक्य एक कोडें निघालें. त्यांनीं पुन्हां तें वाक्य म्हटलें—"एकाला दोन आणि डाव्याला उजवें करी!"

जहागीरदाराचा मुलगा म्हणाला—"आपल्याला नाहीं बुवा माहीत!"

"आपल्याला नाहीं बुवा माहीत!" सर्व म्हणाले.

भीमराव स्मित करून म्हणाले—"आरसा!"

सर्वांनीं टाळ्या वाजवून भीमरावांच्या कोड्याची प्रशंसा केली. जहागीरदाराचा मुलगा म्हणाला—"आज मी नवीन कोडें शिकलों."

हजर असलेल्या लोकांच्या तोंडीं जमीनदाराच्या जांवयाची कीर्ती गांवभर पसरली व सर्व म्हणूं लागले—"जहागीरदाराला जमीनदाराच्या जांवयानें चित्त पाडलें."





# राजकुमारी जुलेखा

डेमास्कस नगरींत अब्दुला नांवाचा एक प्रसिद्ध व्यापारी रहात असे. त्याला एक मुलगा होता. त्याचें नांव हसन असें होतें. अब्दुलानें आपल्या मुलाच्या शिक्षणार्थ उत्तमोत्तम शिक्षक व मौलावी नेमले होते. त्यानें मुलाच्या शिक्षणासाठीं किती खर्च होत आहे या गोष्टीची कधीं फिकीर केली नाहीं. मुलाला उत्तम शिक्षण मिळावें हाच एक हेतु त्याच्या समोर होता. हसनला अनेक भाषा येऊं लागल्या व अनेक शास्त्रांचा त्यानें अभ्यास केला. आपल्या मुलाचें शिक्षण सर्व प्रकारें पुरें झालेलें पाहून अब्दुलाच्या मनाचें समाधान झालें व त्यानें इहलोक सोडून परलोकाची यात्रा करण्यासाठीं सर्व तयारी सुरू केली.

पुढें कांहीं दिवसांनीं तो आजारी पडला. त्या आजारांतून त्याला सुटका मिळाली नाहीं. मरणापूर्वी त्यानें हसनला जवळ बोलावून त्याच्या हिताच्या चार गोष्टी सांगितल्या आणि म्हणाला—"मी तुझ्या-साठीं अलोट संपत्ति मागें सोडली आहे. पण कर्मधर्म संयोगानें तूं ती घालवून बसलास तर एक गोष्ट सांगून ठेवतों ती लक्षांत ठेव. मनुष्याजवळ जोपर्यंत पैसा असतो तोंपर्यंत जग त्याला विचारतें. पण हातांत पैसा नसला तर सर्व मित्र व जवळची नातेवाईक मंडळी देखील सोडून निघून जातात. अशा वेळीं मरण बरें वाटतें. समज, तुझ्यावर देखील असाच प्रसंग आला तर, आपल्या बागेंत एक वाळकें झाड आहे तें तूं पाहिलें आहेसच, त्या झाडाला दोरी बांधून गळ्याला



फांस लावून जीव दे. तसें केलेंस तर तुला मुक्ति मिळेल." असें सांगून अब्दुल्लानें डोळे मिटले.

बापानें मृत्युसमयीं असा विचित्र उपदेश कां करावा ह्याचें हसनला आश्चर्य वाटलें. पुढें तो ती गोष्ट विसरला. आपल्या स्नेही मंडळींच्या संगतींत तो आनंदानें राहूं लागला. त्याला जगाचा अनुभव कमी होता. म्हणून त्याच्या हातून व्यापारांत व व्यवहारांत पुष्कळ चुका घडल्या व त्याच्या जवळ होती नव्हती ती सर्व संपत्ति तो घालवून बसला. त्याची स्नेही मंडळी त्याला सोडून निघून गेली. बापानें त्याला जो उपदेश दिला होता तो त्याला आठवला. त्यानें आत्महत्या करून घ्यायचें ठरविलें.

एक दोरी घेऊन तो बागेंत त्या वाळक्या झाडाजवळ गेला व त्याच्या एका फांदीला दोरी अडकवून गळ्याला फांस लावून घेतला. पण त्याच्या वजनानें वाळकी फांदी तुटली. हसन जमिनीवर आदळला व अजून आपण मेलों नाहीं हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्याहून आश्चर्य त्याला ह्या गोष्टीचें वाटलें कीं त्याच्या शेजारीं एक हिरा पडलेला त्याला दिसला. दुसरा हिरा तुटलेल्या फांदीच्या पोकळींतून पडतांना त्याला दिसला. त्यानें उठून त्या पोकळींत पाहिलें तेव्हां त्याला आंत शेकडों हिरे आंत ठेवलेले दिसले.

तो उठून घरीं गेला. कुऱ्हाड घेऊन आला आणि ती फांदी तोडली. तेव्हां आंत त्याला हिऱ्या-माणकांचा एक ठेवाच सांपडला. तेव्हां त्याला बापाच्या विचित्र उपदेशाचा खरा अर्थ कळला. त्यानें आकाशाकडे पाहून आपल्या मयत बापाला व देवाला नमस्कार केला. देवाच्या कृपेनें तो पुन्हां श्रीमंत झाला. परंतु ह्या खेपेस तो शहाणा झाला होता. बापाची मिळकत



एकदां घालवून बसल्यानंतर त्याला जगाचा चांगला अनुभव आला होता. त्या पुढें त्यानें सावधगिरीनें रहावयाचें मनाशीं ठरविलें.

त्यानें डेमास्कस शहर सोडून जाण्याचें ठरविलें. त्यानें इराण देशाच्या शिराज नांवाच्या गांवीं जाऊन व्यापार करावयाचें ठरविलें. त्याच्या बापाच्या तोंडीं त्यानें ऐकलें होतें कीं इराण देशांतलें तें व्यापाराचें एक मोठें ठाणें आहे. हसनला फारसी भाषा येत होती. शिराज येथें एक जव्हेरी म्हणून राहण्याचें त्यानें ठरविलें आणि जवळ होतें नव्हतें तें सर्व घेऊन शिराज येथें येऊन पोंचला. त्यानें एका धर्मशाळेंत एक खोली भाड्यानें घेतली आणि चांगले कपडे करून गांव पहायला म्हणून निघाला.

तो मशीदींत गेला व तेथें नमाज प्रार्थना करून बाहेर आला. तेव्हां समोर राजाचा वजीर त्याला दिसला. वजिरानें पण त्याला पाहलें व म्हणाला—"तुझ्या कपड्यावरून तूं कोणीतरी परदेशी दिसतो आहेस. कोठून आलास तूं ?"

"मी डेमास्कसचा राहाणारा आहें. या गांवांत कांहीं तरी उद्योगधंदा करावा ह्या हेतूनें आलों आहें." हसन नम्रपणें म्हणाला.



त्याचा तो नम्रपणा पाहून वजीर खूष झाला. तो हसनला म्हणाला—"काय वय तुझें ?"

"मला ह्याच महिन्यांत सोळावें वर्ष लागलें." हसन म्हणाला.

"ठीक ! चल, तुला मी बादशाह-कडे घेऊन जातों. तुझ्यासारख्या तरुण मुलांना तो आपल्या पदरीं नोकरी देतो. अंतःपुरावर पाहारेकऱ्याची जागा तो तुझ्यासारख्यांना देईल. तुला तें काम आवडत असेल तर चल माझ्याबरोबर." वजीर म्हणाला.










हसनला आनंद गगनांत मावेनासें झालें. फक्त त्याची वागणूक आणि बोलण्यांत विनम्रता पाहूनच वजीर खूष झाला होता असें नाहीं, तर त्याच्या शुद्ध फारसी उच्चाराचा वजिराच्या मनावर चांगला परिणाम झाला होता.

बादशाह हसनला पाहून फार खूष झाला त्यानें त्याला अंतःपुराचा द्वारपालक म्हणून नेमलें. वजिरानें त्याला द्वारपालकाचा पोशाख दिला व त्याला त्याचें काम नीट समजावून सांगितलें.

अंतःपुराच्या मुख्य दरवाज्यावर एकंदर बारा द्वारपालक होते व ते पाळीपाळीनें आपलें काम करीत. संध्याकाळीं काळोख पडल्यावर राजवाड्याच्या बागेंत फिरायला कोणालाहि परवानगी नव्हती. कारण त्या वेळीं अंतःपुरांतील स्त्रिया बागेंत हिंडायला येत असत. त्या वेळीं कोणी पुरुष बागेंत हिंडतांना आढळला तर त्याला मृत्युदंड मिळत असे.

एकदां हसन चुकून काळोख पडल्यावर बागेंत राहून गेला. तो दुपारीं बागेंतल्या एका बांकावर झोंपला. त्याची झोंप मोडली तेव्हां त्याच्या कानावर हे शब्द पडले—"काय पण रूप आहे ! देवदूतांनापण लाजवील असा हा पुरुष कोण बरें असेल ?"

प्रथम हसनला वाटलें कीं स्वप्नांतच त्यानें तें ऐकलें असावें. परंतु प्रत्यक्ष डोळ्यांनीं कांहीं तरुणींना फिरत असलेल्या पाहून तो चपापला. संध्याकाळ झाली होती व अजून तो बागेंतच होता. आतां सकाळीं बादशहा समोर आपल्याला उभें करण्यांत येईल व आपलें डोकें उडविण्याची शिक्षा आपल्याला मिळेल. म्हणून सर्वांची नजर चुकवून जाण्यासाठीं एका बाजूनें निघाला. पण समोर एक सुंदर स्त्री उभी होती. तिचें रूप काय होतें ! जणुंकांहीं आकाशीचा चंद्रच जमिनीवर उतरून आला आहे कीं काय, हसनला वाटलें. पण भीतीनें त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला होता. कोणत्याहि स्त्रीशी कधीं पूर्वी बोलण्याचा प्रसंगच त्याच्यावर आला नव्हता. त्या स्त्रीनें विचारलें—"काय झालें काय त्यांत असें पळून जायला ?"

"तूं या अंतःपुरांतलीलं असशील तर मी भिण्याचें कारण तुला माहीत असायला हवें. म्हणून तूं बाजूला हो आणि मला येथून पाय काढूं दे !" हसन गयावया करूं लागला. तें ऐकून ती स्त्री गालांतल्या गालांत हंसूं लागली.







" ....असूं ! आतां ही गोष्ट आठवली वाटतें ? इतक्या काळोखांत बागेंतून पळून जाण्यापेक्षां तूं येथेंच राहून सकाळीं उठून निघून जाणें जास्त बरें होईल. राजवाड्यांत जाणें तर जास्तच धोक्याचें आहे." ती म्हणाली.

हसन इतका घाबरला होता कीं तो रडकुंडीला आला होता. म्हणाला—"तूं... तुम्ही कोणी असा आज माझा जीव जाणार ! पण हें हत्येचें पाप आपल्या कपाळीं कां घेतां ? सोडा मला !" असें सांगून तो तिच्या जवळून जाऊं लागला.

परंतु तिनें एका हातानें त्याचा हात धरला व दुसऱ्या हातानें तोंडावरचें अवगुंठन बाजूला सारलें. म्हणाली—"माझ्याकडे पहा ! मी सुंदर नाहीं का ? तुझ्या शिवाय इतर एकाहि पुरुषानें माझें तोंड पाहिलें नाहीं. तूं मला असा सोडून निघून गेलास तर मला राग येईल."

"बेगम साहेब तुमचें तोंड पाहून चंद्र देखील लाजेनें मान खालीं घालील. हें जरी खरें असलें तरी माझ्या जिवावरचा धोका कसा काय टळेल ?" हसननें भयभीत आवाजांत विचारलें.

"तुला वाटतो तो धोका तुझ्या जिवाला नाहीं. हो एक धोका असूं शकेल. कारण तूं मी कोण आहें हें ओळखलेलें दिसत नाहींस. तूं माझ्या जवळ असेपर्यंत माझ्या क्रोधा एवढा दुसरा धोका नाहीं. बरें तें असूं दे. प्रथम तूं कोण आहेस हें सांग !" तिनें विचारलें.

"माझें नांव हसन आहे. मी डेमा-स्कसचा राहाणारा आहें. बादशहानें मला अंतःपुराचा द्वारपालक म्हणून नेमलें आहे. वजीरसाहेबांची माझ्यावर मेहेरबानी आहे" हसन म्हणाला.





ती स्त्री म्हणाली—"तर मग ऐक, या चांदण्या रात्रीं तुला पाहिल्या पासून मला हें सर्व जग तुझ्या विना निरर्थक वाटत आहे. तुझें प्रेम देखील माझ्यावर आहे का ?"

तें ऐकून हसनला कांहींच उत्तर सुचेना. कारण त्यापूर्वी स्त्री-प्रेम ही काय वस्तु आहे हें त्याला माहीत नव्हतें. ती स्त्री अप्रतिम सुंदर होती व तिचें त्याच्यावर प्रेम होतें. तिच्या सौंदर्यावर तो मुग्ध झाला होता. म्हणाला—"तुझ्या या सौंदर्यावर मी आपले पंचप्राण ओंवाळून टाकीन."

त्याचवेळीं त्या बाजूला दहा बारा मुली हंसत खिदळत व टाळ्या वाजवीत आल्या. त्यापैकीं एक म्हणाली—"कैरया त्या बिचाऱ्या मुलाच्या मागें उगीच का लागली आहेस ?"

हसनला तें जग औरच वाटलें. कधीं स्त्रीमुख त्यानें पाहिलें नाहीं त्याला या स्त्रियांच्या जगांत एकाएकीं प्रसंगानें ढकललें होतें. त्या त्याची थट्टा करीत आहेत एवढें त्याला कळलें. त्याला थोडा रागपण आला. इतक्या निर्लज्ज बायका या जगांत आहेत, स्वप्नांत देखील त्यानें कधीं कल्पना केलेली नव्हती. आतां तो करणार तरी काय ? आज त्या निर्लज्य व बेशरम पोरींच्या कैदेंत थोड्याशा असावधपणामुळें तो सांपडला होता.

तितक्यांत झाडाआड उभी असलेली एक मुलगी पुढें आली. ती आल्याबरोबर सर्व गुपचुप एका बाजूला उभ्या राहाल्या. तिनें समोर येऊन हसनला विचारलें—"तूं रात्रीच्या वेळीं या बागेंत राहून नियमांचें उलंघन तर केलेंसच, त्या बरोबर स्त्री-प्रेमाची भिक्षा मागायला देखील तूं धजलास. मी तुला फांशीची शिक्षा देत आहें. तूं वयानें तरुण आहेस सुंदर आहेस. म्हणून ...."



तितक्यांत कैरिया पुढें येऊन म्हणाली—"राजकन्या जुलेखा! हा अबोध आहे. नकळत त्याच्या हातून ही चूक झाली आहे. त्याला माफ करावें."

जुलेखा कांहीं वेळ विचारांत पडली. थोड्यावेळानें म्हणाली—"तूं म्हणतेस म्हणून मी माफ करतें. पण आपण याला याचें मन दुखवून असेंच जाऊं दिलें तर याला वाटेल कीं आपण सर्व कठोर हृदयाच्या आहोंत. म्हणून ह्याला अंतःपुरांत घेऊन जाऊन याचा स्वागत सत्कार करूं या व मग याला जाऊं देऊं या." असें सांगून तिनें एका मुलीला इंगित केलें.

ती मुलगी स्त्रियांचा पोशाख घेऊन आली. हसनला ते कपडे घालावे लागले. सर्वांना त्याचा तो वेष फार आवडला. त्याला मिसुरडें फुटलें नसल्यानें तो अगदीं मुलीसारखा दिसूं लागला. जुलेखा इतर मुलींच्या घोळक्यांत त्याला अंतःपुरांत घेऊन गेली.

हसनला त्या मुली एका मोठ्या दालनांत घेऊन गेल्या. गुळगुळीत फरशीवर गालिचा घातलेला होता. हसनला त्याच्या प्रेमिकेनें सांगितलें कीं जुलेखा राजकन्या आहे व आम्ही सर्व तिच्या सखी आहोंत. या दालनांत जुलेखा आपल्या मैत्रिणींना मेजवानी देते."

जुलेखा व हसन गालीच्यावर मधें बसलीं व सर्व सखी चारी बाजूला बसल्या. मेजवानीची तयारी झाल्यावर समोर ताटें आलीं. सर्वांनीं पंचपक्वान्नांवर हात मारला.

हसनच्या मनांतून स्त्रीजातीविषयीं जी एक धास्ती बसली होती ती कमी झाली नव्हती. मधून मधून कैरियाकडे त्याची नजर जाई. पण तो पहात आहे हें कळतांच ती आपली मान खालीं करून बसे. जुलेखाच्या नजरेला ती गोष्ट आल्याशिवाय राहाली नाहीं. हसनच्या वागणुकींतला



घाबरटपणा देखील जुलेखाच्या नजरेस आला. तिनें त्याला विचारलें देखील—"हसन! अजून आमची भीति तुझ्या मनांतून गेली नाहीं का? आम्ही तुला खाऊन टाकूं असें वाटतें आहे का तुला? मी कोण आहें हें तुला कळलेंच असेल. मग भीति कसली. मोकळेपणें आमच्याशीं बोलत कां नाहींस? बरें, हें सांग, आमच्या पैकीं तुला सर्वांत जास्त कोण आवडली? अगदीं निर्धास्तपणें सांग!"

तें ऐकून हसनची हिंमत वाढणें तर दूरच त्याची धास्ती जास्तच वाढली. ही जमीन दुभंगली तर बरें होईल. उडी मारून मी स्वतःचें रक्षण तरी करून घेईन.

"तुला वाटत असेल कीं तूं कोणाला जास्त सुंदर म्हटलें तर मी किंवा आमच्या पैकीं इतर मुली रागावतील. पण तूं अगदीं भिऊं नकोस अगदीं निर्भीकपणें तुला कोण आवडली हें सांग.

हसनला थोडा धीर आला. तरी भीत-भीतच त्यानें सर्वांना डोळे भरून पाहून घेतलें. त्यांत कुरूप तर एक देखील नव्हती. एकीहून एक सुंदर होती. परंतु त्याला सर्वांत सुंदर कैरियाच भासली. म्हणाला—



"काय बोलावें हें मलाच कळत नाहीं. नक्षत्रें खरोखरच किती सुंदर असतात एकाहून एक पण चंद्र तो चंद्र."

जुलेखा म्हणाली—"हें पहा, आम्हां सर्वांना खूष करण्यासाठीं तूं हें बोललास हें खरें असलें तरी तो चंद्र कोण हें सांगशील कीं नाहीं? अशी कोडीं टाकून काय उपयोग? माझी गोष्ट सोडून दे. माझ्या या मैत्रिणीं पैकीं तुला सर्वांत जास्त कोण आवडली? मोकळेपणें सांग!"

तें ऐकून हसननें कैरियाकडे पाहिलें. तेथून त्याची नजर हटेना. सर्वांना साक्ष पटली. राग येणें तर दूर, सर्व हंसूं लागल्या. जुलेखा त्याचें अभिनंदन करीत म्हणाली—"हसन तूं जव्हेरी आहेस कीं काय असें वाटूं लागलें आहे आम्हांला. तुला रत्नाची पारख आहे."

सर्व सखींनीं कैरियाच्या सौंदर्याची वाखाणणी केली. नंतर त्यांनीं हसनच्या हातांत तिचा हात देऊन दोघांचें अभिनंदन केलें. हसनला तें सर्व पाहून आश्चर्य वाटलें. मी एकीच्या सौंदर्यावर मुग्ध झालों, पण इतरांना राग कसा आला नाहीं?

गप्पा गोष्टींत पहाट झाली. जुलेखानें आपल्या एका विश्वासपात्र म्हाताऱ्या दासीला बोलावून हसनला चोरवाटेनें राजवाड्याबाहेर पोंचवायला सांगितलें. जाण्यापूर्वीं ती हसनला म्हणाली—"तुमचें परस्परांबरचें प्रेम यशस्वी होवो यासाठीं मी प्रयत्न करीन!"

म्हाताऱ्या दासीनें मालकिणीच्या आज्ञेप्रमाणें हसनला राजवाड्या बाहेर पोंचतें केलें.

[बाकी गोष्ट पुढील अंकीं]





# चाणक्याची गोष्ट

[२]

नंदाचें राज्य संपुष्टांत आलें होतें. पण त्याचे अनुयायी जागोजागीं बंडाळी करीत होते. राज्यांत शांतता नव्हती. ही बंडाळी नाहींशी करणारा एक विणकर चाणक्याला भेटला. तो ढेंकूण दिसला कीं तेथल्या तेथें त्याला चिरडून टाकीत असे. ते पुन्हां डोकें वर काढतील यासाठीं तो त्यांना उचलून विस्तवांत टाकीत असे. चाणक्यानें विचार केला कीं ह्या विणकराच्या पद्धतीनें बंडखोरांचा नायनाट करणें शक्य होईल.

चंद्रगुप्ताला राज्य मिळालें होतें. पण खजिना रिकामा होता. तो पुन्हां भरुन काढण्यासाठीं चाणक्यानें एक युक्ति केली. त्यानें गांवांतल्या लक्षाधिशांना एक मेजवानी दिली. त्यांना पंचपक्वान्नांचें जेवण वाढलें. सर्व दारूच्या धुंदींत असतां त्यानें चंद्रगुप्ताची स्तुति केली व म्हणाला—"मी आपले पांच लक्ष रुपये या राजाला देण्याचें ठरविलें आहे." एकामागून एक लक्षाधीश म्हणूं लागले—"मी दहा लक्ष रुपये देईन," "मी पंधरा लाख रुपये देईन," "मी वीस लाख देईन." यांतच चढाओढ लागली. दारूच्या धुंदींत त्यांची चालू असलेली वटवट त्यांचें वचन सांगून त्यानें सर्वांकडून ती रक्कम वसूल केली व खजिना भरला.

चंद्रगुप्ताच्या राज्यांत एकदां दुष्काळ पडला. राजधानींत राहणाऱ्या जैन श्रवणांना भिक्षा देखील मिळणें अशक्य झालें. त्यांचा गुरु सुस्थित यानें आपल्या अनुयायांना



गांवभर भिक्षा मागून स्वतःचा उदर निर्वाह करण्यास आज्ञा केली. दोघां शिष्यांशिवाय सर्व निघून गेले. पण तें दोघांना आवडलें नाहीं. म्हणून त्यांनीं स्वतःचें पोट भरण्या-साठीं युक्ति केली. त्यांच्याकडे एक तऱ्हेचें अंजन होते. तें डोळ्यांत घातलें कीं घालणारा अदृश्य होई. दोघे अंजन लावून राजवाड्यांत जात व चंद्रगुप्तासमोर ताट वाढून आलें कीं त्याच्या ताटांतले पदार्थ अदृश्यपणें खाऊन टाकीत.

अशा तऱ्हेनें कांहीं दिवस लोटल्यावर चंद्रगुप्त अशक्त होत गेला. चाणक्यानें त्याला कारण विचारलें तेव्हां त्यानें जो चमत्कार किंवा भुताटकी होत होती त्याचें वर्णन केलें. म्हणाला—"मी रोज जेवायला बसलों कीं माझ्या ताटांत वाढलेलें अन्न अदृश्य होतें. थोडें फार पोटांत जातें, त्यावर मी जगलों आहे."

चाणक्याला भुताटकीचा किंवा चोरीचा संशय आला. शोध लावण्यासाठीं त्यानें एक युक्ति केली. त्यानें चंद्रगुप्ताच्या महालांत येण्याच्या वाटेवर एक तऱ्हेचें चूर्ण शिंपडून ठेवलें. चंद्रगुप्ताचें जेवण झाल्यावर चाणक्यानें स्वतः येऊन पाहालें तेव्हां दोन तऱ्हेचीं पावलें त्याला उमटलेलीं दिसलीं.

दुसऱ्या दिवशीं चंद्रगुप्त जेवायला बसला तेव्हां चाणक्यानें जेवणाच्या खोलींत खूप धूर केला. त्यामुळें चंद्रगुप्ताच्या डोळ्यांना पाणी आलें व जैन गुरूच्या दोघां शिष्यांच्या डोळ्यांतून पण टिपें आलीं. परंतु त्यामुळें त्यांच्या डोळ्यांत घातलेलें अंजन धुवून निघालें व त्यांचा अदृश्यपणा जाऊन ते दिसूं लागले. सर्व आश्चर्य चकित होऊन त्या दोघांकडे पाहूं लागले. परंतु चाणक्यानें त्यांना शिक्षा केली नाहीं व आदरपूर्वक त्यांना निरोप दिला.



चंद्रगुप्ताला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां इतके दिवस दुसऱ्याचें उष्टें खात आल्याबद्दल त्याला ग्लानी वाटूं लागली. पण चाणक्यानें, तूं उपाशी लोकांना भिक्षा देऊन पुण्य मिळविलें आहेस, असें सांगून त्याच्या मनाचें समाधान केलें. पुढें चाणक्यानें त्या जैन गुरूला बोलावून त्याच्या शिष्यांनीं केलेली अन्नाची चोरी त्याच्या नजरेस आणली व पुढें सावध राहण्यास त्यांना बजावून सांगितलें. पण जैन साधू म्हणाला– "तुमच्या राजधानींतल्या नागरिकांनीं गरीब शिष्यांना पोटभर जेवायला घातलें असतें तर ते चोरी करायला कां गेले असते ?" त्यानंतर जैन श्रवणांना भिक्षा देण्याची व्यवस्था चाणक्यानें करून दिली.

चाणक्य चंद्रगुप्ताची फार काळजी घेत असे. त्याच्या अन्नांत विष कालवून कोणी त्याचा वध करूं नये यासाठीं चाणक्यानें चंद्रगुप्ताच्या जेवणांत थोडें थोडें विष कालवून द्यायची व्यवस्था केली व त्याला चांगली संवय व्हावी म्हणून तो तें थोडें थोडें वाढवीत गेला. त्याचा परिणाम अनुकूल असाच झाला.

परंतु एकदां राणी दुर्धरा चंद्रगुप्ताबरोबर जेवायला बसली. त्या वेळीं ती गरोदर होती. तिला किंवा चंद्रगुप्ताला अन्नांत विष कालवून देत असल्याची गोष्ट माहीत नसल्यामुळें दोन घास खाल्याबरोबर राणीचें प्राणोत्क्रमण झालें.

चाणक्याला ही गोष्ट कळल्याबरोबर तो तेथें आला. त्यानें जास्त विचार करण्यांत वेळ न घालवितां वैद्यांना शस्त्रचिकित्सा करून राणीच्या पोटांतून तिच्या एकुलत्या एका मुलाला वांचविलें. विषाचा एक बिंदु (थेंब) त्या मुलाच्या पोटतां गेला होताच. तरी त्याचा परिणाम त्याच्यावर झाला नाहीं. तोच पुढें बिंदुसार म्हणून चंद्रगुप्ताच्या मागून त्याच्या गादीवर बसला. चाणक्यानें स्वतः बिंदुसारचा राज्याभिषेक करविला होता. परंतु त्याचा मंत्री म्हणून चाणक्य फार दिवस राहूं शकला नाहीं. कारण चाणक्याच्या सुबंधु नांवाच्या एका शिष्यानें चाणक्याच्या विरुद्ध बिंदुसारच्या मनांत विष कालवलें. त्याला स्वतःला मंत्रीपद हवें होतें. त्यानें बिंदुसार हें नांव कसें पडलें याचा पुरा इतिहास राजाला सांगितला. राजानें विचारल्यावर चाणक्यानें तें खरें असल्याचें कबूल केलें. आपलाच शिष्य आपल्या विरुद्ध फिरलेला पाहून व वय झालें असल्यानें चाणक्याला जगाचा वीट आला व त्यानें वानप्रस्थाश्रम स्वीकार केला. सुंभ जळालें तरी पीळ जात नाहीं म्हणतात तसा चाणक्य वैराग्य घेऊन देखील स्वस्थ बसला नाहीं. कारण त्याच्या विरुद्ध उलटलेल्या शिष्याला कोणत्यातरी रूपानें अद्दल घडविण्याची गोष्ट त्याच्या मनांत घर करून होती.

त्यानें एक युक्ति केली. त्यानें एका भोजपत्रांवर कांहीं वाक्यें लिहून तीं पत्रें सुबंधुच्या ज्या ज्या वस्तू त्याच्या हातीं लागल्या त्यांच्याबरोबर एका सुंदर पेटींत



ठेवून दिली आणि ती पेटी स्वतःच्या पेटाऱ्यांत ठेवून दिली. नंतर त्यानें त्याच्याजवळ जें कांहीं होतें तें दान करून रानांत एक झोंपडी बांधून तींत तो राहूं लागला.

पुढें कांहीं दिवसांनीं बिंदुसारला सर्व पूर्व इतिहास कळला तेव्हां चाणक्याचा आपण उगाच अपमान केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप वाटला. त्यानें पुन्हां मंत्रीपद स्वीकारण्यास चाणक्याजवळ विनंती केली. पण चाणक्यानें तें पद स्वीकारलें नाहीं.

बिंदुसारला सुबंधूवर राग आला. पण सुबंधूनें चाणक्याचें मन वळवून बोलावून आणण्याचें वचन दिलें. तो एका बाजूनें गोड गोड बोलत होता व दुसऱ्या बाजूनें त्यानें चाणक्याच्या झोंपडीला आग लावली. त्या आगींत चाणक्य जळून मरण पावला. बिंदुसारच्या परवानगीनें सुबंधू चाणक्याच्या घरांत रहायला गेला. तेथें त्याला एक पेटारें दिसलें. त्यांत धन असेल या आशेनें त्यानें ती उघडविली. तेव्हां आंत एक पेटी सांपडली. ती पेटी उघडतां आंत पांच भोजपत्रें सांपडलीं. तीं पत्रें वाचल्यावर त्याला खरें रहस्य कळलें. त्यांत लिहिलें होतें कीं या पानांचा वास घेणाऱ्यानें संन्यास ग्रहण केला नाहीं तर त्याला मरण येईल. त्याची प्रचीति घेण्याची त्याची छाती नव्हती त्यानें संन्यास ग्रहण केला. तरी त्यानंतर एकाला त्या पानांचा वास घेण्यास सांगितलें. पत्रांत लिहिल्याप्रमाणें संन्यास न घेतल्यानें त्या माणसाला तत्काळ मरण आलें.

त्यानें कां संन्यास ग्रहण केला हें हळूहळू जैन संन्याश्यांना कळलें व तो खरा संन्यासी नसून ढोंगी आहे हें ओळखून त्यांनीं त्याला आपल्या समाजांतून काढून लावलें. (संपूर्ण)





# किष्किंधाकांड

तारा बोलण्यांत फार चतुर होती. प्रसंग ओळखून कोणाशीं कसें बोलावें हें तिला चांगलें माहीत होतें. लक्ष्मणाला आलेला कोप कमी करण्यासाठीं तो नम्रपणें म्हणाली– "लक्ष्मणा, उगाच सुग्रीवाला दूषण देऊं नकोस. त्यानें इतकीं वर्षें दुःख भोगलें म्हणून आतां तो सुखांत आणि विलासांत इतका गढून गेलेला आहे. पण तो आपलें कर्तव्य विसरलेला नाहीं. त्यानें सर्व वानर वीरांना निरोप पाठविला आहे. लवकरच येथें सर्व वानर सेना हजर होईल. तूं शूर आहेस वीर आहेस. तुला त्याची मनःस्थिति सहज कळूं शकेल. कृपा करून तूं त्याच्यावर रागावूं नकोस. त्याला क्षमा कर."

ताराचें बोलणें ऐकून लक्ष्मण थोडा शांत झाला. त्याचा आवाज थोडा नरमलेला पाहून सुग्रीवाला बोलायला धीर झाला. तो म्हणाला "रामानें मला जी मदत केली आहे त्याबद्दल त्याचा अत्यंत ऋणी आहें. जन्मोजन्मीं रामाची सेवा केली तरी मी त्या ऋणांतून मुक्त होऊं शकणार नाहीं. पण किती झालें तरी आम्ही वानरें. आमच्या हातून अशी काय मदत होणार? तरी पण मी सर्व प्रकारें त्याची मदत करीतच आहें. जाणून बुजून मी माझ्या कामांत

कसूर करीत नाहीं. त्यांतून कांहीं चूक झाली असेल तर मी क्षमा मागतों."

सुग्रीवाच्या ह्या बोलण्यानें तर लक्ष्मण अगदींच शांत झाला आणि म्हणाला— "सुग्रीवा! तुझी मदत म्हणजे जणुं दैवी मदतच वाटते आम्हांला. पण माझ्या तोंडून जे कठोर शब्द निघाले ते केवळ रामाच्या दुःखानें. तूं स्वतः येऊन पाहिलेंस तरच तुला त्याचें दुःख कळेल. म्हणून म्हणतों तूं येऊन त्याच्या मनाचें सांत्वन करून जा."

नंतर सुग्रीव हनुमानाला म्हणाला—"हे वीरा, आपल्या आजूबाजूच्या प्रसिद्ध अशा सरदारांना आपापल्या सैन्यानिशी आज येण्यास सांगितलेंच आहे. तरी तूं जंगलांत, डोंगरावर, समुद्रकाठीं व आणखी कोठें राहात असलेल्या सर्व वानर वीरांना आपल्या मदतीला येण्यासाठीं सज्ज होऊन या म्हणून सांगून ये. त्यांना असें देखील सांग कीं जे जे वानर दहा दिवसांच्या आंत येथें हजर होणार नाहींत त्यांना देहान्त शिक्षा दिली जाईल.



राजाच्या आज्ञेवरून मारुतीनें दाहीं दिशांना दूत पाठविले.

हळूं हळूं निरनिराळ्या जातींच्या वानरांच्या झुंडीच्या झुंडी किष्किंधा नगरींत येऊं लागल्या. त्यांत काळ्या, तांबड्या, पिवळ्या पांढऱ्या अशा तरतऱ्हेच्या रंगांचीं भयंकर आकृतींचीं अशीं वानरें होतीं. येतांना ह्या वानरांनीं सुग्रीवाला भेट देण्यासाठीं स्वादिष्ट फळें व सुगंधी पुष्पें आणिलीं होतीं.

सुग्रीवाच्याकडे येणाऱ्या वानर वीरांना पाहून लक्ष्मणाच्या मनाचें समाधान झालें. त्यानें सुग्रीवाला राम दर्शनासाठीं बोलाविलें. सुग्रीवानें तें कबूल करून पालखी मागविली. त्यांत लक्ष्मणाला बसवून स्वतः बसला आणि रामदर्शनाला निघाला. वानरांनीं त्यांच्यावर छत्र चामर धरलें. शिंग, भेरी, शंख वगैरे वाजविले आणि पालखी उचलून घेऊन गेले.

प्रस्रवण पर्वतावर रामाच्या गुहेजवळ पालखी येतांच लक्ष्मण आणि सुग्रीव खालीं उतरले आणि राम दर्शनासाठीं आंत गेले. त्यांच्या पाठोपाठ वानर वीर पण गेले. सुग्रीवादिकांनीं हात जोडून नमस्कार करतांच





इतर वानर वीरांनीं हात जोडून रामाचें वंदन केलें. रामानें त्या सर्वांचें वंदन स्वीकारून सुग्रीवाला आलिंगन दिलें. रामाच्या दर्शनानें त्या सर्वांना फार आनंद झाला. ते मोठ्या आतुरतेनें त्याच्या आज्ञेची वाट पाहूं लागले.

रामानें सौम्य शब्दांत सुग्रीवाला आपल्या शब्दाची आठवण करून दिली. म्हणाला—"सुग्रीवा! पावसाळा संपून शरद् ऋतु सुरू झाला आहे. मी आजपर्यंत तुझ्या भरंवशावर धीर धरून होतों. तूं आपलें वचन मोडणार नाहींस याची मला खातरी आहे. तरी मन हें मोठें वेडें आहे."

त्यावर सुग्रीव म्हणाला—"चिंता करण्याचें कारण नाहीं. पृथ्वीच्या कानाकोपऱ्यांतून महापराक्रमी वानर माझ्या आज्ञेवरून आपल्या सेवेसाठीं किष्किंधा नगरांत आलेले आहेत. ते सर्व सीतेचा शोध लावण्यासाठीं आपल्या आज्ञेची वाट पाहात आहेत."

"शाबास वीरा! मग अर्धें अधिक काम झाल्यासारखेंच आहे." राम म्हणाला.

वानर सैन्यांच्या चालीनें किष्किंधा नगरावर आकाशांत धूळ उडालेली प्रस्रवण पर्वतावरून स्पष्ट दिसत होती. ताराचा बाप सुषेण दहा कोटी वानर सेना घेऊन आला होता. सुग्रीवाचा श्वशुर तार एक अब्ज वानर सेना घेऊन आला होता. काळ्या तोंडांच्या वानरांचा राजा गवाक्ष एक हजार कोटी वानर सेनेसह आला होता. दोघेहि धूम्रवीर अस्वलांची मलीमोठी सेना घेऊन आले होते. त्याच प्रमाणें पवन, नील, गवय, अश्विनी मैंद द्विद, गज, जाम्बवन्त, रुमावन्त, गंधमादन अंगद आदि वीर आपापलीं सैन्यें घेऊन आले होते.

सुग्रीवानें ती सारी सेना रामाला दाखविली. कोणाची किती सेना आहे हें सर्व सांगून तो रामाला म्हणाला—"रामा, हें



सारें सैन्य तुझ्या सेवेसाठींच आहे. तूं ह्याला आपल्या कामीं लाव."

"सुग्रीवा, प्रथम सीता जिवंत आहे कीं नाहीं ह्या गोष्टीचा शोध लावला पाहिजे व मग रावणाची राजधानी कोठें आहे हें शोधून काढलें पाहिजे. या गोष्टींचा शोध आम्हीं काय लावणार? त्या तूंच करूं शकशील. म्हणजे नुसतें सैन्य माझ्या ताब्यांत देऊन काम भागणार नाहीं."

"ठीक आहे." म्हणून सुग्रीवानें विनत नांवाच्या एका पराक्रमी सेना नायकाला बोलावून पूर्व दिशेस जाण्याची आज्ञा केली. त्याच्याबरोबर एक लाख वानरसेना देऊन सुग्रीव म्हणाला—"तूं पूर्व दिशेस जा. तेथें रावणाची नगरी कोठें आहे ह्याचा शोध लावून सीतेचें वर्तमान कळल्यास येऊन सांग. एका महिन्याच्या आंत तुम्हीं सर्वांनीं परत आलें पाहिजे. जो येणार नाहीं त्याला मृत्यु दंड दिला जाईल."

नंतर त्यानें नील, हनुमान, महाबल, जाम्बवन्त अंगद आदि वीरांना दक्षिण दिशेला पाठविलें. त्यांना आज्ञा केली कीं समुद्र किनाऱ्यापर्यंतच नाहींतर तो पार करण्याचा कांहीं तरी उपाय योजून पलीकडे जाऊन शोध काढून आणा. कारण असें सांगतात कीं रावणाची लंका समुद्रांत शंभर योजनांवर पसरलेली आहे. तेथेंच कोठेंतरी सीता असणार तिला शोधून काढा. ह्या शिवाय समुद्रांत आणखी कोठें पर्वत, जमीन दिसल्यास तेथेंहि सीतेला शोधून काढा. एक महिन्याची मुदत देतों. जो कोणी ह्या मुदतीचें उल्लंघन करील तो प्राणास मुकेल आणि जो कोणी सीतेचा शोध लावील त्याला योग्य इनाम दिलें जाईल."

ह्याच प्रमाणें सुग्रीवानें ताराचे वडील सुषेणाला दोन लाख सैन्य देऊन पश्चिमेकडे पाठविलें आणि शतबलीला एक लाख सैन्यासह उत्तरेकडे शोध लावून येण्यास सांगितलें.

सुग्रीवानें इतक्या साऱ्या वानरांना पाठविलें. त्यांत त्याला मारुती विषयीं जास्त खात्री वाटत होती. म्हणून त्यानें मारुतीला विशेष प्रोत्साहन देऊन पाठविलें. तो मारुतीला म्हणाला—"हनुमाना, तूं जमिनीवर ज्या प्रमाणें संचार करतोस त्याच प्रमाणें पाण्यांत व हवेंत संचार करण्यास तुला शक्ति प्राप्त आहे. तूं तिन्हीं लोकांत जाऊं शकतोस. तूं तुझा बाप वायु याच्यासारखा बुद्धिवान आणि प्रतिभावान आहेस. म्हणून माझी सारी भिस्त तुझ्यावरच आहे. तूं आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली पाहिस."

ह्या प्रमाणें मारुतीला निक्षून सांगितलेलें वचन ऐकून रामालाहि मारुतीच्या कर्तृत्व शक्ती बद्दल विश्वास वाटूं लागला. त्यानें आपली अंगठी काढून मारुतीला दिली आणि म्हणाला—"सीता दिसली कीं तिला ही अंगठी दाखव म्हणजे तिला खूण पटेल." मारुतीनें मोठ्या आदरानें ती अंगठी घेतली व रामाला नमस्कार करून आपल्या कामगिरीवर निघाला. त्याच्या बरोबर दिलेली वानरसेना त्याच्या मागोमाग चालूं लागली.



ही सर्व सेना सीतेचा शोध लावून एका महिन्यानंतरच परत येणार होती. तो संपूर्ण महिना राम व लक्ष्मणांनीं प्रस्रवण पर्वतावरच घालविला.

एवढी कामगिरी केल्यावर सुग्रीवाला जरा हलकें वाटलें. थोडें तरी काम आपल्या-कडून झालें म्हणून त्याला बरें वाटलें.

सीतेच्या शोधार्थ निघालेली सर्व वानरें दिवसभर हिंडून सीतेचा शोध लावण्याचा प्रयत्न करीत आणि रात्रीं ठराविक बागेंत एकत्र होत. तेथें फळेंमुळें खाऊन भूक भागवून तेथेंच विश्रांति घेत. सकाळीं

आपलीं सर्व कामें उरकून पुन्हां कामगिरीवर जात.

ह्याप्रमाणें एक महीना पूर्ण झाला. परंतु सीतेचा शोध लागला नाहीं. तरी मुदत संपल्यानें पूर्व, पश्चिम व उत्तरेकडील सेना परत आल्या.

दक्षिणेकडे गेलेली सेना हिंडतां हिंडतां विंध्य पर्वतावर आली. विंध्य पर्वत फार उंच असून त्याला बरींच शिखरें आहेत आणि एकेका शिखरावर बऱ्याच गुहा आहेत. त्या पर्वतावर अरण्यें व नद्या पण आहेत. त्या सर्व प्रदेश शोधण्यांत त्यांचा बराच वेळ गेला. एके ठिकाणीं त्यांना एक भयंकर राक्षस दिसला. त्यालाच रावण समजून वानरांनीं मारून टाकलें. पण त्याच्याजवळ त्यांना सीता सांपडली नाहीं.

विश्रांति घेण्यासाठीं सर्व वानरें एका झाडाखालीं जमलीं असतां अंगद त्यांना म्हणाला—"आपली मुदत संपत आली आहे आणि अजून सीतेचा शोध तर लागलाच नाहीं. आपणाला परत जाण्यास उशीर झाला तर सुग्रीव आपल्याला ठरलेली शिक्षा देण्यास कमी करणार नाहीं. तरी आतां रात्रंदिवस जागून सुद्धां आपल्याला सीतेचा शोध लाविला पाहिजे."

सर्वांनीं त्याचें अनुमोदन केलें व तात्काळ कामाला लागलीं. सारा विन्ध्य पर्वत त्यांनीं पालथा घातला. रामाच्या सेवेंत त्यांना भूक लागली नाहीं कीं थकवा वाटला नाहीं. अशा तऱ्हेनें विंध्यपर्वतावर सीतेचा शोध चालू असतां एक महीना संपून गेला.



# २१. मृत्यूचें खोरें

हें अमेरिकेंतील कॅलीफोर्निया प्रांतात आहे. आज पावेतों शेंकडों प्रवासी या खोऱ्यांत प्राणास मुकले आहेत. अमेरिकेंत याहून जास्त खोल स्थान एकहि नाहीं. समुद्राच्या पातळीपासून २७५ फूट खोल हें खोरें आहे. अमेरिकेंतील सर्वांत उंच शिखर म्हणजे माउंट व्हिटनी (१४५०२ फूट). हें शिखर या खोऱ्या पासून ७५ मैलांवर आहे.





# भारताचा इतिहास



अलाउद्दिनाचा विश्वासपात्र सरदार मलिक काफूर (मल्लिकंबर) यानें अलाउद्दिनाच्या मरणानंतर अधिकार सूत्रें स्वतःच्या हातीं करून घेण्यासाठीं प्रयत्न सुरू केला. सुल-तानाची म्हणून एक घोषणा त्यानें लोकांना दाखविली. ती घोषणा नकली तरी होती किंवा सुलतान मरणासन्न अवस्थेंत असतां मलिक काफूरनें त्या घोषणेवर सुलतानाची सही व शिक्कामोर्तब करवून घेतले होते. या घोषणेप्रमाणें सुलतानाचा मोठा मुलगा खिज्रीखान याच्याऐवजीं सर्वांत धाकटा मुलगा शहाबुद्दीन याला (त्याचें वय त्या वेळीं अवघें पांच सहा वर्षें होतें) गादीचा वारस नेमण्यांत आलें होतें.

या मुलाला गादीवर बसवून त्याच्या वतीनें काफूर राज्य कारभार पाहूं लागला. त्यानें अधिकाराच्या लोभानें अनेक दुष्ट कृत्यें केलीं. अल्लाउद्दिनाचा मोठा मुलगा खिज्रीखान व दुसरा मुलगा शादीखान यांचे डोळे काढवून राजमातेचें सर्व धन स्वाधीन करून घेऊन तिला तुरुंगांत टाकलें. नंतर त्यानें अल्लाउद्दिनाच्या तिसऱ्या मुलाला देखील एका महालांत नजरकैद करून त्याचे डोळे देखील काढण्याच्या प्रयत्नांत तो होता. परंतु त्यानें फक्त ३५ दिवसांच्या अमदानींत जे अत्याचार केले त्यांमुळें त्याचा अंतकाळ जवळ येऊन ठेपला. अल्ला-उद्दिनाच्या स्वामिभक्त नोकरांनीं त्याचा वध केला.

दिल्लीच्या वरिष्ठ उमरावांनीं मुबारक याला कैदेंतून मुक्त केलें व त्याला उमर याचा राजप्रतिनिधि म्हणून नेमलें. मुबारकनें फक्त ६४ दिवसच त्या पदावर काम केलें. नंतर त्यानें स्वतःच्या धाकट्या भावाचे डोळे काढले आणि कुतुबुद्दीन मुबारकशाह या नांवानें दिल्लीच्या गादीवर बसला. त्याचें राज्य कांहीं दिवस निर्विघ्नपणें चाललें. त्यानें कांहीं कडक कायदे रद्द केले व राजकीय कैद्यांना मुक्त केलें. सुलतानानें जप्त केलेल्या जमिनीपण त्यानें परत केल्या.

परंतु मुबारकचें लक्ष हळू हळू राज्य-कारभारांत कमी होत गेलें व तो भोग-विलासांत गुरफटून गेला. त्या काळच्या ऐतिहासिकांचें मत आहे कीं तो गादीवर होता तो चार वर्षें व चार महिन्यांचा अवधी दारू पिण्यांत व नाचरंगांत लोटला.

मुबारकशाह खुसरो खान नांवाच्या एका सरदाराच्या हातचें एक बाहुलें होऊन बसला. हा खुसरो खान नीच जातीचा एक गुजराथी मुसलमान होता. त्यानें सुलतानाला वाईट संगत लावून देऊन स्वतःचा स्वार्थ सिद्ध करून घेतला.

सुदैवानें मुबारक शाह गादीवर असतां मंगोल लोकांनीं भारतावर स्वारी केली नाहीं. गुजराथ व देवगिरी येथें दोनदां सुलताना-विरुद्ध बंड झालें. गुजराथचें बंड मोडून सुलतानानें आपल्या सासऱ्याला गुजराथचा गव्हर्नर नेमलें. देवगिरीवर स्वतः सुलतानानें



स्वारी केली. देवगिरीचा अधिकारी हरपाल-देव यानें पराभव निश्चित होणार हें पाहून पळून जाण्याचा यत्न केला. परंतु सुलता-नानें त्याला कैद करून त्याचा अंत केला. मलिक यक्लखी याला देवगिरीचा शासक म्हणून नेमण्यांत आलें. अशा तऱ्हेनें यादवांचें राज्य खालसा करण्यांत आलें.

सुलतानानें खुसरो खान याला तेलंगाण्या-वर स्वारी करण्यासाठीं पाठविलें. तो एक वर्ष देवगिरीला राहिला. तेथें त्यानें एक मशीद बांधली व दिल्लीला परत आला. हे सर्व विजय मिळाल्याचा सुलतानाला

फायदा होण्याऐवजीं त्याचें नुकसानच जास्त झालें. राजघराण्यांतल्या अनेक कर्त्या पुरुषांचा वध झाला. खलीफाशीं सुल्तानाचें वितुष्ट आलें. सुल्तानानें स्वतःला मुसलमान धर्माचा अधिपति म्हणून घोषणा काढली. त्यानें स्वतःला अल्लाचा प्रतिनिधि म्हणून आपल्या नांवा बरोबर "अल वासिक बिल्ला" ही उपाधि धारण केली.

सुलतानाच्या मित्रांनीं खुसरोच्या खाना विरुद्ध तक्रार करून त्याची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला. पण सुलतानानें त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व शेवटीं खुसरोच्या एका नोकरानें सुरा भोसकून सुल्ताताचा वध केला. अशा तऱ्हेनें खिलजी वंश संपुष्टांत आला.

खुसरो "नासिरुद्दीन खुसरो" ही पदवी धारण करून दिल्लीच्या तख्तावर बसला. ज्या उमरावांनीं त्याला गादीवर बसविलें त्यांना खूष करण्यासाठीं इनामें देऊन त्यानें खजिना रिकामा केला.

हिन्दू लोकांना त्यानें उच्च अधिकाराच्या पदांवर नेमलें. ही गोष्ट कडव्या मुसल्मान उमरावांना आवडली नाहीं व त्यांनीं गाजी मलिक बाला पुढारी करून खुसरोविरुद्ध बंडाचें निषाण उभें केलें. ५ सेप्टेंबर १३२० या रोजीं गाजी मलिक दीपाल्पूरहून दिल्लीवर चालून आला व त्यानें खुसरोचा पराभव करून त्याचा शिरच्छेद केला व त्याच्या अनुयायांची कत्तल केली.

गाजी मलिक बाला स्वतः सुल्तान होण्याची इच्छा नव्हती. परंतु दिल्लीच्या नागरिकांच्या आग्रहास्तव ग्यासुद्दीन तुघलक या नांवानें १३२० च्या सेप्टेंबर महिन्यांत तो दिल्लीच्या गादीवर बसला.





# महाभारत

धृतराष्ट्राच्या वानप्रस्थाश्रमाकरितां आवश्यक ती सर्व तयारी करण्यास युधिष्ठिरानें आज्ञा दिली. साऱ्या हस्तिनापुरांत ती बातमी पसरली व धृतराष्ट्राला निरोप देण्या-साठीं सारें शहर लोटलें.

धृतराष्ट्र गांधारीसह राजवाड्यांतून बाहेर आला. तो प्रजेला संबोधन करून म्हणाला— "मी व गांधारी वानप्रस्थाश्रम घेत आहों. व्यास मुनि व युधिष्ठिर दोघांनीं आम्हांला त्यासाठीं परवानगी दिली आहे. आतां तुमची सर्वांची परवानगी आम्ही मागत आहों. आमचा तुमच्याशीं कित्येक वर्षांचा संबंध शाश्वत असाच आहे. वार्धक्यामुळें व पुत्रशोकामुळें माझें शरीर दुर्बळ झालें आहे. राज्याचा भार युधिष्ठिराच्या खांद्यावर टाकून मी आपली जबाबदारी कमी करीत आहें. दुर्योधनाच्या राज्यकारभारापेक्षां युधिष्ठिराचा राज्यकारभार प्रजेला जास्त सुखावह होईल. उतारवयांत वानप्रस्थाश्रमा-व्यतिरिक्त भार हलका करण्यास दुसरा उपाय नाहीं. म्हणून मी तुमचा सर्वांचा आतां निरोप घेत आहें."

तें ऐकून लोक त्यांना जें सुचलें तें बोलले. तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला—"या देशाच्या गादीवर शांतनूचें राज्य होतें. भीष्माचार्य व विचित्रवीर्य यांनीं प्रजेला सुखी करण्यासाठीं आपल्या कारकीर्दीत प्रयत्न केला. माझा भाऊ पांडु यानें त्यांच्या मागें राज्यकारभार पाहिला. मी देखील आपल्या अल्पबुद्धीप्रमाणें राज्य केलें. माझ्या हातून कांहीं चूक घडली असल्यास मला क्षमा करा. दुर्योधनाचा कारभार

शेवटचें मलपृष्ठ



निरंकुश होता. त्याच्यामुळें क्षत्रिय जातींत दोन तट पडले. त्यांत माझी चूक नसेल असें मी मानीत नाहीं. तें सर्व आतां तुम्हीं विसरा. आतां कौरव यांचा राजा देखील युधिष्ठिरच आहे. मी त्याला तुमच्या व तुम्हांला त्याच्या हवालीं करीत आहें. आतां आम्हांला निरोप द्या. सर्वांना आमचे दोघांचे नमस्कार."

धृतराष्ट्रानें निरोपवजा दुःखकातर होऊन जें कांहीं म्हटलें तें ऐकून सर्व प्रजा दुःखी झाली. प्रजेच्या वतीनें एका ब्राह्मणानें पुढें येऊन निवेदन केलें—"महाराज! आपल्या प्रजेच्या वतीनें हात जोडून मी निवेदन करीत आहें. आपल्या पूर्वजांनीं आपल्या प्रजेला स्वतःच्या आपल्यासारखें वागविलें. आपण आपल्या मित्राप्रमाणें आमचें रक्षण केलेंत. व्यास महर्षींच्या सल्ल्याप्रमाणें आपण वानप्रस्थ आश्रम घेत आहांत. आपण जाऊं नये असें आम्ही कसें सांगूं? मात्र आपला वियोग सदा आमच्या हृदयाला दुःखी करीत राहील. पांडवांच्या राज्यांत देखील आम्हांला सुख मिळेल यांत आम्हांला शंका नाहीं. युधिष्ठिराचें राज्य सहस्र वर्षें रहावें हीच त्या परमेश्वराजवळ आमची प्रार्थना आहे."

गांधारीसह धृतराष्ट्र प्रजेचा निरोप घेऊन अंतःपुरांत परत आला. रात्र उलटल्यावर सकाळीं धृतराष्ट्राच्या इच्छेवरून विदुर युधिष्ठिराकडे गेला आणि म्हणाला—"धृतराष्ट्रानें कार्तिक महिन्यांत वानप्रस्थाश्रम घेण्याचें ठरविलें आहे. भीष्म, द्रोण, त्याचे पुत्र, सैंधव व इतर मित्रांचें श्राद्ध करण्याची त्याची इच्छा आहे. त्याला त्यासाठीं जें थोडें धन लागेल त्याची व्यवस्था कर अशी विनंति करण्यासाठीं त्यानें मला पाठविलें आहे."



युधिष्ठिर व अर्जुन दोघांनीं तें लगेच कबूल केलें. परंतु भीमाला तें मुळींच पसंत पडलें नाहीं. तेव्हां अर्जुन म्हणाला—"भीष्मादिकांचेंच श्राद्ध करावयाचें आहे ना? परिस्थिति येऊन पडली आहे म्हणून ते आपल्याकडे मागायला आले आहेत. पूर्वीं कधीं त्यांच्या समोर हात पसरण्याचा प्रसंग आपल्यावर देखील आला होता. म्हणून कोणी तोंड उघडून मागायला आलें तर त्याला नकार देणें बरोबर नाहीं. तुला माझें मत पसंत नसेल तरयुधिष्ठिराला विचार."

भीमाला राग आला. तो म्हणाला—"भीष्म व द्रोणाचार्य दोघांच्या श्राद्धासाठीं जें धन हवें असेल तें द्यायला माझा नकार नाहीं. पण आतां श्राद्धकरण्याची गरजच काय, मला नाहीं कळलें. दुर्योधन, दुःशासनादिकांना परलोकांत सुख मिळावें हाच हेतु आहे ना? त्या कुलनाशकांनीं साऱ्या पृथ्वीचा ध्वंस केला आहे. आम्हांला या सर्वांनीं काय कमी छळलें? तेव्हां हे आमचे काका कोठें गेले होते? द्यूत खेळत असतां आम्ही पणामागून पण हारत चाललों होतों तेव्हां हेच आनंदानें विदुराला नव्हते का विचारीत कीं कोण हारला?"



युधिष्ठिराला भीमाचा तो उद्धटपणा आवडला नाहीं. म्हणाला—"गप्प बस. पुरे झाली तुझी बडबड!" तो विदुराकडे वळून म्हणाला—"आमच्या काकांना जितक्या द्रव्याची आवश्यकता असेल तितकें त्यांनीं घेऊन जावें. आपल्या जुन्या कष्टांची आठवण करून भीम जें कांहीं बोलला तिकडे लक्ष देऊं नका." विदुरानें घडलेलें सर्व वृत्त धृतराष्ट्राला जाऊन सांगितलें. फक्त भीमानें म्हटलें तेवढें सांगितलें नाहीं. धृतराष्ट्राच्या मनाचें समाधान झालें. ब्राह्मण व ऋषी-

मुनींना त्यानें आमंत्रणें पाठविलीं. भीष्म पितामहांच्या नांवीं रथ, अश्व, सुवर्ण, रत्न, मोती वगैरे, रेशमी व लोकरी वस्त्रें, गांवें दासदासी दान केले.

धृतराष्ट्र दान करीत होता व त्याच्या आज्ञेप्रमाणें युधिष्ठिराचे अधिकारी तो सांगेल तें देत चालले होते. काय काय दिलें गेलें याचा सर्व हिशेब पण ठेवण्यांत येत होता. दान धर्म धृतराष्ट्राच्या मना-सारखा झाला. म्हणून त्याच्या मनाचें पूर्ण समाधान झालें.

दुसऱ्या दिवशीं त्यानें पांडवांना बोला-विलें. एक मोठा यज्ञ केला व वानप्रस्थाश्र-माची दीक्षा घेतली. वल्कल वस्त्रें परिधान करून गांधारी सह तो घरून निघाला. त्याच्याबरोबर पंचपांडव व त्यांच्या पत्नी, विदुर, संजय, युयुत्सु, गौतम, धौम्य आदि मुनि निघाले. कुंती गांधारीचा हात आपल्या हातांत घेऊन निघाली. धृतराष्ट्र गांधारीच्या खांद्यावर हात ठेवून निघाला. द्रौपदी आणि सुभद्रा यांच्याबरोबर उत्तरा-पण आपल्या मुलाला कडेवर घेऊन निघाली. त्यांच्या मागें नागरीक लोक चालू लागले. साऱ्या हस्तिनापुराला शोककळा आली होती. पांडव द्यूतांत हारल्यावर वनवासास निघाले होते तोच प्रसंग सर्वांना आठवला. जागोजागीं लोकांची गर्दी होती. सर्वांचे डोळे ओलावले होते. सर्व नगराच्या द्वारा-पर्यंत आले. धृतराष्ट्रानें सर्वांना परत फिर-ण्यास सांगितलें. धृतराष्ट्राबरोबर विदुर व संजय दोघांना जाण्यास अनुमति मिळाली. कृपाचार्य, युयुत्सु अंत:पुरांतील परत स्त्रियांना घेऊन जायला धृतराष्ट्रानें युधिष्ठिराला सांगि-तलें. सर्व जागच्याजागीं उभे होते. युधिष्ठिर कुंतीला म्हणाला—" आई, मी यांच्याबरोबर जातों. तूं सर्व स्त्रियांना घेऊन जा."





[ १९ ]

[ लख आपल्या दोघां साथी मित्रांबरोबर त्या विचित्र सिंहाच्या गुहेंत शिरला. त्यांना तेथें दगडी गदा सांपडली. तो सिंह त्यांच्यावर उडी मारणार इतक्यांत सोमांगानें ती गदा त्याच्या टाळक्यांत फेंकून मारली. सिंह घाबरून परतला आणि गुहेबाहेर रानांत पळून गेला. त्याच भागांत पंखवाल्या जातीचे लोक होते. ते सिंहाला पाहून घाबरले. तेथेंच ब्रह्मदंडी पण होता. पुढें वाचा. ]

ब्रह्मदंडीचा मंत्रोच्चार व पंखवाल्यांचा आरडा ओरडा यामुळें सर्व मैदान दुमदुमलें. सिंह त्यांच्या बाजूला गेलाच नाहीं. तो स्वत:चा जीव वांचविण्यासाठीं पळतच होता. ब्रह्मदंडीनें तें ओळखलें होतें. म्हणून तो जास्त मोठमोठ्यानें मंत्रोच्चार करूं लागला. मधून मधून तो ओरडे—" काळभैरवा ! त्या सिंहाला कान धरून रानाबाहेर नेऊन टाक ! " कांहीं वेळानें त्यानें ओरडून हाक मारली—" जित ! ए शक्ति ! आहांत कोठें ? सिंहाला काळभैरवानें रानाबाहेर नेऊन टाकलें आहे. आतां भिण्याचें कारण नाहीं." त्याचे दोघे अंगरक्षक समोर येऊन उभे राहाले. दोघांची घाबरगुंडी उडून गेली होती. त्यांची दृष्टि सिंह पळून गेला होता त्या बाजूला खिळली होती. शक्तिवर्मा आपली



तलवार फिरवीत म्हणाला—"समोर तर येऊं दे, जमिनीवर लोळवला नाहीं तर नांवाचा शक्तिवर्मा नाहीं."

जितवर्मा म्हणाला—"आज्ञा करावी, गुरुदेव! आम्ही त्याचा पाठलाग करून त्याला ठार करतों!"

पण ब्रह्मदंडी जोरानें हंसून म्हणाला—"तुमचा पराक्रम काय मला माहीत नाहीं. तो राखून ठेवा. याहून जास्त महत्वाच्या कामासाठीं त्याचा उपयोग करतां येईल. प्रथम जाऊन त्या पंखवाल्यांना धाडस द्या. त्यांच्या सरदाराला बोलावून घेऊन या. आतां लखू आपल्या हातीं सांपडला आहे या गोष्टीची मला तरी शंका उरली नाहीं."

लखूचें नांव ऐकून दोघे चकित होऊन ब्रह्मदंडीच्या तोंडाकडे पाहूं लागले. म्हणाले—"लखू! कोठें आहे? आम्हांला नाहीं दिसला तो!"

ब्रह्मदंडी म्हणाला—"तो दिसायला तुम्हांला माझे डोळे असले पाहिजेत. पण घाई करूं नका! तो आपल्या अनुयायांसह जवळ पासच कोठेंतरी आहे. आपण सावध-गिरी बाळगून काम केलें पाहिजे.

जितवर्मा व शक्तिवर्मा पंखवाल्या जातीचा नायक गरुडराज याला भेटायला निघाले. तो आपल्या अनुयायांना गोळा करून त्यांना रागवत होता. कारण सिंहाला पाहून घाब-रून ते सर्व पळत होते. म्हणाला—

"आपण गरुडाच्या वंशांत जन्माला आलों. एका सामान्य सिंहाला भिऊन पळून गेलात आणि आपल्या कुळाच्या नांवाला कलंक लावलात. सांगा, आपल्यासारखें आकाशांत कुणाला उडतां येतें का? त्या सिंहाच्या चारी बाजूला आकाशांत घिरट्या घालून त्याला उचलून फेंकून दिला असतात तर! तें सोडून भित्र्यासारखे घाबरून पळून आलांत! लाज वाटायला हवी होती तुम्हांला!"

तितक्यांत जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांनीं येऊन ब्रह्मदंडीचा निरोप सांगितला. ब्रह्म-दंडीचें नांव ऐकतांच सरदाराचा चेहरा संतापानें लाल झाला. म्हणाला—"तुमच्या ब्रह्मदंडीवर माझा होता नव्हता तो विश्वास उडाला आहे. तो म्हणत होता कीं मी मंत्रबळानें सारें रान भस्म करून टाकीन. पण एका सामान्य सिंहाला देखील त्याला भस्म करतां आलें नाहीं. तो रानांत पळून गेला आहे व पुन्हां परत येणार नाहीं कशावरून?"

जितवर्मा व शक्तिवर्मा दोघांनीं लवून मुजरा केला व म्हणाले—"गरुडराज! कदाचित आपणांला माहीत नसेल, या सिंहाहून क्रूर अशा चार चौघांशीं युद्ध करावयाचें आहे. प्रथम या संकटाला तोंड द्यावयाचें आहे!"

सरदारानें आपल्या तोंडावरचा गरुडाचा मुखवटा काढून बाजूला ठेवला व विचारूं लागला—"संकट येणार आहे? आपल्यावर? तो मार्जार व श्वानकर्णी दोघांचें परस्परांशीं



सख्य झालें आहे कीं काय? दोघे आमच्या-वर चालून येणार आहेत वाटतें?" त्याच्या आवाजांत थोडा घाबरटपणा होता.

"तें सर्व आम्हांला माहीत नाहीं. तुम्ही प्रथम आमच्या मालकाला भेटायला चलावें. तेच काय तें आपल्याला सांगतील." जितवर्मा म्हणाला.

गरुडराज, ब्रह्मदंडीला भेटण्यासाठीं निघाला. त्याला येत असलेला पाहून ब्रह्मदंडी चार पावलें पुढें येऊन म्हणाला—"गरुडराज! आमच्यावर कृपा कर! आमच्यावर कृपा कर!"



"गरुडराज!" हें संबोधन ऐकून सरदार खूष झाला. उडत पुढें येऊन तो ब्रह्मदंडीला प्रेमानें भेटला व स्मित करून म्हणाला– "मी तुझ्यावर कृपा करणार? आमच्यावर एक मोठें संकट ओढवणार आहे असें तूं सांगून पाठविलेंस! पण, तुला पाहून तर तसें कांहीं वाटत नाहीं!"

"संकट! अरे, आपलें भाग्य उदयाला आलें आहे! तुझ्या अनुयायांवर बाण सोडून मार्जारच्या अनुयायांना सोडविणारे या गुहेंत कोठें तरी दडी मारून बसले आहेत. या विषयीं माझ्या मनाची खात्री पटली आहे. त्या सिंहाला पाहूनच सर्व घाबरून पळून गेले. पण सिंहाला गुहेंतून हुसकावून लावणारा कोण आहे हें नाहीं कोणी पाहिलें. तुला नाहीं वाटत त्यांच्या भीतीनें सिंह बाहेर पळून आला असेलसें?" ब्रह्मदंडीनें गरुड राजाचें मत विचारलें.

ब्रह्मदंडीच्या बोलण्याचा गरुडराजाच्या मनावर परिणाम झाल्यासारखें दिसलें. म्हणून तो म्हणाला–"म्हणजे! लखू आणि त्याचे अनुयायी गुहेंत आहेत! ठीक! आम्हांला अर्धें राज्य, आणि भयानक दरींतलें सोनें व चांदी तुला! चल तर आंत शिरून हुडकून काढूं त्यांना!"

ब्रह्मदंडी प्रत्येक वेळीं सांपडल्यावर अर्धें राज्य देण्याचें वचन देऊन आपली सुटका करून घेत होता. चंडमंडूकाच्या हातांतून स्वतःला सोडवून घेण्यासाठीं त्यानें तें वचन दिलें होतें. नंतर गरुड राजाला पण तेंच वचन दिलें होतें. त्यानें चंडमंडूकाच्या हातांतून गुलामांचा व्यापार करणाऱ्या महाकाय व्यापाऱ्याला सोडविलें होतें. त्याची मदत पुढें केव्हां तरी मिळेल हा हेतु त्यांत होता. तो महाकाय पण ब्रह्मदंडीच्या बरोबर होताच.



गरुड राजाचा उत्साह व घाई पाहून ब्रह्मदंडी थोडा संकोच करीत म्हणाला– "गरुड राज! तुझ्या साहसाची व शौर्याची मी वाखाणणी करतो. पण माझ्या मतें घाई करून चालावयाचें नाहीं. युक्तीनें काम केलें पाहिजे. कारण लखू, जयमल व तो रानटी गोभांग तिघे हुशार आहेत. आपण गुहेंत शिरलों तर ते दुसऱ्या बाजूनें निसटून पळून जातील. त्यांना गुहेंतून बाहेर काढण्यासाठीं कांहीं तरी युक्ति योजली पाहिजे. बाहेर आल्याबरोबर त्यांना पकडणें तेवढें कठीण जाणार नाहीं."

"पण त्यांना बाहेर काढणें शक्य आहे का? तूंच तर म्हणालास कीं तिघे एकाहून एक वस्ताद आहेत म्हणून!" गरुड राजानें शंका केली.

"त्यांचें शौर्य, धैर्य आणि चातुर्य माझा काळभैरव पाहून घेईल. तो महाकाय गुलामांचा व्यापारी आहे ना? त्याच्या मदतीची आतां गरज आहे. त्याला बोलावून घेऊन यायला सांग!" ब्रह्मदंडी म्हणाला.

गरुड राजानें त्या महाकाय व्यापाऱ्याला बोलावून घेऊन यायला आपल्या दोघां अनुयायांना पाठविलें.



ब्रह्मदंडी आपल्या दोघां अंगरक्षकांना एका बाजूला बोलावून घेऊन गेला. एका झोपडीच्या शेजारीं उभे राहून त्यांनीं आपसांत कांहीं सल्ला केला.

"ब्रह्मदंडी त्या महाकाय व्यापाऱ्याच्या नादाला लागूं नकोस. तूं स्वतःच आपल्या हातानें आपल्या पायावर कुऱ्हाड मारीत आहेस. त्याला कोण तैनात देण्याचा विचार आहे?" शक्तिवर्मानें विचारलें.

"आपल्या या मूर्खपणाच्या प्रश्नांनीं मला विनाकारण त्रास देऊं नका! गुलामांचा मालक त्या महाकायाला मी नरमांसभक्षक



चंडमंडूकाच्या हातांतून वांचविलें आहे. आतां तो माझा गुलाम झाला आहे. मी सांगेन तसा तो वागतो कीं नाहीं, तुम्ही पहात रहा!" ब्रह्मदंडी थोडा रागानेंच म्हणाला.

"तो तुझा गुलाम कसा काय झाला बुवा? तूं तर त्याला अर्धें राज्य द्यावचें वचन दिलें आहेस?" जितवर्मानें विचारलें.

"मी नाहीं कोणाला वचन दिलें. मी त्याला एवढेंच म्हटलें होतें कीं माझ्या अर्ध्या राज्यांतील वाटेल त्याला तूं आपला गुलाम करून घे! म्हणजे त्याला अर्धें राज्य देऊन टाकलें असा अर्थ झाला वाटतें?" ब्रह्मदंडीचा पारा खूप चढला होता.

इतक्यांत गरुडराज पुढें येऊन म्हणाला—"झालें काय भांडायला, तुम्हांला आपसांत?"

ब्रह्मदंडी त्याच्याकडे वळून स्मित करून म्हणाला—"आम्ही भांडतों आहों असें वाटलें तुला? माझे अंगरक्षक तुझ्यासारखेंच गुहेंत शिरून लखूला व त्याच्या अनुयायांना धरून आणण्यासाठीं आग्रह करीत होते. त्यांत किती धोका आहे हें त्यांना मी समजावून सांगत होतों." थोड्या वेळानें महाकाय तेथें येऊन पोंचला. ब्रह्मदंडीकडे आश्चर्यानें पहात विचारूं लागला—"महामांत्रिक! बऱ्याच दिवसांनीं माझी आठवण काढलीस? काय भानगड आहे?" असें म्हणत त्यानें खांद्यावरचा चाबूक हातांत घेतला.

ब्रह्मदंडी त्याला बाजूला बोलावून घेऊन गेला आणि त्याच्या कानांत त्यानें कांहीं तरी सांगितलें. तें ऐकून तो घाबरून गेला होता असें त्याच्या तोंडावरून भासलें. पण थोड्या वेळानें चेहरा बदलला व त्याच्या मनांतली शंका दूर झाल्यासारखें वाटलें. चाबूक फटकारवून व आपल्या मिशांवर ताव देत तो थोडा गुरगुरला.



ब्रह्मदंडी गरुड राजाजवळ येऊन म्हणाला—"गरुडाग्रेसरा! लखू आपल्या हातीं आला आहे असें समज! आतां निसटून पळून जाणें त्याला शक्य नाहीं. तूं आपल्या अनुचरांसह त्या डोंगरापर्यंत आमच्याबरोबर ये! या महाकायाला मी जें कांहीं सांगितलें आहे तसें तो करील! त्याच्या बोलण्या व वागण्याकडे तूं दुर्लक्ष कर! कारण तें सर्व नाटक आहे!"

गरुडराज त्याप्रमाणें आपल्या पांच निवडक अनुयायांसह डोंगराळ प्रदेशांत येऊन पोंचला. ब्रह्मदंडी आपल्या दोघां अंगरक्षकांबरोबर त्याच्या पाठोपाठ येत होते. महाकाय सर्वांच्या पुढें आपला चाबूक फटकारवीत आणि ओरडत जात होता. तो एका उंच दगडावर चढून उभा राहिला. महाकाय ओरडूं लागला—"ब्रह्मदंडी जितवर्मा, शक्तिवर्मा आणि गरुडराजा! आतां माझ्या हातून तुम्हांला ब्रह्मदेव देखील वांचवूं शकणार नाहीं. मी तुम्हांला त्या लखूच्या हातीं विकून टाकणार आहें. तो तुमच्या अंगाचे लचके तोडून खाईल व मी उभा राहून गंमत पहात राहीन! तुम्हांला ठार करून लखू त्या भयानक दरींत जाईल.











तो तेथील ऐश्वर्य संपादन करून येईल व मला भरपूर किंमत देईल. मी त्याच्याबरोबर जाणार!" त्याच्या कर्कश आवाजानें डोंगर व तें खोरें हादरलें.

गुहेच्या एका विवरांत उभे राहून लखू व त्याचे अनुयायी तें सर्व दृश्य पहात होते व महाकाय म्हणत होता तें ऐकत होते. त्यांना आश्चर्य वाटलें. क्रूर महाकाय जिवंत होता व त्यानें स्वतः ब्रह्मदंडीला व त्याच्या अनुयायांना गुलाम करून घेतलें होतें. स्वतःच्या डोळ्यांवर त्यांचा विश्वासच बसेना.

"लखू! यांत मला लुच्चेगिरी दिसते आहे! संभाळून वागलें पाहिजे!" जयमल म्हणाला.

लखू कांहीं उत्तर देणार इतक्यांत तो महाकाय चाबूक फटकारवून ओरडला—"आंतां तुम्ही त्या झोपडींत जाऊन बसा! बाहेर आलांत तर पहा! एकेकाची चामडी लोळवीन. खबरदार!" त्यानंतर सर्व त्या झोपडींत जाऊन बसलेले लखूला दिसले. महाकाय त्या दगडावर उभा राहून मिशांवर ताव देत चाबूक फिरवीत होता.

"जयमल! चल! त्या महाकायाला भेटून पाहूं या तर काय भानगड आहे. समज, आपल्याला हुडकून काढणें त्यांना शक्य नाहीं." असें म्हणत उत्तराची वाट न पाहतां लखू गुहेंतून बाहेर आला व तो महाकाय उभा होता तिकडे रांगत रांगत जाऊं लागला.

जयमलनें त्याला सावध करण्याचा प्रयत्न केला. पण त्यापूर्वीच लखू चार पांच पावलें दूर निघून देखील गेला होता. आतां कांहीं करणें शक्य नाहीं हें ओळखून जयमल व गोमांग दोघे त्याच्या पाठोपाठ निघाले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# हृदय पालट

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं अशक्य काम करून दाखविण्याच्या नादांत व्यर्थ कष्ट सहन करीत आहेस. तुला कंटाळा वाटूं नये म्हणून एक लहानशी गोष्ट सांगतो. ऐक!" असें सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला—

"फार पूर्वी उज्जयनीच्या गादीवर वीरसिंह नांवाचा राजा राज्य करीत असे. तो स्वतः शूरवीर होता. पण राज्यव्यवस्थेची त्याला विशेष आवड नव्हती. म्हणून त्यानें राज्यकारभाराचा सर्व भार आपल्या विश्वासू प्रधानांवर व सेनापतीवर टाकला आणि स्वतः चैनींत दिवस घालवूं लागला.

**वेताळाच्या गोष्टी**

M-



एकदां वीरसिंहाला स्वप्न पडलें. स्वप्नांत त्याला राजधानींतले सर्व रस्ते व गल्ल्या दिसूं लागल्या. रस्त्यांवर व गल्ल्यांतून त्याला मनुष्यांऐवजीं कोल्हे हिंडत असलेले दिसले. दुसऱ्या दिवशीं राजानें असें स्वप्न कां पडावें याच्या विषयीं पुष्कळ विचार केला. पण त्याला उत्तर सुचेना. त्यानें आपल्या प्रधानाला व इतर प्रमुख अधिकाऱ्यांना बोलावून स्वप्नाचा अर्थ काय असावा असा प्रश्न केला. पण कोणीच सयुक्तिक असें उत्तर देऊं शकला नाहीं. शेवटीं राजानें राज्यभर अशी दवंडी पिटवली कीं राजाला पडलेल्या स्वप्नाचा ठीक ठीक अर्थ सांगणाराला मोठें बक्षिस देण्यांत येईल.

राजधानीजवळच्या एका खेडेगांवांत सांवळ्या नांवाचा लाकूडफोड्या रहात असे. तो लाकडें फोडून आपला उदर-निर्वाह करी. तो एक दिवशीं खांद्यावर कुऱ्हाड टाकून रानांत गेला. एका झाडाजवळ विचार करीत उभा होता कीं किती दिवस देव कष्ट देणार आहे कोणास ठाऊक? मुलांचीं कोमेजलेलीं तोंडें त्याच्या डोळ्यासमोर उभीं राहालीं आणि त्याच्या डोळ्यांतून टिपें घळघळा गळूं लागलीं. पण तितक्यांत त्याला कोणी प्रश्न विचारीत असल्याचा भास झाला—"कोण तूं? काय झालें तुला असें टिपें गाळायला?" चकित होऊन ज्या बाजूनें तो आवाज आला त्या बाजूला पाहिलें तेव्हां त्याला बिळांतून डोकावून पाहणारा एक सांप दिसला.

सांवळ्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. सांप मनुष्यासारखा कसा काय बोलतो? पण त्यानें धीर करून उत्तर दिलें—"आज पाऊस पडतो आहे. आज मी लाकडें कशी काय फोडणार आणि ती बाजारांत जाऊन कशी काय विकणार? चार पैसे हातीं पडले नाहींत तर पोरांची उपासमार होणार म्हणून वाईट वाटत आहे." सांवळ्यानें धीर करून नागाला उत्तर दिलें.



नाग म्हणाला—"मी तुला एक युक्ति सांगतों. पण एका अटीवर, तुला जें धन मिळेल त्यांतलें तूं मला अर्धें दिलें पाहिजेस!"

सांवळ्यानें ती अट कबूल केली.

नाग म्हणाला—"राजाला एक स्वप्न पडलें आहे कीं राजधानीभर कोल्हे हिंडत आहेत. त्या स्वप्नाचा अर्थ राजालाच काय राजाच्या प्रधानाला व इतर पंडितांना देखील कळला नाहीं. राजानें घोषणा केली आहे कीं माझ्या स्वप्नाचा अर्थ सांगेल त्याला बक्षिस दिलें जाईल. मी त्याचा सांगतों अर्थ. तूं जाऊन सांग. तुला जें बक्षिस मिळेल त्यांतलें तूं मला अर्धें आणून दे."

नंतर नाग म्हणाला—"स्वप्नाचा अर्थ असा आहे. राजा पराक्रमी आहे हें खरें आहे. परंतु राज्यव्यवस्थेकडे त्याचें मुळींच लक्ष नाहीं. सर्व कामें प्रधानावर व मंत्र्यांवर त्यानें टाकलीं आहेत. राज्यांत त्यामुळें लांचलुचपत वाढली आहे. सर्व राज्यभर प्रजेची स्थिति दयनीय झाली आहे. मग खुद्द राजधानींत कोल्हींकुत्रीं हिंडतांना दिसूं लागलीं तर त्यांत काय आश्चर्य!"

सांवळ्या सांपाला पाहून घाबरून होता. तो माणसासारखा बोलतो आहे हें पाहून तर तो चकितच झाला. नंतर त्यानें सांगितलें तें खरें आहे कीं नाहीं विचार करीत तो राजाकडे गेला आणि नागाच्या तोंडून त्यानें जें ऐकलें होतें तें राजाला जाऊन सांगितलें. राजानें विचार करून पाहिला तेव्हां त्याला सांवळ्याचें म्हणणें बरोबर

वाटलें. त्यानें त्याला बक्षिस देऊन त्याचा सत्कार केला. सांवळ्याचें दारिद्र्य कमी झालें. नागसांपाला दिलेलें वचन तो विसरला होता असें नाहीं. पण हें जें धन मिळालें आहे तें माझ्या कुटुंबाला कांहीं वर्षें तरी सुखानें जगायला पुरेल. सांपाला पैशाची काय गरज ?" असा विचार करून त्यानें सांपाला दिलेल्या वचनाप्रमाणें अर्धें धन दिलें नाहीं.

राजानें लांचखाऊ अधिकाऱ्यांना कामावरून कमी केलें व त्यांच्या जागीं नवीन व कर्तव्यपरायण अधिकाऱ्यांना नेमलें. तो स्वत: देखील राज्यव्यवस्थेकडे लक्ष देऊं लागला.

कांहीं दिवसांनीं राजाला पुन्हां एक स्वप्न पडलें. स्वप्नांत त्याला एक तलवार दिसली. त्या स्वप्नाचा अर्थ पण राजाला कळला नाहीं. म्हणून त्यानें सांवळ्याकडे निरोप पाठवून त्याला बोलाविलें. राजानें त्याला स्वप्नाचा अर्थ विचारला.

सांवळ्या काय उत्तर देणार ? दुसऱ्या दिवशीं उत्तर देण्याचें वचन देऊन तो घरीं परतला. नागसांपाला शरण जाणें त्याला भाग पडलें. त्यानें क्षमा मागून दुसऱ्या



स्वप्नाचा अर्थ विचारून घेण्याचें मनाशीं ठरविलें व रानांत त्याला सांप भेटला होता त्या जागीं गेला.

नागसांपानें बिळांतून आपली फडा बाहेर काढून त्याला विचारलें—"काय रे बुवा ? काय भानगड आहे ? माझ्याकडे कशासाठीं आला आहेस ?"

सांवळ्या म्हणाला—"नागराजा ! राजाला पुन्हां एक स्वप्न पडलें आहे व त्यानें त्या प्रश्नाचा अर्थ मला विचारला आहे. तुझ्याशिवाय कोण सांगणार अर्थ. म्हणून मी तुलाच विचारायला आलों आहें. मी तुला मागें अर्धें धन द्यायचें कबूल केलें होतें. तें मी विसरलों नाहीं. या खेपेस मी, तें व या स्वप्नाचा अर्थ सांगितल्यावर मला मिळेल त्यांतलें अर्धें दोन्ही एकदम देण्याचें वचन देतों."

"या स्वप्नाचा अर्थ राजाला कळायला हवा होता. हें बघ, राजानें लांचखाऊ लोकांना कामावरून कमी केलें असलें तरी त्यानें त्यांना कडक शिक्षा केली नाहीं. त्या सर्वांनीं मिळून राजाच्या विरुद्ध कट केला आहे. त्यांनीं राजाला सिंहासनावरून हुसकावून लावून त्याचा वध करण्याचें





ठरविलें आहे. यासाठीं त्यांनीं राज्याच्या शत्रूची मदत घेतली आहे. स्वप्नाचा एवढाच अर्थ आहे." नागसांप म्हणाला.

सांवळ्या तेथून सरळ राजाकडे गेला व म्हणाला—"महाराज! तुम्हांला स्वप्नांत तलवार दिसली नाहीं का? त्याचा अर्थ मी सांगतों." असें सांगून त्यानें सांपाच्या तोंडून जें कांहीं ऐकलें होतें सांगून टाकलें.

या खेपेस देखील राजाला स्वप्नाचा तो अर्थ पटला. राजानें सांवळ्याला दुप्पट बक्षिस देऊन आदरपूर्वक निरोप दिला. नंतर त्यानें सर्व कट करणाऱ्या अधिकाऱ्यांना तुरुंगांत टाकलें. त्यानें शत्रूवर स्वतःच स्वारी केली व त्याचा पराभव करून त्याची खोड मोडली.

सांवळ्या बक्षिस घेऊन घरीं गेला. सांपाला त्याचा वांटा देण्याची त्याला आवश्यकता भासली नाहीं. सांप बक्षिस मागायला आलाच तर त्याला ठार करण्याचा पण त्यानें निश्चय केला.

पुढें कांहीं दिवसांनीं राजाला आणखी एक स्वप्न पडलें. स्वप्नांत राजाला हिरवेंगार कुरण व त्यांत चरणाऱ्या गाई व वासरें दिसलीं. त्यानें पुन्हां सांवळ्याला बोलावून त्याचा अर्थ विचारला.

राजाला पुन्हां स्वप्न पडलें असल्याचें ऐकूनच सांवळ्याचे पाय गारठले. नागसांपाच्या मदतीची आतां पुढें गरज पडणार नाहीं असें त्याला दोन्ही वेळ वाटलें होतें. पण या खेपेस देखील त्याला सांपाकडेच जावें लागलें. त्यानें राजाचा निरोप घेऊन येणाऱ्याला परत पाठविलें व सांपाच्या बिळाजवळ आला. सांपानें बिळाबाहेर येऊन येण्याचें कारण विचारलें.

या खेपेस सांवळ्या लाजत लाजतच गेला. म्हणाला—"नागदेवा! मी या पूर्वीच यायला हवें होतें. पण मझ्या या दिरंगाई-बद्दल मला माफ कर! मला पुन्हां तुझ्या मदतीची गरज आहे. राजाला पुन्हां एक स्वप्न पडलें आहे. मी तिन्ही इनामांतला अर्धा वांटा तुला देईन. राजाच्या स्वप्नाचा अर्थ काय आहे मला सांग."

"राजाला स्वप्नांत हिरवेंगार कुरण व गाई-गुरें दिसलीं याचा अर्थ त्याच्या राज्यांत सर्वत्र शांतता नांदत आहे व धर्म आज चार पायावर निर्भास्त उभा आहे असा होतो." असें सांगून सांप बिळांत निघून गेला.

सांवळ्यानें सांगितलेला अर्थ पटल्यामुळें राजा इतका खूष झाला कीं त्यानें सांवळ्याला कांहीं गांवेंच इनाम म्हणून लिहून दिलीं.

सांवळ्या या खेपेस स्वतः नागदेवाकडे पुष्कळशीं सोन्या चांदीचीं नाणीं घेऊन गेला. पण या खेपेस सांप स्वतः बिळाच्या बाहेर आला नाहीं. तेव्हां सांवळ्यानें त्याला बोलाविलें. तेव्हां बिळाबाहेर येऊन नागानें विचारलें—"आतां कशाला आला आहेस बुवा?"

"हें घे, मी तुला वचन दिलें होतें त्याप्रमाणें राजाकडून मला जें कांहीं इनाम आजवर मिळालें त्यांतला अर्धा वांटा मी घेऊन आलों आहें." सांवळ्या म्हणाला.



पण नागानें इनामाचा तो वांटा घेतला नाहीं. "हें तूं स्वतःसाठींच ठेवून घे." असें सांगून सांप बिळांत निघून गेला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून राजाला विचारलें—"राजा, मला एक शंका आहे! ज्या सांवळ्यानें सांपाला दिलेलें वचन दोनदां पाळलें नाहीं व एकदां तर त्याला ठार करण्याची वेळ आल्यास त्याला देखील तयार झाला होता. तो तिसऱ्या वेळीं





स्वतः होऊन बक्षिसाचा अर्धा वांटा द्यायला कसा काय तयार झाला? सांपानें तो वांटा कां घेतला नाहीं? दोनदां ज्या गृहस्थानें वचन मोडलें त्याच्याकडून काय घ्यायचें या विचारानें का? तूं माझ्या या शंकेचें समाधानकारक उत्तर माहीत असूनहि दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील! लक्षांत ठेव!"

राजा म्हणाला—"नाग सांवळ्यावर रागावला नव्हता हें तर उघड दिसतेंच आहे. रागावला असता तर तो दोन ही वेळां मदत द्यायला तयार झालाच नसता. सांवळ्यानें पहिल्या व नंतर दुसऱ्या वेळीं वांटा दिला नाहीं तर त्याचें कारण पण उघड आहे. पहिल्यानें सांपाकडून राजाच्या स्वप्नाचा अर्थ त्याला कळला तेव्हां प्रजेंत शृगालवृत्ति होती. तो स्वतः देखील त्याच मनोवृत्तीच्या दडपणा खालीं दबलेला होताच. म्हणून त्यानें सांपाला वांटा दिला नाहीं. दुसऱ्या वेळीं सांपानें स्वप्नाचा अर्थ सांगितला तेव्हां लोकांच्या मनांत दुष्टबुद्धीनें घर केलेलें होतें. म्हणून सांवळ्याच्या मनांत सांपाला ठार करण्याचा दुष्ट विचार आला. राजाला तिसरें स्वप्न पडलें तेव्हां राज्यांत सुख व शांति नांदत होती. प्रजेला म्हणून तीच स्थिति सांवळ्याच्या मनाची पण होती. कसलीच काळजी उरली नव्हती. स्वखुषीनें सांवळ्या बक्षिसाचा वांटा द्यायला तयार झाला."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. [कल्पित]



# तीन संकटें

एकदां एक ससा एकांतांत बसून स्वतःशींच बोलूं लागला—"प्राण्याला तीन प्रकारचीं संकटें सहन करावीं लागतात. पहिलें संकट म्हणजे नैसर्गिक—भूकंप, वणवा वगैरे, दुसरें संकट म्हणजे तात्कालिक—दुष्काळ, अतिवृष्टि वगैरे आणि तिसरें संकट म्हणजे शिकारी, चोर वगैरे." सशाचे ते शब्द एक माकड, चक्रवाक पक्षी व गांढूळ यांच्या कानावर पडले.

"जर आकाश माझ्या डोक्यावर कोसळलें तर जागा असेन तेव्हां पडलें तर हरकत नाहीं. पण झोपलो असतांना पडलें तर चिरडून जाईन त्याच्या खालीं." म्हणून तेव्हांपासून चक्रवाक पक्षी पाय वर करून झोंपूं लागला.

"दुष्काळ पडला व मला खायला माती सुद्धां मिळाली नाहीं तर मी काय करणार बुवा." असा विचार करून गांढूळ खाल्लेली माती ओकूं लागलें.

चोरांचा सुळसुळाट वाढला व त्यांनीं जमीनच चोरून नेली तर काय करावयाचें असा विचार करून माकडें झाडावर राहूं लागलीं व मधून मधून खालीं येऊन जमीन आहे कीं चोरीला गेली हें पाहूं लागलीं.





# भीमूचे पराक्रम

भीमू आतां बाबा झाला होता. जमीनदाराच्या मुलीला मुलगा झाला म्हणून गांवभर आनंदाची बातमी पसरली. सर्व भीमूचें व जमीनदारचें अभिनंदन करूं लागले. भीमूला जो आनंद झाला तो काय वर्णावा. तो मुलाच्या पाळण्याजवळ जाई व बराच वेळ मुलाकडे पहात उभा राही.

एकदां मुलगा जोरजोरानें रडूं लागला. भीमूला एका जुन्या गोष्टीची आठवण झाली. मुलें अचानक रडूं लागली कीं घरांतलीं भुतें पळून जातात हें मागें त्यानें ऐकलें होतें. म्हणून तो भुतें कोणत्या दारानें व कोणत्या बाजूला पळत आहेत हें पाहण्यासाठीं गच्चीवर चढून उभा राहाला.

त्याच वेळीं सामान ठेवायच्या कोठडींत त्याला कांहींतरी खुडबुड ऐकूं आली. एक उंदीर एका बरणींत पडला होता व बाहेर येण्यासाठीं धडपड करीत होता. परंतु त्याच्या सर्व उड्या फुकट जात. भीमूला तीच खुडबुड ऐकूं आली होती. परंतु भीमूला वाटलें कीं तें भूतच असणार. तो सामानाच्या खोलींत गेला. बरणीचें तोंड टावेलानें घट्ट बांधलें व बाहेर बागेंत घेऊन गेला. हळूच टावेल बाजूला करून बरणी वांकडी केली आणि ओरडूं लागला– "भू....त ! भू....त !" पुढें म्हणाला– "नीघ बाहेर ! आणि पहा, पुन्हां जर आमच्या घरांत आलास तर तुझें नरडेंच दाबून टाकीन."

काळोख असल्यामुळें भीमरावांना उंदीर बाहेर उडी मारून निघालेला दिसला नाहीं. पण टुणकन उडी मारल्याचा आवाज मात्र ऐकूं आला. भीमराव घरीं परत आले तोंपर्यंत मुलाचें रडणें थांबलें होतें. त्यावरून भूत पळून गेल्याची त्यांची खात्री पटली.

भीमरावांनीं जाऊन आपला पराक्रम लक्ष्मीजवळ जाऊन वर्णन करून सांगितला. म्हणाले–"मूल रडूं लागल्याबरोबर कोठेंतरी भूत आहे व तें पळणार हें मी ओळखलें होतें." नंतर त्यांनीं भुताला कसें पळवून लावलें हें हातवारे करून सांगितलें.

लक्ष्मी म्हणाली–"मुलगा रडूं लागलेला पाहून मी धांवत आलें. येऊन पाहिलें तर मुंगी चावली होती त्याला. तुम्ही भूत म्हणून बाहेर हाकललेंत तो उंदीर असेल आणखी काय ?"

बायकोचें म्हणणें भीमरावांना पटल्यासारखें दिसलें. उंदीरच असेल तर मग तो, असें त्यांनीं मनाचें समाधान करून घेतलें. त्यांनीं बायकोच्या चाणाक्षपणाचें तोंड भरून कौतुक केलें.

नातवाच्या बारशाची तयारी जमीनदारानें खूप थाटामाटानें केली. हरिकीर्तनाची पण व्यवस्था केली. बुवा कीर्तन सुरू करणार होते. खूप गर्दी जमली होती. मुलांची गर्दीच जास्त होती. जमीनदाराला



मुलांची गडबड ऐकूं आली. म्हणून त्यांनीं नोकराला बोलावून सांगितलें कीं सर्वांना जाऊन सांग कीं हरिकथेला येणाऱ्यांनीं आरडा ओरड करूं नये, शांतपणें बसून हरिकथा ऐकावी."

नोकरानें जाऊन मालकाचा हुकूम बजावला. म्हणाला–"ओरडा कशाला करतां ? दादा रागावले आहेत. शांतपणानें बसून कथा ऐका, म्हणून सांगायला सांगितलें आहे," पण तें कोणाला ऐकूं येणार ?

तेव्हां जमीनदारानें भीमूला बोलावून सांगितलें कीं नोकरांनीं सांगितलेलें कोणी

ऐकत नाहींसें दिसतें. म्हणून तूं जाऊन सांग कीं कोणी गलका करूं नये.

भीमरावांनीं बाहेर मांडवांत जाऊन ओरडून सांगितलें, गप्प बसा ! काय ओरडा आरंभिला आहे. कोणी तोंड उघडलें तर त्याला धक्के मारून बाहेर काढीन. भीमराव येण्यापूर्वीं दहा पांच मिनिटेंच आधीं कीर्तन-कारानें कीर्तन सुरू केलें होतें.

लोकांचें बोलणें बंद झालें म्हणून कथेकऱ्याचा आवाज जास्त स्पष्ट ऐकूं आला. भीमूनें मागें फिरून कथेकऱ्याला दटावून विचारलें—"गप्प बसा ! तुम्हांलाच सांगतों आहें, तुम्हांलाच ! सांगतों आहे. तुम्हांला निराळें सांगायला हवें वाटतें ?"

कथेकरी चकित होऊन भीमरावांकडे पाहूं लागला. त्याला काय करावें हें सुचेना. कथेला आलेल्या लोकांना देखील भीम-रावांनीं अशी मध्येंच कथा कां थांबवावी हें कळलें नाहीं. पण सुदैवानें त्याच वेळीं भीमरावांची आजी गांवाहून तेथें आली. भीमरावांनीं तिला पाहिलें व "ओहो, आजी आली आहे का ?" म्हणून धांवत जाऊन तिला नमस्कार केला. नोकरांनीं पुढें जाऊन आजीचें सामान वगैरे घरांत नेलें. जमीनदारानें बाहेर येऊन आजींना आंत बोलावून नेलें.

आजी आली म्हणून भीमरावांनीं मध्येंच कथा थांबविली असेल असा मनाशीं तर्क करून लोकांनीं आपापल्या मनाचें समाधान करून घेतलें.

"ओहो पणजी बाई आल्या आहेत होय ? मग सुरवातीपासूनच कथा आरंभ करतों." असें हरिदासांनीं म्हटलें व कथेस सुरुवात केली.





# वरवंट्याचें माहात्म्य

एका म्हातारीनें मरणसमयीं आपल्या दोघां नातवांना बोलावून सांगितलें कीं बाळांनो ! माझ्याकडे सोनें, चांदी, हिरे माणिक्यें कांहीं नाहीं. सैंपाक घरांत पाटा वरवंटा आहे. थोरल्याला मी पाटा देतें व धाकट्याला वरवंटा. असें सांगून म्हातारीनें प्राण सोडला.

पाटा घेऊन मी काय करणार ? सैंपाकी होऊन का मी आयुष्य कंठणार ? थोरल्यानें पाटा तेथेंच टाकून दिला व मजुरी करून उदरनिर्वाह करूं लागला.

धाकट्यानें विचार केला वरवंटा देण्यांत आजीचा कांहीं तरी हेतू असला पाहिजे. म्हणून तो नेहमीं वरवंटा जवळ बाळगी. त्याला पाहून लोक त्याची थट्टा देखील करीत. तो रानांत जाऊन वाळक्या काटक्या गोळा करून आणी व त्या विकून आपला उदर निर्वाह करी.

एकदां तो काटक्या गोळा करीत असतां एक लांडगा त्याच बाजूला आला व त्याला पाहून भिऊन धाकटा झाडावर चढून बसला.

लांडगा म्हणाला—"मला पाहून भितोस का ? तुझ्याजवळ तो वरवंटा आहे ना ? तो देऊन टाक मला."

मुलानें त्याला विचारलें—"तूं वरवंटा घेऊन काय करणार हें सांग आधीं."

"माझा साथीदार लांडगा आतांच थोड्या वेळापूर्वीं मेला आहे. तुझा वरवंटा त्याच्या नाकाला हुंगवला तर तो पुन्हां जिवंत होईल." लांडग्यानें उत्तर दिलें.

"या वरवंट्याचें एवढें मोठें महात्म्य मला नव्हतें माहीत." मुलगा म्हणाला.

"चल माझ्याबरोबर ! स्वतः डोळ्यांनीं पाहून खात्री करून घे, पाहिजे तर !" लांडगा म्हणाला.

मुलगा झाडावरून खालीं उतरला व रानांत लांडग्याबरोबर निघाला. एका जागीं दुसरा एक लांडगा जमिनीवर अचेत अवस्थेंत पडलेला होता. म्हातारीच्या नातवानें वरवंटा त्याच्या नाकाजवळ नेल्याबरोबर तो जिवंत होऊन उठून उभा राहिला.

"तुझ्या या वरवंट्याचें महात्म्य खरें पाहिलें तर त्याच्या सुवासांत आहे. ही गोष्ट इतर कोणाला कळेपर्यंतच त्याचें हें महात्म्य टिकणार !" पहिल्या लांडग्यानें त्याचें तें महात्म्य मुलाला समजावून सांगितलें व आपल्या साथी लांडग्याबरोबर निघून गेला.

धाकटा आपला वरवंटा घेऊन गांवांत निघाला. त्याला वाटेंत एक मेलेला कुत्रा दिसला. त्यानें आपला वरवंटा त्याच्या नाकाजवळ नेऊन तो हुंगवला. कुत्रा जिवंत होऊन जीवनदान देणाऱ्या उपकार कर्त्या-समोर शेंपुट हालवीत उभा राहिला.

गांवभर धाकट्या नातवाची कीर्ति पसरली. मेलेल्याला जिवंत करणारा संजीवनी वरवंटा त्याच्या जवळ आहे हें लोकांना कळलें.



एकदां राजाची एकुलती एक मुलगी मरण पावली. धाकट्या नातवानें तिला जिवंत केलें. राजानें आपली कृतज्ञता दर्शविण्यासाठीं त्याच्याशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें व त्यालाच आपला वारस म्हणून नेमलें. राजाचा जांवई झाला. तरी त्यानें मृत माणसाला जिवंत करण्याचा आपला धंदा चालूच ठेवला. म्हणून राज्यांत कोणाला मरणाचें भय म्हणून उरलें नाहीं.

एकदां धाकट्या नातवाला एक गोष्ट सुचली. या वरवंट्यांत संजीवनी शक्ति आहे तर म्हातारपण नाहींसें करण्याची शक्ति सुद्धां असली पाहिजे. याची प्रचीति पाहण्यासाठीं तो रोज स्वतः व त्याची बायको वरवंटा हुंगूं लागले. पण रोज रोज वरवंटा उचलून हुंगणें राजकन्येला एक नसता उद्योग वाटूं लागला. पण तिचा नवरा एक मोठा वैद्य आहे. त्यानें विशेष हेतूनेंच रोज वरवंटा हुंगायला सांगितलें असणार असा विचार करून ती नित्यनिय-मितपणें वरवंटा हुंगूं लागली.

यामुळें धाकट्या नातवानें विचार केला होता तसें त्याचें व राजकन्येचें यौवन टिकून राहालें.











तें पाहून चंद्राला राग आला. कारण त्याला वाटे कीं स्थायी यौवन फक्त त्याच्याच वांट्याला आहे. दुसऱ्या कोणाला त्याचा अधिकार नाहीं. म्हणून चंद्रानें धाकट्या नातवाचा वरवंटा चोरून नेण्याचा प्रयत्न सुरू केला.

एकदां धाकट्या नातवाला वरवंट्यावर बुरशी जमा झालेली दिसली. बुरशी पुसून त्यानें वरवंटा उन्हांत ठेवला व स्वतः त्याच्या-वर नजर ठेवण्यासाठीं पाहाऱ्याला बसला.

तें पाहून राजकन्येनें त्याला विचारलें—"तुम्ही होणारे राजे! आणि हें पाहारे-कऱ्याचें काय काम करतां? इतके नोकर आहेत आपल्या घरीं त्यांच्यापैकीं कोणाला तरी कां नाहीं उभा करीत येथें?"

"माझ्या या स्वामीभक्त कुत्र्याशिवाय माझा दुसऱ्या कोणावर देखील विश्वास नाहीं." असें सांगून त्यानें कुत्र्याला तेथें उभें केलें व स्वतः राजवाड्यांत निघून गेला.

नेमका त्याच वेळीं चंद्र खालीं उतरून आला. वरवंटा घेऊन तो पळूं लागला. अमावास्येचा चंद्र होता तो. म्हणून कुत्र्याला तो दिसला नाहीं. पण वरवंट्याचा वास त्याला माहीत होता म्हणून तो चंद्राच्या पाठोपाठ धांवला.

ब्रह्मदेशाच्या लोकांत अशी जनश्रुति आहे कीं तो कुत्रा चंद्राचा पाठलाग आज-पावेतों करीत आहे. चंद्राला ग्रहण लागलें कीं ते म्हणतात कीं कुत्र्यानें चंद्राला धरलें आहे. ग्रहण सुटल्याबरोबर म्हणतात—"आतां कुत्र्यानें चंद्राला सोडलें आहे." त्यांचा असा समज आहे कीं चंद्र मोठा आहे व कुत्रा लहान म्हणून तो चंद्राला गिळून टाकूं शकत नाहीं.






# राजकुमारी जुलेखा

[ २ ]

हसन अंतःपुरांतून बाहेर आला तोंपर्यंत हळू हळू उजाडूं लागलें होतें. हसन राजवाड्याच्या सिंहद्वारापर्यंत येऊन पोंचला आणि पाहारेकऱ्यांची नजर त्याच्यावर पडेल अशा बेतानें तो राजवाड्यांत शिरला व सरळ आंत वजिराकडे गेला.

"मी रात्रभर काळजींत होतों कीं कोठें नाहींसा झालास! मला रात्रभर झोंपच लागली नाहीं. कोठें गेला होतास?" वजिरानें विचारलें.

"डेमास्कसचा एक व्यापारी भेटला. तो शिराजहून बसऱ्याला जात होता. त्यानें मला आपल्या घरीं बोलाविलें होतें. त्याच्या-कडे होतों मी रात्रभर." हसननें सपशेल खोटें सांगितलें.

त्या दिवशीं आणि रात्रीं कैरयाचाच विचार त्याच्या मनांत घोळत होता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं अंतःपुरांतून एक हिजडा हुजऱ्या आला आणि त्याच्या हातांत एक चिठ्ठी देऊन गेला. त्या चिठ्ठींत कोणी तें पत्र लिहिलें आहे याचा उल्लेख नव्हता. "रात्रीं बागेंत भेटायला ये!" एवढेंच लिहिलें होतें. दाट झाडी आहे तेथें आलास तर तुझी प्रेमिका भेटेल, असें देखील त्या पत्रांत लिहिलें होतें.

कैरयाचें त्याच्यावर प्रेम होतें हें हसनला तोंपर्यंत माहीत नव्हतें. आपल्यामुळें अंतः-पुरांतल्या स्त्रियांचें थोडावेळ का होईना थोडेंसें मनोरंजन झालें एवढेंच त्याला वाटलें होतें. पण तें पत्र पाहून मात्र आपलें भाग्य



उदयाला येत असल्याचा विश्वास त्याला वाटला. तो वजिराला जाऊन म्हणाला—"आज मक्केहून माझा एक मित्र आला आहे व त्यानें मला भेटायला बोलाविलें आहे. त्याला भेटायला मी जाणार आहें."

वजिराची परवानगी मिळाल्यावर हसन आपल्या राहण्याच्या जागीं परत आला. त्याच्याकडे कांहीं मोती व मणी होते ते ओवून त्यानें त्यांची एक सुंदर माळ केली. ती माळ घेऊन तो चोर दरवाज्यानें बागेंत शिरला व त्या दिवशीं तो झोंपला ताहो तेथें जाऊन आपल्या प्रेमिकेची वाट पहात उभा राहिला. थोड्या वेळानें कैरया आली.

"हसन, इतर मुलींपेक्षां खरोखरच का मी तुला जास्त सुंदर दिसल्यें? तूं पुन्हां तें वदेपर्यंत माझा माझ्या कानावर विश्वास बसत नाहीं." कैरया म्हणाली.

"तूं माझ्या हृदयाची राणी आहेस. ही मोहनमाळ मी तुझ्यासाठीं स्वतःच्या हातांनीं ओवून आणली आहे. माण्यां-बरोबर आपलें मनदेखील तुझ्या स्वाधीन करीत आहें." हसन म्हणाला.

"तुझे हें गोड शब्द ऐकून मी हंसूं कीं रडूं हेंच मला कळत नाहीं." म्हणून कैरयानें डोळ्याचीं टिपें पुसून टाकली.

"या आनंदाच्या वेळीं तूं आसवें गाळूं लागली आहेस? असें वाईट वाटण्याचें काय कारण झालें?" हसननें तिला विचारलें.

"स्वतः राजकुमारी जुलेखाचें मन तुझ्या-वर बसलें आहे. तिच्या प्रेमाला नकार देऊन तूं माझा हात कसा काय धरणार? तुला केवढा मान मिळेल? वैभव आणि कीर्तीचा तूं मालक होशील. त्या सर्वांचा त्याग करण्याची तुझी प्रतिष्ठा शक्ति तुझ्या अंगांत आहे का?"



"हें काय तूं मनांत घेऊन बसली आहेस? एकच काय, सहस्र राजकन्या मी तुझ्यावर ओंवाळून टाकीन. गादीचा वारस होशील असा मोह घालण्याचा प्रयत्न जरी कोणी केला तरी त्या गादीला लाथ मारून मी तुझा हात धरीन." हसन म्हणाला.

"जुलेखाला दोघांचा राग येईल व तें आपणां दोघांच्या हिताचें नाहीं. तिच्या मनांत आलें तर ती आपल्याला सुळावर देखील चढवील. म्हणून आपण दोघांनीं आपल्या या अयशस्वी प्रेमाबद्दल चार आंसवें गाळून आपापला मार्ग मोकळा करून घ्यावा." कैरया म्हणाली.

हसनला कैरयाचें तें बोलणें असह्य झालें. म्हणाला—"तुझ्या या शब्दांनीं माझ्या हृदयाचे तुकडे होत आहेत. तुला त्यांत काय आनंद वाटतो? तुला येथें राहल्यानें तुझ्यावर संकट येईल अशी भीति वाटत असेल तर चल, आपण दोघे कोठें तरी दूर जेथें मनुष्याचा वास देखील येणार नाहीं. अशा निर्जन स्थानीं जाऊन राहूं. मी तुला वाटत असेल तसा गरीब नाहीं. आपला दोघांचा संसार सुखाचा होईल एवढें धन माझ्याकडे नक्कीच आहे."



तें ऐकून कैरयाला आनंद झाल्यासारखें वाटलें. म्हणाली—"हसन, आतां तुला जास्त वेळ अंधःकारांत ठेवणें मला देखील आवडणार नाहीं. मी कैरया नसून राजकन्या जुलेखा आहें. स्वतःला जुलेखा म्हणणारी माझी सखी कैरया आहे. फक्त तुझी परीक्षा घेण्यासाठीं आम्ही नांवांची अदलाबदल केली होती." असें सांगून तिनें हलकेच टाळी वाजविली. ती ऐकून कैरया पुढें आली व लवून सलाम केला.

जुलेखा हसनला म्हणाली—"त्या दिवशीं मी तुला झोंपलेला पाहिलें तेव्हां पासून तू



माझें मन हिरावून घेतलें आहेस." तिथें रात्रभर गप्पा मारीत बागेंतच बसून राहालीं. उजाडण्यापूर्वी ती तिथें आपापल्या वाटेनें निघून गेलीं.

दोन दिवसांनीं तो बागेंत जाऊन पाहतो तर जागो जागीं शिपाई उभे होते. तो थोडा घाबरला. तो उलट पावलीं घरीं गेला. तेथें एक हिजडा त्याची वाट पाहात उभा होता. हसनच्या हातांत एक पत्र देऊन त्यानें तेथून पाय काढला, जणुंकांहीं वाघच त्याच्या पाठीशीं लागला होता. त्या पत्रांत देखील कोणाची सही नव्हती. पण तें पत्र जुलेखाचें होतें हें ओळखायला हसनला विशेष वेळ लागला नाहीं. त्यांत तिनें तिच्यावर कडक नजर ठेवण्यांत आली असल्याचें लिहून पुढें, आतां भेट होणें कठीण आहे. या करितां आपल्या प्रेमाची गोष्ट कोणाला कळूं नये याची काळजी बाळगावी व एखादी वाईट आणि भयंकर बातमी कळली तरी बिलकुल भिऊं नये असें देखील त्या पत्रांत लिहिलें होतें.

दुसऱ्या दिवशीं गांवभर बातमी पसरली कीं राजकन्या जुलेखा एका एकीं मरण पावली. ती बातमी ऐकून हसन बेशुद्ध होऊन पडला. सुदैवानें वजीर तेथेंच होता. त्यानें औषधोपचाराची व्यवस्था केली. एका आठवड्यानें त्याची तब्येत सुधारली. तब्येत सुधारली होती तरी त्यानें कोठें तरी जाऊन जीव द्यावा असें मनाशीं ठरविलें. कैरयानें लिहून सावध केलें होतें तरी तें तो पार विसरला.

काळोख पडल्यावर हसन शिराज नगरा-बाहेर पडला. रात्रभर तो पाय नेतील तिकडे चालत होता. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं तो एका लहान तलावाच्या काठीं पोंचला.

त्याला पाठी मागून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. त्यानें मागें वळून पाहिलें तर एक तरुण घोडेस्वार येत असलेला दिसला. अंधुक उजेडांत तो एका तरुण राजकुमारा सारखा वाटला. त्यानें सलाम केला तेव्हां त्या तरुणानें पण नुसता सलाम केला. हसनला वाटलें कीं तो मुसलमान नसावा.

"गार वारा सुरू झाला आहे. प्यायला तलावाचें छान पाणी पण आहे. थकवा दूर होईल." कांहींतरी बोलायला विषय हवा म्हणून हसन म्हणाला. तें ऐकून स्मित करीत तो तरुण घोड्यावरून उतरला. त्यानें पाणी प्यायला घोड्याला उभे केलें आणि हसनला कडकडून मिठी मारली. हसनला तोंपर्यंत कळलें नव्हतें कीं तो घोडस्वार तरुण राज-कुमार नसून राजकन्या जुलेखा होती.

कैरयाच्या मदतीनें आजारी पडल्याचें व मरण आल्याचें कसें सोंग केलें हें कैरियानें वर्णन करून सांगितलें. हसन शिराज नगरा बाहेर पडेपर्यंत ती कोठें तरी लपून बसली होती. त्यानंतर त्याच्या पाठोंपाठ त्याचा शोध काढीत तेथवर आली होती. तिनें हसनसाठीं आपल्या बापाचा राजवाडा, आई-बापांचें प्रेम, वैभव आणि भोगविलास सर्वांवर पाणी सोडलें होतें. रात्रभर दोघें त्या तलावाच्या काठींच पडून राहालीं. सकाळ होताच दोघं घोड्यावर बसून डेमास्कसच्या वाटेनें निघालीं.

हसन खलीफाच्या विश्वासपात्र व स्वामी-भक्त दरबारी म्हणून राहूं लागला. पुढें खलीफानें त्यालाच आपला मंत्रीपण नेमलें.

[ गोष्ट संपूर्ण ]





# खोड मोडली

एका गांवांत दोन शेतकरी रहात होते. दोघे मित्र होते. गांवातले लोक दोघांना चांगले ओळखत असत. एक स्वभावानें हुशार होता तर दुसरा भोळा सांब. त्याला लोक भोळोबाच म्हणत. तो अगदीं गरीब होता. त्याच्याकडे घोडा किंवा गाडी कांहीं नव्हतें. त्यानें शेतांत सुरण लावले बाजारांत ते विकायला कसे न्यायचे हा त्याच्यासमोर एक प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला. म्हणून तो दुसऱ्या एका शेतकऱ्याकडे गेला व म्हणाला—"तुझें खेचर मला देतोस का? सुरण विकून आल्यावर तुला तूं मागशील तें भाडें देईन."

पण तो शेतकरी म्हणाला—"माझें खेचर काल दुपार पासूनच कोठें तरी नाहींसें झालें आहे." म्हणून शेतकऱ्याला दुसऱ्या एका शेतकऱ्याकडे जावें लागलें. त्याच्याकडे एक घोडें होतें. तो शेतकरी स्वभावानें फार लोभी होता. भोळोबा त्याच्याकडे गेला व घोडें भाड्यानें देतोस का म्हणून विचारलें. तो म्हणाला—"देईन पण तूं काय भाडें देशील?"

भोळोबानें पांच कोहाळे देतों म्हणून सांगितलें पण त्या लोभी शेतकऱ्यानें पंधरा कोहाळे दिले पाहिजेत म्हणून हट्ट केला व पांच कोहाळे बयाणा म्हणून ठेवून घेतले.

भोळोबानें आपल्या मित्राकडे जाऊन दहा कोहाळे उधार मागितले. त्याच्या मित्राला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"पंधरा कोहाळे भाड्यानें मागतो आहे! बरें तर पाहातो मी!"

श्री. वा. ग. जगदाळे



वाटेंत तो खेचरवाला शेतकरी भेटला व म्हणाला—"माझें खेचर सांपडलें बुवा! पाहिजे तर घेऊन जा!" परंतु भोळोबांनीं त्या लोभी माणसाला पांच कोहाळे बयाणा म्हणून दिलेले होते. तो पेंच प्रसंग कसा सोडवायचा हें भोळाबांना कळेना. तेव्हां त्याचा हुशार मित्र म्हणाला—"मी पाहातों काय करायचें तें."

तिघे त्या लोभी शेतकऱ्याच्या घरीं निघाले. वाटेंत भोळोबाच्या मित्रानें त्याला सांगितलें कीं तूं त्याला सांग कीं मला घोड्याची गरज नाहीं, माझे कोहाळे परत दे. त्यानें नकार दिला तर मी पाहून घेईन.

पण भोळोबाला तें कोडें उलगडेना. त्यानें विचारलें कीं तो परत कां देईल? तो सान्या मुलखाचा लोभी आहे.

"हें बघ त्याची काळजी तूं करूं नकोस. आज त्याची खोड मोडायला चांगली संधी मिळाली आहे. मी म्हणेन त्याला तूं नुसता होकार देत रहा." भोळोबा चकित होऊन त्याच्याकडे पहात उभे राहाले.

तिघांना येत असलेले पाहून लोभी शेतकऱ्याला थोडें आश्चर्य वाटलें. जवळ आल्यावर त्यानें त्यांना विचारलें—"काय भोळोबा? अहो तुम्ही कोहाळे घेऊन यायला गेला होतात ना? आणि यांना काय घेऊन आला आहांत?"

"आम्ही आलों आहों घोडा पहायला! तुमचा घोडा कोठें आहे?" भोळोबाऐवजीं त्यांच्या हुशार मित्रानेंच उत्तर दिलें.

"तो काय उभा आहे तेथें? घोड्याला काय पाहायचं?" लोभी माणसानें विचारलें आणि म्हणाला—"भोळोबा! आणखी दहा कोहाळे आणून दिले नाहींत तर घोडा येथून हलणार नाहीं, विसरूं नका!"



"ओहो हो हो! इतकी घाई कशाला? पहिल्यानें पाहूं तर देशील कीं घोडा पुरतो आहे कीं नाहीं तें?" हुशार मित्र म्हणाला.

"काय पण राव बोलता? अहो घोडा कुठें पुरेसा कीं आहे नाहीं हें कोणी पाहातो का?" हंसत लोभी माणसानें विचारलें.

"तुला काय तें माहीत? मी मापून पाहणार आहें, घोड्याची पाठ!" असें सांगून तो हुशार शेतकरी हातानें घोड्याची पाठ मापूं लागला व म्हणूं लागला—"भोळोबा, तुला दोन टिचा तरी जागा हवी. समज तुला मधें बसविलें व मी पुढें बसलों तर चार टिचा जागा गेली. अन् तुझी बायको कोठें रे बसणार? तिला बसव मागें. आणखी दोन टिचा जागा गेली. अन् तुझी पोरें रे कोठें बसणार? त्यांना बसवूं घोड्याच्या मानगुटीवर? धाकल्या मुलाला त्याची आई घेईल आपल्या जवळ. घेऊं कसें तरी भागवून." तो बोलत गेला.

लोभी माणसाचा जीव खालीं वर होऊं लागला कीं इतकीं माणसें घोड्यांवर बसलीं तर घोडाच बसणार! तो म्हणाला देखील—"एका घोड्यावर किती जण बसणार हो?"



"तें घोडा पाहून घेईल. तुझ्या खांद्या-नाहीं बसत आम्ही! सर्वांनीं पंढरीला जायचें कसें या एवढ्याशा घोड्यावर ही काळजी पडली आहे आम्हांला!" चतुर शेतकरी म्हणाला.

"म्हणजे तुम्ही इतकीं माणसें माझ्या घोड्यावर बसून पंढरीला जाणार?" लोभी मनुष्य घाबरट आवाजांत म्हणाला.

"आहे कठीण पण भागवून घेऊं!" चतुर शेतकरी म्हणाला.

"तर मग मी आपला घोडा माझ्यानें देणार नाहीं." लोभी मनुष्य म्हणाला.

"थोर माणसें शब्द देऊन तो मागें घेत नाहींत. तुला हें माहीत आहे." धूर्त शेतकरी एवढें सांगून भोळोबाला म्हणाला— "अरे तुझी म्हातारी आणि म्हातारा कोठें बसणार विसरूनच गेलास कीं. बकऱ्या कोंबड्या सोडून दे पहिजे तर!" अगदीं निराश झाल्यासारखें दाखवीत तो म्हणाला. लोभी शेतकरी घाबरून ओरडला—"माझ्या घोड्याचा जीव घेण्याचा विचार आहे कीं काय तुमच्या मनांत? हा काय खेळ खंडोबा मांडला आहे? मी नाहीं देणार आपला घोडा."

"बऱ्या बोलानें ठरल्याप्रमाणें घोडा दे नाहींतर तुला कोर्टांत ओढून नेईन. समजलास काय?" चतुर माणसानें दम दिला.

"आपले हे पांच कोहाळे परत घेऊन जा कसा? असा नाहीं घोडा द्यायचा?" तो म्हणाला.

"पंधरा कोहाळ्यांची बोली होती आणि आतां तूं पांच कोहाळे घेऊन जा म्हणतोस? तुझा हा धूर्तपणा या गांवांत नाहीं चालूं देणार राव! समजलां आहांत काय?" चतुर शेतकऱ्यानें विचारलें.

"भोळ्यानें पांचच कोहाळे दिले होते?" लोभी माणसानें विचारलें.

"ते तूं परत देशील. पण बोलीचे पंधरा कोहाळे? घोडा तरी दे नाहीं तर पंधरा कोहाळे तरी दे." चतुर शेतकऱ्यानें हिशोब पटवून त्याच्या गळ्यांत बांधला.

बिचारा लोभी धांवत घरांत गेला आणि भराभर पंधरा कोहाळे बाहेर आणून ठेवले आणि म्हणाला—"हे घे बोलीचे कोहाळे आणि चालूं लाग!"

तिघे कोहाळे घेऊन घरीं परतले.





# राजद्रोही

एक राजा होता. तो आपल्या प्रजेला स्वतःच्या अपत्याप्रमाणें मानून प्रजेच्या सुखाची तो नित्य काळजी वाही. प्रत्येक नागरिकाच्या कष्टसुखाची स्वतःच्या डोळ्यांनीं कल्पना करून घ्यावी म्हणून त्याचा प्रयत्न असे. राजा वेष पालटून नेहमीं आपल्या मंत्र्याबरोबर हिंडत असे. फक्त सकाळीं दरबार भरे त्यावेळीं तो हजर राही. बाकी वेळ तो कोठें व कोणत्या रूपानें हिंडत आहे हें कोणाला माहीत नसे. गादीवर बसल्यापासून नित्यनियमितपणें राजाचा कार्यक्रम असे.

एकदां राजा व त्याचा मंत्री वेष पालटून बराच वेळ राजधानींत हिंडल्यानंतर घरीं परत येत होते तेव्हां त्यांना एक व्यापारी भेटला. त्यानें दोघांना नमस्कार करून एक करंडक दाखविला. राजानें त्या व्यापाऱ्याला विचारलें—"काय आहे या करंडकांत?"

"कांहीं नाहीं, एक सुगंधी चूर्ण आहे, महाराज!" व्यापारी म्हणाला.

व्यापाऱ्यानें आपल्याला ओळखलेलें पाहून राजाला आश्चर्य वाटलें. तरी राजानें आपलें आश्चर्य तोंडावर झळकूं न देतां विचारलें—"काय किंमत आहे याची"

"एक सोन्याची मोहोर!" व्यापारी म्हणाला.

राजानें एका ऐवजीं सोन्याच्या दोन मोहोरा व्यापाऱ्याच्या हातांत ठेवल्या व करंडक घेऊन निघून गेला. राजा व मंत्री राजवाड्यांत परतले नाहींत. सूर्यास्ताची शोभा पाहण्यासाठीं राजधानीबाहेरच्या सरो-



वराच्या काठीं गेले. तेथें राजानें तो करंडक उघडून पाहिला. त्यांत एक चिठ्ठी होती. चिठ्ठींत लिहिलें होतें कीं—

"याचा वास घेतला तर हाताच्या जागीं पंख फुटतात व "फुले" म्हटलें तर हात येतात."

राजा मंत्र्याला म्हणाला—"हें सामान्य चूर्ण दिसत नाहीं. मंत्रवलेलें सुवासिक चूर्ण दिसतें आहे. याचा वास घेतला तर पक्ष्याचें रूप येईल व "फुले" म्हटलें तर पुन्हां मनुष्य रूप येईल. वास घेऊन पाहूं या तर."

राजा व मंत्री दोघांनीं थोडें थोडें चूर्ण हातांत घेतलें व करंडक एका जागीं ठेवून दिला. त्यानंतर त्यांनीं त्या चूर्णाचा वास घेतला. त्याबरोबर त्यांना सारस पक्ष्याचें रूप मिळालें. दोघे उडत सरोवराच्या पलीकडच्या तीरावर गेले. नंतर उडत राजधानी वरून राजवाड्याकडे आले.

संध्याकाळ झाली. दोघे घरीं परत जाण्याच्या हेतूनें "फुले" म्हणाले. पण त्यांना मनुष्यरूप मिळालें नाहीं. मनुष्य रूप मिळावें म्हणून त्यांनीं नानाप्रकारचा प्रयत्न करून पाहिला पण तो सर्व फुकट गेला. शेवटीं दमून भागून त्यांनीं सरोवराच्या काठींच विश्रांति घेण्याचें ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दोघांची झोप मोडली त्यांनीं मासे खाऊन भूक भागवली. चोचीनें पंख धुऊन पुसून स्वच्छ केले आणि पुन्हां उडत जाऊन राजवाड्याच्या कलशावर जाऊन बसले. राज्यांत सर्वत्र गोंधळ उडून गेलेला त्यांच्या नजरेस आला. राजा व मंत्री कोठें गेले? सर्व याच काळजींत होते.

"आमच्याच शोधांत आहांत तुम्ही!" असें निरनिराळ्या प्रकारें ओरडून सांगण्याचा



त्यांनीं प्रयत्न करून पाहिला. पण सारस पक्ष्यांची भाषा कोणाला कळणार? करणार तरी काय ते? पुन्हां उडत सरोवराच्या काठीं परत गेले.

राजा व मंत्री अदृश्य झाल्याची गोष्ट राजवाड्यांतून राजधानींत व देशभर लोकांना कळली. हाहाकार उडून गेला. राजा व मन्त्री वरून तें सर्व ऐकत व पहात होते. त्यांचें सांत्वन करण्यासाठीं दोघे राजधानीवर उडत होते. लोक म्हणत—"या सारस पक्ष्यांना देखील दुःख होत आहे, पहा." पण त्या सारस पक्ष्यांस कोणी ओळखलें नाहीं.

एकदां ते राजधानीच्या मुख्य चौकावरून उडत असतां त्यांना एक मोठी मिरवणूक दिसली. कोणीतरी राजाचा पोशाख घालून अंबारींत बसलेला होता. नव्या महाराजांचा जयजयकार चालू होता. तो सेनापतीचा मुलगा होता. त्याला पाहून राजा मंत्र्याला म्हणाला—"हा राजा झाला तर प्रजेला पिळून काढील."

त्याच दिवशीं सेनापतीच्या मुलाचा राज्याभिषेक पण झाला. तो राज्याभिषेक समारंभ स्वतःच्या डोळ्यांनीं पाहून राजा व मंत्री दुःखी मनानें सरोवराच्या काठीं आले.



"आज आपली ही स्थिति होण्याला कारण सेनापतीच आहे यांत मला तरी आतां शंका उरली नाहीं." राजा म्हणाला. नंतर त्यांनीं परस्परांशीं सल्ला करून कांहीं तरी ठरविलें आणि सरोवरापलीकडच्या काठावर निर्जन रानांत जाऊन राहूं लागले.

आठवडे, महिने व वर्षं लोटलें. राजा व मंत्री सारसपक्ष्याच्या रूपानें त्या निर्जन स्थानीं सरोवरांतील मासे खाऊन स्वतःच्या भाग्याला दोष देत आयुष्य कंठीत होते. ते बेडूक व मासे धरायला गेले तेव्हां त्यांना एक विचित्र दृश्य दिसलें. एक पक्षी



सुतारपक्ष्या सारखा चोचीनें झाडाला भोंक पडून आंतले किडे खाण्याच्या प्रयत्नांत होता. त्याच्या डोळ्यांतून टिपें गळत होतीं.

राजानें कांहीं वेळ तें दृश्य पाहिलें. त्यानें त्या पक्ष्याला विचारलें—"आम्ही बोलत आहों तें तुला कळतें का?"

"हो कळतें!" मागें वळून तो पक्षी म्हणाला.

"तूं आंसवें कां ढाळतो आहेस?" राजानें विचारलें.

"तूं जन्माचा पक्षी, तुला माझें दुःख काय कळणार? मी एक स्त्री होतें आतां मला हें पक्ष्याचें रूप मिळालें आहे." तो पक्षी म्हणाला.

"ऐकूं तर दे तुझी ती करुन कहाणी!" राजानें विचारलें.

"या सरोवराच्या काढच्या राज्याच्या सेनापतीनें माझी ही स्थिति केली आहे. मी राजाची कन्या आहें. वडिलांच्या मागें मीच गादीला वारस होतें. सेनापतीनें मला त्याच्या मुलाशीं लग्न करून घ्यायला सांगितलें. मी त्या नीच माणसाच्या मुलाशीं लग्न करण्यास नकार दिला. म्हणून त्यानें मंत्रबळानें मला पक्षी करून टाकलें आहे. जर कोणी मला पक्षी रूपानें स्वीकारायला तयार झाला तर पुन्हां तो मनुष्य रूप मिळेल असें तो म्हणाला. या पक्षी रूपाचा मला वीट आला आहे व मी त्याच्याकडे गेलें तर तो आपल्या मुलालाच पाठविणार. माझ्या मनांत पुन्हां स्त्री रूप मिळविण्याची इच्छा उत्पन्न व्हावी म्हणून कांहीं लोक रोज या रानांत येऊन मला ऐकूं येईल अशा तऱ्हेनें कांहीं तरी बोलत बसतात. माझ्या प्रजेला सेनापतीनें कसा त्रास द्यायला सुरवात केली आहे ते ऐकून माझें मन फार दुःखी होतें व प्रजेला पुन्हां सुखी करण्यासाठीं आपल्या मनाविरुद्ध स्त्री रूप घेण्याची इच्छा माझ्या मनांत उत्पन्न होऊं लागली आहे."

"ते लोक केव्हां व कोठें येऊन बसतात हें दाखविशील का?" राजानें विचारलें व त्या पक्ष्यानें ती जागा दाखविली.

रात्रीं काळोक व्हायच्या आधीं राजा व मंत्री त्या जागेच्या जवळ झुडपाआड जाऊन बसले. संध्याकाळीं कांहीं लोक पक्ष्यानें दाखविलेल्या जागीं येऊन बसून गप्पा मारूं लागले. त्यापैकीं दोघे स्वतः सेनापति व त्याचा मुलगा म्हणजे तूर्तचा राजा होते. तिथे नव्या राजाचा स्तुतिपाठ करीत होते आणि विचारीत होते—"आपली प्रजा कशी काय वागते? राज्य व्यवस्थेंत ढवळाढवळ करायला कोणी येत तर नाहीं?"

"सुरवातीला प्रजेनें माझा चांगलाच आदर केला व मी गादीवर बसल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. पण तो सुरवातीचा उत्साह थंड पडूं लागला आहे. जुन्या राजाला प्रजा अजून विसरली नाहीं." सेनापतीचा मुलगा म्हणाला.



"मूर्ख आहे प्रजा! जुना राजा आतां त्यांच्या नजरेस देखील पडणार नाहीं. मी त्या साठीं जरूर ती तजवीज करून ठेवली आहे." एक जण म्हणाला. त्यानेंच राजाला तें सुवासिक चूर्ण विकलें होतें. तो व त्याच्या बरोबर आलेले आणखी दोघे मांत्रिक होते.

"राजा व मंत्री दोघांना तूं अदृश्य कसें केलेंस हें सांगशील कीं नाहीं?" दोघांनीं विचारलें.

"मी व्यापाऱ्याचें सोंग घेऊन राजाला भेटलो व एक सुवासिक चूर्ण विकलें. तें

चूर्ण हुंगल्याबरोबर पक्ष्याचें रूप येतें. एका करंडकांत तें चूर्ण व त्याचा उपयोग करण्याची रीत एका कागदावर लिहून ठेवली होती. "फळें!" म्हटल्यास त्यांना पुन्हां मनुष्य रूप येईल. पण मी "फळें" या शब्दाला "फुलें" करून तें लिहून ठेवलें होतें. 'फुलें' 'फुलें' म्हणून ते घोकंपट्टी करीत राहाले तरी त्यांना मनुष्य रूप मिळणार नाहीं." आपण दाखविलेल्या दुष्टपणाचा आनंद दर्शवीत तो जोर जोरानें हंसूं लागला.

राजा व मंत्री तें ऐकून हळूच तेथून निघून गेले व तो पक्षी झाडाच्या बुंधाला चिकटून जेथें बसला होता तेथें गेले. "फळें!" म्हणतांच त्यांना मनुष्य रूप मिळालें. तो पक्षी अजून तेथेंच बसलेला होता. मंत्र्यानें त्याला विचारलें—"तूं माझ्याशीं विवाहास तयार आहेस का?" त्या प्रश्नाबरोबर त्या पक्ष्याची राज-कन्या झाली. तिघें रात्रीच्या काळोखांतच राजधानी कडे निघालीं आणि सूर्योदयाच्या सुमारास राजधानी जवळ येऊन पोंचलीं. द्वार-पालकानें राजाला व मंत्र्याला लगेच ओळखलें. राजा व मंत्री परत आल्याची सुखवार्ता राजधानीभर हां हां म्हणतां पसरली. जागों-जागीं लोक आपल्या पितृतुल्य राजाच्या स्वागतासाठीं जमा होऊं लागले. तोरणें उभीं करण्यांत आलीं.

सेनापति व त्याचा मुलगा राजधानीच्या द्वाराजवळ आले तेव्हां पाहारेकऱ्यांनीं त्यांना धरून त्यांच्या मुसक्या बांधल्या व त्यांना कैदेंत टाकलें.

राजकुमारीचा एका राजकुमाराशीं थाटानें विवाह झाला. सर्व प्रजा पुन्हां सुखी झाली.





# किष्किंधाकांड

वानर दमून भागून, उपाशी व तहानेले मय राक्षसानें निर्मिलेल्या एका विलक्षण स्थानीं येऊन पोंचले. ते एक रम्य तपोवन वाटलें त्यांना. हरणें निरापद हिंडत होतीं. झाडावर पक्ष्यांनी किलबिल सुरू होती. वाऱ्याच्या झुळके बरोबर फुलांचा वास येत होता. ज्या बाजूनें वास येत होता तिकडे जवळ जाऊन पाहतां त्यांना एक विचित्र विवर दिसलें. विवर म्हणजे गुहाच होती ती. गुहेंत वेली व झुडपें उगवली असल्यामुळें आंत जाणें सोपें नव्हतें.

मारुतीनें तें विवर न्याहाळून पाहालें. व म्हणाला—

"आंतून पक्षी बाहेर येत आहेत व बाहेरून आंत जात आहेत यावरून आंत कोठें तरी जलाशय असला पाहिजे बावडी, किंवा तलाव असेल असें मला वाटतें."

म्हणून सर्व वानरांनीं झाडें झुडपें बाजूला सारून त्या गुहेंत प्रवेश केला. आंत काळोख होता. तरी परस्परांचा हात धरून ते बरेच आंत गेले. कांहीं वेळानें आंत त्यांना पुन्हां दिवसासारखा उजेड दिसूं लागला. सोन्या-चांदीचे रत्नखचित महाल दिसले. जागोजागीं अगर, चंदन, फळें, फुलें यांचा मोहक सुवास सुटला होता व रेशमी वस्त्रें यज्ञसाटीं ठेवलेली दिसलीं. तें एक तपोवन असावें





तेव्हां त्या ऋतूंत जाऊनच तीं आणावीं लागतात. तीं देखील एका जागीं मिळत नाहींत. कांहीं आसामच्या बाजूला आहेत तर कांहीं नेपाळांत व कांहीं काश्मीरांत. त्यांत एका झाडाच्या फुलांची गरज आहे. हीं फुलें चार वर्षांतून एकदांच फुलतात. गेल्या वर्षी फुलें येऊन गेलीं."

"आणखी एक धातू बर्फाखालींच सांपडतो. हिमालयाच्या कांचनगंगा शिखराखालीं तो आहे. पण तो काढून आणल्या शिवाय मी राहणार नाहीं." वैद्य म्हणाला.

"मग तें औषध तयार होईल म्हणतां?" राजानें विचारलें.

"मिळेल व खात्रीनें मिळेल." वैद्य ठासून म्हणाला. यापेक्षां माझी अशी सूचना आहे कीं राजकन्येला घेऊन जायला आम्हाला परवानगी द्यावी. औषध देण्यापूर्वी तेल मालिश वगैरेची चिकित्सा करावी लागते. आम्ही बारा वर्षांच्या आंत राजकन्येला घेऊन येतों. औषध पाणी करून तिचे केस वाढवूं व तिला दांत सुद्धां येतील अशी एक दिव्य चिकित्सा करूं." वैद्य म्हणाला.

राजानें राणीला विचारलें—"घेऊन जाऊं देत राजकन्येला? बारा वर्षे चिकित्सा करून ते तिला घेऊन येतील."

राणीनें होकार दिला.

वैद्यबुवा राजकन्येला घेऊन गेले. तिला त्यांनीं ल्हानाचें मोठें केलें, लिहावाचायला शिकवलें आणि बारावें वर्षे लागल्यावर तिला घेऊन आले.

राजानें आपल्या मुलीची लांब वेणी व मोत्यासारखे दांत पाहून वैद्य बुवांच्या दिव्य चिकित्सेची प्रशंसा केली व त्यांना मोठें बक्षिस दिलें.

